








# भारताचा इतिहास



औरंगजेबाचा राज्याभिषेक दोनदां झाला. आग्रा जिंकल्यावरोबर २१ जुलाई १६५८ या रोजीं व पुन्हां १६५९ च्या जून महिन्यांत. दरम्यानच्या काळांत त्यानें आपल्या सर्व शत्रूंचा नाश केला.

५ जानेवारी १६५९ या रोजीं अलाहाबाद नजीक खजुहा येथें शुजाचा पराभव झाला. मीरजुमलानें त्याला ढाक्याला व नंतर आराकानपर्यंत पिटाळून लावलें. पुढें तो कोठें गेला हें कोणाला कळलें नाहीं. दाराशिकोह दिल्लीहून लाहोरला पळून गेला. तेथून तो मुल्तानला गेला. तेथून त्याला गुजराथकडे पिटाळून लावण्यांत आलें. नंतर अजमीरपासून चार मैलांवर देवराय नजीक तीन दिवस औरंगजेबाच्या सैन्याशीं त्याचें युद्ध झालें व त्यांत त्याचा पराभव झाला. त्याला भारतांत कोठेंहि आसरा मिळाला नाहीं. सरहद्द प्रांतांत पळून जात असतां वाटेंत त्याची बायको नादिरा बेगम वारली. त्याचा मित्र अफगाणिस्तानाचा अमीर यानें त्याचा विश्वासघात केला. म्हणून बहादुरखानाच्या हातीं तो कैद झाला. ३० जानेवारी १६५९ या रोजीं त्याचा शिरच्छेद करण्यांत आला.

औरंगजेब 'आलमगीर' म्हणजे 'जगज्जेता' ही पदवी धारण करून गादीवर बसला. सुमारें दोनशें वर्षांपूर्वीच स्थापन झालेलें मोगल साम्राज्य त्याच्या काळांत जास्त पसरलें. बिहारचा गव्हर्नर दाऊदखान यानें १६६१ मध्यें पलमौ जिंकलें व बंगालचा गव्हर्नर मीरजुमला यानें अहोमांवर स्वारी केली. अहोम मंगोल जातीचे लोक होते. ते १२ व्या शतकांत ब्रह्मदेशाच्या उत्तरेकडून ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यांत

५०. औरंगजेबाचा साम्राज्य विस्तार

उतरले. हळू हळू त्यांनीं आपल्या राज्याचा विस्तार केला आणि हिंदूधर्म स्वीकार करून ते तेथेंच कायमची वस्ती करून राहूं लागले.

मीरजुमला १६६१ च्या नव्हेंबर महिन्यांत एक मोठें सैन्य घेऊन ढाक्याहून निघाला. त्यानें अहोमांच्या हातून कूचविहार व आसाम प्रदेश जिंकला. १७ मार्च १६६२ या रोजीं अहोमांची राजधानी गढगांव येथें येऊन धडकला. मीरजुमलाला शत्रूपेक्षां जास्त निसर्गाशींच युद्ध करावें लागलें. शेवटीं त्याला विजयश्री मिळाली. अहोमांचा राजा जयध्वज यानें नुकसान भरपाई व दरवर्षी खंडणी देण्याचें कबूल करून संधी करून घेतली. मीरजुमला १६६३ सालीं मार्च महिन्याच्या ३० तारखेस ढाक्याला परत येत असतां मरण पावला. अहोमांनीं कामरूप राज्यावर पुन्हां अधिकार करून घेतला.

मीरजुमलाच्या जागीं बंगालचा गव्हर्नर म्हणून औरंगजेबाचा मामेभाऊ शाइस्तेखान याची नेमणूक झाली. तो त्या पदावर ३० वर्षें राहाला. त्यानें चांचेगिरी करणाऱ्या पोर्तुगीजांची खोड मोडली.



पश्चिमोत्तर सरहद्दीचा प्रदेश हा औरंगजेबाच्या समोर एक प्रश्न म्हणून उभा होता. तेथील अफगाण स्वभावानें बंडखोर होते. त्या प्रदेशांतली जमीन सुपीक नव्हती. म्हणून ते पंजाबावर चढे करीत व लुटालूट करीत. औरंगजेबानें प्रथम त्यांना धनाचा लोभ दाखवून वश करून घेण्याचा यत्न केला. परंतु ते त्याला जुमानीतनासे झाले. १६६७च्या सुरवातीला भागू नांवाच्या एका सरदाराला आपला पुढारी करून त्यांनीं बंडाळी सुरू केली. त्यांनी हाजरा जिल्हा, पश्चिमी पेशावर, अटक इत्यादींवर स्वाऱ्या





केल्या. पण बंडाचा बीमोड करण्यांत आला. सन् १६७२ मध्यें अफ्रीदी जातीनें अकमलखान याला आपला पुढारी करून मोंगलांच्या विरुद्ध बंड केलें. अकमलखानानें स्वतःला सुलतान म्हणून जाहीर केलें. मोंगलांनीं आफ्रीदी लोकांचें बंड मोडण्याचा यत्न केला परंतु त्या कामीं त्यांना यश मिळालें नाहीं.

अकमलखानाला मोठा कीर्तिलाभ झाला. खत्तक जातीच्या अफगाणांनीं अफ्रीदी जातीशीं सख्य करून घेतलें. त्यांचा पुढारी खुशहालखान एक मोठा कवि होता. त्यानें आपली लेखणी व तलवार दोन्हींच्या सहाय्यानें आपल्या जातिबांधवांना आव्हान केलें. १६७४ मध्यें अफगाण व मोंगल यांचें युद्ध झालें. या युद्धांत मोंगल सेनापति शुजाबतखान ठार झाला.

तेव्हां औरंगजेबाचे डोळे उघडले. सरहद्द प्रांतांत मोंगलांची प्रतिष्ठा पुन्हां कायम करण्यासाठीं तो स्वतः १६७४ च्या जुलाई महिन्यांत पेशावर प्रांतांत गेला. त्यानें इनाम व जहागिरी वांटून कांहीं लोकांना वळवून घेतलें. जे लोभाला बळी पडले नाहींत त्यांच्यावर शक्ती करून त्यांना चिरडून टाकलें. 'फोडा व झोडा' ह्या नीतीचा अवलंब करण्यांत अफगाणिस्तानचा गव्हर्नर अमीरखान व त्याची बेगम यांचेंकडून पुष्कळ मदत मिळाली. औरंगजेब या युद्ध-नीतीला "दोन हाडांची परस्पर मारामारी व दोहींचा धुव्वा" असें म्हणत असे.

सरहद्द प्रांतांत यश मिळालें तरी अफगाण जातीशीं युद्ध करीत असतां मोंगलांचें सैन्यबळ पुष्कळ नष्ट झालें. त्याचा फायदा शिवाजीला झाला.



# नवाबकुमारी

[ ४ ]

आतां पठाण ओरिसा प्रांतांत निर्विघ्नपणें राज्य करूं लागले होते. स्वर्णदुर्ग येथें त्यांनीं आपली राजधानी स्थापन केली. कतलूखानानंतर त्याच्या राज्याला वारस म्हणून सुलेमानखान व उस्मानखान यांना जाहीर करून आणि म्हातारा वजीर ईसाखान याच्या खांद्यावर राज्यकारभाराचें ओझें टाकून मानसिंह निघून गेला.

सुलेमानखान व उस्मानखान दोघांच्या स्वभावांत पुष्कळ फरक होता. सुलेमानखानाला दारूचें व्यसन होतें व तो भोगविलासांत गुरफटून गेला होता. या उलट उस्मानखानाला मोंगलांच्या सत्तेची इतकी चीड होती कीं त्याला भोगविलासांत पडायला वेळच नव्हता. अफगाणांची सत्ता हिंदुस्थानांत पुन्हां कायम करण्याचीं स्वप्नें तो पाहूं लागला. अर्थातच त्याला मानसिंहानें अफगाणांशीं जी संधी घडवून आणली होती ती पसंत पडली नाहीं.

आयशाच्या तुटकपणामुळें देखील उस्मानखानाच्या चित्ताला आराम नव्हता. आयशा कतलूखानाची स्वतःची मुलगी नव्हती, दत्तक घेतलेली मुलगी होती. कतलूखानाची एक बेगम काश्मीरीबेगम म्हणून

श्री दामोदर मुखर्जी













होती. तिच्या मोठ्या भावाची आयशा मुलगी होती. आयशा सहा महिन्याची होती तेव्हांच तिला तिची आई सोडून परलोकीं गेली. म्हणून बापानें आपल्या मुलीला वहिणीकडे नेऊन ठेवलें. पुढें कांहीं दिवसांनीं आयशाचा बाप वारला. तेव्हांपासून आयशा कतलखानाकडेच त्याच्या स्वतःच्या मुलीसारखी लहानाची मोठी झाली. ती जीव कीं प्राण होती कतलखानाला. आयशावर त्याचें स्वतःच्या मुलांपेक्षां जास्त प्रेम होतें.

आयशा व उस्मानखान समवयस्क होतीं. दोघं बरोबरच खेळत लहानाची मोठी झालीं. लहानपणीं जें वहिणभावंडासारखं नातें होतें, मोठेंपणीं तें बदलून त्याच्या जागीं उस्मानखानाच्या मनांत प्रेमांकुर उगवला. परंतु आयशा मात्र त्याला आपला भाऊच मानीत असे. आयशाचें मन जगतसिंहानें हिरावून घेतल्याचें उस्मानखानाला कळलें त्या वेळेपासून त्याच्या मनांत द्वेषाग्नी वाढूं लागला.

एकदां उस्मानखान स्वतःच्या खोलींत बसला असतां तेथें म्हातारा वजीर ईसाखान आला. औपचारिक दुवा सलाम झाल्यावर उस्मानखानानें येण्याचें कारण विचारलें.

“जगतसिंहाला जन्मठेप शिक्षा झाल्याचें आपल्याला कळलेंच असेल?” वजिरानें विचारलें.

“होय, मी पण ऐकलें आहे. पण त्याच्याशीं आपला काय संबंध?” उस्मानखानानें विचारलें.

“असें कळतें कीं महाराज मानसिंहांनीं आपल्याशीं जी संधी केली होती ती अकबर बादशहांना आवडली नाहीं. म्हणून कांहीं तरी कारण काढून त्यांनीं ही संधी रद्द करण्याची खटपट चालू केली आहे.” वजीर म्हणाला.



“या गोष्टीचा जगतसिंहाला झालेल्या शिक्षेशीं काय संबंध?”

“माझ्या मतें संबंध आहे. जगतसिंह पहिल्यासारखा आतां आपला शत्रू राहाला नाहीं. मला असेंदेखील वाटतें कीं आपल्याविषयीं त्याच्या मनांत विशेष प्रेमादर देखील असावा.” वजीर म्हणाला.

म्हाताऱ्या वजिरानें आयशाचें नांव न घेतां चातुर्यानें ती सूचना केली आहे हें उस्मानानें ओळखलें. जगतसिंहाचें आयशावर प्रेम आहे म्हणून अफगाणांविरुद्ध कांहीं करण्याचा विचार त्याच्या मनांत येणार नाहीं हें वजिरानें सुचविलें होतें. पण तीच गोष्ट उस्मानाच्या मनाला बोचली.

“म्हणजे तुम्हांला असें वाटतें होय कीं तो आमच्या भल्यासाठीं अकबर बादशहाकडे आमच्या वतीनें शिफारस करून ही संधी रद्द करूं देणार नाहीं?” उस्मानखानानें खोचक शब्दांत विचारलें.

“होय....” वजीर म्हणाला.

“परंतु मी हें विचारतों या संधीमुळें आपला फायदा काय झाला? सर्व बंगाल आपण काबीज केला होता, तो आपण घालवून बसलों आहों. जगन्नाथपुरीवर देखील मोगलांचा अधिकार आपण मान्य केला आहे. माझ्या मतें अकबर बादशहानें ही संधी रद्द केली तरी काळजी करण्याची कांहीं गरज आपल्याला कां असावी?” उस्मान म्हणाला.



वजीर कांहीं वेळ विचार करून म्हणाला—“या प्रश्नावर मला आपल्याशीं बोलावयाचें नाहीं. मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं तूर्त मोगलांशीं वैर करण्याला पुरेशी शक्ति आपल्यांत नाहीं.”

“हें खरें आहे कीं मानसिंहाशीं समोरा-समोर युद्ध करण्यास आपल्यापैकीं एक-



जणदेखील तयार होणार नाहीं. त्यासाठीं तुम्हीं कांहीं करूं शकाल तर पहा.”

“राज्यकारभाराच्या कामांतून डोकें वर काढायलादेखील माझ्याकडे वेळ नाहीं.”

“ठीक! मग तुम्हीं तेंच पहात रहा. या वयांत युद्धाच्या गोष्टींत मन घालणें तुम्हांला शक्यदेखील नाहीं. संधी व सलोखा हेच सुचतात या वयांत. ही संधी तुम्हांला आवडत असेल. परंतु आम्हांला ती अपमानकारक वाटते. ती रद्द करून मोंगलांशीं युद्ध करण्याचा माझा विचार आहे. त्याच्यासाठीं आवश्यक ती तयारी करून मग मी तुम्हांला काय तें कळवीन.” उस्मान म्हणाला.

“हो, आणखी एक गोष्ट! मानसिंह जगन्नाथपुरीच्या तीर्थयात्रेला लवकरच येणार आहेत. आपल्या राज्यांतूनच त्यांना जावें लागेल. म्हणून त्यांच्या हुद्याला साजेल अशी त्यांची बडदास्त ठेवणें आपलें कर्तव्य आहे.” वजीर म्हणाला.

“अशक्य! आम्ही स्वतंत्र आहों. जसा दिल्लीचा बादशाह तसे आम्ही. हा मानसिंह महाराज झाला तरी दिल्लीच्या बादशाहाचा गुलामच कीं नाहीं?” हें बोलताना उस्मानला आवेश चढला होता.

“आपण कितो स्वतंत्र झालों तरी दिल्लीच्या बादशाहच्या अधीन आहों. ओरिसा प्रांत त्यांच्या कृपेनेंच आज स्वतंत्र आहे हें आपण विसरून चालणार नाहीं.”

“रात्रंदिवस जी गोष्ट आमच्या मनाला कांट्यासारखी बोचत आहे ती विसरून चालणार नाहीं हें म्हणण्याचा काय अर्थ आहे? हा कलंक धुवून निघाल्याशिवाय माझ्या चित्ताला आराम पडणार नाहीं.” असें सांगून त्यानें वजिराला निरोप दिला.

तो त्याच विचारांत गर्क होऊन आपल्या खोलींतून अंतःपुराकडे वळला. त्याच्या डोक्यांत विचार चालू होते,—‘अफगाण व मोंगल यांची जी संधी झाली आहे ती मोंगलांच्याच फायद्याची झाली. कतलखान एकाएकीं मेला नसता तर या संधीचा प्रश्नच उठला नसता. तेव्हां युवराज अफगाणांचा कैदी होता. एका युद्धांत मानसिंहाचा पराभव पण झाला होता. सुलतान अवेळीं मेल्यामुळें अफगाणांच्या राज्यांत अराजकता पसरली. म्हणून अफगाणांना संधी करावी लागली. खरें पाहिलें तर त्यांचा पराभव झालाच नव्हता. ठीक, मानसिंहाचा मानमरातब राखण्याचें काम कोणत्या तरी सरदारावर टाकीन. नजराणा वगैरे मी कांहीं पाठवणार नाहीं.’ असा विचार करीत असतां तो अंतःपुरापर्यंत पोंचला. त्याला आयशाची आठवण झाली व विचाराला कलाटणी मिळाली.

जगतसिंहाला जिवंत जाऊं दिलें ही केवढी मोठी चूक झाली! आयशावर त्याचें प्रेम नसलें तरी तिचें आहे ना त्याच्यावर! त्याचा कांटा दूर होईपर्यंत तिच्या मनांत पालट होणें अशक्य!



असा विचार करीत तो अंतःपुरांत जात असतां काश्मीरीबेगमनें त्याला बोलविलें व म्हणाली—“दहा वर्षांपूर्वी आयशाचे काका, आपली सर्व इस्टेट तिला देऊन पैगंबरवासी झाले. ती इस्टेट तिला देऊन टाकण्याचा विचार असल्याची गोष्ट पंजाबच्या सुबेदारानें नवाबांना लिहून नवाबसाहेबांनीं त्या इस्टेटीचें रक्षण करावें असा निरोप पाठविला. निरोप घेऊन लोक नुकतेच आले आहेत. त्यांनीं परत असा पण निरोप आणला आहे कीं आयशा आतां वयांत आली आहे. म्हणून तिनें स्वतः येऊन












इस्टेट संभाळावी. हें काम तूं करून द्यावेंस असें मला वाटतें."

"आपले इतर बंधु काय करतात?" असें त्यानें विचारलें.

"एक भाऊ पंजाबांत सेनापति आहे. ज्यांनीं आपली सर्व इस्टेट आयशाच्या नांवीं लिहून ठेवली आहे ते जहागीरदार होते. आयशाची आई सुबेदाराची मुलगी." काश्मीरीबेगम म्हणाली.

"म्हणजे आयशाची आई मोगल जातीची व वडील अफगाण होते म्हणावयाचें! तरी कतलखानाच्या दत्तक मुलीला मोंगल सुबेदाराची इस्टेट मिळायला कांहीं अडचण येणार नाहीं म्हणतां?"

"नाहीं, कारण आयशाच्या वडिलांवर अकबर बादशहांची विशेष मर्जी होती. बादशहांनीं त्याविषयीं एक फरमान पण काढलें होतें व ती गोष्ट सर्व दरबाऱ्यांना माहीत आहे."

"हें खरें, पण माझें काम काय?"

"त्याचा विचार आतां तूंच कर! आयशा पंजाब प्रांतांत जावयाचें म्हणत आहे. हवापालट झाल्यास तिची तब्येत थोडी सुधारेल पण."

"आयशाच्या इस्टेटीच्या बाबतींत कांहीं करतां येणें शक्य आहे. पण ती तिकडे निघून गेली कीं इकडे सर्व काळोख!" उस्मान म्हणाला.

"होय, आयशावर तुझें प्रेम आहे व तुमचें दोघांचें लग्न होईल असें वाटलें होतें. पण तूं इकडे यायचें सोडलेंस आणि तिची तब्येत तूं पाहतोसच आहेस!"

"परंतु त्याला आतां मी काय करूं? आयशाला वांचविण्यासाठीं मी वाटेल तो त्याग करायला तयार आहें. कोणाच्यासाठीं तरी ती आपल्या जिवाचे असे हाल करून घेत आहे व तिच्याबरोबर आमच्या जिवाचे पण हाल होत आहेत. मी भेटेन तिला."

"आतां होती येथें. बागेंत गेली असेल. बरें मग पंजाबांत जाण्यासंबंधीं तुझा काय विचार?"

"आयशाचा काय विचार आहे, पाहून मी सांगेन." असें. सांगून तो बागेकडे निघाला.

आयशाच्या शोधार्थ तो सरोवराच्या काठीं, सोनचाफ्याच्या झाडाखालीं व बकुळीच्या झाडाजवळ गेला व शेवटीं उद्यानाच्या मध्य भागीं एक महाल होता तिकडे गेला. आयशा महालांत असल्याचें एका दासीकडून त्याला कळलें.

उस्मान मांजराच्या पावलांनीं आंत गेला. आयशा झोंपलेली होती म्हणून तो परत फिरला. परंतु तिच्या अंगावरून लांब दोरी सारखी कांहीं वस्तु सरकत पुढें जात असल्या-भास झाल्यावर तो थबकला व दासीला आंत जाऊन हळूच पाहून यायला सांगितलें.

दासी आंत जाऊन पाहून येऊन घाबऱ्या आवाजांत म्हणाली—"अग बाई! तो तर एक मोठा सांप आहे."

"जागची हलूं नकोस, बोलूं किंवा ओरडूं नकोस." दासीला बजावून सांगून



उस्मान आंत गेला. एक भयंकर सांप आयशाच्या अंगावर पडून होता. त्याचें डोकें तिच्या डाव्या बाजूला जमिनीवर होतें. ती थोडी हलली कीं तो चांवेल असा विचार मनांत येतांच उस्मानच्या अंगावर शहारे उभे राहिले. त्यानें सांपाची शेपटी धरून सांपाला एका झटक्यासरशी बाजूला केलें. सांप आपला फण उभा करून उस्मानला चांवायला वळला. पण उस्माननें त्याचें डोकें उजव्या हाताच्या मुठींत धरून खूप आवळलें व दासीला तलवार द्यायला खुणावलें. डाव्या हातांत तलवार घेऊन










त्यानें हाताला विळखा घालून बसलेल्या सांपाला जागोजागीं कांपलें व त्याची पकड सुटल्यावर त्याला दूर फेंकून दिलें. तो रक्ताचे डाग धुवायला बाहेर गेला तेव्हां आयशाची झोंप मोडली.

तिला दासीकडून सर्व वर्तमान कळलें व ती झोंपली असतां उस्माननें तेथें यावें हें तिला मुळींच आवडलें नाहीं. ती उस्मानच्या पाठोपाठ गेली व तो हात धूत होता. तेथें जाऊन त्याला म्हणाली—"तूं इतका क्षुद्रबुद्धीचा असशील असें नव्हतें मला वाटलें. माझ्या झोंपण्याच्या जागीं तूं यायला नको होतेंस!"

"आयशा जेथें प्रेम आहे तेथें अपवित्र विचार मनाला शिवत नाहीं. माझें लग्नाचें वय होऊन गेलें असलें तरी मी लग्न केलें नाहीं. मी नवाब आहे, वाटेल त्या स्त्रीशीं लग्न करणें मला अशक्य नाहीं. वाटेल तिला आपली बटीक करून मी ठेवूं शकेन. तुला आपली बेगम करून घ्यायची आहे म्हणून मी आलों नव्हतों. तुझ्या अंगाला हात लावायला मला चोरासारखें येण्याचें कारणच नव्हतें. मी तुझ्याशीं लग्न करून घ्यायचेंच ठरविलें तर मला कोण अडवणार?" एवढें सांगून त्यानें सांपाची गोष्ट पण तिला सांगितली.

आयशाच्या डोळ्यांत टिपें आलीं. त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेत ती म्हणाली—"तूं आपलें हें पवित्र प्रेम माझ्यासारख्या कृतघ्न मुलीवर कां वायां करीत आहेस? सांप चावून मी मेलें असतें तर सुटलें असतें कायमची उस्मान!" असें म्हणत ती घाई घाईनें तेथून निघून गेली.

उस्मान हताश होऊन तिच्याकडे पहात उभा राहाला. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# ल्हान व मोटे

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व स्मशानाच्या दिशेनें गुपचुप चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तूं श्रेष्ठांत श्रेष्ठ पुरुष आहेस. कांहीं खुजांनीं पांचाळ देशाच्या राजाला सतावून सोडलें होतें, तसेंच तुला कांहीं क्षुद्रबुद्धीचे लोक सतावून सोडण्यासाठीं उद्योग करीत असावेत असें मला वाटतें. तुला आज मी त्यांची गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

पांचाळ देशाच्या दक्षिणेकडील सीमेवर एका डोंगराच्या खोऱ्यांत खुजांचें व गिड्यांचें एक राज्य होतें. ते मनुष्य जातीचेच होते परंतु त्यांची उंची बोटाएवढीच होती. परंतु त्यांच्या राजाचा बडेजाव

वेताळाच्या गोष्टी

तसा लहान नव्हता. त्याच्याकडे देखील मंत्री, सामंत, राजकवी व शाहीर होते.

एकदां राजानें एक मेजवानी दिली. मेजवानीला सर्व मुख्य अधिकारी व प्रमुख नागरिक हजर होते. शाहीरांनीं राजाची स्तुति करून पोवाडे म्हटले. राजाच्या मनाचें समाधान झालें. तो सभेंत उभा राहून म्हणाला—"येथें हजर असलेल्या माझ्या नागरिकांनीं माझ्याहून कोणी मोठा राजा पाहिला आहे का?"

"छे, छे!" सर्व गिड्डे नागरिक व मानकरी म्हणाले.

परंतु कोणीतरी खदखदां हंसत असल्याचा आवाज त्याला ऐकूं आला. हंसणारा त्याचा दरबारी कवीच होता. राजानें त्याला हंसण्याचें कारण विचारलें.

"हंसूं नाहीं तर काय रडूं? आपल्या राजधानीपासून एक योजन दूर एक जातीचे लोक राहतात. त्या जातीच्या कोणत्याहि माणसानें जमिनीवर नुसता पाय आपटला तरी आपण सर्व आपापल्या खुर्चीवरून खालीं आदळूं!" कवि म्हणाला.

"या राजद्रोह्याला अंधारकोठडींत टाका." राजानें हुकुम सोडला.

"महाराज! घाई करूं नये. मला फक्त एका महिन्याची मुदत द्यावी. मी जें म्हणालों तें खरें आहे कीं नाहीं या गोष्टीची साक्ष पटवून देईन." कवि म्हणाला.

"ठीक! मी तुला एका महिन्याची मुदत देतों. परंतु या मुदतीच्या आंत तूं म्हणालास तें खरें ठरलें नाहीं तर तुला अंधारकोठडींत टाकण्यांत येईल." गिड्ड्यांचा राजा म्हणाला.

गिड्डा दरबारी कवि 'घरीं' गेला. प्रवासाची तयारी केली व पांचाळ देशाच्या राजधानीकडे निघाला. तो वाटेंत कोठें



थांबला नाहीं. आठवडाभर चालत राहिल्या-वर तो पांचाळ देशाच्या राजधानीच्या गांवीं येऊन पोंचला. द्वारपालकाच्या पायांजवळ उभा राहून तो जोरानें ओरडला. द्वार-पालकानें खालीं लवून पाहिलें. बोटाएवढ्या एका मनुष्याला पाहून चकित होऊन त्यानें ती गोष्ट राजाला कळविली. राजानें पाहारे-कऱ्याला विचारलें—"तो आपल्या कुबड्या-एवढा उंच आहे कां?"

"नाहीं महाराज! तो खुजा आपल्या कुबड्याच्या तळहातावर सहज उभा राहील एवढा आहे." द्वारपालक म्हणाला.

तें ऐकून दरबारांतले सर्व लोक हंसूं लागले. त्या बोटाएवढ्या माणसाला पाहण्या-साठीं सर्व दरबारी सिंहद्वारावर गेले आणि खुजा राजकवीच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहाले.

"महापुरुष हो! थोडे दूरच उभे रहा! तुमच्या श्वासोच्छ्वासाच्या झोंक्यानें मला उभें राहाणेंपण अशक्य झालें आहे. मी तुमच्या राजाच्या भेटीसाठीं आलों आहें. मला आपल्या राजाकडे तो लहान महापुरुष घेऊन जाईल का?" कुबड्याकडे बोट दाखवून राजकवीनें विचारलें.



कुबड्यानें जवळ येऊन हळूच खुजा राज-कवीला आपल्या तळहातावर उचलून घेतलें व राजाकडे घेऊन गेला. त्या विचित्र बोटा-एवढ्या माणसाला पाहून अर्थातच राजाला पण आश्चर्य वाटलें व आनंद झाला. त्या खुजा राजकवीनें आपल्या देशांतील गमतीदार गोष्टींचें वर्णन करून राजाला चकित करून सोडलें. त्याची काव्यशक्ति पाहून दरबारी लोकांनीं माना हलविल्या.

राजा म्हणाला—"राजकवी! तुम्ही आमचें आतिथ्य निदान तीन दिवस स्वीकारून मग स्वदेशीं जावें."



“महाराज, कबूल! पण एका अटीवर. तुम्ही आपल्या कुबड्याला माझ्याबरोबर पाठविलें पाहिजे.” राजकवि म्हणाला. राजानें तें कबूल केलें. राजकवि राजाच्या इच्छेला मान देऊन त्या राक्षस जातीच्या राजधानींत राहाला. परंतु त्याला सुख म्हणून काडी इतकेंहि लाभलें नाहीं. कारण त्याला पाहाण्यासाठीं पांचाळ देशाचे रहिवाशी येत. एकाद्या नवीन धरून आणून ठेवलेल्या माकडासारखी त्याची गत झाली. ते तीन दिवस तीन युगासारखे गेले त्या बिचाऱ्याला. चौथ्यादिवशीं तो कुबड्याला बरोबर घेऊन स्वदेशीं परतला या खेपेस कुबड्यानें त्याला आपल्या पगडींत बसवून घेतलें असल्यामुळें त्याला स्वदेशीं पोंचायला फार वेळ लागला नाहीं व चालण्याचा त्रासपण विशेष सोसावा लागला नाहीं.

कुबड्याला दुरून येत असलेला पाहून “अरे, राक्षस आला!” असे ओरडून खुजे पळूं लागले. खुजांच्या राजाच्या कानावर ती भयंकर बातमी पोंचली कीं राजकवि कोणत्या-तरी राक्षसाला बोलावून घेऊन येत आहे. राजानें राजकवीला बोलावून विचारलें— “आम्हां सर्वांना ठार करण्यासाठीं या राक्षसाला कोठून घेऊन आलास?”

“तो कांहीं राक्षस नव्हे, तो सुद्धां एक मनुष्यच आहे. त्याचा तो भव्य देह पाहून तो राक्षस असावा अशी भीति वाटणें साहजिक आहे. आणखी हें पहा, तो सुद्धां त्यांच्या जातींतला एक खुजा व कुबडा आहे. त्या जातीचीं माणसें त्याच्या चौपट उंचीचीं असतात.” राजकवि म्हणाला.

कांहीं दिवसांनंतर खुजांचा राजा कोणाला कांहीं कळविल्याशिवाय राजकवीनें वर्णिलेल्या पांचाळ देशांत राक्षसाकृती माणसें पाहाण्यासाठीं घोड्यावर बसून गेला.



तो राजवाड्याजवळ पोंचला तोंपर्यंत काळोख पडला होता. एक प्रहर रात्र होऊन गेली होती. सर्व झोंपूं लागले होते. खुजांच्या राजाला भयंकर भूक लागली होती. तो सिंहद्वाराखालच्या फटींतून राजवाड्यांत शिरला. खायला कांहींतरी मिळेल या आशेनें तो सैंपाकघरांत गेला. तेथलीं लहान भांडीदेखील त्याला फार मोठी भासलीं. एका लहानशा भांड्याची कडा धरून तो वर चढण्याचा यत्न करूं लागला तेव्हां त्याला गोड व खमंग वास आला. त्या भांड्याच्या तळाला थोडी खीर होती. खुजांचा राजा भांड्यावर चढून आंत उतरला, पण गळ्यापर्यंत खिरींत बुडला. त्याला चढून परत वर येतां येईना.

सैंपाकिणींनीं सकाळीं त्याला पाहिलें व तो खुजा राजकवीच असावा असें समजून त्याला घेऊन त्या राजाकडे गेल्या.

खुजांचा राजा कुबड्याला पाहूनच घाबरला होता. सामान्य आकृतीच्या त्या महाकाय सैंपाकिणींना पाहून त्याची बोबडीच वळली. पांचाळ राजाला पाहून तो ओरडला— “मला सोडा! मी खुजा जातीच्या लोकांचा राजा आहें.”



पांचाळ देशाच्या राजानें थट्टेंत दरडावून विचारलें—“ कावरे! मग तूं असा लपून छपून आमच्या देशांत कां शिरलास. माझ्या दासींनीं तुला धरलें म्हणून बरें झालें. आतां मी तुला कोठें जाऊं देणार नाहीं.”

खुजांचा राजा हताश झाला. खुजा जातीच्या लोकांना त्यांचा राजा कोठें निघून गेला हें कळलें नाहीं. पांचाळ देशाच्या कैदेंत तो आहे हें कळायला पुष्कळ दिवस लागले. ती बातमी कळतांच खुजांचा राजकवि पांचाळ देशीं आला व आपल्या राजाला सोडण्याची त्यानें पांचाळ राजाजवळ विनंती केली.

“ नाहीं सोडलें तर तुम्ही काय करणार रे!” पांचाळ राजानें विचारलें.

“ आम्ही हट्टाला पेटलों तर काय वाटेल तें करूं. कारण आमच्या बाजूला संख्याबळ आहे.” राजकवि म्हणाला.

“ ठीक! तरमग मी पाहातोंच तुम्ही काय करतां तें. मी नाहीं सोडीत तुमच्या राजाला.” पांचाळ राजा म्हणाला.

त्या वर्षी पांचाळ देशांतलीं सर्व पिकें नष्ट झालीं. एक मूठभर धान्यदेखील मिळालें नाहीं. भयंकर दुष्काळ पडला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून विचारूं लागला—“ राजा! मला एका गोष्टीची शंका आहे. लहान कोण व मोठा कोण? बोटा एवढीं माणसें जास्त शक्तिशाली कीं सामान्य शरीर असलेलीं माणसें? तूं माहीत असून या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील.”

विक्रमार्क म्हणाला—“ फक्त एकाच गोष्टीकडे लक्ष देऊन आपण लहान मोठ्यांचा फरक करतों. परंतु या जगाच्या पाठीवर सर्व तऱ्हेनें सर्वांत लहान किंवा मोठा असा कोणीच नाहीं. रावणाला वरप्राप्ती होती. स्वतः देवेन्द्र ज्याला जिंकूं शकला नाहीं त्याला शेवटीं माकडांनींच नाहीं का जिंकलें? आपल्या मोठेपणाचा कोणी टेंभा मिरवूं लागला कीं त्याची मान खालीं होते. लहानांत लहान मनुष्यदेखील अपमान असह्य झाला कीं महाशक्तिशाली होतो.

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व जाऊन झाडाला लोंबकळूं लागला. [ कल्पित ]





# वजिराचा मुलगा

तुर्कस्तानांतल्या सुलतानाच्या अनेक बेगमा होत्या. त्याला एकूण चाळीस मुलें होतीं. त्यांतल्या सर्वांत लहान मुलाचें वय लग्नाचें झालें तेव्हां सुलतान आपल्या सर्व मुलांना बोलावून म्हणाला—“ तुम्ही सर्व लग्न करून घ्या.”

सर्व भावडांचें परस्परांवर सख्ख्या भावडांसारखें प्रेम होतें. सर्वांनीं बराच वेळ परस्परांशीं विचार करून एक गोष्ट ठरविली व आपल्या वडिलांना जाऊन म्हणाले— “कोठें चाळीस बहिणी असतील तर आम्ही त्यांच्याशीं लग्न करायला तयार आहों.”

“ एकाच घरांत चाळीस बहिणी? शक्य तरी आहे का?” सुलतानानें विचारलें.

“ शक्य नसेल तर आमचीं लग्नेंदेखील अशक्य.” सुलतानाचीं सर्व मुलें म्हणालीं.

मुलांचा तो हट्ट पाहून व त्यामागील भावना ओळखून सुलतानानें ती गोष्ट राज्यभर जाहीर केली. त्यानें आपल्या शिपायांना राज्यभर चवकशीसाठीं पाठविलें. एका घरीं एकुणचाळीस मुली होत्या. पण चाळीस बहिणी एकाच घरीं कोठें आढळल्या नाहींत.

आपल्या देशांत नाहींत तर जगांत कोठें असें कुटुंब मिळणार नाहीं का? सर्व जग हुडकून काढा. अशा कुटुंबांतच आम्ही लग्न करणार.” सुलतानाचीं मुलें म्हणालीं.

सुलतान तरी काय करणार? तो त्या गोष्टीस कबूल झाला. त्याच्या मुलांनींच स्वतः असें कुटुंब शोधून काढण्याचें ठरविलें व देशपर्यटनास निघाले. तेव्हां राजानें आपल्या वजिराच्या मुलाला बोलावून त्यांच्या













बरोबर जायला सांगितलें. म्हणाला— "आपल्या राज्याची हद्द पार केल्यावर वाटेंत एक विहीर लागेल. तेथें तुम्हीं झोंपूं नका. कांहीं अंतर पुढें चालून गेल्यावर उतरण्या जोगी एक जागा मिळेल. तेथें देखील तुम्ही झोंपूं नका. नंतर एक वाळवंट लागेल. वाळवंट पार होईपर्यंत झोंपूं नका. यांतलें एक अक्षरदेखील विसरूं नका. आतां काम पुरें करून लवकर परत या."

सुलतानाचा निरोप व आशीर्वाद घेऊन वजिराचा मुलगा व सुलतानाचें सर्व मुलगे निघाले. राज्याच्या हद्दीपलीकडे त्यांना विहीर लागली. संध्याकाळ होऊन गेली होती. सर्वांनीं घोड्यावरून उतरून खाऊन पिऊन घेतलें. कांहीं वेळ गप्पागोष्टी झाल्या. मोठा मुलगा म्हणाला—"मी फार दमलों आहे बुवा. पुढें नाहीं जाववत मला. काळोख पडला आहे. आजची रात्र येथेंच काढूं या."

"येथें झोंपूं नका म्हणून सुल्तानांनीं बजावून सांगितलें आहे!" वजिराचा मुलगा म्हणाला.

"अरे आपण एकेचाळीसजण आहों, आपल्यावर असें काय संकट येणार?" सुलतानाचे मुलगे म्हणाले. म्हणून ते रात्रीं तेथेंच झोंपले. परंतु वजिराचा मुलगा मात्र झोंपला नाहीं.

अर्धी रात्र लोटल्यावर कोणी तरी येत असल्याची चाहूल त्याला लागली. तो तलवार उपसून उभा राहिला. कांहीं अंतरावर त्याला एक सात फण असलेला नागसांप दिसला. तो तलवार घेऊन सांपाच्या अंगावर धांवला. वजिराच्या मुलानें नाग-सांपाचा एक एक फण कापून टाकला. त्याचे सहा फण एकाच जागीं पडले. पण सातवां फण फरपटत सरकत विहिरींत जाऊन पडला.

असें कां व्हावें हें कळावें म्हणून त्यानें विहिरीवरचें दोरखंड घेऊन त्याचें एक टोंक एका मोठ्या दगडाला बांधलें व दुसरें टोंक आपल्या कमरेला बांधून तो विहिरींत उतरला. अगदीं तळाला गेल्यावर त्याला एक दार दिसलें. तें दार उघडलें तेव्हां त्याला एक सुंदर राजवाडा दिसला. वजिराचा मुलगा त्या वाड्यांत गेला. दोन्ही बाजूला खोल्या होत्या. प्रत्येक खोलींत एकेक सुंदर स्त्री बसलेली होती. चाळीस खोल्यांत चाळीस मुली होत्या. एका अनोळखी माणसाला पाहून त्या भ्याल्या.

"तुम्हांला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मी आतांच सात फणवाल्या एका नागसांपाला ठार केला आहे. एक फण विहिरींत पडला म्हणून मी त्याच्या पाठोपाठ येथवर आलों." वजिराचा मुलगा म्हणाला.

तें ऐकून त्या म्हणाल्या—"आज आम्हांला सुटका मिळाली. आम्ही चाळीस बहिणी आहों. म्हणून तूं आम्हां सर्वांना बरोबर घेऊन जा."

"तुम्ही इतके दिवस धीर धरलात तसाच आणखी कांहीं दिवस धीर धरा. मी वेळेवर येऊन तुमचा उद्धार करीन."





असें सांगून वजिराचा मुलगा दोरखंड धरून विहिरींतून वर चढून आला. सुलतानाचीं सर्व मुलें घोरत पडलेलीं होतीं. तो देखील झोंपला.

सुलतानाचीं मुलें उजाडल्यावर उठलीं व म्हणालीं—" काय पण छान झोंप आली होती नाहीं ! बाबांनीं उगीच भीति दाखविली होती आम्हांला. चला, पुढें निघूं या." वजिराच्या मुलानें नागसांपाविषयीं त्यांना कांहीं सांगितलें नाहीं. ते दिवसभर मजल दर मजल करीत एका जागीं येऊन पोंचलें. " ही जागा विश्रांतीं घेण्यासारखी आहे. रात्र येथेंच राहूं या." मोठा मुलगा म्हणाला.

" हें पहा, पुन्हां तूं सुलतानांनीं दिलेल्या सूचनेविरुद्ध बोलत आहेस." वजिरानें सुलतानांनीं दिलेल्या सूचनेची आठवण करून दिली.

" होय रे ! कळली त्यांची सूचना. त्यांनीं त्या विहिरीजवळ झोंपूं नको म्हणून नव्हतें का सांगितलें ? काय झालें ?" सुलतानाचा मोठा मुलगा म्हणाला.

सुलतानाचे सर्व मुलगे रात्रीं तेथें झोंपले. फक्त वजिराचा मुलगा एकटा झोंपला नाहीं. तो पाहारा देत बसला. अर्धी रात्र लोटल्यावर तसाच सात फण असलेला नाग सांप त्याला दिसला. परंतु हा त्याच्याहून जास्त भयंकर दिसत होता. वजिराच्या मुलानें मागचा पुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व तलवार उपसून त्याच्यावर तुटून पडला. स्वतःचा बचाव करीत शेवटीं त्यानें त्या सांपाचे सातही फण उडवले. या खेपेस-देखील फक्त सातवां फण फरफटत एका विहिरींत जाऊन पडला. वजिराचा मुलगा त्या विहिरींत उतरला. तेथें त्याला एका दारापलीकडे एक राजवाडा दिसला. त्यांत



देखील चाळीस दालनें होतीं. परंतु या दालनांत सुंदर मुलींच्या ऐवजीं रत्नें व माणिक्यें होतीं.

वजिराचा मुलगा पुन्हां वर आला व आपल्या जागीं झोंपीं गेला. सकाळीं उठून सर्व पुढें निघाले. डोंगर व खोरीं ओलांडून गेल्यावर त्यांना एक वाळवंट लागलें. त्यांनीं पोटभर खाऊन घेतलें व तेथेंच ती रात्र काढण्याचें ठरविलें. या खेपेसदेखील वजि-राच्या मुलानें सुलतानांनीं दिलेल्या सूचनेची आठवण करून दिली. पण त्याच्याकडे सर्वांनीं दुर्लक्ष केलें व सर्व झोंपीं गेले.

त्यांना झोंप लागली असेल नसेल, भूकंप होतो तशी जमीन हादरली. एक मोठा नागसांप दुरून येत असलेला त्यांना दिसला. त्याला सात फण होते. त्याच्या तोंडांतून ज्वाळा येत होत्या. तो ओरडला—" माझ्या दोघां भावांचा वध करणारा तुमच्यांत जो आहे त्याला येऊं द्या समोर ! त्याला भस्म करून टाकतों मी !"

त्या नागसांपाला पाहाल्याबरोबर सुलता-नाच्या मुलांचें धाबें दणाणलें. त्या सांपाला ठार करण्याच्या कामीं त्यांच्यापैकीं एकाची देखील मदत कामाला येणार नाहीं हें

















ओळखून वजिराचा मुलगा म्हणाला—" तुम्ही सर्व आल्या वाटेनें परत जा. वाटेंत काल रात्रीं आपण जेथें झोपलों होतों तेथें जवळच एक विहीर आहे. त्या विहिरींत उतरून तुम्ही गेलांत कीं तुम्हांला एक दार दिसेल. दारांतून आंत गेलांत कीं एक राजवाडा दिसेल. त्यांत चाळीस दालनें रत्नमाणिक्यांनीं भरलेलीं आहेत. आपण परवां रात्रीं ज्या विहिरीजवळ झोंपलों होतों त्या विहिरींत तसाच एक वाडा दिसेल. त्या वाड्यांत चाळीस खोल्या आहेत व प्रत्येक खोलींत एक मुलगी आहे. त्या सर्व बहिणी आहेत. तुम्ही त्यांना घेऊन जा व लग्नें करून घ्या. मी या सांपाचा समाचार घेतों. याच्या हातून वांचलों तर तुम्हांला येऊन भेटेन. नाहीं तर माझी वाट पाहूं नका."

वजिराच्या मुलानें सांगितल्याप्रमाणें सुलतानाचे मुलगे मागें परतले. वजिराचा मुलगा एकटा त्या भयंकर सांपावर तुटून पडला. कित्येक तास दोघांची झोंबाझोंब चालू होती. दोघे दमले. परंतु कोणी कोणाला जिंकूं शकला नाहीं.

वजिराच्या मुलाला ठार करणें आपल्याला शक्य नाहीं हें ओळखून नागसांपानें एक युक्ति योजली. म्हणाला—" थांब! आपण संधी करूं या."

" कसली संधी आणि ती कशी बुवा?" वजिराच्या मुलानें विचारलें.

" तूं इराणच्या राजकन्येला आणून दिलेस तर तुझ्याशीं वैर सोडायला मी तयार आहें."

" पण तेथें जायचें कसें?" वजिराच्या मुलानें विचारलें.

" हा लगाम मी तुला देतों. थोड्या वेळानें एक पांढरा घोडा येथें येईल. तो रोज येथें चरायला येतो. तूं त्याला हा लगाम घालून तुला कोठें जायचें आहे तें सांग, तो तुला एका क्षणांत पोंचता करील. तुझें काम पुरें होईपर्यंत तूं त्याला ठेवून घे आणि राजकुमारीबरोबर परत ये." असें सांगून नागसांप नाहींसा झाला.

सकाळीं उजाडतांच एक सुंदर घोडा आकाश मार्गे त्या जागीं उतरला व चरूं लागला. वजिराच्या मुलानें त्याला लगाम घातला आणि वर बसून म्हणाला—" मला इराण देशाच्या बादशाहाच्या राजवाड्यांत पोंचता कर."

क्षणार्धांत घोडा इराणच्या बादशाहाच्या राजवाड्यांत पोंचला. " आतां मी तुझी आठवण काढीन तेव्हां हजर हो!" असें सांगून वजिराचा मुलगा घोड्यावरून खालीं उतरला. घोडा अदृश्य झाला.

वजिराचा मुलगा राजवाड्यांत न जातां एका म्हातारीच्या दुकानांत शिरला व तिच्याजवळ त्या गांवची माहिती विचारली. म्हातारी म्हणाली—" सात फण असलेल्या नागसांपानें राजकन्येला मागणी घातली. बादशहानें नकार दिला. तेव्हांपासून नाग-सांपाचें बादशाहाशीं वितुष्ट आलें. आतां





हें वितुष्ट केव्हां व कसें मिटणार त्या खुदावंद करीमलाच माहीत. नागसांपाच्या भीतीनें बादशाहानें आपल्या मुलीला राजवाड्यांत न ठेवतां आणखी एका जागीं ठेवलें आहे."

"तुम्हांला माहीत आहे का आजी ती जागा?" वजिराच्या मुलानें विचारलें.

"हें पहा, तें एक मोठें गुपित आहे! राजवाड्याच्या उद्यानांत एक लहानसें घर आहे. त्यांत राहते राजकन्या. उद्यानावर नेहमीं कडक पाहारा असतो." म्हातारी म्हणाली.

ज्या मुलीवर इतकी कडक नजर आहे तिला उचलून नेणें म्हणजे थट्टा नव्हे. म्हणून वजिराचा मुलगा मजुराचा वेष करून उद्यानांत शिरला. तो पाहारेकऱ्यांना म्हणाला—"बागेंत काम करायला आलों आहें." त्यांनीं त्याला माळ्याकडे पाठविलें. माळ्यानें तो एक तरुण हुशार मुलगा आहे हें पाहून झाडांना पाणी घालणाऱ्या नोकरांवर नजर ठेवायला त्याला नेमलें.

वजिराच्या मुलाचें सौंदर्य त्या वेषांत लपलें नाहीं. राजकन्येनें त्याला पाहिलें व तो खिडकीजवळ येऊन काम करवीत असतां तिनें त्याला विचारलें—"कोण रे बुवा तूं? आणि इकडे कसा काय आलास?"

"मी तुर्कस्तानाच्या वजिराचा मुलगा. मी दोघां सात फण असलेल्या नागसांपांना ठार केलें आहे. तिसऱ्या नागसांपाच्या सांगण्यावरून इकडे आलों आहें." वजिराचा मुलगा म्हणाला.

सात फणवाल्या नागाचें नांव ऐकतांच राजकन्येचा चेहरा पांढरा फट्ट पडला.

पण वजिराचा मुलगा म्हणाला—"तूं भिऊं नकोस. तूं माझ्याबरोबर आलीस तर त्याला खात्रीनें ठार करतां येईल."



त्याच्या बोलण्यावर राजकुमारीचा विश्वास बसला आणि ती रात्रीं त्याच्याबरोबर पळून गेली. दोघें उद्यानाच्या मागच्या दारानें बाहेर निघून गेलीं.

वाटेंत वजिराचा मुलगा म्हणाला—"त्या सांपाचा जीव कोणत्यातरी गुप्त स्थानीं आहे. नाहींतर मी त्याला केव्हांच ठार केला असता. तुला त्या गुप्तस्थानाची माहिती काढून घेतां येईल का? तूं मी सांगतों तसें कर. तूं रडण्याचें सोंग कर. सारखी रडत रहा. तो विचारील, रडण्याचें कारण काय? तेव्हां सांग, चहूंकडे त्याचे शत्रू आहेत. त्याचा जीव घेण्यास टपले आहेत. त्याचा जीव त्यांनीं घेतला तर तूं काय करणार? नंतर तुझे वडील तरी तुला परत घरांत पाऊल टाकूं देतील कां? असें सांगून जास्तच मोठ्यानें रडूं लाग. तुला धीर देण्यासाठीं तो त्याचा जीव कोठें आहे हें सांगेल. तूं तें मला सांग. पुढचें मी पाहून घेईन."

बादशाहाच्या मुलीनें वजिराच्या मुलानें सांगितल्याप्रमाणें रडण्याचें सोंग केलें आणि सांपानें त्याचा जीव समुद्रापलीकडे एका किल्ल्यांत एका सिंहाच्या पोटांत असल्याचें तिला सांगितलें.



तें कळतांच वजिराच्या मुलानें आपल्या जवळचा लगाम काढून घोड्याचें स्मरण केलें. त्याबरोबर घोडा प्रगट झाला. वजिराचा मुलगा त्याच्या पाठीवर बसून क्षणार्धांत समुद्रापलीकडच्या किल्ल्यांत जाऊन पोंचला. किल्ल्यांत पाऊल टाकल्याबरोबर त्याला खायला तो सिंह गुरगुरत त्याच्या अंगावर धांवला. वजिराचा मुलगा त्याला ठार करण्यासाठीं तयार होताच. त्यानें तलवारीनें त्याचें डोकें उडवलें व त्याच्या पोटांत तलवार भोसकली. त्याच्यांतून एक कबूतर बाहेर आलें व उडूं लागलें. परंतु वजिराच्या मुलानें त्याला धरलें.

तो त्या कबुतराला धरून पुन्हां घोड्यावर बसून सांप रहात असे त्या जागीं येऊन पोंचला. त्याच्या हातांत कबुतराला पाहून नागसांप थरथर कांपूं लागला.

“तो माझा जीव आहे. तो एकदां माझ्या हातांत दे. मी जन्मोजन्मीं तुझी आठवण काढीन.” सांप म्हणाला.

वजिराच्या मुलाला त्याचा कावा कळला नाहीं. तो तें कबूतर सांपाला देऊं लागला. परंतु बादशहाच्या मुलीनें त्याच्या हातांतून कबूतराला हिसकावून घेतलें. त्याचा गळा मुरगळून त्याला दूर जमिनीवर फेंकून दिलें. त्याबरोबर नागसांपानें जमिनीवर अंग टाकलें.

वजिराचा मुलगा राजकन्येला बरोबर घेऊन घोड्यावर बसून बादशहाच्या राजवाड्यांत आला. आपल्या शत्रूला वजिराच्या मुलानें ठार केलें असल्याचें ऐकून बादशहाला आनंद झाला. त्यानें आपल्या मुलीचें लग्न तिचें रक्षण करणाऱ्या वजिराच्या मुलाशीं करून दिलें.





# परोपकारी गोपाळ

गोपाळच्या गांवीं किराण्या मालाचें दुकान उघडण्यासाठीं म्हणून एका गांवच्या पंढरी नांवाच्या एका तरुण माणसानें कांहीं पैसे जमविले होते. परंतु त्याला शंभर रुपयाची तूट भासली. त्याला आपल्या गांवकऱ्यांकडून ती रक्कम मिळाली नाहीं. तेव्हां त्याचा एक मित्र त्याला म्हणाला— “अरे डोक्याला इतका त्रास घ्यायची गरजच काय? तूं ज्या गांवीं दुकान उघडणार आहेस त्याच गांवीं परोपकारी गोपाळ राहतो. त्याच्याकडे जाऊन मागितलेस तर तो नाहीं का देणार? त्याच्या गांवच्या लोकांच्या सोयीसाठीं तू दुकान काढतो आहेस याहून जास्त परोपकार काय असणार. म्हणून तो खात्रीनें देईल व परत कधीं मागणार देखील नाहीं.

पंढरीला तो सल्ला पसंत पडला व तो गोपाळकडे गेला. त्यानें शंभर रुपये मागितले तेव्हां गोपाळनें त्याला विचारलें— “दान म्हणून मागतो आहेस कीं कर्ज म्हणून?” गोपाळचा तो प्रश्न ऐकून पंढरीला आश्चर्यच वाटलें. त्याचें कारण असें झालें कीं गोपाळ एकदां आपल्या गुरुजींकडे गेला होता. तेव्हां गुरुजींनीं गोपाळच्या दानधर्माविषयीं सविस्तर चवकशी केली व उपदेश केला—“हें पहा, हें जग आहे. दान करतांना पात्र व अपात्र पाहून दान करावें. लुळ्या पांगळ्यांना दान करावें. धड धाकट माणसांना दान काय करायचें? फार तर कर्ज द्यावें. ती सुद्धां मदतच आहे. नंतर कर्जाऊ दिलेले पैसे परत मिळविण्याचा यत्न न केल्यास कर्जदाराच्या

मुद्दल व व्याज ] [श्री. मा. गो. मोरे










माथीं जेवढें पाप असतें तेवढेंच कर्ज देणाऱ्याच्या माथीं पण लागतें."

गुरूचा तो उपदेश लक्षांत ठेवूनच गोपाळनें तो प्रश्न पंढरीला केला होता. पंढरी ऐटींत म्हणाला—"कोणासमोर भीक मागण्याची स्थिति अजून तरी आली नाहीं. मी कर्जाऊ पैसेच मागत आहें. तीन महिन्यांनीं व्याजासकट सर्व रकम परत करीन. किती टक्के व्याज तेवढें सांगा."

"अरे तीन महिन्यांनीं तूं देणार आहेस ना, मग व्याजबीज काय? मूळ रकम आणून दिलीस कीं पुरें." गोपाळ म्हणाला.

"मग कागद लिहून देऊं का?" पंढरीनें विचारलें.

"तुला स्वतःच्या शब्दावर भरंवसा नसेल तर दे." गोपाळ म्हणाला.

पंढरी शंभर रुपये घेऊन गेला. गोपाळनें, कोणत्या तार खेला पंढरीला शंभर रुपये दिले तें एका वहींत टिपून ठेवलें.

पंढरीनें स्वतः कबूल केलेली तीन महिन्यांची मुदत संपली. परंतु त्यानें पैसे परत केले नाहींत. कारण त्यानें पाहिलें कीं गोपाळचा दानधर्म चालू होता. फक्त त्यानें पैसे मागितले तेव्हांच गोपाळनें कर्जाची गोष्ट काढली होती.

गोपाळनें एक वर्षभर वाट पाहिली व पैसे परत न आलेले पाहून तो पंढरीकडे गेला. म्हणाला—"गृहस्था! तूं पैसे घेऊन एक वर्ष होऊन गेलें. तीन महिन्यांनीं परत करतों म्हणाला होतास. पण तूं पैसे परत करण्याचें नांवच काढलें नाहींस? दुकान नीट चाललें आहे ना?"

"आहे, बरें चाललें आहे. पण हातांत पैसा राहील तर ना. मी लवकर स्वतः परत आणून देईन. तुम्हीं उगीच तसदी कशाला घेतां?" पंढरी म्हणाला.





"हें पहा, तुला देणें शक्य नसेल तर तसें सांग. दान केले म्हणून समजून मी गप्प बसेन." गोपाळ म्हणाला.

त्यावेळीं दुकानांत चार माणसें उभी होतीं. त्यांच्यासमोर गोपाळनें तसें म्हटलेलें पंढरीला आवडलें नाहीं. म्हणाला—"छे! हें काय बोलतां? कर्जाऊ म्हणून घेतले तर ते कर्जाऊच आहेत." असें सांगून तो गोपाळला जरा बाजूला घेऊन जाऊन म्हणाला—"सर्व रक्कम एकदम देणें थोडें जड जात आहे, हो! दहा दहाचा हप्ता दर महिन्याला देतों."

गोपाळ त्याला कबूल झाला. पंढरीनें पहिला हप्ता म्हणून दहा रुपये देऊन गोपाळला निरोप दिला. त्यानंतर दर महिन्याला तो दहा रुपये देऊं लागला.

कर्ज म्हणून घेतलेले पैसे गोपाळला परत द्यावे लागले या गोष्टीचा राग पंढरीच्या मनांत होता. तो निरनिराळ्या प्रकारें गोपाळची नालस्ती करूं लागला. गोपाळ दुकानांत येऊन प्रत्येक वेळीं दहा रुपये घेऊन जाई तेव्हां कोणीतरी दुकानांत असेच. त्यांना पंढरी म्हणे—"हा या गांवचा एक मोठा मनुष्य. दानी कर्ण म्हणवितो





स्वतःला. मी एकदां शंभर रुपये याच्याकडून घेतले होते त्याचें व्याज दहा रुपये दर महिन्याला वसूल करतो आहे."

गोपाळच्या विरुद्ध पंढरीनें जें खोटें सांगितलें तें ऐकून गोपाळला ओळखणाऱ्या लोकांना आश्चर्य व वाईट वाटलें. त्यांत राघवशेट नांवाचे गोपाळचे एक स्नेही होते. त्यांच्याजवळ देखील पंढरीनें तसेंच कांहीं तरी खोटें सांगितलें. तें ऐकून राघवशेट त्यालाच रागावले. तें ऐकून पंढरी म्हणाला—"हें पहा, राघवशेट! गोपाळरावांना व्याजाची रक्कम मला किती कष्टानें द्यावी लागत आहे, हें माझें मलाच माहीत. हें कर्ज फिटेपर्यंत सुखाचा एक घास घशाखालीं उतरत असेल तर शपथ. मी बायकोचे दागिने विकून हें कर्ज फेडून टाकण्याचा विचार करीत आहें. तुम्ही चांगली किंमत मिळवून दिलीत तर तुमचे आभार मी मानीन." असें सांगून त्यानें खरोखरच बायकोचे दागिने राघवशेटच्या समोर आणून ठेवले.

खरी गोष्ट अशी होती कीं पंढरीचा व्यापार वाढत चालला होता. भांडवल जास्त हातांत राहालें तर व्यापारांत वाढ होईल व फायदा पण होईल, या हेतूनें त्यानें बायकोचे सर्व दागिने विकून भांडवल वाढविण्याच्या विचारानें राघवशेट यांच्याकडे दागिने गहाण ठेवून पैसे मागितले. राघवशेटला त्याचें बोलणें खरें वाटलें. परंतु गोपाळवर त्याचा जो विश्वास होता तो कसा कमी होणार? गोपाळकडे जाऊन त्यानें पंढरीकडून व्याजाचे किती पैसे घेतले होते हें विचारलें. गोपाळनें खरें खरें तें सांगून टाकलें. म्हणाला—"मी त्याला शंभर रुपये दिले होते व त्यानें तीन महिन्यांच्या आंत परत करतों म्हणून वचन दिलें होतें. एका वर्षानंतर मी जाऊन विचारलें तेव्हां म्हणाला, दहा दहा रुपयांच्या हप्त्यानें फेडतों. त्यानें आतांपर्यंत नव्वद रुपये मला परत केले आहेत. त्यानें आणखी दहा रुपये दिले तर कर्जाची रक्कम फिटेल. मी व्याज मागितलें नव्हतें व मला त्याची अपेक्षा पण नाहीं."

तें ऐकून राघवशेटला राग आला. पंढरीनें असें खोटें कां बोलावें? तो गोपाळला म्हणाला—"उद्यां, दहा वाजतां मेहरबानी करून तुम्ही पंढरीच्या दुकानावर या. तो उरलेले सर्व पैसे परत करणार आहे." राघवशेटनें तसें कां सांगितलें गोपाळला कळलें नाहीं. परंतु राघवशेट व्यापार धंद्यांत चोख होता. म्हणून राघवशेटच्या विषयीं त्याच्या मनांत आदर वसत असे. म्हणून गोपाळनें पंढरीच्या दुकानांत जायचें कबूल केलें."

दहा वाजायला दहा मिनिटें कमीच होतीं, राघवशेट पैसे एका पिशवींत घालून गांवांतल्या दोघां प्रमुख व्यापाऱ्यांना बरोबर घेऊन पंढरीच्या दुकानावर हजर झाला. म्हणाला—"हे घे पंढरी! तुझ्या दागिन्यांचें पैसे. गोपाळकडून घेतलेलें कर्ज फेडून मोकळा हो कसा!"













इतक्यांत गोपाळ तेथें आला. राघवशेट त्याला म्हणाला—"या, गोपाळराव! आम्ही तुमच्याच विषयीं बोलत होतों. पंढरीनें तुमचें कर्ज फेडण्यासाठीं बायकोचे सर्व दागिने विकून टाकले. तुमचा तगादा नकोसा झाला होता बिचाऱ्याला. एक ल्हानसा व्यापारी आणि इतकें व्याज देणें त्याला शक्य होईल का? तुम्हीच विचार करा. हे घ्या मुद्दल शंभर रुपये आणि दहा महिन्यांचें व्याज दहा रुपये, एकूण रुपये एकशें दहा." तो गोपाळला एकशें दहा रुपये देऊं लागला.

गोपाळनें चकित होऊन विचारलें—"अहो हे काय राघवशेट? अहो, पंढरीनें माझ्याकडून फक्त शंभर रुपयेच घेतले होते व एकदम सर्व रुपये देतां आले नाहींत म्हणून दर महिन्याला दहा दहा रुपयांप्रमाणें परत करीत होता. मला फक्त दहा रुपयेच मिळणें बाकी आहेत. वर हे शंभर रुपये कसले?"

ती गोष्ट राघवशेटला गोपाळकडून पूर्वीच कळली होती. पण ग्रामस्थांना माहीत नव्हती. त्यांचीदेखील समजूत अशीच होती कीं गोपाळ गरिबाकडून दर महिन्याला दहा रुपये व्याजाचे वसूल करीत होता. परंतु गोपाळला बदनाम करण्यासाठीं पंढरी तें सांगत होता हें त्यांना माहीत नव्हतें. त्यांना पंढरीचा राग आला व त्यांनीं त्याची छान हजेरी घेतली.

गोपाळ फक्त दहाच रुपये घेऊन निघून गेला. पंढरीची मान खालीं करण्याचा हेतु त्यांच्या मनांत नव्हता. त्या दिवसापासून पंढरीच्या दुकानांत गिऱ्हाइक कमी होऊं लागले व त्याला व्यापारांत तूट येऊं लागली.





# राजकन्या हंसली

एका राजाला एक सुंदर मुलगी होती. तिच्या सौंदर्याची प्रसिद्धी देशभर होती. मोठमोठ्या राजघराण्यांतील राजकुमार तिला पहायला आले. पण ती त्यापैकीं कोणाशीं बोलायला किंवा भेटायला तयार नव्हती. ती कधीं कोणाशीं बोलत नसे कीं हंसत खेळत नसे. तिच्या चेहऱ्यावर स्मित म्हणून कोणाला कधीं दिसलें नाहीं.

आपल्या मुलीनें मोठमोठ्या घराण्यांतल्या राजकुमारांशीं लग्न करण्याचें नाकारल्यावर राजानें जाहीर केलें कीं जो कोणी माझ्या मुलीला हंसवील त्याच्याशीं मी तिचें लग्न करून देईन व त्याला आपलें अर्धें राज्य देऊन टाकीन.

तें ऐकून कित्येक लोक आपल्या भाग्याची परीक्षा करून गेले. लंगडे, कुबडे, खुजे, विदूषकसुद्धां येऊन गेले. पण त्यांपैकीं एक जणदेखील तिला हंसवूं शकला नाहीं. तेव्हां राजानें नवीन नियम केला प्रयत्न करून हारणाराला तीन तीन फटके दिले जातील. तेव्हांपासून कोणी पुढें पाऊल टाकायला धजलाच नाहीं.

परंतु राजाच्या किल्ल्या लगतच्या एका गांवीं एक गरीब शेतकरी रहात असे. त्याला तीन मुलें होतीं. त्यानें मोठ्या मुलाला बोलावून भाग्याची परीक्षा करून यायला सांगितलें. त्याच्या अंगांत पुष्कळ व्यंगें होतीं व त्याला पाहूनच लोक हंसत. म्हणून शेतकऱ्यानें त्याला पाठविलें.

शेतकऱ्याचा मुलगा राजाकडे गेला व म्हणाला—"मी हंसवितों राजकन्येला." राजाला थट्टाच वाटली. त्यानें त्याला यत्न

सौ. मंगला तारकर



करून पहायला सांगितलें. पण त्याला यश आलें नाहीं व तीन फटके खावे लागले.

शेतकऱ्यानें त्यानंतर आपल्या दुसऱ्या मुलाला पाठविलें. त्याचा एक पाय लहान होता व एक लांब, मग त्याची चालण्याची ढब पाहून हंसूं कां नाहीं येणार ? तो राजाकडे गेला व राजानें त्यालादेखील यत्न करून पहायला सांगितलें. पण त्यालादेखील यश आलें नाहीं व तीन फटक्यांची शिक्षा झाली. तो घरीं परत आला.

शेतकऱ्यानें आपल्या तिसऱ्या मुलाला पाठविलें. त्याचें नांव होतें संगू. अक्कल नांवाची वस्तु त्याच्या गांवीं देखील नव्हती. त्याला कांहीं काम येत नसे. पण मजा अशी कीं तो स्वतःच जायला तयार झाला. शेतकरी त्याला पाठवायला तयार नव्हता. पण मुलानें हट्टच धरल्यावर बापानें त्याला जायला परवानगी दिली.

तिसरा मुलगा राजवाड्यांत जाऊन राजाला म्हणाला—"महाराज ! मला राजवाड्यांत कांहीं तरी काम द्यावें. राजानें त्याला नदीवरून कावडीनें पाणी भरण्याचें काम दिलें.

एकदां तो नदीवर जाऊन पाणी भरूं लागला तेव्हां भांड्यांत एक मासा आला. तो घेऊन जात असतां वाटेंत त्याला एक म्हातारी भेटली. तिच्या हातांत एक बदक होतें. तें बदक सोनेरी रंगाचें होतें व दिसायला फारच सुंदर होतें.

संगू म्हातारीला म्हणाला—"आजी बाई ! तुमच्या जवळचें तें बदक किती सुंदर आहे हो ! मला कां नाहीं देऊन टाकीत ?"

म्हातारीनें त्याच्या भांड्यांतला मासा पाहून त्याला बदकाऐवजीं मासा देतोस कां म्हणून विचारलें. संगू त्याला कबूल झाला. म्हातारीनें मासा घेऊन त्याला तें बदक देऊन टाकलें व म्हणाली—"हें साधें बदक नाहीं बरं का ? याला कोणी हात लावला व तूं म्हणालास कीं, चिकटूनचा जा व बरोबर ये !' तर तो मनुष्य बदकाला चिकटून जाऊन त्याच्याबरोबर येईल."

"छान, छान ! असें बदक असल्यावर वाटेल तितके मासे धरतां येतील नाहीं."
असें सांगून संगू तें बदक घेऊन राजवाड्याकडे निघाला. वाटेंत त्याला आणखी एक म्हातारी भेटली. म्हणाली—"किती सुंदर आहे रे तुझें बदक !" आणि बदकाच्या अंगावर हात फिरवूं लागली. लगेच संगू म्हणाला—"चिकटून जा आणि बरोबर ये !" म्हातारीच्या हात बदकाला चिकटला व तिला बदकाबरोबर यावें लागलें.

ते थोडे अंतर चालून गेले. समोर एक मनुष्य येत असलेला दिसला. त्याचें त्या म्हातारीशीं भांडण झालें होतें. त्यानें म्हातारी नजरेस पडतांच तिला लात मारली. त्याबरोबर संगू म्हणाला—"चिकटून जा व बरोबर ये !" त्याचा पाय म्हातारीच्या अंगाला चिकटला व त्याला लंगडत चालावें लागलें. एका लोहारानें लंगडत चालणाऱ्या आपल्या मित्राला ओळखलें व त्याला



सोडविण्यासाठीं म्हणून त्याचा हात धरून ओढलें. लगेच संगू म्हणाला—" चिकटून जा आणि ये बरोबर !"

अशा तऱ्हेनें ही मिरवणूक राजवाड्यांत पोंचली. ते राजवाड्याच्या मागच्या दारानें आंत शिरले. त्यांचा ओरडा ऐकून राजवाड्यांतल्या सैंपाकिणी गंमत पहायला धांवल्या. त्यांच्या हातांत पळी व झारा होता. संगूच्या हातांतलें बदक पाहून एक म्हणाली—" काय पण गोजिरवाणें आहे हें बदक, आणि बदकाच्या अंगावर हात फिरवायला निघाली." पण लोहार म्हणाला—" बदकाला हात लावूं नकोस !"

तें ऐकून एक सैंपाकीण म्हणाली—" कोणरे तूं, मधें चोंबडेपणा करायला ! माकड कुठलें !" आणि आपल्या पळीनें तिनें लोहाराला मारलें. त्यावरोबर संगू म्हणाला—" चिकटून जा आणि बरोबर ये !" झालें सैंपाकिणीला पण त्या मिरवणुकीबरोबर चालावें लागलें. त्या सर्वांना राजवाड्याच्या आंतल्या पटांगणांत घेऊन जाऊन संगू त्यांना सरकशीच्या घोड्यासारखा गोल फिरवूं लागला. तें अद्भुत दृश्य पाहून राजवाड्यांतली कुत्रीं भुंकूं लागलीं. खूप गर्दी जमली गंमत पहायला. राजा, राजकुमारी व दासी वरच्या मजल्यावरून ती गंमत पाहूं लागली. राजकुमारीनें तें दृश्य पाहिलें व तिला हंसूं आवरेना. इतकी हंसूं लागली कीं हर्षरोग तर नाहीं झाला असें राजाला वाटलें. सहस्रावधि लोकांनीं आपल्या डोळ्यांनीं राजकन्येला हंसतांना पाहिलें व म्हणाले—" राजकन्या हंसली !"

राजानें वचन दिल्याप्रमाणें संगूशीं तिचें लग्न करून दिलें.





# वीरसिंह

एका गांवीं चांभाराचें एक घर होतें. चांभाराला एकच एक मुलगा होता. मुलगा हुशार होता. वाडवडिलांचा धंदा चांभाराचा. तो त्यानें शिकून घेतला व त्यांत प्राविण्य संपादन केलें. परंतु वयांत आल्यावर त्याला त्याचें तें जग ल्हान भासूं लागलें. त्यानें खुल्या आकाशांत आपल्या पंखांची शक्ति आजमावून पाहण्याचें ठरविलें. त्यानें आपलें नांव वीरसिंह ठेवून घेतलें व बहाद्दुर शिपायाला शोभतील अशी वस्त्रें व एक तलवार विकत घेतली. नंतर भाग्याची परीक्षा करून घेण्यासाठीं राजधानींत आला. तो राजाला म्हणाला—" महाराज ! माझें नांव वीरसिंह सैन्यांत भर्ती होऊन आपल्या राजाची सेवा करण्यासाठीं आलो आहें."

राजानें चकित होऊन चांभार तरुणाकडे न्याहाळून पाहिलें व म्हणाला—" म्हणजे तूं आजपर्यंत कधीं युद्धांत भाग घेतलेला नाहींस ! पण तुझा उत्साह पाहून मी तुला नोकरीला ठेवून घेतों. राजधानी नजीकच्या रानांत एक राक्षस राहातो. त्यानें कित्येक लोकांना आजपर्यंत खाऊन टाकलें आहे. रोज एका दोघांना तो खातो. त्याला ठार करण्याची कामगिरी मी तुझ्यावर टाकतों. आहेस का तयार ?"

" तयार आहें ! मला यश मिळालें तरी किंवा त्याच्याशीं युद्ध करीत असतां मेलों तरी माझ्या कुळाचें नांव उजागर होईल." चांभार तरुण म्हणाला.

" त्या राक्षसाला ठार करण्यासाठीं आजपर्यंत मी अनेक तरुणांना पाठविलें. परंतु

श्री सा. स. मोहिते



त्या राक्षसानें त्या सर्वांना खाऊन टाकलें. म्हणून बजावून ठेवतों." राजा म्हणाला.

"मी त्या राक्षसाचें डोकें आणून महाराजांच्या पायांवर ठेवतों." वीरसिंह ताठ उभा राहून म्हणाला.

वीरसिंह शूर होता व साहसी पण होता. तरी त्या क्रूर राक्षसाचें वर्णन ऐकून थोडा घाबरला. परंतु एक गोष्ट त्याला आठवली. राक्षसांच्या अंगांत शारीरिक बळ किती असलें तरी बुद्धी शून्यच असते. त्यानें तांदुळाची पिठी घेतली आणि पिठींत राख घालून त्याचे दगडासारखे गोळे करून घेतले. रानांत कांहीं अंतर चालत गेल्यावर त्याला राक्षसाचें घर दिसलें. तो त्या घराजवळ एका झाडावर चढून राक्षसाची वाट पहात बसला.

सूर्यास्ताच्या सुमारास राक्षस येत असल्यासारखें वाटलें. जमीन हादरूं लागली. राक्षस झाडाच्या ज्या फांद्या बाजूला सारी त्या तुटूनच जात. झाडावर बसलेले पक्षी घाबरून ओरडत उडूं लागले. वीरसिंह बसला होता त्या झाडाजवळ राक्षस आला तेव्हां त्याला नरगंध आला व तो थबकला आणि "हं" असें म्हणून वीरसिंहाकडे पाहूं लागला. "तूं तेथें बसला आहेस होय? उतर खालीं! नाहींतर झाडासकट तुला उचलून दूर फेंकून देईन." राक्षस म्हणाला.

"थांब जरा, हा आलोंच तुझ्या समाचाराला. जगांत माझ्यासारखा बलवान दुसरा कोणी नाहीं, हें माहीत नसेल तुला कदाचित. तूं अजून मला ओळखलेलें दिसत नाहीं. माझें नांव वीरसिंह आहे." वीरसिंह म्हणाला.

"खरें वाटत नाहीं मला!" राक्षस म्हणाला.



"खरें वाटत नाहीं तर नीट डोळे उघडून पहा. हे पाहिलेस माझ्या हातांतले दगड, चुरा करून टाकतों यांचा तुझ्यासमोर." असें सांगून वीरसिंहानें ते गोळे काढले व दोन्ही हातांनीं ते फोडून त्यांचा चुरा फेंकून दिला.

राक्षसाला वीरसिंहाच्या शक्तीवर विश्वास बसेना. परंतु मनांतल्या मनांत तो घाबरला खरा. तरी एवढासा मनुष्य हा, दगडाचा चुरा कसा काय करतो बुवा? अशी शंका त्याच्या मनांत राहून गेली.

"तूं एवढा शक्तिवान आहेस म्हणतोस तर ये खालीं. चल माझ्या घरीं. आपण बरोबर राहूं. तुला माझ्या घरीं चांगलें पंच पक्वान्नांचें जेवण मिळेल." राक्षस म्हणाला.

वीरसिंह झाडावरून खालीं उतरला. दोघे राक्षसाच्या घरीं गेले. पण घरीं गेल्यावर राक्षस म्हणाला—"अरे हो, पण सैंपाकाला लाकडेंच नाहींत. जाऊन घेऊन येतोस का लाकडें?"

"खोड झाडाचें झाडाच्या फांद्या कीं काय आणूं? तीं झाडें दिसत आहेत ना त्यांतलें एक उपटून घेऊन येऊं का? टाकीन तुझ्या अंगणांत." वीरसिंह म्हणाला.



राक्षसानें विचार केला कीं यानें सारें झाड उपटून आणून टाकलें तर आणखी काय मोडतोड करील कोणास ठाऊक? म्हणाला—"राहूं दे, कांही जरूर नाहीं. मीच जाऊन लाकडें घेऊन येतों."

राक्षस कुऱ्हाड घेऊन गेला आणि चार ओणकीं तोडून घेऊन आला. लाकडें सैंपाक घराजवळ टाकीत म्हणाला—"पण पाणी आहे कोठें सैंपाकाला?" बालडी भरून पाणी घेऊन येतोस का विहिरीवरून?"

"बालडी भर पाणी? अरे चांगलें बळकट दोरखंड असेल एखादें तर दे. विहीरच उचलून घेऊन येतों. आपल्या अंगणांत विहीर ठेवून घे कायमची." वीरसिंह म्हणाला.

राक्षसाला शंका वाटली कीं हा काय गप्पा मारतो आहे कीं म्हणे, विहीरची विहीर घेऊन येतों. पण त्यानें पुन्हां विचार केला कीं खरोखरीच घेऊन आला तर! म्हणून म्हणाला—"राहूं दे, मीच घेऊन येतों, पाणी." असें सांगून राक्षस स्वतःच एक मोठी बालडी घेऊन गेला.

त्या दिवशीं रात्रीं झोंपण्याची वेळ होई-पर्यंत वीरसिंह आपल्या शक्तीच्या वल्गना करून राक्षसाला भीति दाखवीत राहला आणि राक्षसाचें भय वाढतच राहालें. राक्षसानें रात्रीच्या रात्रीं वीरसिंहाला वाटेला लावण्याचें मनाशीं ठरविलें. म्हणाला—"माझ्याकडे झोंपायला एकच एक पलंग आहे. आपण दोघे त्याच्यावर झोंपूंया. तूं एका बाजूला पडून राहा." वीरसिंह त्याला कबूल झाला.

राक्षसाचा तो पलंग फारच मोठा होता. राक्षस एका बाजूला झोंपल्यावर वीरसिंह दुसऱ्या टोंकाला झोंपण्याचें सोंग करून पडून राहाला. परंतु थोड्या वेळानें त्यानें तो झोंपला होता त्या जागीं एक भोपळा



ठेवून दिला व स्वतः पलंगाखालीं। जाऊन बसून राहाला.

थोड्या वेळानें राक्षसाची झोंप मोडली. त्यानें विचार केला वीरसिंहाला झोंप लागली असावी. त्यानें एक पहार घेतली व भोपळ्याला वीरसिंहाचें डोकें समजून दणा-दण मारूं लागला. त्याला वाटलें कीं सुटलों एकदांचा.

राक्षसानें पहार दूर फेंकून दिल्याचा आवाज ऐकून वीरसिंह पलंगाखालून उठला व भोपळ्याचे तुकडे बाजूला सारून पुन्हां आपल्या जागीं झोंपत म्हणाला—"या पलंगांत ढेंकूण फार आहेत बुवा! रात्रभर झोंप नाहीं मला."

तें ऐकून राक्षसाला घाम सुटला. आतां यांच्या हातांतून आपला जीव वांचविणें कठीण, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तो स्वतः जाईल तेव्हां खरा.

दुसऱ्यादिवशीं राक्षसानें भीतभीत वीर-सिंहाला विचारलें—"कायरे बुवा! आज तूं काय खाणार? रात्रीं तूं अगदींच बेतानें जेवलास म्हणून विचारतों.



"हें पहा, काल रात्रीं तूं भेटलास त्याच्या आधीं मी दोन रानटी रेडे खाल्ले होते, म्हणून मला भूक नव्हती. आज तूं जितकें खाशील तितकें मी खाईन. ठरली मग दोघांची पैज!" वीरसिंहानें विचारलें.

राक्षसानें दोन मोठीं तपेलीं भरून भात केला. मणभर वांगीं भाजी म्हणून शिजविली. सैंपाक झाल्यावर दोघे जेवायला बसले. भात व भाजी दोघांनीं अर्धी अर्धी वांटून घेतली. वीरसिंहानें आपल्या सदऱ्या-खालीं एक चामड्याची पिशवी ठेवली होती. त्या पिशवींत तो भात व भाजी राक्षसाची नजर चुकवून भरीत गेला. मधून मधून एकाध घास खाई.

जेवण संपलें राक्षसानें जेवढा भात व भाजी खाली होती तेवढीच वीरसिंहानें खाली होती हें पाहून राक्षसाला आश्चर्य वाटलें.

“परंतु मी भात भाजी चावल्याशिवाय गिळत गेलों होतों व तूं मात्र चावून चावून खात होतास. अर्थातच मी जिंकलों.” वीरसिंह म्हणाला.

“सर्व तुझ्या पोटांत आहे तेव्हां तूं चावून चावून खालेंस कीं गिळत गेलास हें कळायला मार्ग? मी नाहीं कबूल करणार.” राक्षस म्हणाला.

“पाहिजे तर मी आपलें पोट चिरून दाखवितों.” असें सांगून वीरसिंहानें आपल्या अंगरख्याखालची पिशवी वरपासून खालपर्यंत चिरून टाकली. भात व भाजी बाहेर आली. “माझ्यासारखें तूंदेखील आपलें पोट कापून दाखविलेंस तर तूंच जिंकलास हें मी कबूल करीन.” वीरसिंह म्हणाला.

राक्षस माघार घ्यायला तयार नव्हता. त्याला चेव चढला. त्यानें वीरसिंहाचा चाकू घेऊन आपलें पोट चिरलें आणि जागच्या-जागीं मरून पडला. वीरसिंहानें त्याचें डोकें कापून घेतलें व राजाला नेऊन दाखविलें. राजा त्याचा पराक्रम पाहून इतका खूष झाला कीं त्यानें राजकन्येचें लग्न त्याच्याशीं करून दिलें.

त्यानंतर वीरसिंहाच्या शौर्याची परीक्षा घेण्याची जरूरच पडली नाहीं. जे राक्षस जवळपासच्या रानांत रहात असत त्यांनीं वीरसिंहाच्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकल्या व घाबरून दूरच्या रानांत पळून गेले. वीरसिंहच गादीला वारस होता म्हणून राजा मरण पावल्यावर तोच गादीवर बसला.





# उत्तरकांड

या खेपेस कुबेर आपले दोघे मंत्री शुक्र व प्रोष्ठपद यांना बरोबर घेऊन रावणाकडे आला. तो रागावलेला होताच. कुबेर रावणाला म्हणाला—“दुष्ट रावणा! मी तुला किती समजावून सांगितलें. पण तूं माझें एकदेखील ऐकलें नाहींस. अज्ञानवश कोणी विष खायला लागला तर त्याला त्याचीं फळें भोगावींच लागतात. तो सुटतो का? अजून तुझे डोळे उघडलेले दिसत नाहींत. नरकांत खितपत पडावें लागेल तेव्हां कळेल सारें. आतां तुला दुष्टांच्या पंक्तींत उभें करायला हरकत नाहीं. तुझ्याशीं बोलणें म्हणजे स्वतःला मूर्ख ठरविणें आहे.”

नंतर दोघांचें द्वंद्वयुद्ध सुरू झालें. कुबेरानें रावणाचीं सर्व अस्त्रें निरुपयोगी करून टाकलीं. तेव्हां रावणानें मायारूप धारण केलें. कुबेराला अनेक रावण दिसूं लागले. खरा रावण कोणता हें कळायला मार्ग नव्हता. अर्थातच रावणाला कुबेरावर वार करायला चांगली संधी मिळाली. त्यानें कुबेराच्या डोक्यांत गदाप्रहार केला. कुबेर बेशुद्ध होऊन पडला तेव्हां त्याचे अनुयायी व देव त्याला उचलून घेऊन गेले व नंदनवनांत त्याची चिकित्सा केली.

अशा तऱ्हेनें रावणानें कुबेराला जिंकलें. त्याचें पुष्पक विमान त्यानें बळकावलें व



त्यांत बसून शरवण पर्वतावर गेला. तो सोन्याचा पर्वत सूर्यासारखा चमकत होता. पुष्पक विमान त्याच्यावर उतरूं लागलें पण एकाएकीं आकाशांतच थांबलें.

तें पाहून रावणानें आपल्या मंत्र्यांना विचारलें—" विमान एकाएकीं थांबण्याचें काय कारण ?"

इतक्यांत शंकराचें वाहन महाबली नंदी पुढें येऊन म्हणाला—" दशग्रीवा ! मागें फिर ! या पर्वतावर शंकर पार्वती क्रीडा करीत आहेत. सुवर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव, राक्षस यांपैकीं एकालाहि किंवा इतर कोणत्याहि प्राण्याला या पर्वतावर प्रवेश नाहीं."

तें ऐकून रावणाला भयंकर राग आला. म्हणाला—" होतो कोण तो शंकर ?" असें म्हणून तो विमानांतून खालीं उतरून पर्वताच्या पायथ्याजवळ उभा राहाला. तेथें त्याला शंकर व कांहीं अंतरावर हातांत त्रिशूल घेऊन दुसऱ्या शंकरासारखा उभा नंदी दिसला. नंदीचें वानर मुख पाहून रावण मेघगर्जनेसारखा खदखदां हंसला.

नंदीला राग आला. तो म्हणाला—" तूं माझें वानरमुख पाहून हंसला आहेस. म्हणून माझें रूप असणारे व माझ्याच सारखे शक्तिशाली वानर तुला व तुझ्या कुळाला निर्मूल करतील."

रावणानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व पर्वताजवळ जाऊन नंदीला म्हणाला—" माझें विमान अडवणाऱ्या या पर्वताचा धुव्वा उडवतों पहा. तुला माझ्या शक्तीची कल्पना आहेसें दिसत नाहीं मला ?" त्यानें पर्वताखालीं आपला हात घातला व तो उचलूं लागला. पर्वत हलला व थोडा वर उचलला गेला.





शंकर तें सर्व पाहून हंसला. त्यानें आपल्या पायाच्या अंगठ्यानें पर्वत थोडा दाबला. त्याबरोबर रावणाचीं बोटें पर्वताखालीं चेंगरलीं. बोटें दुखूं लागलीं म्हणून रावणाला जास्तच राग आला.

रावणाचे मंत्री चकित होऊन तें दृश्य पाहूं लागले. म्हणाले—" महाराज ! शंकराला नमस्कार करून संतुष्ट करावें. त्याच्याशिवाय शरण नाहीं आपल्याला. त्याचा स्तोत्र पाठ करावा." म्हणून रावण कण्हत कुथत स्तोत्र पाठ करूं लागला.

शेवटीं शंकराची कृपा झाली. रावणानें आपला हात पर्वताखालून काढून घेतल्यावर शंकर म्हणाला—" रावणा ! तुझें शौर्य पाहून व स्तोत्र ऐकून मी संतुष्ट झालों आहें. तुझा हात पर्वताखालीं चेंगरला तेव्हां तूं ओरडलास. तें ओरडणें ऐकून तुझें रावण नांव सार्थक ठरलें. आतां तुला जिकडे जावयाचें असेल तिकडे जा."

तें ऐकून रावण म्हणाला—" महादेवा ! तूं माझ्यावर संतुष्ट झाला असशील तर मी जो वर मागेन तो दे. मला या पूर्वीच वरप्राप्ती झाली आहे. त्याप्रमाणें देव व मनुष्य यांच्या हातीं मला मरण येणें शक्य नाहीं. ब्रह्मदेवानें मला दीर्घायुष्य दिलें आहे. मी तुझ्याजवळ शेषआयु व एक आयुध मागत आहें."

शंकरानें त्याला प्रसन्न होऊन शेषआयु व चंद्रहास नांवाचें खड्ग दिलें व म्हणाला—" ह्या खड्गाचा कधीं अपमान होता कामा नये. याचा अपमान ज्या वेळेस होईल त्याच घटकेला हें माझ्याकडे परत निघून येईल."

अशातऱ्हेनें शंकराकडून वरप्राप्ती करून घेऊन रावणानें चंद्रहास खड्ग मिळविलें. त्याचप्रमाणें रावण हें नवें नांव धारण



करून दशग्रीव पुष्पक विमानांत बसून पृथ्वीवर हिंडूं लागला व सर्व राजांना त्रास देऊं लागला.

मोठमोठे शूर व बहाद्दर त्याच्याशीं युद्ध करून नष्ट झाले. समजूतदारांनीं, त्याच्याशीं युद्ध केल्यास जय मिळणार नाहीं, हें ओळखून त्याच्याशीं सख्य करून घेतलें किंवा त्याचें प्रभुत्व मान्य केलें.

असाच विश्वविजय करीत रावण हिमालय पर्वतावर गेला. तेथें त्याला अप्सरेसारखी सुंदर स्त्री दिसली. ती ऋषी मुनींसारखीं वल्कलवस्त्रें धारण करून तपश्चर्या करीत होती. रावण तिचें सौंदर्य पाहून तिच्यावर भाळला व तिला म्हणाला—“ हे सुंदरी ! तूं या तारुण्यांत तपश्चर्या कां करीत आहेस ? तुझें रूप पाहूनच आम्हां पुरुषांना स्वतःचें भान रहात नाहीं. मग हें खडतर व्रत तूं कां घेतलें आहेस ? ”

तिनें आपलें जीवनवृत्त रावणाला सांगितलें. म्हणाली—“ बृहस्पतीचा मुलगा कुशध्वज याची मी मुलगी. माझें नांव वेदवती. देव, राक्षस, यक्ष, गंधर्व अनेकांनीं मला मागणी घातली. परंतु माझ्या वडिलांना एकदेखील संबंध मान्य झाला नाहीं. कारण विष्णूलाच आपला जांवई करून घेण्याची इच्छा त्यांच्या मनांत होती. म्हणून चिडून जाऊन दंभ नांवाच्या एका राक्षसानें माझे वडील झोंपी गेले असतां त्यांचा वध केला. माझी आई माझ्या वडिलांबरोबर सती गेली. तेव्हांपासून मी आपल्या वडिलांची इच्छा पुरी व्हावी म्हणून मनांत विष्णूलाच आपला पती मानून येथें तपश्चर्या करीत आहें. समजलें रावणा ! आतां तुला जायला हरकत नाहीं.”

तें ऐकून रावणाला राग आला. तो विमानांतून उतरून जवळ येऊन तिला





म्हणाला—“ तुला गर्व चढलेला दिसतो आहे स्वतःच्या सौंदर्याचा व तपोबलाचा. म्हणूनच तुझें डोकें फिरलें आहे. नाहींतर तुझ्यासारखी त्रिलोक सुंदरी वेड्यासारखी तपश्चर्या करीत बसली नसती. मी दशग्रीव आहें व लंकापति आहें. माझ्याशीं लग्न करून माझी राणी हो. तुला सर्व सुखें उपभोगायला मिळतील. माझ्यासमोर त्या विष्णूचें खूळ काय डोक्यांत घेऊन बसली आहेस ? आज जो पराक्रम व तपोबल माझ्यांत आहे तें त्याच्यांत कोठून असणार ? तूंच विचार करून पहा.”

“ तुझ्याजवळ थोडी तरी अक्कल असती तर तूं विष्णूविषयीं असे अपमानकारक शब्द तोंडांतून काढले नसतेस.” वेदवती म्हणाली.

लगेच रावणानें तिचे केस धरले. वेदवतीनें आपल्या हाताची तलवार करून घेऊन आपले केस कापून टाकले. तिचा क्रोधाग्नी इतका खवळला कीं त्यांत रावण भस्म होऊन जातो कीं काय असें भासूं लागलें. ती रावणाला म्हणाली—“ तुझ्या हातून माझा जो अपमान झाला आहे त्यामुळें आतां जिवंत राहाणें मला शक्य नाहीं. या अग्नींत मी प्रवेश करून मी स्वतःचा जीव देतें व पुढील जन्मीं पतिव्रता म्हणून पुन्हां जन्म घेतें.” असें सांगून तिनें अग्नींत प्रवेश केला. हीच वेदवती सीता म्हणून जन्मली. जनक राजाकडे वाढली व रामाची पतिव्रता पत्नी म्हणून प्रसिद्ध झाली. रावणाच्या मृत्यूला कारण पण तीच झाली.

वेदवतीनें अग्नींत प्रवेश केल्यावर रावण पुन्हां पुष्पक विमानांत बसला आणि संचार करीत मरुत देवांसमक्ष यज्ञ करीत होता तेथें येऊन पोंचला.



बृहस्पतीचा भाऊ संवर्त यज्ञाला पुरोहित होता. रावणाला येत असलेला पाहून तेथें हजर असलेले सर्व दिक्पालक घाबरून गेले व स्वतःचें रूप सोडून दुसरें रूप घेऊं लागले. इंद्रानें मयूररूप घेतलें. यम कावळा झाला, कुबेर सरडा झाला, वरुण हंस झाला. इतर देवांनीं पण निरनिराळ्या प्राण्यांचीं रूपें घेतलीं.

इतक्यांत रावण निस्संकोचपणें यज्ञमंडपांत शिरला. मरुतला पाहून तो म्हणाला— "युद्ध करायला तयार आहेस का? कीं हार मानतोस?"

"तूं कोण रे बाबा?" मरुतानें रावणाला विचारलें.

रावण जोरानें हंसला व म्हणाला— "म्हणजे तूं रावणाला ओळखलें नाहींस तर? माझी कीर्ति ऐकली नाहीं असा कोणी या त्रिलोकांत असेलसें मला नाहीं वाटत. हें विमान मी आपला भाऊ कुबेर याचा पराभव करून मिळविलें आहे."

"आपल्या पितातुल्य वडील भावाचा पराभव करणारा तूं स्वतःला मोठा व पराक्रमी समजतोस? आणि त्याचा तुला गर्व आहे! तरमग गर्वाचें घर खालीं झालेंच पाहिजे." असें सांगून तो धनुष्यबाण घेऊन आला.

परंतु संवर्त मध्यें पडला व म्हणाला— "मरुतराजा, मी सांगतों तें ऐक! या महेश्वर यज्ञांत विघ्न आलें तर अनर्थ होईल. आपण यज्ञ दीक्षा घेतली आहे. आपण क्रोध करून चालणार नाहीं. या शिवाय रावण दुर्जय आहे."

गुरूच्या आज्ञेला मान देऊन मरुतनें धनुष्यबाण ठेवून दिले व यज्ञ करूं लागला. तें पाहून रावणाचा मंत्री शुक आनंदानें रावणाचा जय जयकार करूं लागला. रावण वाटिकेंतील ऋषींना खाऊन संतुष्ट झाला.





नंतर दिक्पालकांनीं स्वतःचें रूप धारण केलें व ज्यांचें ज्यांचें म्हणून रूप घेऊन त्यांनीं आपलें रक्षण केलें होतें त्यांना वर दिले. त्यापूर्वी मोर काळ्या रंगाचा असे. इंद्रानें त्याला अनेक सुंदर रंग दिले व आपले सहस्र डोळे त्याच्या पिसांत ठेवून दिले. याशिवाय त्याला सर्प भयापासून मुक्त करून मेघदर्शनानें त्याला आनंद होईल असा वर दिला.

यमानें कावळ्याला वर दिला कीं त्याला कोणताहि रोग होणार नाहीं व कावळ्यांचें पोट भरल्यास पितरांचें पोट भरेल असा आशीर्वाद दिला.

वरुणानें हंसपक्षाला दुधाच्या फेसासारखा पांढरा शुभ्र देह आणि जलविहार करण्याची शक्ति दिली. कुबेरानें सरड्याला सुवर्णकांति व स्वरक्षणासाठीं रंग बदलण्याची शक्ति दिली.

रावण विश्वविजयी म्हणविण्यासाठीं त्रिलोक हिंडला. दुष्यंत, सुरथ, गाधीराज, पुरुरव इत्यादिकांनीं रावणाचें प्रभुत्व कबूल केलें. परंतु अयोध्येचा राजा अनरण्य यानें रावणाचें आह्वान स्वीकार केलें. दोघांचें युद्ध झालें व अनरण्य याचें सर्व सैन्य नष्ट झालें. रावण व अनरण्य यांचें द्वंद्व युद्ध झालें. पण या युद्धांत अनरण्याचे बाण रावणाला लागलेदेखील नाहींत. रावणानें आपला हात डोक्यावर ठेवल्याबरोबर अनरण्य रथांतून खालीं पडला. मृत्युसमयीं त्यानें रावणाला शाप दिला कीं ईक्ष्वाकु वंशीयाच्या हातूनच त्याचा वध होईल.

रावण पुष्पक विमानांतून गगनविहार करीत जात असतां त्याला विमानासमोर मेघांवरून जात असलेले नारदमुनी दिसले. नारद रावणाला म्हणाले— "रावणा! तुझें बळ व पराक्रम पाहून माझें मन संतुष्ट झालें आहे. पण एक गोष्ट नाहीं मला आवडली.

तूं सर्व देव व दिक्पालक यांना जिंकलेंस मग बिचाऱ्या मानवांवर आपलें बळ दाखविण्यांत आपल्या शक्तीचा अपव्यय कां करीत आहेस? मानव हा मर्त्यलोकांत राहणारा व्यसनांत पडलेला, रोग व वार्धक्याला भिणारा असा एक भितरा प्राणी आहे. त्याच्याशीं तुझ्यासारख्या शूरानें कशाला युद्ध करावें? त्याच्या पाठीमागें यम लागला आहे तो पुरे. तूं त्या यमाला खालीं पहावयास लावावें असें माझें मत आहे. त्या यमाला जिंकलेंस कीं मर्त्यलोक जिंकल्यासारखा आहे.

"नारदा! मी प्रथम पाताळ जिंकून स्वर्गाकडे वळलो. मर्त्यलोक जिंकून त्रिलोक स्वाधीन करून घेईन आणि त्यानंतर समुद्रमंथन करून अमृत मिळविण्याचा यत्न करीन." रावण म्हणाला.

"अरे, यमलोक जवळ वाटेवर आहे तो सोडून आणखी कोठें निघालास?" नारद म्हणाला.

रावणा राक्षसी हास्य करून म्हणाला—"नारदा! तूं तरी बरी आठवण करून दिलीस. हा पहा निघालों मी यमलोकाकडे. खऱ्या दिक्पालकांना जिंकण्याचें व्रत मी प्रथमच घेतलें आहे. तरमग सर्व प्रथम मर्त्यलोकाला भयभीत करणाऱ्या यमालाच मी जिंकणार!" अशी प्रतिज्ञा करून व नारदाला नमस्कार केला व तो दक्षिणेकडे वळला.

रावण यमाचा वध कसा करतो हें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहण्यासाठीं नारद पण रावणाच्या पाठोपाठ निघाला. सर्व प्राण्यांचें प्राणहरण करणारा यम त्याचें प्राणहरण करण्याची रावणाची प्रतिज्ञा होती. कळीच्या नारदाला ती गंमत पहावयाची होती.





# गरुडगर्वभंग

इंद्राचा सारथी व त्याचा अगदीं जिवलग मित्र मातली याच्या बायकोचें नांव सुधर्मा असें होतें. त्यांना लग्न झाल्यावर फार उशिरां एक मुलगी झाली. तिचें नांव गुणकेशी होतें. मुलगी अर्थातच आई बापांची फार लाडकी होती. वयांत आल्यावर तिच्या सौंदर्याची व लावण्याची ख्याति त्रिलोकांत झाली. ती विवाह योग्य झाली तेव्हां तिच्या लग्नाची काळजी आई बापांना वाटूं लागणें साहजिक होतें. देव, ऋषी व मर्त्य लोकांतील इतर कोणी आपल्या मुली जोगता योग्य वर आढळला नाहीं.

शेवटीं मातली बायकोला म्हणाला—"पाताळ लोकांत कदाचित आपल्या मुलीला योग्य असा गुणवान व रूपवान वर मिळेल." असें सांगून तो पाताळ लोकांत निघाला.

वाटेंत नारदाशीं त्याची गांठ पडली. नारदानें विचारलें—"कुठें निघाली स्वारी? स्वतःच्या कामानें कीं इंद्राच्या?"

मातलीनें थोडक्यांत काम काय तें सांगितलें व म्हणाला—"वरुणाला भेटून पाताळ लोकांत जाण्याचा विचार आहे."

"अरे तर मग बरोबरच जाऊं! मी तिकडेच निघालों आहें." नारद म्हणाला.

वरुणानें दोघांचा यथायोग्य सत्कार करून येण्याचें कारण विचारलें. मातली म्हणाला—"कांहीं नाहीं, पाताळ लोकांत जाण्यासाठीं तुमची परवानगी मागायला आलों होतों."

वरुणाचा निरोप घेऊन दोघे निघाले. एका जागी हिरण्यपुर नांवाचें नगर होतें. यमानें तें नगर बसवलें होतें. इतर लोकांत



पराभव झालेले राक्षस त्या नगरांत रहात होते. अशा जागीं जांवई शोधणें मातलीला मुळींच आवडलें नाहीं.

पुढें ते नागलोकाच्या भोगवतीपुरींत गेले. ती नगरी इंद्राच्या अमरावतीहून कमी सुंदर नव्हती. तेथील राजाचें नांव वासुकी असें होतें. शेषनाग वगैरे इतर पराक्रमी नाग तेथें रहात असत. त्या नगरींत हिंडत असतां मातलीला एक सुंदर तरुण पुरुष दिसला. त्यानें नारदाला विचारलें—"देवर्षी! कोण हो तो तरुण युवक? त्याचे आईवडील कोण माहीत आहे का तुम्हांला? मला बरा वाटतो तो. तुमचे मत पण सांगा."

"त्याचें नांव सुमुख! ऐरावत वंशांत त्याचा जन्म झाला. त्याच्या आजोबांचें नांव अर्थक व वडिलांचें नांव चिकुर, ज्याचा वध गरुडानें नुकताच केला."

असें सांगून नारद, मातलीला बरोबर घेऊन अर्थकच्या घरीं गेला व त्याला म्हणाला—"हे इंद्राचे सारथी मातली. यांच्या मुलीचें नांव गुणकेशी. तुमचा नातू सुमुख याला आपली मुलगी द्यावी या विचारानें हे आपल्याकडे आले आहेत."

अर्थक म्हणाला—"नारदा! तूं म्हणालास तें सर्व खरें! परंतु मला तें पसंत नाहीं. कारण माझ्या नातवावर एक अत्यंत प्राणांतिक संकट येण्याची शक्यता आहे. गरुडानें कांहीं दिवसापूर्वीच त्याच्या बापाला मारुन खाऊन टाकलें आणि एका महिन्यानें याला खाऊन टाकीन अशी त्यानें प्रतिज्ञा केली आहे. गरुडाच्या शक्ति सामर्थ्याचें वर्णन मी आपल्यासमोर करण्याचें कारण नाहीं."

तें ऐकून मातली म्हणाला—"नागराज! मी आपल्या नातवाची आपला जांवई म्हणून निवड केली आहे तेव्हां त्याच्या रक्षणाची जबाबदारीपण माझ्यावरच आहे. तुम्ही सुमुखाला माझ्याबरोबर पाठवून दिल्यास मी देवेंद्राशीं त्याची ओळख करून देईन आणि जें कांहीं करणें आवश्यक वाटेल तें मी करीन. तुम्ही बिलकुल काळजी करूं नका."

अर्थक आपल्या नातवाला मातलीच्या बरोबर पाठवायला तयार झाला. मातली व नारद सुमुखाला बरोबर घेऊन देवलोकीं आले. ते इंद्राला भेटायला गेले. तेव्हां इंद्र विष्णूबरोबर बोलत बसला होता. मातलीनें जाऊन दोघांना नमस्कार केला व विष्णूला सर्व वृत्त थोडक्यांत निवेदन केलें. तेव्हां विष्णु इंद्राला म्हणाला—"इंद्रा! अरे ही अगदीं सामान्य गोष्ट आहे तूं याला अमृत देऊन अमर कर."

इंद्र थोडा मागेंपुढें करूं लागला. कारण महा पराक्रमी गरुडाशीं वैर करणें त्याला पसंत नव्हतें. इंद्र विष्णूला म्हणाला—"मग तूंच कां नाहीं देत त्याला अमृत?"

"अरे तूं तर सर्व लोकांचा अधिपति आहेस. तुला कोण आडवणार? तूंच अमृत दे." विष्णु म्हणाला.



तरी इंद्राला सुमुखाला अमृत देण्याचें साहस होईना. तरी त्यानें त्याला दीर्घायूचा वर दिला. म्हणून सुमुखाच्या मनांतलें गरुडाची भीति कमी झाली. तो मातलीच्या मुलीशीं लग्न करून आपल्या लोकीं निघून गेला.

मातली व नारद दोघांच्या आग्रहास्तव इंद्रानें सुमुखाला दीर्घायु केलें असल्याचें गरुडाला कळलें. तो इंद्राकडे गेला आणि इंद्राशीं भांडणाच्या स्वरांत म्हणाला—"इंद्रा! तूं माझें खाद्य तोंडांतून ओढून घेतल्यासारखें नाहीं का झालें हें? ब्रह्मदेवानें तो माझा

       

आहार म्हणून ठरविलें आणि तूं कोण मध्यें ढवळाढवळ करणारा? मी त्या सुमुखाला ठार करून खाण्याची प्रतिज्ञापण केली आहे. जगांत माझ्यासारखा बलवान कोणी नाहीं हें तुला कळायला हवें होतें. तुला उचलायला माझें एक पीस पुरें. विष्णुचें मी वाहन आहें. म्हणून तूं माझा अपमान करीत असशील. त्या विष्णूच्या मुळेंच माझी मान पदोपदीं खालीं होत आहे."

त्याचें तें उर्मटपणाचें बोलणें ऐकून विष्णु म्हणाला—" गरुडा! अरे तुझ्या शक्तीची किंवा दौर्बल्याची माहिती मला नाहीं असें वाटलें होय तुला? माझ्यासमोर तुझ्या या वल्गना? तूं माझें ओझें वाहतोस हें सपशेल खोटें व चुकीचें बोलणें आहे. मी स्वतःला स्वतःच वाहून नेतों व तुलें ओझें पण मला वाहावें लागतें. तुला ही गोष्ट खरीं वाटत नसेल तर माझा डावा हात जरा उचलून दाखव. तेवढें पुरे!" असें सांगून विष्णूनें आपला डावा हात गरुडाच्या पाठीवर ठेवला.

हाताच्या ओझ्यानें गरुडाला कंबरडें मोडतें की काय वाटलें आणि त्रिलोक अंगावर कोसळलें कीं काय असें भासलें. त्याचे पाय थरथर कांपूं लागले. घाबरून जाऊन गरुड म्हणाला—" पाहि माम्! पाहि माम्! प्रभो! अज्ञानवश मी वल्गना करीत होतों. आतां तुझी कृपा असेल तरच जीव वांचेल."

विष्णूला त्याची दया आली व म्हणाला—" पुन्हां आपल्या शक्तीचा असा गर्व दाखवूं नकोस. इंद्रानें जो वर दिला आहे त्याचा मान राख. सुमुखाशीं सख्य करून रहा."

तेव्हांपासून गरुड सांपाला नित्य आपल्याजवळ ठेवून घेऊं लागला.



# ... डरॅयसचा शिलालेख इतिहास

आपल्या भारतांत गौतमबुद्ध आपल्या मताचा प्रचार करीत असतां डरॅयस नामक राजानें पारशी राजवंशाची स्थापना करून 'बगस्तान' (देवस्थान) येथें आपला इतिहास ३४० फूट उंच डोंगरावर तीन भाषांत कोरून ठेवला. हें चित्र पहा. मनुष्य चढूं शकेल अशा जागेपासून सुमारें शंभर फुटावर तो इतिहास लिहिला गेला आहे.

यांत मूर्तींचें जें कोरीव काम आहे त्यावरून डरॅयस यानें आपल्या शत्रूला कसें कैद केले होतें हें दाखविलें आहे. डरॅयस (डावीकडून तिसरा) आपल्या पायाखालीं आपल्या मुख्य शत्रूला चिरडून टाकीत आहे. इतरांचे हात बांधून ठेवण्यांत आले आहेत. त्यांच्या गळ्यांत दोरी बांधून त्यांना त्याच्यासमोर उभा केला आहे. त्यांच्या वरच्या बाजूला डरॅयसचें दैवत 'अहुरमज' याची मूर्ति आहे. तो डरॅयसला आशीर्वाद देत आहे. त्या शत्रूला जिंकून इ. स. पू. ५२२ मध्यें डरॅयस राजा झाला.

२५०० वर्षांपूर्वी डरॅयसनें आपलें चरित्र प्राचीन फारसी बाबिलोनियन व एलामेट या तीन भाषांत कोरून ठेवलें आहे. पहिल्या भाषेंत ५१५ ओळी, दुसरींत १४१ ओळी व तिसरींत ६५० ओळी आहेत. ही सर्व माहिती १९५० मध्येंच कळूं शकली.



      




# भारताचा इतिहास



औरंगजेब सुनी मुसलमान होता. धर्म व राज्य यांत तो कांहीं भेद मानत नसे. कुराणांतल्या तत्वांच्या आधारें तो राज्य-कारभार चालवूं लागला. त्यानें मनोरंजन व नृत्य वगैरेंना बंदी केली. त्याला "गादीनशीन फकीर" ही उपाधि दिली जाते. १६७९ मध्यें त्यानें इतर मतावलंबी प्रजेवर जजिया नांवाचा कर लावला. या नव्या कायद्याविरुद्ध सर्वांत प्रथम मथुरेच्या कांहीं जातीच्या लोकांनीं उठाव केला. तिलपत जमीनदाराला आपला पुढारी करून त्यांनीं आपला विरोध जाहीर केला. नंतर त्यांनी अब्दुल नबी नांवाच्या फौजदाराला ठार केलें. त्यानें जो अत्याचार सतत एक वर्ष केला होता त्या पासून स्वतःचें रक्षण करण्यास दुसरा उपाय नव्हता. नंतर हसन अलीखानाची फोजदाराच्या जागीं नेमणूक झाली. त्यानें तिलपत जमीनदाराला ठार करून त्याच्या सर्व कुटुंबियांना बाटवून मुसलमान करून घेतलें. १६७५ मध्यें या जातीच्या लोकांनीं राजाराम याला पुढारी करून पुन्हां उठाव केला. १६८८ मध्यें त्यांनीं सिकंदरा येथील अकबराची समाधी लुटली. राजारामाला ठार करण्यांत आलें व बंडखोरोंना चिरडून टाकण्यांत आलें.

औरंगजेबाविरुद्ध दुसरें बंड करणारा बुंदेल खंडाचा छत्रसाल नांवाचा राजा होता. छत्रसालाचे वडील चंपतराय यांनीं पहिल्या बंडांत भाग घेतला होता. परंतु कैद होण्याच्या भीतीनें त्यांनीं आत्महत्या करून घेतली.

शिवाजीच्या वळणावर छत्रसाल आपला धर्म व बुंदेलखंडाचें स्वातंत्र्य यांसाठीं शूरा-सारखा लढला. कित्येकदां मोगलांविरुद्ध त्याला यशदेखील मिळालें. बुंदेलखंडांतील प्रजा व मालव प्रांताचे लोक यांचें पूर्ण पाठबळ त्याला मिळालें. मालव प्रांताच्या पूर्वेकडे त्यानें आपल्या स्वतंत्र राज्याची स्थापना केली. १७३१ मध्यें तो वारला तों पर्यंत त्यानें राज्य केलें. त्याच्या राजधानीचें नांव पन्ना असें होतें.

औरंगजेबाचें शिखांशींदेखील बितुष्ट आलें. देशांत १५–१६ व्या शतकांत गुरु नानक यानें शिखधर्म स्थापन केला. त्यांच्यानंतर अनुक्रमें अंगद, अमरदास, रामदास शिखांचे गुरु झाले. अकबराच्या मनांत रामदासाविषयीं भक्ति वसत होती. त्यानें रामदासाला अमृतसर जवळ जमीन दिली. तेथें तलाव होता. तो स्वच्छ करून व बांधून एक गुरुद्वारा म्हणजे शिखधर्माचें मंदिर बांधण्यांत आलें.



पांचवे गुरु अर्जनमल यानें १५८१ ते १६०६ च्या दर्म्यान शीख धर्माचा पुष्कळ प्रचार केला. त्यानें 'आदिग्रंथ' लिहिला. हाच शिखांचा मूळ धर्मग्रंथ होय. त्यानें राजकीय कार्यांत पण पुष्कळ भाग घेतला. त्यानें खुसरोच्या पक्षाचा पुरस्कार केला. म्हणून जहांगीर बादशाहानें त्याला राजद्रोही म्हणून जाहीर केलें व त्याला १६०६ मध्यें ठार केलें. त्याचा मुलगा हरगोविंद यानें सैन्य जमा करून अमृतसर जवळ संग्राम या जागीं मोगलांशी युद्ध करून जय मिळविला.

१६६८ मध्यें तेगबहादुर नांवाच्या शीख गुरूनें बादशाहाविरुद्ध बंडाचें निशाण उभें केलें व काश्मीरी ब्राह्मणांना मोगलाविरुद्ध चिथावलें. म्हणून औरंगजेबानें चिडून जाऊन त्याला दिल्ली येथें धरून आणलें व विचारलें— "तूं मुसलमान धर्म कबूल करतोस कीं आपलें शिर देतोस?" गुरु तेग बहादुर आपलें शिर द्यायला कबूल झाला. औरंग-जेबानें त्याचा शिरच्छेद केला.

 

गुरु तेग बहादुर यांचा मुलगा गुरु-गोविंदसिंह भारताच्या इतिहासांत एक थोर पुरुष होऊन गेला. त्यानें शीख मताव-लंबियांत कांहीं आचार रूढ केले. शत्रूला कधीं पाठ दाखवूं नये असा शिखांना त्याचा उपदेश होता. मोंगलांशीं त्यानें अनेक युद्धें केलीं.

मोंगल साम्राज्याची सेवा करणाऱ्या सुभे-दारांशीं वैर करून औरंगजेबानें मोंगल साम्राज्याचें नुकसान करून घेतलें. त्यानें आपल्या आततायी वृत्तीनें राजा जयसिंह यांच्यानंतर अंबरचें राज्य व जसवंतसिंह यांच्यानंतर मारवाडचें राज्य स्वाधीन करून घेतलें. म्हणून राजपूत घराणीं त्याच्याविरुद्ध उलटलीं व त्यांचें आपसांत सख्य झालें. मारवाडचा दुर्गादास याची स्वामिभक्ति, परा-क्रम व युद्धकौशल्य वाखाणण्यासारखें होतें. औरंगजेबानें आपल्या राजपुतान्यांतली बंडाळी मोडण्यासाठीं मोठें सैन्य पाठविलें. चितोडचें राज्य त्यांनीं जिंकलें. आपला मुलगा अकबर व थोडें सैन्य चितोड येथें ठेवून औरंगजेब स्वतः अजमीरवर चालून गेला. राजपुतांनीं औरंगजेबाच्या सैन्यावर हल्ले करून पिच्छा पुरवला. औरंगजेबानें अकबराला सेना-पतीच्या पदावरून कमी केलें. म्हणून त्यानें रजपुतांशीं मित्रता राखण्यांत मोंगलांचें हित आहे असा विचार करून ७० हजार रज-पूतांचें सैन्य उभें केलें व बापाविरुद्ध बंड केलें. परंतु त्यांत त्याला यश मिळालें नाहीं. दुर्गादासानें त्याला मदत केली नसती तर औरंगजेबानें अकबराला कडक शिक्षा केली असती. तो इराण देशांत पळून गेला. तेथें १७०४ मध्यें तो मरण पावला.





# नवाबकुमारी

[ ५ ]

हाराज मानसिंह एक मोठ्या लवाजम्या- सह जगन्नाथ पुरीच्या क्षेत्रदर्शनास ले. समुद्र किनाऱ्यावर एक मैल लांब- शिबिरवजा नगर त्यांच्यासाठीं निर्मिलें होतें.

निघण्यापूर्वी त्यांनीं अफगाण नवाबांना पत्र लिहून कळविलें होतें कीं आम्ही दर्शनासाठीं येत आहों तरी सर्व जरूर ती स्था करावी व येऊन भेटावें. परंतु मानखान किंवा उस्मानखान यांपैकीं गी भेटायला आला नाहीं. नवाबांच्या नेवाइकांपैकीं कोणीतरी सामान्य माणसानें येऊन मानसिंहाचें स्वागत केलें. पठाणांनीं दाखविलेला हा उर्मटपणा पाहून मानसिंह असंतुष्ट झाले त्यांत आश्चर्य नाहीं.

जगतसिंहाची आई मानसिंहांची पट्टराणी होती. परंतु त्यांच्या मनांत तिच्याबद्दल प्रेमादर मुळींच नव्हता. उलट तिच्या विषयीं त्यांच्या मनांत थोडीशी भीति नेहमीं वसत असे, असें म्हटलें तरी चालेल. कारण युद्धानिमित्तें मानसिंह देशांत पूर्वीकडून पश्चिमेकडे व उत्तरेकडून दक्षिणेकडे फिरत. त्यांच्या अंतःपुरांत इतर अनेक बायका होत्या. त्यांत उर्मिला नांवाच्या जोधपूरच्या

श्री दामोदर मुखर्जी



राजकन्येवर त्यांची फार प्रीति होती. क्षेत्र दर्शनाला आलेल्या तिर्था बायकांत ती एक होती.

पुरीच्या प्रवासांत महाराजांच्या मना-सारखी व्यवस्था करणारा रामचंद्रदेव नांवाच्या एक मनुष्य होता. तो देववंशीय क्षत्रिय होता. पठाणांनीं ओरिसा प्रांत जिंकला त्या पूर्वीं त्याच वंशाचें राज्य ओरिसांत होतें. संधीच्या अटीप्रमाणें पुरी क्षेत्राची व्यवस्था मोगलांकडे आल्यावर राम-चंद्रदेव याची देवालयाच्या व क्षेत्राच्या व्यवस्थेसाठीं नेमणूक झाली होती.

मानसिंहांनीं पुरी येथें एक आठवडाभर राहाण्याचें ठरविलें होतें. दोन दिवस होऊन गेले होते. तिसऱ्या दिवशीं मानसिंह महाराज संध्याकाळीं पूजाआरती झाल्यावर देवदर्शन करून उर्मिला रहात असे त्या डेऱ्यांत आले. महाराज येणार हें माहीत असल्यामुळें उर्मिला त्यांच्या जेवणाची आवश्यक सर्व व्यवस्था करण्यांत गर्क होती. महाराज आल्याचें कळतांच एका मुलीला-बरोबर घेऊन ती महाराजांना सामोरी आली. ती मुलगी अप्रतिम रूपवती होती.

"कोण ही मुलगी? साक्षात लक्ष्मी-सारखी सुंदर आहे." मानसिंहांनीं विचारलें.

"ही माझ्या एका मैत्रिणीची मुलगी आहे. मायलेकी जगन्नाथाच्या दर्शनासाठीं आल्या आहेत आज दुपारीं त्या मला भेटायला म्हणून आल्या होत्या. माझी मैत्रीण निघून गेली. मुलीला कांहीं दिवस आपल्याजवळ ठेवून घेतें असें तिला सांगून ठेवून घेतलें आहे." उर्मिला म्हणाली.

"हिचें लग्न झालें आहे का?"

"झालें आहे. त्याविषयीं आपल्याजवळ कांहीं बोलावयाचें आहे. पण मागाहून बोलूं."

"ठीक, या मुलीचें नांव काय?"

"राज्यलक्ष्मी!"

"छान, छान! खरोखरीच राज्यलक्ष्मीच आहे."

तेव्हां पासून राज्यलक्ष्मीनें महाराजांची अनेक प्रकारें सेवा करून महाराजांची मर्जी संपादन केली.

पुरीला येऊन महाराजांना दहा दिवस झाले. परंतु त्यांचें परत प्रयाण केव्हां हें कांहीं कळेना. मध्यंतरीं पठाण नवाबांच्या अनेक गोष्टी त्यांच्या कानावर आल्या. म्हातारा वजीर ईसाखान कित्येक दिवस अंथरुणाला खिळून राहाल्यावर मरण पावला. सुलेमानखान नांवापुरता नवाब होता. त्याला राजकारणाचा गंधहि नव्हता. तें सर्व ओझें त्यानें उस्मानखानावर टाकलें होतें. त्यानें खिजरखान याला आपला नवा वजीर म्हणून नेमलें. खिजरखान सर्व स्वभावानें उस्मानखानासारखाच साहसी व शूर होता. राज्यकारभार पूर्णपणें उस्मान-खानाच्या हातांत होता.

या सर्व गोष्टी मानसिंह महाराजांना कळल्यावर त्यांनीं रामचंद्रदेव याच्याशीं त्या सर्व गोष्टींसंबंधी विचारविनिमय केला. उस्मानखान लवकरच संधी मोडणार. मोगल-



सत्तेकडे दुर्लक्ष करूनच तो आपला राज्य कारभार चालवणार. तो मानसिंहांना भेटा-यला देखील आला नाहीं. बादशाहाविषयीं राजभक्ति थोडीदेखील त्याच्या मनांत नाहीं. मानसिंहांनीं पठाणांशीं संधी केली ती त्यांना युद्ध करायचें नव्हतें म्हणून. आतां मानसिंह युद्धाला तयार झाले होते. परंतु पठाण संधीप्रमाणें वागत आहेत तों पर्यंत त्यांची युद्ध करण्याची इच्छा नव्हती.

शेवटीं उस्मानखान पुरीला आला. महा-राज दुपारीं इतर मित्रांबरोबर व रामचंद्रदेव याच्याबरोबर बोलत बसले असतां उस्मान-











खान तेथें आला. मानसिंहांनीं त्याचें योग्यप्रकारें स्वागत केलें व त्याला त्याच्या हुद्याला साजेल अशा जागीं बसायला सांगितलें.

उस्मान एक अत्यंत रूपवान तरुण होता. उत्तम पोशाख करून व एक सुंदर नवाब पद्धतीचें पागोटें घालून तो आला होता. एक मोठी तलवार कंबरेला लोंबत होती. महाराज मयत वजिरांच्या मृत्यूबद्दल आपला शोक प्रगट करून म्हणाले—"मी ओरिसा प्रांतांत आलों होतों खरा, परंतु मला ओरिसाच्या नवाबांच्या दर्शनाचें भाग्य मिळणार नाहीं असें वाटलें नव्हतें. उशिरां का होईना, आमचें भाग्य आज उद्यास आलें."

ही व्यंगोक्ति न समजण्या इतका उस्मानखान मूर्ख नव्हता. म्हणाला—"आम्ही आपले खरोखरींच आत्मीय असतों तर आमच्या दर्शनानें आपलें भाग्य उद्यास येण्याचें कारणच नव्हतें. परंतु आपले आत्मीय होण्याचें भाग्य आम्हांला कधींच लाभलें नाहीं. तसें असतें तर आपण एकाद्या गुलाम राजाला वागवावें असें आम्हांला पत्र लिहून स्वतःच्या दर्शनाला बोलाविलें नसतें." जाणून बुजून उर्मटपणा दाखविण्यासाठींच तो हें सर्व बोलला होता.

मानसिंह महाराज पण उघड बोलण्याचें ठरवून म्हणाले—"आज्ञेचें पालन करणारे दास आत्मीय नसतात असें कोठें लिहिलें आहे. आत्मीय होणें किंवा न होणें हें ज्याच्या त्याच्या वागणुकीवर अवलंबून असतें. नवाबांनीं बादशाहाचें प्रभुत्व मान्य केलें होतें. आतां आत्मीयांसारखें रहावयाचें कीं नाहीं हें त्यानींच ठरवावें."

मानसिंहानीं उघड उघड असें थोबाड फोडण्यासारखें बोलल्यावर उस्मानखानाचा चेहरा रागानें लाल झाला. परंतु स्वतःला आवरून तो म्हणाला—"बंगालचा सुबेदार व मी आपणांशीं वादविवाद करण्यासाठीं आलेलों नाहीं. आपल्या सारख्यांशीं वाद्-विवाद् करणें आमच्या इभ्रतीला शोभत नाहीं. आपल्याशीं कांहीं मुख्य कामासाठीं म्हणून आम्ही आलों होतों. परंतु आपण ज्या तऱ्हेनें बोलत आहांत तें पाहून न बोलण्याचाच आमचा विचार आहे. बरें तर आम्ही येतों. जाण्यापूर्वीं एक गोष्ट बोलणें आवश्यक आहे. ती गोष्ट एक खाजगी आहे."

"तुम्हांला जें कांहीं बोलावयाचें असेल तें खुशाल बोलावें. मी तुमचा शत्रू आहें का? माझी मैत्री गमावून बसणें तुमच्या हिताचें नाहीं, एवढें मात्र मी पुन्हां पुन्हां सांगूं इच्छितों." मानसिंह म्हणाला.

"या बाबतींत मला आपल्याशीं कांहीं बोलण्याची इच्छा नाहीं. आपण आपल्या मुलाला जन्मठेप कैदेची शिक्षा दिली आहे. त्याचें व नवाबकुमारी आयशाचें परस्परांवर प्रेम असल्याचें आपल्या कानावर आलें म्हणूनच ना आपण त्याला ही शिक्षा दिलीत. परंतु त्याला दिलेल्या शिक्षेला अनेक कारणें



आहेत. तो उद्धटपणानें वागला, त्यानें आपल्या हुकमाचें पालन केलें नाहीं, होय ना!

"जगतसिंह माझा शत्रु आहे. त्याचें हित व्हावें म्हणून मी बोलत नाहीं. परंतु त्यानें जो अपराध केला नाहीं त्या अपराधाबद्दल त्याला जर ही शिक्षा भोगावी लागत असेल तर तें मात्र बरोबर होणार नाहीं. आयशाच्या प्रेमसंबंधांत त्याचामुळींच अपराध नाहीं. आयशावर त्याचें प्रेम कधींच नव्हतें व तसें तो कोणाजवळ बोलल्याचें मला तरी माहीत नाहीं. फक्त आयशाचें त्याच्यावर


चांदोबा



प्रेम आहे. हें माहीत असूनदेखील त्याचें मन तिच्याकडे वळलें नाहीं. हें आपणांला कळविणें मी आपलें कर्तव्य समजतों."

"हें खरें असेल तर तुझें व त्याचें द्वंद्व युद्ध कशासाठीं झालें ?"

उस्मान थोडा वेळ उत्तर द्यायला तयार झाला नाहीं. त्याला शरम वाटली असावी. म्हणाला—"तरमग ती गोष्ट पण आपल्याला कळली आहे, म्हणावयाची ? माझें आयशावर प्रेम आहे. परंतु जगतसिंहाचा कांटा दूर होईपर्यंत तिचें मन माझ्याकडे वळणें शक्य नाहीं असें मला वाटलें. परंतु त्या द्वंद्व युद्धांत माझा पराभव झाला. तेव्हां पासून जगतसिंहावर सूड उगवण्याचा विचार माझ्या मनांत घर करून बसला आहे. परंतु ही जन्मठेप शिक्षाच आतां माझ्या आड येत आहे." एवढें सांगून व सलाम करून उस्मानखान तेथून निघून गेला.

"मोगल आणि पठाण यांची आपसांतली संधी फार दिवस टिकेलसें वाटत नाहीं." तेथें हजर असलेले मोगल सरदार म्हणाले. मानसिंहानें कांहींच उत्तर दिलें नाहीं व ते जगन्नाथाच्या आरतीसाठीं निघून गेले.

मानसिंह कांहीं बोलण्यापूर्वींच उस्मान निघून गेला. परंतु त्याचे हेर मात्र मानसिंहाच्या हालचालींची वार्ता त्याच्याकडे पोंचती करीत होते. तो कांहीं तरी कारण काढून संधी मोडून युद्ध करण्याच्या प्रयत्नांत होता.

तो एकदां एकटाच आपल्या खोलींत बसला असतां आयशानें दार उघडलें व विचारलें—"नवाब एकटेच आहेत वाटतें ? थोडावेळ बोलावयाचें आहे. येऊं का ?"

"परंतु तूं स्वतः कशाला एवढी तसदी घेतलीस आयशा ? दासीच्या हातीं निरोप पाठविला असतास तर मी नसतों का आलों ? असें आहे तरी काय काम ?" उस्माननें दार बंद करीत विचारलें.





तिच्या तोंडावर काळजीची चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. म्हणाली—"एक गोष्ट सांगायला आलें होतें. तुझ्यावर माझें प्रेम नाहीं. तूं उगाच त्यासाठीं आकाशपाताळ एक करण्याचा यत्न सोडून दे."

"तुझें बोलणें किती गोड अमृतासारखें आहे." उस्मान म्हणाला.

आयशा कांहीं वेळ थांबून म्हणाली—"तूं युद्धाची तयारी करीत आहेस. या लहानसहान गोष्टींसाठीं तुझा वेळ घेणें मला आवडत नाहीं."

"तूं वाटेल तें बोललीस तरी मी तुला कांहीं म्हणणार नाहीं. पण बोललीच नाहींस तर मात्र मला आवडणार नाहीं."

"तुझी एवढी कृपा माझ्यावर आहे. परंतु त्याचा मोबदला मी तुला कांहींच देऊं शकत नाहीं, याचेंच मला दुःख वाटतें."

"आयशा ! मी तुझ्यावर कांहीं उपकार केला आहे असें मला वाटत नाहीं. पण तूं मला आपला एक हितचिंतक मानतेस, एवढ्यावरच माझ्या मनाचें समाधान होत आहे."

"यापुढें मी येथें राहणें बरोबर नाहीं असें मला वाटत आहे." ती म्हणाली.

उस्मानच्या हृदयाला जणुं कांहीं धक्काच बसला. म्हणाला—"हेंच सांगायला आली होतीस का ? तूं माझी झाली नाहींस हें माझें दुर्भाग्य ! पण अजून मी आशा सोडली नाहीं. तुझी कृपा केव्हांतरी होईल या आशेवरच माझा जीव अडकून राहाला आहे. मग ती आशापण सोडून देऊं, म्हणतेस ?" उस्माननें विचारलें.

       

"उस्मान तुझें हृदय थोर, तुझें प्रेमपण थोर! परंतु तुला माझ्यासारख्या पाषाण-हृदयापासून दुःखाशिवाय काय मिळणार? म्हणून मी डोळ्यासमोरून बाजूला होणेंच बरें."

"आयशा! तुझ्या सान्निध्यानें, फक्त तुझ्या दर्शनानें व मधून मधून अमृतासारखा तुझा गोड आवाज ऐकल्यानें मला पुनर्जन्माचा आनंद होतो."

"मी दृष्टीआड झालें कीं सृष्टीआड होईन."

"तुझें ज्याच्यावर प्रेम आहे तो सुद्धां दृष्टीआडच आहे ना?"

"पुरुषांची गोष्ट निराळी. त्यांना कित्येक कामें असतात व त्यांत ते रमून जातात. बायकांना प्रेमाशिवाय जगणेंच अशक्य. या दगडी पुतळ्याला विसरणें तुला कठीण जाणार नाहीं."

"माझा देह मातींत अदृश्य झाल्यावर तें होईल कदाचित. पण तोंपर्यंत अशक्य! ज्याच्यावर तुझें प्रेम आहे त्याचा कांटा मी केव्हांतरी दूर करीनच करीन. तरीदेखील तूं मला झिडकारलेंस तर माझा वैरी तरी मेला, एवढें मनाला समाधान राहील."

"उस्मान! तुमचें दोघांचें वैर वाढविण्यासाठींच मी जिवंत आहें कीं काय असें मला वाटूं लागले आहे. तूं सुखी व्हावेंस एवढीच माझ्या मनाची इच्छा आहे. पुन्हां मी तुझ्या नजरेस पडणार नाहीं. पण तुझ्यावर संकट आलें तर तें टळावें म्हणून मी धांवत येईन."

उस्मान तें सर्व मान खालीं करून ऐकत होता. वर डोकें करून त्यानें पाहिलें तोंपर्यंत आयशा निघून गेली होती.

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# त्रिलोकसुंदरी

एका गांवीं तीन भाऊ रहात होते. आई-बाप वारल्यानंतर ते निराधार झाले. म्हणून कोठें तरी जाऊन नोकरी धंदा करण्याचा त्यांनीं विचार केला. दोघां वडील भावांनीं धाकट्यालाबरोबर येऊं दिलें नाहीं. ते आपापलें सामान घेऊन राजाकडे गेले. ते तेथें पोंचल्यावर धाकटा पण तेथें पोंचला.

राजा त्यांचें म्हणणें ऐकून म्हणाला—"तुमच्या जोगतें काम तूर्त तरी माझ्या-कडे नाहीं. परंतु आज तुमच्यावर हें संकट ओढवलें आहे तेव्हां सैंपाकघरांत लाकडें व पाणी पुरवण्याचें काम मी तुम्हांला देतों." तिघे तें काम करायला कबूल झाले.

कांहीं दिवसांनंतर राजा मोठ्या दोघां भावांना बोलावून म्हणाला—"तुम्ही दोघे मिळून जितकें पाणी भरतां एकटा नागेश्वर तेवढें पाणी भरतो. दुप्पट लाकडें आणून टाकतो. तुम्ही दोघे आळसट!"

राजाची बायको वारली तरी त्यानें दुसरें लग्न केलें नाहीं, ही गोष्ट दोघां भावांना माहीत होती. नागेश्वरचा कांटा दूर करण्याच्या हेतूनें ते राजाला म्हणाले—"नागेश्वर लहान-पणापासूनच हुशार व चलाख मुलगा आहे. त्याला पाठविलें तर तो योग्य वधू शोधून आणील.

राजाच्या मनांत दुसरें लग्न करून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. नागेश्वरला बोलावून तो म्हणाला—"तुझ्या हुशारीची व समजूतदारपणाची कल्पना मला नव्हती. म्हणून तुला हें हलकें काम आजपर्यंत दिलें.














नागेश्वरला नाइलाजानें मुलीच्या शोधार्थ जावें लागलें. तो गेला त्या वाटेवर त्याला एक रान लागलें. रानांत थोडें अंतर चालत गेल्यावर त्याला भूक लागली. म्हणून तो एका झाडाखालीं खायला बसला.

इतक्यांत एक म्हातारी त्याच्या जवळ आली व विचारूं लागली—"मुला, काय रे आहे यांत?"

"या, आजी! माझ्याबरोबर खाऊन घ्या." नागेश्वर म्हणाला.

दोघांचें खाणेंपिणें झाल्यावर म्हातारी म्हणाली—"मुला! तुझ्या या ऋणांतून मला मुक्त झालें पाहिजे. तूं कोठें निघालास? कोणत्या कामावर निघालास?"

नागेश्वरनें राजानें सोंपविलेली कामगिरी व ती न केल्यास जी शिक्षा होईल तिचें वर्णन सांगून टाकलें.

"एक त्रिलोकसुंदरी कोठें राहते हें मी तुला सांगतें. मी सांगतें त्या दिशेनें जा. मायावी लोकांचा एक किल्ला येईल तेथें राहणाऱ्या स्त्रिया सर्वच एकीहून एक सुंदर आहेत. तूं शंख वाजविलास तर मायावी लोक तुझ्या वाटेला येणार नाहींत. उलट तूं सांगशील तसें ते करतील." असें

आतां तूं हें काम सोड आणि माझ्याशीं लग्न करण्यास योग्य अशी एक सुंदर मुलगी पाहून घेऊन ये. तुला एका आठ-वड्याचा अवधी मी देतो."

"लग्नें जमविणें हें थोरामोठ्यांचें काम आहे. मी ल्हान मुलगा, हें काम कसें काय करूं शकेन!" नागेश्वर भीतभीत म्हणाला.

"एका आठवड्याच्या आंत मला पसंत पडेल अशी सुंदर मुलगी तूं घेऊन आला नाहींस तर तुझें डोकें उडवीन आणि तुझें प्रेत फाटकाला टांगून ठेवीन." राजानें त्याला बजावून सांगितलें.



सांगून म्हातारीनें नागेश्वरला एक शंख दिला व निघून गेली.

बराच प्रयत्न केल्यावर नागेश्वरला तो शंख वाजवितां येऊं लागला. त्यानें शंख वाजवल्या-बरोबर त्याच्या चारी बाजूला मायावी लोक घोळका करून उभे राहाले. म्हणाले—"काय पाहिजे तुम्हांला महाराज? हुकुम करावा!"

"मला एका त्रिलोकसुंदरीची गरज आहे. तुम्ही आणून द्याल का?" नागेश्वरनें धीर करून विचारलें.

"त्रिलोकसुंदरींच्या अंगाला स्पर्श करण्यास आम्हांला मनाई आहे. परंतु त्या कोठें राहतात हें आम्ही तुम्हांला दाखवितो. असें सांगून त्या मायावींनीं नागेश्वरला उचलून एका किल्ल्याजवळ नेलें.

तो किल्ला एका निर्जनस्थानीं होता. नागेश्वर किल्ल्यांत गेला तेव्हां त्याला आंत अप्सरांसारख्या सुंदर तीन मुली दिसल्या. नागेश्वरला पाहून त्या पळूं लागल्या व कोठें तरी दिसेनाशा झाल्या. नागेश्वरनें सारा किल्ला हुडकून काढला, पण त्याला त्या कोठें दिसल्या नाहींत. आतां त्याला रिकाम्या हातांनीं परत जावें लागणार व राजा खात्रीनें त्याचें डोकें उडवणार या





काळजींत नागेश्वर विचार करीत उभा असतां त्याला एका जागीं एका कोनाड्यांत तीन लिंबें दिसलीं. वाटेंत तहान लागली तर एकेक लिंबाचा रस पिऊन तहान भागवतां येईल असा विचार करून त्यानें तीं लिंबें आपल्या पिशवींत ठेवून घेतलीं आणि घरीं निघाला.

कांहीं अंतर चालत गेल्यावर नागेश्वरला तहान लागली. कडक ऊन पडलें होतें व जवळ पास कोठें पाणी दिसलें नाहीं. म्हणून त्यानें पिशवींतून एक लिंबू काढून तें कांपलें. त्याबरोबर त्याला एका सुंदरीचें डोकें दिसलें. ती "पाणी, पाणी!" म्हणून ओरडत होती. तहानेमुळें तिचा जीव कासावीस झाला होता.

यदाकदाचित मी या सुंदर स्त्रीचें रक्षण करूं शकलों व तिला राजाकडे घेऊन गेलों तर माझा जीव वांचेल. असा विचार करून नागेश्वर पाण्याच्या शोधार्थ निघाला. पण एक थेंबभर देखील पाणी कोठें मिळेल तर शपथ. तो दमूनभागून परत येऊन पाहातो तों ती मुलगी मेलेली. नागेश्वर निराश होऊन पुढें निघाला.

कांहीं अंतर चालत गेल्यावर पुन्हां तहान लागली. त्यानें पिशवींतून आणखी एक लिंबू काढून कांपलें तर त्यांत देखील त्याला एका सुंदर स्त्रीचें डोकें दिसलें. तीदेखील "पाणी, पाणी!" म्हणून ओरडत होती. नागेश्वरला याखेपेसहि पाणी कोठें ही मिळालें नाहीं. त्या लिंबांतली मुलगी देखील मरण पावली.

नागेश्वरला वाटलें कीं तिसऱ्या लिंबांत पण सुंदर स्त्री असणार. तेव्हां वाटेंत कोठेंहि तें लिंबू न कापतां सरळ राजवाड्यांत घेऊन गेलों व तेथें लिंबू कापून तिनें पाणी मागितल्याबरोबर तिला प्यायला पाणी दिलें तर ती नक्की वांचेल व तिच्याबरोबर आपला जीव पण वांचेल.

परंतु पुन्हां त्याला फार तहान लागली. त्याला वाटलें कीं राजवाड्यांत पोंचण्यापूर्वीच तहानेनें आपलाच जीव जाणार. तरी त्यानें धीर करून पुढें जाण्याचें ठरविलें. एक मोठी बावडी जवळच असल्याचें त्याला आठवलें. परंतु तेथवर जायला त्याच्या अंगांत मुळींच शक्ति उरली नाहीं. म्हणून नाइलाजानें त्यानें तें तिसरें लिंबू पण कापलें. त्यांतली मुलगी पूर्वीच्या दोघां मुलींहून जास्त सुंदर निघाली. ती सुद्धां "पाणी, पाणी!" म्हणून ओरडूं लागली.

नागेश्वर तिला घेऊन धांवत धांवत त्या बावडीपर्यंत गेला आणि तिला पाणी पाजून स्वतः पाणी प्याला. पाणी प्यालयाबरोबर त्या मुलीला मनुष्याकार मिळाला. खरोखरच ती एक त्रिलोकसुंदरी होती.

"बरें झालें, तुझा जीव वांचला. आतां तूं लवकर झाडावर चढून पानांच्या आड लपून बस. मी राजाकडे जाऊन त्यांना बोलावून घेऊन येतों." असें सांगून नागेश्वर निघून गेला.



इतक्यांत राजवाड्यांतली सैंपाकीण पाणी भरायला म्हणून आली. घागर भरूं लागली तेव्हां तिला पाण्यांत एक सुंदर मुलीचें प्रतिबिंब दिसलें. तें पाहून ती ओरडली—"अरे! मी इतकी सुंदर! मग सैंपाकिणीचें काम कां करतें आहे मी!" मागें वळून पाहाते तर तिला पानांच्या आड त्रिलोक-सुंदरी दिसली.

तिला पाहून सैंपाकिणीच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोंचली. तिनें त्रिलोकसुंदरीला बाहेर ओढलें. तिचे कपडे स्वत: घातले तिला विहिरींत ढकललें व स्वत: तिच्या जागेवर झाडावर चढून बसली.

थोड्या वेळानें राजा आपल्या नोकरांना बरोबर घेऊन तिकडे आला. त्यानें झाडा-वरच्या स्त्रीला खालीं उतरवून पाहिलें तर ती त्रिलोकसुंदरी तर काय, सामान्य सुंदर स्त्रीदेखील नव्हती. त्यानें तिला व नागेश्वरला तुरुंगांत टाकलें.

दुसऱ्या दिवशीं नोकरांना त्या विहिरींत एक सुंदर पांढरा मासा दिसला. सैंपाक घरांत घेऊन जाऊन तेथल्या दासींनीं तो मासा कापला तर त्यांतून एक जिवंत बाहुली निघाली व पाहतां पाहतां तिला मनुष्याकार मिळाला.

दासींनीं ती गोष्ट राजाला जाऊन सांगितली. राजा त्रिलोकसुंदरीचें सौंदर्य पाहून चकित झाला. तिच्याकडून त्याला सर्व वृत्त कळलें. त्यानें नागेश्वरला तुरुंगांतून आदर' वैक घेऊन यायला सांगितलें. त्यानें त्याला आपला खास अंगरक्षक म्हणून नेमलें. त्रिलोकसुंदरीशीं राजाचें थाटामाटानें ल्ग्न झालें. नागेश्वरचे भाऊ मात्र आयुष्यभर राजाच्या सैंपाक घरांत पाणी भरीत राहाले.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या प्रदेशांत रहात असे त्या प्रदेशावर युद्धाचें वादळ आलें. शेजा-ऱ्याच्या राजानें त्या प्रदेशांतला कांहीं भाग आपल्या राज्याला जोडून घेण्याचें ठरविलें व युद्धाला सुरवात झाली. गोपाळ रहात असे त्या प्रदेशांत शत्रूच्या हेरांचें जाळें पसरलें होतें. अनेक दिवस राजधानीच्या किल्ल्याला वेढा देऊन शत्रुसैन्य बसलें होतें. परंतु किल्ला सर करूं शकलें नाहीं.

देश रक्षणासाठीं राजानें नवे कर लावले. पाटील व कुळकर्ण्यांना कर वसूलीचीं कामें करावी लागत. कर वसूलीच्या कामांत गोपाळनें ग्रामाधिकाऱ्यांना पुष्कळ मदत केली. सैन्य भरतीचें काम पण चालू होतें. गोपाळ रक्षणनिधि घेऊन व सैन्यांत भर्ती होण्यासाठीं तयार झालेल्या तरुणांना बरोबर घेऊन राजधानींत आला होता. तेथलें काम पुरें करून तो परत आपल्या गांवीं जात असतां रात्र झाली म्हणून एका गांवीं त्याला ती रात्र काढावी लागली. तो एका धर्मशाळेंत उतरला. तेथें पुष्कळ भिकारी जमा झाले होते. गोपाळनें त्यांना तेथें जमा होण्याचें कारण विचारलें. तेव्हां ते म्हणाले—"तशी राजाज्ञा आहे. भिकाऱ्यांना धरून राज-धानीच्या गांवीं घेऊन यावें. कारण शत्रूचे हेर वेश पालटून राज्यभर फिरत आहेत."

त्या भिकाऱ्यांपैकीं कांहीं जणांनीं गोपाळला ओळखलें व म्हणाले—"गोपाळ-राव! आम्हांला शिपायांनीं निष्कारण फक्त संशयावरून अटक करून येथें आणलें आहे. तुमच्या मध्यस्थीनें सुटका झाली तर तुमचे उपकार आम्ही जन्मोजन्मीं विसरणार नाहीं."













"पण यांत तुमचें नुकसान काय झालें ? अरे, फुकट बसून खायला मिळेल ना ? युद्ध संपेपर्यंत थोडा धीर धरा. तुमचा कांहीं अपराध नसेल तर तुम्हांला सुटका मिळेलच !" गोपाळ भिकाऱ्यांना म्हणाला.

एका वृद्ध भिकाऱ्यानें इतर भिकाऱ्यांकडून गोपाळच्या परोपकाराच्या गोष्टी ऐकून गोपाळला जवळ बोलाविलें व म्हणाला— "परोपकार हें तुमचें ब्रीद आहे. एक मेहेरबानी या गरीब भिकाऱ्यावर करा. माझा मुलगा देवीच्या देवळांत माझी वाट पहात बसला असेल. त्याचें नांव देवीदास आहे. मला शिपायांनी धरलें असल्याचें जरा कळवाल का ? मी देतों तेवढें पत्र त्याला द्या. त्यांत मी एक मंत्र लिहून ठेवला आहे. एवढा उपकार तुम्ही करावा."

काळोख पडला होता. तरी गोपाळनें तें पत्र त्या म्हाताऱ्याच्या मुलाकडे पोंचतें करण्याचें कबूल केलें. म्हाताऱ्यानें एका बाजूला गोपाळला बोलावून नेलें व त्याच्या हातांत तें पत्र दिलें. तें एका जुन्या फडक्यांत बांधलेलें होतें.

दुसऱ्या दिवशीं गोपाळ तें पत्र घेऊन देवीच्या देवळांत गेला. तेथें म्हाताऱ्यानें सांगितलेल्या खुणेप्रमाणें एक डोळा नसलेला मुलगा त्याला दिसला. त्यानें त्याला विचारलें—"तुझें नांव देवीदासच ना ?" त्यानें होकारार्थी मान हलविल्यावर गोपाळनें तें पत्र त्याच्या हातांत दिलें व म्हणाला— "हें तुझ्या बापानें दिलें आहे." असें सांगून व उत्तराची वाट न पाहतां देवीच्या दर्शनासाठीं गोपाळ देवळांत गेला.

त्या वेळीं देवळांत चारजण होते.— पुजारी, एक नोकर, देवीदास व देवीदासचा एक मित्र. देवीदासनें पाकीट उघडलें व त्यांतला कागद काढून तो भिजवला. त्याबरोबर त्याला त्यावर एक गुप्तलिपि दिसली. कांहीं उभ्या आडव्या रेघा व त्याशिवाय कांहीं लिहिलेलें पण होतें,—"हा परोपकारी गोपाळ आहे राजाचा स्नेहपात्र आहे, याला कैद करावें."

गोपाळ देवळांतून बाहेर जाऊं लागला तेव्हां देवीदास जवळ येऊन त्याला म्हणाला— "गोपाळराव ! आपल्याला आमचें आतिथ्य स्वीकारावें लागेल. आपण एक महत्वाची बातमी आम्हांला येऊन कळविलीत म्हणून आमचा राजा आपल्याला कांहीं बक्षिस देईल." असें तो बोलतच होता कीं त्याच्या मित्रानें येऊन पाठीमागून गोपाळचे दोन्ही हात घट्ट धरून ठेवले.

"अरे पण हें कां ? तूं त्या म्हाताऱ्या भिकाऱ्याचा मुलगा ना ?" गोपाळ विचारीत असतां देवळाचा नोकर एक दोरी घेऊन आला व तिघांनीं मिळून गोपाळला बांधून ठेवलें.

"हें सर्व एक नाटक आहे. आतां तुम्ही आमचा पाहुणचार स्वीकारलाच पाहिजे. तुमच्या राजाला तुम्ही आमचे कैदी आहां हें कळलें तर तो तुम्हांला सोडवून घेण्यासाठीं आपले अर्धें राज्य देईल." देवीदास म्हणाला.



"अस्सं....! पण तुमची चूक झाली. तुम्ही मला जितका मोठा समजतां तितका मोठा मी नाहीं हें मी तुम्हांला सांगूं इच्छितों. मला तुम्ही ठार केलेंत तरी राजाला त्याची फिकीर राहणार नाहीं. युद्धांत अनेक लोक मरत आहेत, त्यांतच मी एक, असें समजून राजा दुर्लक्षच करील. तुम्हांला पाहिजे तर तुम्ही मला ठार करा. पण एका निरपराध्याची हत्या केल्याचें पाप तुमच्या माथीं येईल. याच्याशिवाय तुम्हांला काय मिळणार ?" गोपाळ म्हणाला.














त्यांनीं त्याचे हात बांधून त्याला एका खोलींत ढकललें व दरवाजा बाहेरून बंद करून घेतला.

ते एक निर्जन व शून्य स्थान होतें. गोपाळला हें माहीत होतें कीं तो कितीहि ओरडला असता तरी त्याच्या मदतीला कोणी आलें नसतें. त्या देवळांत जितके लोक होते ते सर्व शत्रूचे हेर होते. तो म्हातारा भिकारी पण शत्रूचा हेरच होता. कदाचित त्यांचा पुढारी असावा. त्यानें राजधानींतल्या गुप्तमार्गांचा एक नकाशाच काढून त्या गुप्तलिपींत लिहून देवीदासला कळविला होता. म्हातारा कैद झाला असला तरी त्याचा मुलगा अजून बाहेरच होता व शत्रूकडे सर्व गुप्त माहिती पोंचती करीत होता.

गोपाळच्या अंगांत असामान्य शक्ति होती. म्हणून त्यानें दोरी तोडून आपले हात सोडवून घेतले आणि पुढें काय करावयाचे या विचारांत बसून राहाला. रात्रीं देवीदास आपल्या मित्राबरोबर सैनिक वेष धारण करून आला. त्यानें खोलीचें दार उघडलें व गोपाळला बाहेर यायला सांगितलें व म्हणाला—"आतां आम्ही तुला आमच्या राजाकडे नेत आहों. वाटेंत तूं कांहीं गैर-वर्तन केलेंस तर आमच्या जवळच्या या तलवारी पाहतो आहेसच."

"पण या तलवारीचा तुला उपयोग काय?" असें म्हणत गोपाळनें देवीदासला इतक्या जोरानें धक्का मारला कीं त्याच्या हातांतली तलवार खालीं पडली व तो एका बाजूला जाऊन पडला. तेवढ्यांत देवीदासचा मित्र तलवार घेऊन धांवला. परंतु त्या पूर्वींच गोपाळनें त्याला देखील धक्का मारून पाडलें. त्याची तलवार पण एका बाजूला जाऊन पडली होती. गोपाळनें दोन्ही तल-वारी उचलून घेऊन दूर फेंकून दिल्या.



तिकडून पुजारी व नोकर दोरी घेऊन धांवत आले. तोंपर्यंत गोपाळनें देवीदासचा व याच्या मित्राचा खूप समाचार घेतला होता. पुजारी जी दोरी घेऊन आला होता त्याच दोरीनें त्यानें त्या चौघांना बांधून त्या खालींत कोंडून ठेवलें. पुजारी व नोकर, दोघांनीं गोपाळ दोघांना खूप बडवीत असतां पाहालें होतें म्हणून त्यांची बोबडीच वळली होती. एक पाऊल पुढें टाकण्याची त्यांची हिंमतच झाली नाहीं. म्हणून गोपाळ चौघांना खोलींत कोंडून ठेवूं शकला.

नंतर त्यानें पोलीस चौकीवर ती बातमी पोंचती केली. पोलिसांनीं चौघांना धरून नेलें. गोपाळ त्यांच्याबरोबर राजधानींत गेला व त्यानें घडलेलें वृत्त राजाला जाऊन सांगितलें.

राजानें त्या म्हाताऱ्या भिकाऱ्याला घेऊन यायला पोलिसांना पाठविलें. चवकशी केल्यावर कळलें कीं तो भिकारी दुसरा कोणी नसून शत्रु राजाचा चुलताच होता. राजानें आपल्या शत्रु राजाला लिहून कळविलें कीं आपले चुलते व त्यांचे चिरंजीव आमचे कैदी आहेत. आपलें सैन्य आमच्या राज्याच्या हद्दीबाहेर ताबडतोब घेऊन जाण्याची व्यवस्था वेळींच झाली नाहीं तर आम्हांला आपण मागाहून दोष देऊं नये. नुकसान भरपाई म्हणून दहा लाख वराह दोन दिवसांच्या आंत पोंचते झाले नाहींत तर या दोघां राजकीय कैद्यांचीं डोकीं उडविली जातील."

शत्रु राजानें सर्व अटी मान्य करून संधी करून घेतली. राजानें एक खास दरबार बोलावून गोपाळचा सत्कार केला.














# पांढरा ससा

जपान देशापासून कांहीं अंतरावर एक बेट होतें. त्या बेटावर ससे राहात. सशांना तेथें कोणाची भीति नव्हती व खायला प्यायला आराम. त्या बेटावर एकच एक पांढरा शुभ्र ससा रहात असे.

तो ससा समुद्राच्या उत्तरेकडील काठावर पडून राहून जपानच्या तटाकडे पहात राही. जपानचा तट क्षितिजावर एका बारीक काळ्या रेघेसारखा दिसे, इतका दूर होता तो तट. तरी तो देश पाहून यावा असें त्या सशाला वाटे. त्याचे साथी ससे त्याला विचारीत—"तूं येथें तासन् तास पडून समुद्राकडे काय पहात राहतोस?" तो उत्तर देई—"ती जी एक काळी रेघ दिसत आहे, खरोखरीं तोच खरा देश आहे. तो एकदां पाहून येण्याची इच्छा आहे."

"डोकें फिरलें आहे कीं काय? अरे आपल्यासाठीं देवानें हें एक सुंदर बेट निर्मिलें आहे. येथें जें सुख व आराम आपल्याला आहे तो आणखी कोठें मिळणार? हा देश सोडून आणखी कोठें जाण्याचा विचार मनांत आणणें मूर्खपणा आहे." सर्व सशांनीं त्याची समजूत घालण्याचा यत्न केला. पण सर्व फुकट.

सशाच्या मनांत ती इच्छा उत्पन्न व्हायला तसें एक कारण पण झालें. एक मगर जपान देशाच्या तटावरून सशांच्या देशांत येई व ती त्या देशाचें वर्णन सशाला सांगे. म्हणे—"त्या देशाचा समुद्र किनारा सशांच्या देशाच्या समुद्र किनाऱ्यासारखा स्वच्छ नाहीं. तेथें मनुष्य नांवाच्या प्राण्याची एक जात आहे. ते मागच्या पायावर उभे राहतात व चालतात आणि पुढच्या पायांनीं सर्व कामें करतात. त्यांचा एक राजा आहे. त्याला एक मुलगी आहे. तिचे केस अमावास्येसारखे काळेभोर व अंग पौर्णिमेसारखें आहे." जपान देशाच्या राजकन्येचें तें वर्णन ऐकल्यापासून सशाच्या मनांत जपानदेश पाहण्याची इच्छा जास्तच वाढली.

एकदां मगरीनें सशाला आणखी एक गोष्ट सांगितली. राजानें त्या मुलीचें स्वयंवर रचलें आहे. अनेक राजकुमार तिला पाहून गेले. परंतु तिला एकदेखील पसंत पडला नाहीं. परंतु दूर कोठून तरी पांच राजकुमार राजकन्येशीं विवाह करण्यासाठीं येत आहेत. त्यांपैकीं एकाला पसंत करून राजकन्या त्याच्याशीं लग्न करणार आहे.

पांढऱ्या सशाच्या मनांत तेव्हांपासून जपान देशांत जाऊन त्या राजकन्येला पाहण्याची इच्छा जास्त वाढली. तो मगरीला म्हणाला—"तुझ्याशिवाय या जगांत माझा कोणी सखा मित्र नाहीं. तूं मला आपल्या पाठीवर बसवून पलीकडच्या तीरावर घेऊन गेलीस तर आयुष्यभर मी तुझे उपकार विसरणार नाहीं."



"मी हें काम केलें तर तुझे जात भाई माझ्यावर रागावतील व तुमच्या या मऊ गारगार वाळूवर मला एक मिनिटभर देखील पडून राहूं देणार नाहींत." मगरीनें प्रथम असें उत्तर सांगून टाळाटाळी केली. परंतु ससा हट्टालाच पेटला आहे हें पाहून ती त्याला पैल तीरावर न्यायला कबूल झाली. ती त्याला आपल्या पाठीवर बसवून जपान देशांत घेऊन गेली. तेथल्या तटावरची जमीन खडकाळ होती व तेथें फार चिखल पण होता.

समुद्र किनाऱ्यावरून थोडें आंत गेल्यावर सशाच्या पाठीस एक कुत्रें लागलें व



तें त्याला चावलें पण. मरणाला कधीं न भिणारा ससा तेव्हांपासून भिऊं लागला. तो रडत कण्हत एका खाऱ्या पाण्याच्या ओढ्याच्या काठीं आला. त्यावर एक पूल होता. तो त्या पुलाखालीं बसून स्वदेश सोडून परक्यांच्या देशांत आल्याबद्दल पश्चात्ताप करूं लागला. येथें सर्व कांहीं नवें व परकें. संकट कोठून व कोणतें रूप घेऊन येईल माहीत नाहीं. राजकन्येच्या दर्शनाचा योग केव्हां येतो हेंदेखील कळेना. तो त्या बाजूनें निराशच झाला. मगरीच्या पाठीवर बसून परत स्वदेशींजाणें देखील सोपें नव्हतें. तरी कुत्रें चावल्यापासून तो जोरजोरानें धांवूं लागला होता.

कांहीं वेळानें त्याला पुलावर घोड्याच्या टापांचा आवाज ऐकूं आला. पुलाखालून बाहेर येऊन त्यानें सर्वांत प्रथम मनुष्य जातीला पाहिलें. चार स्वार घोड्यावर बसून पुढें येत होते. "चक्रवर्तीच्या घराची वाट कोणती?" ते परस्परांशीं बोलत होते. मगरीनें त्याला सांगितलेली गोष्ट आठवली कीं पांच राजकुमार राजकन्येशीं विवाह करण्याच्या हेतूनें येणार आहेत. त्यांपैकीं चौघे हेच असावेत. तो त्यांच्या जवळ गेला व बरोबर घेऊन चलायला विनंति केली.

"अरे तूं तर जखमी दिसतोस. तुला आम्ही घेऊन गेलों तर तें चक्रवर्तींच्या मुलीला आवडेल का? असें सांगून राज-कुमारांनीं सशाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें व पुढें निघून गेले. त्यांच्यापैकीं एकजण मागें येऊन त्याला म्हणाला—"हें पहा! ओढ्याच्या पाण्यांत आंघोळ करून तूं वाळूंत लोळलास तर तुझी जखम भरून येईल व अंग स्वच्छ मऊ होऊन जाईल."

राजकुमारानें जें कांहीं सांगितलें तें सशाला खरें वाटलें व ओढ्याच्या पाण्यांत स्नान करून जखमा बऱ्या होतील असा विचार करून तो ओढ्यांत उतरला. पण जखमांना पाणी लागतांच त्या झोंबूं लागल्या. वाळूंत लोळल्यास कदाचित बरें वाटेल म्हणून तो कसा बसा वाळूंत गेला व खूप लोळला. प्रत्येक जखमेंतून फेस आला व त्याचें सर्व अंग इतकें घाण दिसूं लागलें कीं त्याचें त्यालाच तें पाहवेना.

"ही मनुष्यांची जात इतकी दुष्ट आहे तर! कुत्रींदेखील यांच्याहून बरीं." त्याला वाटलें व स्वदेशीं परत जाण्यासाठीं त्याचें मन जास्तच उताबीळ झालें. तो पुलावर येऊन मोठ्यानें रडूं लागला. इतक्यांत त्या पुलावर आणखी एक मनुष्य आला. तो आपल्या पाठीवर चार मोठमोठ्या गाद्या उचलून घेऊन येत होता. सशाला रडत असलेला पाहून तो थबकला. आपलें ओझें खालीं उतरून ठेवून त्यानें सशाला उचलून घेतलें व सहानुभूतीच्या स्वरांत म्हणाला—अरे रे रे! काय पण दशा झाली आहे बिचाऱ्याची! या मातींत पडून कां रडत आहेस बाबा?"

त्याच्या बोलण्यावरून हा मनुष्य चांगला असावा हें ओळखून सशानें सर्व आत्मवृत्त



सांगितलें. तो म्हणाला—"तुला ओढ्यांत आंघोळ करायला सांगणारे माझेच भाऊ. मी पांचवा. ते चौघे तिच्याशीं लग्न करण्या-साठीं म्हणून आले आहेत व मी त्यांचा नोकर म्हणून."

"तूं कां नाहीं राजकन्येशीं लग्न करून घेत? ती फार सुंदर आहे, म्हणें!" सशानें त्याला विचारलें.

त्यानें सशाला गोड पाण्यानें धुवून काढलें. सशाला पुष्कळ बरें वाटलें. नंतर त्यानें त्या जखमांना मलम लावलें व म्हणाला—"ससा! तूं येथेंच स्वस्थ पडून

रहा. मी पुन्हां येऊन तुला राजकन्येकडे घेऊन जाईन. मी तुझ्या जखमांवर जें मलम लावलें आहे त्यामुळें जखमा लवकर बऱ्या होतील व तुझ्या अंगावर मऊमऊ स्वच्छ केसपण येतील."

पांचवा राजकुमार गाद्या घेऊन गेला व आपल्या भावांना देऊन परत आला. ससा त्याची वाट पहात, त्यानें सांगितल्याप्रमाणें स्वस्थ पडून होता. त्याच्या अंगावर स्वच्छ पांढरी लव उगवली होती. पांचवा राजकुमार सशाला घेऊन राजकन्येच्या अंत:पुरांत गेला, तोंपर्यंत राजकन्येनें त्या चौघां राजकुमारांना एकामागून एक हाकलून बाहेर काढलें होतें.

द्वारपालकांनीं राजकन्येला जाऊन पांचवा राजकुमार आल्याची व त्याच्या बरोबर एक सुंदर पांढरा ससा असल्याची वर्दी दिली.

"पांढरा ससा! असा ससादेखील असतो तर! मी नव्हता कधीं पाहिला. तरमग लवकर घेऊन ये त्याला आंत!" राजकन्या म्हणाली.

राजकन्येनें सशाला उचलून घेतलें व त्याच्या अंगावर हळुवारपणानें हात फिरवला व म्हणाली—"खरोखरच किती सुंदर आहे!" सशानें तिला राजकुमारानें त्याचें कसें रक्षण केलें हें वर्णन करून सांगितलें. त्याच्याशींच विवाह करून घे, असेंदेखील सशानें सांगितलें. राजकन्येनें सशाच्या सल्ल्याप्रमाणें पांचव्या राजकुमाराशीं लग्न करून घेतलें.

पांढरा ससा त्यानंतर स्वदेशीं परत गेला नाहीं. त्यानें आपलें पुढील आयुष्य राजवाड्यांतच राजकन्येबरोबर आनंदानें घालविलें.



# अनपेक्षित पराभव

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ पुन्हां गेला व प्रेत खांद्यावर टाकून स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं एवढी मेहनत इतक्या अपरात्रीं करीत आहेस. शेवटीं ही सारी मेहनत जर फुकट गेली तर त्याबद्दल मनाला वाईट वाटवून घेऊं नकोस. कारण कधीं काळीं गुर्जर देशाचा राजा तारांग हा प्रयत्न सुरू करण्यापूर्वीच अयशस्वी झाला होता. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्याची गोष्ट तुला सांगतों ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

गुर्जर देशाच्या राजाला दोन बायका होत्या. कित्येक दिवस त्यांना कांहीं मूलबाळ झालें नाहीं. शेवटीं धाकट्या राणीला एक मुलगा झाला. सर्वांना आनंद

वेताळाच्या गोष्टी



झाला कीं राज्याला युवराज लाभला. त्याचें नांव त्यांनीं तारांग असें ठेवलें.

पांच वर्षांनंतर थोरल्या राणीला पण एक मुलगा झाला. त्याचें नांव चंद्रांग ठेवण्यांत आलें. दोघे मुलगे मोठे होऊं लागले. चंद्रांग वयानें लहान असला तरी थोरल्या राणीचा मुलगा होता. म्हणून गादीला तोच वारस होणार असें थोरल्या राणीला व तिच्या नातेवाइकांना वाटत होतें. म्हणून त्यालाच सर्व युवराज म्हणून हाक मारीत. तारांग वयानें मोठा होता. म्हणून नियमा-प्रमाणें राजा वारल्यावर गादीला वारस तोच होता. म्हणून धाकट्या राणीचे नातेवाईक तारांगलाच युवराज म्हणून हाक मारीत.

परंतु राजाला आपले दोघे मुलगे दोन डोळ्यांसारखे होते. त्याच्या मनांत कधीं दोघांपैकीं जास्त योग्य कोण हा प्रश्नच उद्भवला नाहीं. कारण तो विचार करी कीं आतांपासून त्याचा विचार करण्यांत काय अर्थ ?

पण तो प्रश्न एकाएकीं दत्त म्हणून उभा राहाला. राजा आजारी पडला. मृत्युसमयीं त्यानें आपल्या प्रधानाला व मंत्र्यांना जवळ बोलाविलें व म्हणाला—"माझ्या नंतर माझ्या मुलांपैकीं जो कोणी गादीला योग्य वारस तुम्हांला वाटेल त्याला आपला राजा करून घ्या." असें सांगून राजानें डोळे मिटले.

राजाचा दहन संस्कार आटोपल्यावर मंत्री व पुरोहित विचार करण्यासाठीं बसले. बराच वेळ विचार केला. परंतु कोणताहि निर्णय त्यांना घेतां आला नाहीं. धाकट्या राणीचा मुलगा वयानें मोठा होता. तारांग जन्मल्याबरोबर युवराजांचा जन्म झाला म्हणून राज्यभर आनंद पसरला होता व तोच राजा होणार असें प्रत्येकाला वाटत होतें. चंद्रांग, ज्याला 'दादा' म्हणून हाक मारीत होता त्याच्याकडे दुर्लक्ष करून चंद्रांगलाच राजा करणें बरें दिसत नव्हतें.

परंतु चंद्रांगची आई थोरली राणी. थोरल्या राणीला मुलगा असतां धाकट्या राणीच्या मुलाला गादीवर बसविणें पण बरें दिसेना. राजानें स्वतः कोणाला तरी आपला युवराज मानून गादीवर बसविलें असतें तर प्रश्नच मिटला असता. परंतु आज मंत्र्यानें किंवा पुरोहितांनीं दिलेला निर्णय सर्वांना आवडेलच अशी स्थिति नव्हती. दोघां राण्यांनीं तरी कांहीं ठरविलें असतें तर हरकत नव्हती. पण दोघींपैकीं प्रत्येकीला वाटे कीं तिचाच मुलगा गादीला वारस आहे. अशा परिस्थितींत मंत्र्यांनीं राज्याचे दोन तुकडे करून दोघां भावांना वांटून द्यायचें ठरविलें. या गोष्टीस चंद्रांग बिलकूल कबूल झाला नाहीं. एका मोठ्या राज्याचे दोन कमकुवत तुकडे करून टाकणें त्याला मुळींच पसंत पडलें नाहीं. एकाच राज्याच्या दोन अंगांचें आपसांत वैर व शत्रुता वाढेल आणि दोघांचीं परस्परांशीं युद्धें होतील. ही गोष्ट त्याला मुळींच आवडली नाहीं.

शेवटीं तारांगलाच गादीवर बसवायचें ठरलें. चंद्रांग राज्याभिषेकाच्या उत्सवाची





तयारी चालू असतां त्या गर्दीत कोणाला कांहीं सांगितल्या शिवाय देश सोडून निघून गेला. त्याला आपल्या शौर्यावर व पराक्रमावर पूर्ण विश्वास होता. लाथ मारीन तेथें पाणी काढीन या हिंमतीवर त्यानें आपलें स्वतःचें एक निराळें राज्य स्थापन करण्याचें मनाशीं ठरविलें.

मुलाला राज्य मिळालें नाहीं म्हणून तो निराश होऊन राज्य सोडून निघून गेला असा विचार करून त्याच्या आईला फार वाईट वाटलें व त्याच दुःखानें ती मरण पावली.

चंद्रांग दक्षिणेकडे कंकण नांवाचें एक राज्य होतें त्या राज्यांत येऊन पोंचला. राजधानींतल्या मुख्य रस्त्यावरून जात असतां समोरून राजकन्येची स्वारी हत्तीवर येत असलेली त्याला दिसली. राजकन्या विद्युलता देवीच्या दर्शनाला जात होती. नांवाला साजेल अशीच ती सुंदर पण होती. तिचें रूप पाहून चंद्रांग चकित झाला.

विद्युलता कंकण राजाची एकुलती एक मुलगी होती. तिच्याशीं ज्याचें लग्न होईल तोच राजा होणार होता. म्हणून राजा एका शूर राजपुत्राशीं तिचा विवाह व्हावा या प्रयत्नांत होता. राजानें अनेक राज-कुमारांना पाहिलें व राज्यांतले तरुण युवक पाहिले. प्रत्येक या ना त्या एकाच विद्येंत प्रवीण होता. म्हणून सर्व विद्येंत प्रवीण असेल त्याच्याशींच राजकन्येचें स्वयंवर होईल असें राजानें जाहीर केलें.

चंद्रांगनें ती घोषणा ऐकली त्यानें आपल्या भाग्याची परीक्षा घ्यायचें मनाशीं ठरविलें. या प्रयत्नांत त्याला राज्य व एक रूपवती राणीपण मिळणार होती. घर सोडून निघण्याचा हेतू पुरा होणार या विचारानें त्याला आनंदच झाला. विद्युलतेला त्यानें पाहिलें तेव्हांपासून तिनें त्याचें मन हिरावून घेतलें होतें. स्वयंवराच्या दिवशीं त्यानें हजर असलेल्या सर्व तरुण राज-कुमारांचा पराभव केला तर त्याला राजकन्या वरमाळा घालील व त्याला राज्य पण मिळेल. कंकण राज्य तसें मोठें नव्हतें. परंतु तें राज्य हातीं आल्यावर हळूहळू तें वाढवितां येईल. तो एका म्हातारीच्या घरीं उतरला आणि स्वयंवराच्या मुहूर्ताची वाट पाहूं लागला.

स्वयंवराचा मुहूर्त जवळ आला. विद्युल-तेशीं विवाह करण्याच्या हेतूनें जे राजकुमार आले होते त्यांच्या राहण्या जेवण्याची उत्तम व्यवस्था करण्यांत आली होती. चंद्रांगपण तेथें गेला. त्यानें तो कोणत्या देशाचा राजकुमार आहे हें सांगितलें नाहीं. तो एका उत्तम क्षत्रिय वंशांत जन्मला आहे एवढेंच सांगितलें.

मल्लयुद्ध, गदायुद्ध, धनुर्युद्ध व शेवटीं खड्गयुद्ध करून जो सर्वांचा पराभव करील त्यालाच राजकन्या स्वयंवराची माळा घालील असें ठरलें होतें.

जे राजकुमार स्वयंवरासाठीं आले होते त्यापैकीं अर्धे अधिक मल्लयुद्धांतच हारले.





जे मल्लयुद्धांत हारले नव्हते ते गदायुद्धांत हारले. चंद्रांगनें राजकुमार म्हणून स्वतःची ओळख सांगितली नव्हती. म्हणून त्याच्या-कडे कोणी लक्ष दिलें नाहीं. पण तोच जिंकेल असें राजाला स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. त्यानें एका मागून एक मल्लयुद्धांत, गदायुद्धांत व धनुर्विद्येंत जिंकणाऱ्या लोकांचा पराभव केलेला पाहून सर्व थक्क झाले. मल्लयुद्धांत एका मिनिटांत प्रतिपक्षी चीत खालीं पडला. गदायुद्धांत प्रवीण राज-कुमाराची गदा दूर जाऊन पडली. धनुर्विद्येंत प्रवीण मनुष्यदेखील धनुष्य व बाण टाकून पाठमोरा निघून गेला. शेवटीं खड्गयुद्धांत जो वीर युद्धाला आला त्याच्या तलवारीचे दोन तुकडे होऊन पडले. विद्युल्लता बरमाळा हातांत घेऊन चंद्रांगला घालायला पुढें आली. त्याच वेळीं तारांग रथांत बसून तेथें आला. तो देखील स्वयंवरा-साठींच आला होता. चंद्रांगाची आई वारल्यावर तिचा दहन-संस्कार भावाच्या बतीनें त्याला करावा लागला. म्हणून स्वयंवराला यायला त्याला उशीर झाला.

तारांग गुर्जर राजा आहे हें जेव्हां कंकण राजाला कळलें तेव्हां तो उशिरां आल्याबद्दल त्याला वाईट वाटलें. कारण मोठमोठे राजे हार मानून निघून गेले व एक सामान्य क्षत्रियाशीं गुर्जर राजा समक्ष कंकण राजकन्येचा विवाह होणार. गुर्जर राजा सर्व विद्येंत प्रवीण असणार. परंतु त्याला यायला उशीर झाला होता परंतु त्या परिस्थितींतहि त्याला एक गोष्ट सुचली. म्हणाला—“महाराज! यावें यावें! उशीर झाला म्हणून कांहीं हरकत नाहीं. आपण या वीर तरुणाला सर्व विद्येंत जिंकलेंत तर माझी मुलगी आपल्यालाच बरमाळा घालील.” कंकण राजाला वाटलें कीं गुर्जर देशाच्या राजाच्या हातीं तो तरुण वीर मारला गेला तर एका हलक्या क्षत्रिय कुळांत आपल्या मुलीचा विवाह करून दिल्याचें दुःख मनाला राहणार नाहीं.

तारांग आपली तलवार उपसून खड्ग-युद्धासाठीं चंद्रांगच्या समोर येऊन उभा राहाला. त्यानें चंद्रांगला ओळखलें नाहीं. परंतु चंद्रांगनें त्याला ओळखलें आणि हातांतली तलवार खालीं फेंकून दिली. विद्युल्लतेनें त्याच वेळीं बरमाळा चंद्रांगच्या गळ्यांत घातली. त्याची तलवार हातांत घेऊन ती तारांगला ती म्हणाली—“युद्ध करून हे दमले आहेत. तुम्हांला खड्गयुद्ध करावयाचेंच असेल तर माझ्याशीं करावें.”

चंद्रांग चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. त्यानें तारांग काय करतो हें पाहिलें. यावेळेस तारांगनें चंद्रांगला ओळ-खलें. त्यानें आपली तलवार म्यानेंत ठेवली आणि कोणाला कांहीं सांगितल्याशिवाय रथांत बसून निघून गेला.

विद्युल्लतेनें चंद्रांगच्या गळ्यांत बरमाळा घातली होती. म्हणून त्या दोघांचा विवाह समारंभ ठरला. कंकण राजाला नंतर कळलें कीं त्याचा जांवई सामान्य क्षत्रिय नसून गुर्जर राजाच्या थोरल्या राणीचाच मुलगा आहे. तेव्हां त्याला फार आनंद वाटला.



तारांग आपल्या राजधानींत गेला व आपल्या प्रधानाला म्हणाला—“मला हें राज्य नको. माझा धाकटा भाऊ कंकण देशांत राहातो. त्याला हें राज्य द्यावें.”

अशातऱ्हेनें चंद्रांग गुर्जर व कंकण देशांचा राजा झाला. विद्युल्लता दोन्ही देशांची राणी झाली. तारांग आपलें राज्य सोडून निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—“राजा! मला एक गोष्ट कळत नाहीं, विद्युल्लतेनें गुर्जर राणी होण्याची संधी

मिळाली असून गुर्जर राजाशीं युद्ध करण्याचा विचार कां केला? एका यःकश्चित माणसाच्या गळ्यांत तिनें वरमाळा कां घातली? विद्युलतेशीं युद्ध करण्याचें तारांगनें कां नाकारलें हें बरोबर. परंतु आपल्या भावाशीं युद्ध करून त्यानें तिला जिंकण्याचा यत्न कां केला नाहीं? या प्रश्नांचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"विद्युलतेनें नियमाचें पालन केलें. एकदां ठरलें तें ठरलें. आपणच नियम करून आपणच तो मोडणें तिला पसंत नव्हतें. तिचे वडील नियम मोडायला तयार झाले होते. पण तिनें त्यांना तो मोडूं दिला नाहीं. तारांग स्वाभिमानी व शूर नव्हता. कारण गुर्जर देशाचे दोन तुकडे करण्याचें ठरलें तेव्हां चंद्रांगला तें आवडलें नाहीं व तसें त्यानें बोलून दाखविलें. पण तारांग कांहींच बोलला नाहीं. एका मुलीशीं युद्ध करणें बरोबर नाहीं असें त्याला वाटलें असावें. त्याबरोबरच आपण तिच्याशीं खड्गयुद्ध करण्यांत हारलों तर आपली मान खालीं होईल, ही भीति पण त्याला वाटली व तेंच खरें कारण होतें. सर्वांना असेंच वाटलें कीं एका मुलीशीं युद्ध करण्यासदेखील जो मागें पुढें करतो तो राज्य काय करणार? या गोष्टीची जाणीव त्याला झाली असावी. म्हणून तो राज्य सोडून निघून गेला."

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# दगडोबा

चंद्रनगर येथें एक गरीब विधवा रहात होती. ती काबाडकष्ट करून कसाबसा आपला उदर निर्वाह करीत असे. तिला एकच एक मुलगा होता. त्याचें नांव दगडू होतें. त्याला साजेल असेंच तें नांव होतें. आईला त्याची काडीभर देखील मदत मिळत नसे. आईला नेहमीं त्याची काळजी वाटे, होणार कसें या मुलाचें पुढें!

एकदां त्याच्या आईनें लाकडें फोडून घेऊन यायला सांगितलें. तीनदां सांगितल्यावर त्यानें कळल्यासारखें डोकें हलविलें. नंतर कुऱ्हाड खांद्यावर टाकून तो गातगात रानांत निघाला. रानांत जायची वाट एका मैदानांतून जात होती. त्या मैदानांत त्याला कडक उन्हांत तिघे तरुण मुलगे झोंपत घोरत पडलेले दिसले.

दगडूला त्यांची दया वाटली. त्यानें जवळच्या एका झाडाच्या फांद्या तोडल्या व त्यांची सांवली त्या तिघांवर पडेल अशा-तऱ्हेनें त्या जवळच पुरून ठेवल्या. काम पुरें करून तो पुढें जाऊं लागला तेव्हांच ते तिघे जागे झाले. त्यांनीं त्याला विचारलें—"काय रे, बाबा! आमच्यासाठीं तूं इतकी सांवलीची कां व्यवस्था केलीस?"

"कडक ऊन पडलें आहे. तुम्हांला चांगली झोप लागावी म्हणून" दगडू म्हणाला.

"मोठा गुणी दिसतोस कीं रे! बरें जा, तुला आम्ही वर देतों, तुझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न होईल ती तावडतोब पुरी होईल." ते म्हणाले. ते त्रिदेव होते म्हणून त्यांना तसा वर देण्याचा अधिकार पण होता.

श्री. मु. द. संसारे

पण दगडोबाला तें कांहीं कळलें नाहीं. काय उत्तर द्यावें हेंदेखील त्याला सुचलें नाहीं. त्यानें दोघांना नमस्कार केला व रानांत निघून गेला. तो लाकडें तोडूं लागला. त्यानें एक मोठी मोळी तयार केली. पण ती त्याला उचलतां येईना. त्याला काय करावें हें सुचेना. तेव्हां तो त्या मोळीवर चढून बसला. मी ही मोळी उचलून घरीं घेऊन जाणें मला शक्य नाहीं. पण ही मोळीच मला उचलून घेऊन जाऊं शकली तर किती बरें होईल? त्याच्या मनांत आलें.

झालें त्याबरोबर ती मोळी आकाशांत उडूं लागली व दगडूच्या घराकडे जोरानें जाऊं लागली. ती मोळी अधांत्री मुख्य रस्त्यावरून जात असतां राजवाड्यांतून राज-कन्येनें त्याला पाहिलें. तिला गंमत वाटली व ती हंसली. दगडूनें राजकन्या प्रभावतीला हंसतांना पाहून म्हटलें—“ तूं मला पाहून हंसते आहेस, पण लक्षांत ठेव माझ्याशीं तुझें लग्न झालें म्हणजे पाहून घेईन.” तो तें म्हणाला तेव्हां त्याला आपल्या मनांतल्या इच्छेप्रमाणें होण्यास आपल्याला वर प्राप्त आहे, हें त्याला कोठें कळत होतें?

पण त्याला वर मिळाला होता तसेंच झालें. राजकन्येचें हंसणें बंद झालें व खिडकीजवळ मन मारल्यासारखी ती बसून राहाली. तिच्या दासी व सखी तें दृश्य पाहून चकित झाल्या व तिची समजूत घालण्याचा यत्न करूं लागल्या. शेवटीं त्यांनीं तें सर्व राजाला जाऊन सांगितलें.

राजानें आपल्या मुलीकडे पाहून विचार केला, दुःखी कां होणार नाहीं? लग्नाचें वय झालें आहे. लवकर लग्न करून टाकलें पाहिजे. नंतर मुलीला बोलावून म्हणाला—“ मुली! तुझें लग्न करून टाकावें म्हणतों. तुला जो कोणी राजकुमार पसंत पडला असेल तर सांग.”

प्रभावती म्हणाली—“ थोड्या वेळापूर्वी एक जण लाकडाच्या मोळीवर बसून गेला. त्या तरुण मुलाशिवाय मी आणखी कोणाशीं लग्न करणार नाहीं.”

मुलगी म्हणाली तें राजाला कळेना. म्हणून प्रभावतीच्या मैत्रिणींनीं घडलेलें वृत्त थोडक्यांत सांगितलें. तें ऐकून राजाला मुलीच्या मूर्खपणावर राग आला.

प्रभावतीनें ज्याच्याशीं लग्न करण्याचें मनाशीं ठरविलें होतें त्याचें नांवदेखील तिला









माहित नव्हतें. अशा प्रकारचें तऱ्हेवाईक वागणें राजाला मुळींच आवडलें नाहीं. तिला शिक्षा करून तिची खोड मोडण्याचें त्यानें ठरविलें. परंतु राजाचा प्रधान म्हणाला—“आपल्याला हेंच कययतें एकुलतें एक अपत्य. आपण तिच्यावर असा राग काढला तर ती कोणकडे जाणार? शिवाय ज्या मुलावर तिचें प्रेम आहे तो कोणत्या तरी देशाचा राजकुमार नसेल कशावरून? म्हणून घाई करूं नये.”

“प्रथम त्याला धरून आणलें पाहिजे.” राजा म्हणाला.

“गांवांत लग्नाला योग्य जितके तरुण आहेत त्या सर्वांना मेजवानीला बोलवा. जी तरुण मंडळी मेजवानीला येतील त्यांपैकीं राजकुमारीला पसंत पडलेला मुलगा कोण हें सहजीं कळूं शकेल. कारण राजकुमारी स्वतःच त्याला ओळखील” मंत्र्यानें सुचविलें.

राजाला तो सल्ला पसंत पडला. त्यानें राजधानींतल्या सर्व घरंदाज तरुणांना मेजवानीला बोलाविलें आणि राजकन्येला म्हणाला—“सांग, त्यांपैकीं तूं पसंत केलेला मुलगा कोण?” प्रभावतीनें जवळ जाऊन प्रत्येक तरुणाला न्याहाळून पाहिलें व म्हणाली—“माझें प्रेम ज्याच्यावर आहे तो येथें आलेला नाहीं.”

राजाला तें उत्तर ऐकून इतकी चीड आली कीं तेथल्या तेथें त्या मूर्ख मुलीला ठार करावेंसें त्याला वाटलें. प्रधानानें पुन्हां त्याला अडविलें. गांवांत लग्नाला योग्य इतर तरुण पुष्कळ आहेत. त्यांना एकदां मेजवानी द्यावी. राजकुमारीचें प्रेम ज्याच्यावर आहे तो सामान्य घराण्यांत जन्मलेला मुलगा असेल.

“माझ्या मुलीचें लग्न एका अशा सामान्य घरांत जन्मलेल्या माणसाशीं व्हावें



हें मला मुळींच पसंत पडणार नाहीं.” असें राजा म्हणाला.

“जगांत सर्वच गोष्टी मनुष्य योजतो तशा होत नाहींत. ईश्वरेच्छा कांहीं निराळीच असते. त्याविरुद्ध मनुष्याचा सर्व प्रयत्न फुकट असतो.” प्रधान म्हणाला.

राजानें आणखी एक मेजवानी दिली. राजधानींतली सर्व गरीब तरुण मंडळी मेजवानीला आली. परंतु तें दगडूला कळलें नाहीं. त्याच्या आईला कळलें. तिनें त्याला आग्रह करून मेजवानीला जायला सांगितलें. तो जायला तयार झाला नाहीं. ती म्हणाली—“वेड्या! पंचपक्वान्नांचें जेवण आहे. पोट भर खाऊन ये.” आईनें त्याला ढकलून घराबाहेर काढलेंच तेव्हां तो जुने फाटके कपडे घालून मेजवानीला गेला.

राजकन्येनें त्याला पाहतांच ओळखलें व म्हणाली—“हा माझा प्रियकर!”

“तूं या दगड्याशीं लग्न करणार?” राजानें रागांत राजकन्येस विचारलें. त्या वेळीं त्याचें नांव दगडू आहे हें राजाला माहीत नव्हतें.

“होय!” प्रभावती म्हणाली. हें ऐकून राजाला भयंकर संताप आला. म्हणाला—



“ठीक, कर या दगडोबाशीं लग्न. पुढें मला जें करायचें तें मी करीन.”

लगेच पुरोहिताला राजानें बोलाविलें व दगडूशीं प्रभावतीचें लग्न करून दिलें. लग्न झाल्यावर राजानें दोघांना एका पिंपांत बसविलें व समुद्रांत दूर खोल पाण्यांत तें पिंप नेऊन सोडलें. ओहोटीच्या लाटे बरोबर तें पिंप समुद्रांत जास्त आंत गेलें.

राजाची ती भयंकर आज्ञा राजकन्येच्या मैत्रिणींना कळली म्हणून बरें झालें. त्यांनीं, दोघांना पिंपांत घातलें व त्यांच्याजवळ खाण्यापिण्याच्या पुष्कळ वस्तू बांधून दिल्या.



पिपांत बसून दगडू प्रभावतीला म्हणाला— "आपलें मरण जवळ येऊन ठेपलें आहे."

"राजकन्या म्हणाली—"हो, पिपांत कोठें भोंक नसेल तर हवेच्या अभावीं आपल्याला मरण येईल. भोंक असेल तर पिपांत पाणी शिरेल व आपण पाण्यांत बुडून मरूं. यदाकदाचित आपण त्यांतूनहि वांचलोंच तर माझ्याजवळ खाण्यापिण्याचे जे पदार्थ आहेत ते संपले कीं नंतर मरण हें येणारच." असें म्हणत ती रडूं लागली.

"अरे रडण्याचें कारण काय? आपण आतां तर जिवंत आहों." दगडू म्हणाला.

"तुला बिल्कुल कळत नाहीं. तूं बाबा म्हणतात तसा दगडोबा आहेस. एकादें जहाज आलें व आपल्याला कोणी पाहून वांचविलें तर आपण वांचणार." राजकन्या म्हणाली.

"तुला जहाजच पाहिजे ना? मी मनांत आणलें तर एका क्षणार्धांत तें समोर उभें राहील. मला त्या तिघांनीं एक वर दिला होता ना, कीं माझ्या मनांत जें येईल तें होईल." दगडू म्हणाला.

"तुला असा वर आहे तर काय करीत होतास दगडोबा! एक जहाज कर ना निर्माण!" राजकन्या म्हणाली.

"त्यासाठीं इतकी घाई कशाला? पहिल्यानें खायला काय आणलें आहेस तें तर काढशील कीं नाहीं?" दगडू म्हणाला.

प्रभावतीचा जीव कासावीस झाला होता. या पिपांतून बाहेर कसें निघावें, हा एकच एक विचार तिच्या मनांत होता. तिनें खाण्यासाठीं म्हणून जें कांहीं आणलें होतें तें दगडूच्या समोर ठेव. दगडू खायला बसला. दगडूनें पिपाचें झांकण उघडलें पाहतो तर समोर एक जहाज. नवरा बायको त्यांत बसून किनाऱ्यावर पोंचली व घरीं आलीं.










प्रभावतीच्या सूचनेवरून दगडूनें विचार केला कीं त्यांना राहण्यासाठीं एक राजवाडा असावा. त्यांत सर्व सुखसोयी व नोकर-चाकर असावेत. राजवाड्याच्या चारीबाजूला उद्यान असावें. तसेंच झालें.

राजवाड्यांत कांहीं दिवस दोघं सुखानें राहाली. नंतर एकदां प्रभावती दगडूला म्हणाली—"एक गोष्ट आणखी झाली पाहिजे. तूं दिसायला बावळट दिसतोस. तूं दिसायला सुंदर व्हावास व तुझा बावळट-पणा नाहींसा व्हावा."

"तुला तेंच हवें असेल तसें होईल!" दगडोबा म्हणाले.

झालें, दगडूनें तसा विचार केला त्या-बरोबर त्याला सुंदर रूप आलें व त्याला बुद्धीपण आली. आतां त्याला प्रत्येक वेळीं बायकोच्या सल्ल्याप्रमाणें काम करण्याची किंवा वागण्याची गरज राहाली नाहीं. त्याला मिळालेला वर त्याला उपयोगी पडला. त्याच्या मनांत आलें कीं आपण राजा व्हावें व आपल्याजवळ एक राज्य असावें. त्या-प्रमाणें त्याला राज्य मिळालें. त्याच्या राज्यांत प्रजा सुखी झाली.

प्रभावती व दगडोबाला पिंपांत घालून समुद्रांत फेकून दिल्यावर राजाला फार वाईट वाटलें. कांहीं दिवसानंतर तो शिकारीला गेला असतां त्याला एक राजवाडा दिसला. तो राजवाड्यांत गेला. तेथें त्याला त्याची मुलगी भेटली. त्याला फार आनंद झाला.

दगडूनें आपल्या आईला बोलवून घेतलें. म्हातारीला पण आनंद झाला. ती आपल्या मुलाला 'दगडू' 'दगड्या' न म्हणतां दगडूराव म्हणूं लागली. म्हातारपणीं तिला सुख मिळालें.





# उत्तरकांड

यमाबरोबर युद्ध करण्याचें ठरवून रावणानें यमलोकावर स्वारी केली. तेथें नाना तऱ्हेची नरक यातना सहन करणारे नाना प्रकारचे पापी त्याला दिसले. त्याच प्रमाणें पुण्यकर्म करून सुखोपभोग करणारे पुण्यवान लोक पण रावणाला दिसले. कुरूप व क्रूर यमकिंकर पापी लोकांना किडे खायला लावीत होते. कुत्रे त्यांच्या अंगाचे लचके तोडीत होते. वैतरणी नदींत व तापलेल्या वाळूंत त्यांना फेकून देण्यांत येत होतें. नरकांत पडलेल्या लोकांची स्थिति प्रेतासारखी होती. जखमा झाल्यामुळें व दमून भागून गेल्यामुळें पापी लोक रडत होते तर दुसरीकडे पुण्यवान आनंदांत गर्क होऊन गेले होते.

लक्षावधि पापी लोकांना ते कष्ट सहन करीत असतांना पाहून रावणाला त्यांची सर्वा कींव आली. तो त्या यमयातनेंतूनना मुक्त करण्यासाठीं धांवला. तें पाहून यमदूतांना राग आला. त्यांनीं रावणावर शस्त्रास्त्र प्रहार सुरू केला. कित्येक पुष्पक विमानांत शिरून त्यांतल्या वस्तूंचा नासधूस करूं लागले. परंतु तें विमान अक्षय होतें. म्हणून कोणी कांहीं बिघाड करूं शकला नाहीं. मोडलेला भाग पुन्हां पहिल्यासारखा होऊन गेला.



त्यानंतर नारद सरळ यमाकडे गेला. यमानें त्याला आदरपूर्वक बसायला सांगितलें व येण्याचें कारण विचारलें.

नारद मिस्मिलपणें स्मित करून म्हणाला— "यमराजा! तुला माहीत असेल, कदाचित माहीत नसेल हि, दशग्रीव नांवाचा राक्षसांचा एक महाप्रतापी व अजेय राजा तुला जिंकण्याची प्रतिज्ञा करून येत आहे. तुझा अधिकार व तुझें शासन कार्य तूं कसें काय चालवणार आहेस, हें पहा." नारद बोलतच होता, तेवढ्यांत यमाला दुरून तें दिव्य विमान येत असलेलें दिसलें.

रावणानें यमाच्या किंकरांशीं कांहीं वेळ युद्ध केलें. नंतर त्यानें त्यांच्यावर आपलें पाशुपतास्त्र सोडलें. त्यामुळें यमलोकाच्या त्या प्रदेशाला आग लागली आणि 'हां हां' म्हणतां वृक्षलता जळून भस्म होऊन गेल्या. आगीचे लोट चहूंकडे पसरूं लागले व यम-किंकर त्यांत किड्यासारखे जळून जाऊं लागले.

रावणानें व त्याच्या मंत्र्यांनीं गर्जना केली व त्या आवाजानें त्रिलोक हादरलें. ती गर्जना ऐकून यमाला कळलें कीं रावणाचा जय झाला असावा. त्यानें आपल्या सारथ्याला बोलावून रथ तयार करायला सांगितलें.

एका क्षणार्धांत एक रथ तयार होऊन आला. त्याला तांबडे घोडे होते व स्वतः मृत्युदेव हातांत मुद्गल व यमपाश घेऊन घेऊन उभा राहाला.

यम रथांत बसला तेव्हां एका बाजूला कालदंड व दुसऱ्या बाजूला कालपाश ठेवलेले होते. अशा तऱ्हेनें यम सर्व तयारी करून युद्धाला निघाला तेव्हां त्रिलोक भयभीत होऊन तिकडे पाहूं लागलें.

यमाचा रथ सरळ रावणासमोर जाऊन उभा राहाला. यमाचा तो भयंकर रथ पाहून व समोर भयंकर मृत्यूला उभा पाहून



रावणाचे मंत्री दचकले व पाठ फिरवून पळूं लागले. पण रावण थोडा देखील भ्याला नाहीं. तो तेथेंच उभा राहाला.

दोघांचें सात रात्रीं भयंकर युद्ध झालें. यमानें अस्त्रप्रहार करून रावणाला जखमी केलें. परंतु रावण भ्याला नाहीं कीं जागचा हलला नाहीं. एवढेंच नव्हें तर रावणानें यमाला बाणवृष्टि करून जखमी केलें.

तें पाहून मृत्यु यमाला म्हणाला—"यम-धर्मराजा! मी करतों या राक्षसाशीं युद्ध. एका क्षणांत मी त्याला ठार करतों. ठार करणें हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे. मी कित्येक राक्षसांना ठार केलें आहे. प्रलयकालांत तर त्रिलोकाचा नाश झालेला स्वतःच्या डोळ्यांनीं मी पाहिला आहे. मग या क्षुद्र राक्षसाची काय कथा?"

"तूं पहा तर, मी एका क्षणांत त्याचा नाश करतों." असें सांगून यमानें कालदंड हातीं घेतला. त्यांतून ज्वाळा बाहेर येत होत्या. कालदंडच तो, भयंकर दिसत होता.

यम आतां कालदंड फेंकणार, तेवढ्यांत स्वतः ब्रह्मदेव प्रत्यक्ष होऊन म्हणाला—"यमा कालदंड मागें घे. त्याच्यासमोर सर्व अस्त्रें फुकट. मी रावणाला जो वर दिला आहे तो याचा प्रयोग केलास तर निरर्थक व खोटा ठरेल. म्हणून माझ्या लाजेस्तव तूं तो कालदंड मागें घे. याशिवाय समज, माझा वर खरा ठरला तर कालदंड खोटा ठरेल. तेंदेखील बरोबर नाहीं. म्हणून दोघांची लाज राखणें तुझें कर्तव्य आहे. मी मृत्यूची सृष्टि केली तेव्हां कालदंडाची पण केली होती. म्हणून एकाला खरा व दुसऱ्याला खोटा करणें बरोबर नाहीं."

ब्रह्मदेवाच्या शब्दाला मान देऊन यमानें आपला कालदंड बाजूला उचलून ठेवून दिला. रावणाला मारणें इतर कोणत्याहि प्रकारें अशक्य आहे हें समजून तो रणांगणावरच अंतर्धान झाला व ब्रह्मादिक देवांच्या बरोबर स्वर्गलोकी निघून गेला.

रावणानें यम कोठें दिसत नाहीं हें पाहून स्वतःचा जय झाल्याचें जाहीर केलें. तो पुष्पक विमानांत बसून यमलोकांत शिरला. तें सर्व पाहून विघ्नसंतोषी नारदाला आनंदच झाला.

यमाला जिंकून व मारीच वगैरे आपल्या मंत्र्यांची शाबासकी मिळवून रावण पुष्पक विमानांत बसून पाताळलोकीं गेला. समुद्रांत वरुणाचें राज्य होतें. त्यानें भोगवती नगरी जिंकली. त्या नगरींतच वासुकी वगैरे मोठ-मोठे नाग रहात होते. तेथून तो मणिमति नगरास गेला. तेथें निवातकवच वगैरे रहात होते. निवातकवच आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन रावणाशीं युद्ध करण्यास तयार होऊन आले.

एक वर्षभर युद्ध चालू होतें. पण जयापजयाचा निर्णय होऊं शकला नाहीं. तेव्हां ब्रह्मदेव प्रगट झाला व त्यानें दोघां-मध्यें संधी करून दिली. त्यानें अग्नीला साक्षी ठेवून दोघांमध्यें कायमची नोकरी घडवून आणली आणि ब्रह्मलोकीं निघून गेला. रावण निवातकवचांच्या राज्यांत



त्यांचा पाहुणा म्हणून एक वर्षभर राहाला. तो परस्थानीं पण स्वदेशासारखाच सुखी झाला. निवातकवचांकडून रावणानें नव्याण्णव माया शिकून घेतल्या. नंतर वरुणाचा शोध काढीत निघाला.

वाटेंत कालकेय याचें यश्मनगर लागलें. रावणाचें कालकेयांशी युद्ध झालें. रावणानें अनेक कालकेय वीरांचा वध केला. या युद्धांत ठार झालेल्या वीरांत विद्युज्जिव्ह पण एक होता. शूर्पणखेचा तो पति होता. तो फार मोठा वीर होता. विजेसारखी त्याची जीभ होती व तो राक्षसांना आपल्या



जिभेनें पकडून गिळून टाकीत असे. रावणानें त्याला तलवारीनें ठार केलें. रावणाच्या हातीं एकंदर चारशें वीर ठार झाले.

तेथून रावण वरुणाच्या राजवाड्यांत आला. तो वाडा एक पांढऱ्या शुभ्र ढगासारखा मोठा व कैलाश पर्वतासारखा गगनचुंबी होता. तेथें कामधेनु होती. तिच्या दुधापासूनच क्षीरसागर झाला होता. क्षीरसागरांतूनच चंद्र व अमृत यांचा जन्म झाला. त्याचा फेस खाऊन तेवढ्यावरच कांहीं ऋषि व मुनि जगत होते. शंकराचें वाहन नंदी कामधेनूचाच मुलगा.

अशा कामधेनूला रावणानें प्रदक्षिणा घातली आणि वरुणाच्या वाड्याकडे वळला. वरुणाच्या शूर अनुयायांनीं रावणाला अडविलें. रावणानें त्या सर्वांना ठार केलें. उरलेल्यांना तो म्हणाला—"जाऊन आपला राजा वरुण याला सांगा कीं रावण युद्ध करण्यासाठीं आला आहे."

वरुणाचे मुलगे व नातवंडें सर्व आपल्या अनुयायांसह रथांत बसून रावणाशीं युद्धाला आले. पण रावण आणि त्याचे मंत्री यांच्या हातीं त्यांचा पराभव झाला. सर्व नोकरचाकर ठार झाले व वरुणाचे मुलगे कसेबसे आपला जीव घेऊन रणांगणावरून पळून गेले. नंतर रावणानें वरुणाकडे निरोप धाडला तेव्हां तो घरांत नसल्याचें रावणाला कळलें. त्या वेळीं तो गायनाच्या कार्यक्रमासाठीं ब्रह्मलोकांत गेला होता.

रावणानें आपला जय झाल्याचें जाहीर केलें व अश्म नगराकडे वळला. तेथें त्याला एक भव्य इमारत दिसली. त्या वाड्याला शोभेसाठीं तोरणें व मोत्यांच्या झालरी बांधल्या होत्या. सोन्याचे खांब व स्फटिकाचे जिने दिसले. रावण प्रहस्ताला म्हणाला—"चवकशी कर कीं हें घर कोणाचें आहे!"



प्रहस्त किल्ल्याचा पहिला कोट पार करून आंत गेला तेव्हां त्याला कोणी दिसलें नाहीं. सात कोट पार करून तो आंत गेला तेव्हां त्याला एक दिव्य ज्वाला दिसली. त्या ज्वालेच्या मध्यभागीं एक दिव्य पुरुष दिसला. त्याच्या तोंडावर सूर्याचें तेज होतें. म्हणून त्याच्याकडे नुसतें पाहाणें देखील प्रहस्ताला अशक्य झालें. प्रहस्ताला पाहून त्या दिव्य पुरुषानें स्मित केलें. त्याचें स्मित पाहून प्रहस्ताला आनंद झाला. तो परत रावणाकडे गेला व त्यानें जें कांहीं पाहिलें तें वर्णन करून रावणाला सांगितलें.

तें कळल्यावर रावण पुष्पक विमानांतून खालीं उतरला व त्या राजवाड्यांत प्रवेश करूं लागला. परंतु त्याच वेळीं एक भयंकर आकृति दार अडवून उभी असलेली त्याला दिसली. त्याच्या डोक्यावर चंद्र चमकत होता. तोंडांतून भयंकर ज्वाळा येत होत्या. त्याचे ओठ लाल होते व तोंड गौरवर्ण. त्याच्या जटा वर बांधलेल्या होत्या. मोठमोठ्या पिळदार मिशा त्याला होत्या. लांब दाढी होती. मोठमोठे दांत होते व हातांत मुद्गल होतें. ती भयंकर आकृति पाहून रावणाच्या सर्वांगावर कांटा उभा राहाला.



तो रावणाला म्हणाला—"राक्षसा! भिऊं नकोस! बोल, तुला काय पाहिजे?"

"मला युद्ध करावयाचें आहे!"

"कोणाशीं युद्ध करावयाचें आहे? माझ्याशीं कीं बलीशीं?" त्या आकृतीनें विचारलें.

"ज्याचा हा राजवाडा आहे त्याच्याशीं नाहीं, तूं ज्याच्याशीं युद्ध करायला सांगशील त्याच्याशीं!" रावण म्हणाला.

"आंत बली आहे. त्याच्याशीं तुला युद्ध करावयाचें असेल तर कर." ती आकृति म्हणाली.

रावण आंत गेला. सूर्यासारखा बलीचा तेजस्वी चेहरा पाहून रावणाचे डोळे दिपून गेले. बलीनें रावणाला उचलून मांडीवर बसवून विचारलें—"कशासाठीं आला होतास? काय वाटेल तें माग."

"आणखी कांहीं इच्छा नाहीं. कांहीं थोर लोकांकडून ऐकतों कीं विष्णूनें तुम्हांला फंसवून या बंधनांत बांधून ठेवलें आहे. तुम्हांला सोडवण्याची इच्छा माझ्या मनांत आहे व तेवढी शक्ति पण माझ्या अंगांत आहे. म्हणून तें काम मी करणार आहें." रावण म्हणाला.

"असें होय? तर मग ऐक. तुला एक गोष्ट सांगून ठेवतों. तेथें पडलेलें तें कुंडल घेऊन ये." बली म्हणाला.

रावणानें जवळ जाऊन पाहिलें, तें कुंडल रथाच्या मोठ्या चाकाएवढें होतें. रावण तें उचलूं लागला. परंतु तो तें उचलूं शकला नाहीं. त्यानें दोन्ही हातांनीं तें उचलण्याचा यत्न करून पाहिला. परंतु तो देखील फुकट गेला. रावणाला आपल्या शक्तीचा गर्व होता. त्याची मान खालीं झाली.

तें पाहून बलीनें रावणाला जवळ बोलावलें व म्हणाला—"जें कुंडल तूं जागचें हलवूं शकला नाहींस तें कुंडल आमचे पूर्वज हिरण्यकश्यपु कानांत घालीत असत. त्यांना अनेक वर प्राप्त होते. अमरपणाचा वर पण त्यांना प्राप्त होता. परंतु शेवटीं विष्णूनें नरसिंहावतार घेऊन त्याचा वध केला. त्याच विष्णूला तूं दरवाज्यावर पाहिलें होतेंस."

तें ऐकून रावणाला भयंकर राग आला. तो पाय आपटीत दारापर्यंत आला. परंतु तेथें त्याला विष्णु दिसला नाहीं.





# जलंधराची गोष्ट

ब्रह्मदेवाकडून वरप्राप्ती करून घेऊन तारकासुरानें त्रिलोक पादाक्रांत केला. तेव्हां इंद्राला कळलें कीं जलंधराचा वध करण्यास शंकराचा मुलगाच समर्थ होईल. म्हणून इंद्रानें कामदेवाला बोलावून त्याला त्या कामावर नेमलें. कामदेव आपला मित्र वसंत याला बरोबर घेऊन शंकर तपश्चर्या करीत बसला होता तेथें गेला. त्या वेळीं पार्वती सेवेला हजर होती. कामदेवानें आपला पुष्पबाण शंकरावर फेंकला. त्याबरोबर तपश्चर्या भंग झाली म्हणून शंकराला राग आला. त्यानें आपला तिसरा डोळा उघडला. त्यांतून अग्निवृष्टि होऊं लागली व त्यांत कामदेव भस्म होऊन गेला.

कामदेव भस्म झाल्यावर उरलेला अग्नि समुद्रांत पडला व त्यांतून एक मुलगा उत्पन्न झाला. तो मुलगा रडला तेव्हां देव घाबरून ब्रह्मदेवाकडे धांवले. ब्रह्मदेव त्यांना बरोबर घेऊन समुद्राकडे गेला व त्याला विचारलें—"हा कसला ओरडा?"

समुद्रानें आपला मुलगा त्यांना दाखवला व ब्रह्मदेवाला म्हणाला—"हा माझा मुलगा आहे. तुम्ही याचें नांव ठेवा व याची जन्मकुंडली लिहा."

ब्रह्मदेवानें त्या मुलाचें नांव जलंधर ठेवलें व म्हणाला—"याला शंकराशिवाय इतर कोणाचें भय नाहीं."

जलंधर लहानाचा मोठा झाला. वयांत आल्यावर समुद्रानें कालनेमीची मुलगी वृंदा म्हणजे तुळशीशीं त्याचें लग्न करून दिलें.

एकदां जलंधराच्या सभेंत राक्षसांचा गुरु शुक्राचार्य आला. त्यानें देवांचें राक्षसांशीं



कसें वैर वाढत गेलें याचा इतिहास सांगितला व म्हणाला—"देवांनीं राक्षसांवर जो अन्याय केला आहे त्याचा प्रतिकार करणें त्यांना आवश्यक वाटलें. सुरासुरांनीं समुद्राचें मंथन केलें तेव्हां त्यांतून चवदा रत्नें व अमृत पण निघालें. सर्व रत्नें देवांनीं आपसांत वांटून घेतलीं. समुद्राला किंवा राक्षसांना कांहींच दिलें नाहीं. अमृतदेखील तेच घेऊन जाऊं लागले. राहू त्यांतलें थोडें अमृत चोरून प्यालाच. म्हणून त्यांनीं त्याचा शिरच्छेद केला."

तो जुना इतिहास ऐकून जलंधरला राग आला. त्यानें घस्मर नांवाचा आपला एक दूत इंद्राकडे पाठविला व समुद्रमंथनांत त्यांनीं जीं रत्नें मिळविलीं होतीं त्यांतला वांटा परत द्यायला कळविलें. इंद्र गर्वानें त्याला म्हणाला—"माझा धाकटा भाऊ विष्णु यानें तुझ्यासारख्या अनेक राक्षसांचा वध केला आहे. मग तुझी कोण पर्वा करतो?"

जलंधरानें त्या रागानें देवांशीं युद्ध आरंभिलें. त्याच्याशीं युद्ध करण्यासाठीं देव विष्णूला घेऊन आले. विष्णूनें जलंधरशीं अनेक वर्षें युद्ध केलें पण तो त्याला जिंकूं शकला नाहीं व स्वतःचा पराभव मान्य करून लक्ष्मीसह जलंधरच्या घरीं रहायला कबूल झाला. स्वतः विष्णूचाच पराभव झाल्यावर इंद्राच्या बाजूनें युद्ध करण्यास कोण पुढें पाऊल टाकणार? म्हणून त्यांनीं नारदाकडे जाऊन त्याचे पाय धरले व म्हणाले—"नारदा! या संकटांतून आमचें रक्षण होण्यास तूंच कांहीं तरी तोड सांग!"

नारद त्यांना मदत देण्याचें वचन देऊन जलंधरच्या घरीं गेला व म्हणाला—"जलंधरा! तुझें हें वैभव असून नसून फुकट. अरे, हें उपभोगण्यासाठीं लोकोत्तर सुंदर स्त्री कोठें आहे तुझ्याकडे. या त्रिलोकांत एकच सुंदर स्त्री आहे. ती म्हणजे पार्वती. आणि तिनें त्या जोगड्या शंकराबरोबर स्मशानांत विहार करावा हें नाहीं बरोबर. तूं घेऊन ये तिला व आपली राणी कर."

नारदाच्या बोलण्यावर विश्वास करून जलंधरानें शंकराकडे निरोप पाठविला कीं ताबडतोब पार्वतीला माझ्याकडे पाठवून दे. शंकराला त्या गोष्टीचा राग आला व तो जलंधराशीं युद्ध करण्यास निघाला. भयंकर युद्ध झालें

जलंधराला एक युक्ति सुचली. त्यानें स्वतः शिवरूप धारण केलें. कांहीं राक्षसांना शंकराचे गण व्हायला सांगितलें व अशा तऱ्हेनें सर्व तयारी करून तो पार्वती होती तेथें गेला. त्यानें पार्वतीकडे नोकराकरवीं सांगून पाठविलें कीं स्वतः शंकर तुझ्या भेटीसाठीं आला आहे. परंतु पार्वतीसमोर आली तेव्हां तिचें सौंदर्य पाहून त्याला आश्चर्य वाटलें व त्याचा पाय मागें सरकला.

पार्वतीला संशय आला. ती अदृश्य झाली व तिनें विष्णूचें ध्यान केलें. विष्णूनें तिला लगेच दर्शन दिलें व विचारलें—"पार्वती! माझी आठवण कां ग काढलीस?"



पार्वती म्हणाली—"जलंधरची बायको वृंदा एक महा पतिव्रता आहे. तिच्या पातिव्रत्याच्या बळावर जलंधर अजेय झाला आहे."

त्याच वेळीं वृंदाला एक वाईट स्वप्न पडलें. जलंधर एका रेड्यावर बसून दक्षिणेकडे जात आहे व त्याच्या राजधानीला आग लागली आहे. तिला अनेक अपशकुन पण झाले. ती घाबरून गेली व वेड्यासारखी उपवनांत पळूं लागली. ती अशी पळत असतां तिला एका झाडाखालीं म्हाताऱ्या मुनीचें सोंग करून बसलेला विष्णु दिसला. झाडावर दोन माकडें बसलीं होतीं.

वृंदानें विष्णूला मुनी समजून विचारलें— "मुनीश्वर! आपण आपल्या दिव्य दृष्टीनें पाहून सांगा कीं माझे पति जिवंत आहेत कीं नाहींत."

"शंकराच्या हातीं तुझ्या पतीचा वध झाला आहे." मुनि वेषधारी विष्णु म्हणाला.

वृंदा जास्तच भ्याली. म्हणाली— "मुनीश्वरा! आपण काय वाटेल तें करून माझ्या पतीला जिवंत करा!"

"मी आपली तपश्चर्या पणाला लावून तुझ्या पतीला जिवंत करतों." असें सांगून विष्णूनें शेजारच्या ओढ्यांतल्या डोहांत बुडी मारली व थोड्या वेळानें तो बाहेर निघाला तेव्हां तो जलंधरासारखाच होता. तो वृंदेजवळ आला. वृंदेला तें कांहीं कळलें नाहीं. तिनें विष्णूलाच पति समजून आलिंगन केलें व अशा तऱ्हेनें तिचें पातिव्रत्य नष्ट झालें.

परंतु विष्णूनें आपली फसवणूक केल्याचें थोड्याच वेळानें वृंदेच्या लक्षांत आलें. म्हणून तिनें विष्णूला शाप दिला— "तूं मला असें फसविलें आहेस म्हणून तुला पत्नीविरह सहन करावा लागेल व माकडांच्या आश्रयाला रहावें लागेल." असा शाप देऊन तिनें चिता पेटवली व त्यांत प्रवेश करून भस्म होऊन गेली.

विष्णु निश्चेष्ट उभा राहून तें दृश्य पहात राहाला. तिकडे पत्नीचें पातिव्रत्यबळ पाठीशीं नसल्यामुळें जलंधरचें रक्षण होऊं शकलें नाहीं. त्याचा वध करण्यांत शंकराला यश मिळालें.

नंतर शिव पार्वती विष्णूकडे आले. वृंदाची चिता जळून तेथें थंड राख उरली होती तीवर त्यांनीं बिया टाकल्या. त्या जागीं तुळशी, आंवळा व मालतीचीं झाडें उगवलीं.



# १९. [illegible]चें शिखर

पवे (फ्रान्स) नगराजवळचा डोंगर पूर्वीं कधीं एक ज्वालामुखी होता. दगड वितळून गेल्यावर जो उरला तो हा एवढा डोंगर. एक हजार वर्षांपूर्वीं याच्या शिखरावर २६९ फुट उंच असें एक प्रार्थनामंदिर बांधण्यांत आलें. चढून जायला एकंदर २६८ पायऱ्या आहेत.





# भारताचा इतिहास



औरंगजेब बादशाहाच्या आमदानींतला अर्धाअधिक काळ उत्तर हिंदुस्थानांतील प्रश्न सोडविण्यांत नष्ट झाला. दक्षिण हिंदुस्तानांतील शासन त्याचे प्रतिनिधि पहात होते.

दक्षिणेंतील सुल्तानांची स्थिति सुधारली नाहीं. म्हणून मराठ्यांची सत्ता जास्त जास्त बळकट होऊन गेली आणि प्रतिद्वंद्वी म्हणून तिचा उदय होऊं लागला.

सुरवातीला औरंगजेबानें त्या सत्तेची फिकीर केली नाही. परंतु त्याचा मुलगा अकबर आणि शिवाजीचा मुलगा संभाजी यांची परस्परांशीं वाढत चाललेली मैत्री पाहून मात्र त्यानें आपलें धोरण बदललें. त्यानें मेवाडशीं संधी केली आणि १६८१ मध्यें तो दक्षिणेच्या मोहिमेवर निघाला.

अकबराला कैद करण्यासाठीं औरंगजेबानें बारा वर्षें सतत प्रयत्न केला. त्याला मराठ्यांशीं झालेल्या युद्धांत यश मिळालें नाहीं. फक्त कांहीं किल्लेच मोंगलांनीं सर केले. परंतु शिवाजीनें महाराष्ट्रांत एक नवीन जागरण उत्पन्न केलें होतें. प्रजेचें मन औरंगजेब स्वतःकडे वळवूं शकला नाहीं. प्रजेनें औरंगजेबाच्या सैन्यावर छापे मारून त्याला बेजार करून सोडलें.

त्यानंतर औरंगजेबानें दक्षिणेकडील मुस्लिम राज्यें मोंगल साम्राज्याला जोडण्याचा यत्न केला. एप्रिल १६८५ मध्यें औरंगजेबानें विजापूरला वेढा दिला. पुढल्या वर्षी जुलै महिन्यांत तो स्वतः तेथें गेला. आदिलशाही वंशाचा शेवटचा सुलतान सिकंदरशाह यानें औरंगजेबासमोर मान तुकविली आणि यूसुफ आदिलशाहचा वंश त्यानंतर खुंटला. औरंगजेबानें सिकंदरच्या राजमहालांत शिरून तो जमीनस्दोत केला.



विजापूरचा नुसता पराभवच झाला नाहीं तर तें शहर ओसाड होऊन गेलें.

१६८७ मध्यें औरंगजेब गोवळकोंड्याकडे वळला. त्यानें किल्ल्याला वेढा दिला. सतत आठ महिने औरंगजेबाचा तोफखाना चालू होता. परंतु त्याला यश मिळालें नाहीं. शेवटीं त्यानें गोवळकोंड्याचा सुलतान अबुल हसन याच्या अब्दुल नांवाच्या एका अफगाण अधिकाऱ्याला लांच देऊन किल्ल्याचें मुख्य फाटक उघडविलें आणि मोंगल सैन्यासह किल्ल्यांत शिरला. अशा तऱ्हेनें औरंगजेबानें गोवळकोंड्याचा किल्ला जिंकला. अबुल हसन दौलताबादला निघून गेला आणि पेन्शन म्हणून दरसाल रु. ३०,००० घेण्याचें कबूल करून तेथें राहूं लागला.

दख्खनचीं मुस्लिम राज्यें काबीज करून नंतर औरंगजेब महाराष्ट्र जिंकण्यासाठीं आला. सुरवातीला त्याला थोडें यश मिळालें. १६८० च्या मार्च महिन्यांत संभाजीचा वध करण्यांत आला व रायगड सर झाला. संभाजीचा धाकटा भाऊ राजाराम पळून गेला. संभाजीच्या कुटुंबांतील इतर लोकांना औरंगजेबानें कैद केलें.



सुदूर दक्षिणेंतील तंजाऊर व त्रिचनापल्लीच्या राज्यांनीं औरंगजेबाचें वर्चस्व कबूल करून त्याला कर देण्याचें कबूल केलें. १६९० पर्यंत औरंगजेब सर्व हिंदुस्थानचा बादशाह झाला. परंतु ज्या वेळेस तो आपल्या गौरवाच्या शिखराला पोंचला त्याच वेळेस त्याच्या राज्याला उतरती कळा पण लागली. इतक्या मोठ्या साम्राज्याचें रक्षण तो एकटा करूं शकला नाही. चहूंकडे त्याचे शत्रू उभे राहाले. त्यांना जिंकणें तेवढें कठीण नव्हतें. परंतु त्यांना वश करून घेणें अशक्य होतें. उत्तर हिंदुस्थानांत व मध्य भारतांत अराज-




क्ता पसरली. राज्यकारभारांत लांच लुचपत वाढली व ढिलेपणा येऊं लागला. दक्षिणेंत नेमलेल्या अधिकाऱ्यांना सुद्धां तो आपल्या काबूंत ठेवूं शकला नाहीं. औरंगजेबानें इतकीं वर्षें राज्य केलें. परंतु त्यानें शिल्पकलेचा नमुना म्हणून एक इमारत देखील बांधली नाहीं कीं त्याच्या दरबारांत एक काव्य लिहिलें गेलें नाहीं. दक्षिणेंतील युद्धांमुळें त्याचा खजिना रिकामा झाला. जागोजागचे अधिकारी हुकूम मोडूं लागले. सैन्याला वेळेवर पगार मिळत नासे झाले तेव्हां बंडांना ऊत चढला. बादशाहाच्या कुटुंबाला व सैन्याच्या हालचालीसाठीं खर्चाला बंगाल मधून नियमितपणें मिळणारा फक्त करच काय तो उरला.

मराठ्यांची सर्व मुख्य मुख्य ठाणीं मोंगलांच्या हातीं गेलीं तरी त्यांनीं त्यांच्यासमोर मान वांकविली नाहीं. १६९१ मध्यें त्यांनीं पुन्हां आपल्या सैन्याची जमवाजमव केली व मोंगलाविरुद्ध एक मोठा राष्ट्रीय संग्रामच सुरू केला. राजारामानें त्यांचें अनेक वर्षें नेतृत्व केलें. इ. स. १७०० मध्यें राजारामाच्या मृत्यूनंतर त्याची बायको ताराबाई हिनें राजसूत्रें स्वतःच्या हातीं घेतलीं.

आपलें साम्राज्य डळमळीत झालेलें पाहून त्यांत पुन्हां बळकटी आणण्यासाठीं औरंगजेबानें तें आपल्या मुलांमध्यें वांटून देण्याचें ठरविलें. परंतु त्याच्या मुलांनीं त्याचें ऐकलें नाहीं. ३ मार्च १७०७ या रोजीं औरंगजेब अहमदनगर येथें मरण पावला. त्याचें प्रेत दौलताबाद येथें आणून सुप्रसिद्ध मुस्लिम मीर बुरहानुद्दीन याच्या कबरी नजीक दफन करण्यांत आलें.



त्याग वृत्ति व साहस पाहून सर्व भारत चकित झाला. सरकारनें गुरुद्वारा कमेटी गैरकायदेशीर असल्याचें जाहीर केलें. चळवळीला जोम चढला व शेवटीं शिखांचा जय झाला.

नेहरूंना झालेल्या अटकेशीं गुरुका बाग प्रकरणाचा प्रत्यक्ष संबंध नव्हता परंतु अप्रत्यक्ष संबंध होता. पंजाबांत पतियाळा व नाभा अशीं दोन शीख संस्थानें होतीं. या दोन्ही संस्थानांचें परस्परांशीं वैर होतें. या विरोधामुळें भारत सरकारानें नाभाच्या महाराजांना गादीवरून काढलें व राज्य-कारभार एका इंग्रज अधिकाऱ्याच्या हातीं दिला. या विरुद्ध नाभा संस्थानांत व इतरत्र चळवळ सुरू झाली. जैते नामक एका स्थानीं धार्मिक उत्सवाची तयारी सुरू असतां त्या गोऱ्या इंग्रज अधिकाऱ्यानें त्यावर बंदी लावली. या विरुद्ध शिखांचे जत्थे जैतेला पाठविण्यांत आले. पोलीस जत्थेदारांना मारहाणकरून कैद करीत व रानांत नेऊन सोडीत.

दिल्ली येथें कांग्रेसचे अधिवेशन संपल्या-नंतर जवाहरलालजींना कळलें कीं एक जत्था नाभा संस्थानांत जात आहे. तेथें चालू असलेला अत्याचार नेहरूंनीं स्वतःच्या डोळ्यांनीं पहावा म्हणून त्यांना खास विनंती करण्यांत आली. जवाहरलालजींबरोबर ए. टी. गिडवानी व के. संतानम देखील निघाले. ते जैते जवळच्या स्टेशनापर्यंत आगगाडींतून गेले. नंतर बैलगाडींत बसून नाभाच्या हद्दींत प्रवेश केला. एक जत्था त्याच वेळीं तेथें आला होता. जवाहरलालजी त्या जत्थ्याबरोबर गेले नाहींत. गाडींत बसून पाठोपाठ गेले.





# नवाबकुमारी

[ ६ ]

जगतसिंहाला हातकड्या व बेड्या पडल्या होत्या व तो तुरुंगाच्या अंधार कोठडींत काळ कंठीत होता. दिवसां सूर्यदर्शन नाहीं तर चांदणें पहायला कोठून मिळणार? त्याला जणुंकाहीं जिवंत समाधीच मिळाली होती. परंतु आशा मात्र खुंटली नव्हती. कारण रात्रीमागून दिवस हा येतोच.

त्याला स्वतःला जो कष्ट सहन करावा लागत होता त्याहून जास्त तिलोत्तमेला होणाऱ्या कष्टाची कल्पना करून दुःख होत होतें. तिलोत्तमेची खुशाली त्याला कोणी येऊन सांगितली असती किंवा त्याची खुशाली तिला जाऊन कळविली असती तरी त्यांच्या परस्परांच्या मनाचें दुःख थोडें तरी कमी झालें असतें. पण तें कसें होणार?

एके दिवशीं पहाटे त्याला थोडी गुंगी लागली. तेवढ्यांत बांगड्या वाजल्याचा आणि तिलोत्तम एक पुष्पहार घेऊन आल्याचा भास झाला. "मी तलवार दूर फेंकून दिली आहे. ती आतां...." असें तो झोंपेंतच बडबडला. परंतु तेवढ्यांत त्याला "युवराज!" म्हणून कोणी तरी हाक मारली.

स्वप्न मोडलें. त्यानें डोळे उघडून पाहिलें तर समोर तुरुंगाचा पाहारेकरी उभा होता.

श्री दामोदर मुखर्जी



"काय रे बाबा? अजून उजाडलेंसुद्धां नाहीं, कांहीं बातमी आहे का?"

"आपल्याला भेटायला एक संन्यासी आला आहे!"

"मग घेऊन कां नाहीं आलास?"

"धीर झाला नाहीं मला."

"पण तें मला सांगण्याची गरज?"

"संन्याशाला भेटायला आपण तयार आहांत कीं नाहीं म्हणून!"

"तूं केव्हांहि कोणालाहि आंत घेऊन आलास तर माझी ना नाहीं. कळलें का?"

तो पाहारेकरी बाहेर गेला व अभिराम-स्वामीला घेऊन परत आला. त्याला पाहतांच जगतसिंहानें त्याला नमस्कार केला व विचारलें—"तुम्ही इकडे असे कसे?"

"मी इकडे फार वेळ राहण्यासाठीं आलों नाहीं. म्हणून मुख्य गोष्ट थोडक्यांत सांगतों. तुला शिक्षा झाल्याचें कळल्या-बरोबर इकडे आलों. किती तरी दिवस झाले इकडे येऊन."

"मंधारणला सर्व खुशाल आहेत ना?"

"तुला अटक झाल्यापासून आम्ही सर्व दुःखसागरांत लोटल्यासारखे आहों. तिलोत्तमेच्या दुःखाचें आतां मी काय सांगूं? मी आल्यावर माझा शिष्य दिग्गज विमलेचें एक पत्र घेऊन आला. तुला सुटका मिळेल व तुझें दर्शन होईल या आशेनें तिलोत्तमेचा जीव अडकून राहाला आहे, असें तिनें लिहिलें आहे."

"तुम्ही इतके दिवस इकडे कशासाठीं राहालांत?"

"एक तर तुझी भेट होईल हा हेतू होता; दुसरा हेतू तुला सुटका मिळावी म्हणून त्यासाठीं कांहीं खटपट करतां आली तर पहावी, असाहि होता."



"मला भेटायला तुम्ही आंत आलांत कसे?"

"तुरुंगाच्या अधिकाऱ्याचा हात चांगला गरम केला. अगदीं थोडा वेळ तुझ्याशीं बोलायला त्यानें परवानगी दिली आहे."

"मला सुटका मिळवून देणें शक्य नाहीं, असें मला वाटतें."

अभिरामस्वामी आपल्या झोळींतून एक कागद काढून म्हणाला—"तसें हताश होण्याचें कारण नाहीं. या कागदावर सही कर. या प्रयत्नांत देखील यश येईल."

"तें कसें काय?"

"बादशाहाच्या दरबारांत जा!"

"तेथें आपल्याला कोण मदत करणार?"

"नवाबकुमारी आयशा. तिच्या प्रयत्नानें व तिच्या प्रोत्साहनामुळेंच हें सर्व येथवर घडलें आहे."

अभिरास्वामी जें कांहीं म्हणाला तें ऐकून जगतसिंहानें चकित होऊन विचारलें—"पण तिची मदत कशी काय मिळविलीत?"

"मी नाहीं त्यासाठीं कांहीं केलें. तुला सुटका मिळावी म्हणून तीच आकाश पाताळ एक करीत आहे. मी फक्त तिच्या आज्ञेप्रमाणें वागत आहें. ती तूर्त पाटण्यांतच



आहे. तुझें पत्र घेऊन ती दिल्लीला जाणार आहे. तेथें सर्व आपल्या मनासारखें सहजीं घडून येईल व तुला सुटका पण मिळेल.

आयशाचे एवढे उपकार! या ऋणांतून कधीं मी मुक्त होऊं शकेन का, असा विचार जगतसिंहाच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. त्यानें अभिरामस्वामीला एवढेंच विचारलें—"आयशाची एकदां भेट होणें शक्य आहे का?"

"पण ती तुला भेटणार नाहीं. दोघांची भेट झाल्यास त्यापासून दोघांचीं मनें दुखावतील, यापेक्षां जास्त फायदा काय मिळणार? म्हणून



ती तुझ्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करायला तयार असली तरी तुला भेटण्यास मात्र ती तयार नाहीं. इतर गोष्टी मागाहून पाहून घेतां येतील. प्रथम या कागदावर सही तर कर." अभिरामस्वामी म्हणाला.

जगतसिंहानें सही करून दिल्यावर तो कागद अभिरामस्वामी आपल्या झोळींत घडी केल्याशिवाय ठेवूं लागला, त्याच वेळीं तुरुंगाचा अधिकारी येऊन त्याला घाई करूं लागला. अभिरामस्वामी निघून गेला.

राजा मानसिंहानें कुळाभिमानाच्या आवेशांत आपल्या मुलाला जन्मठेप शिक्षा दिली व सर्वांना चकित करून सोडलें. बादशाह अकबराची एक न्यायी शासक म्हणून शाबासकी पण मिळविली. परंतु त्याच्या स्वतःच्या मनांत मात्र चलबिचल होत राहाली. कारण जगतसिंह एकुलता एक मुलगा व युवराज होता. याशिवाय त्याच्या हातून ज्या कांहीं चुका राजकीय स्वरूपाच्या झाल्या असल्या तरी त्यानें आपल्या आचरणा-विरुद्ध बोलायला आपल्या वडिलांना जागा दिली नव्हती. मानसिंहानें मुलावर आरोप लावून आपल्या न्यायीपणाचें कितीहि प्रदर्शन केलें असलें तरी तो खरा न्यायनिवाडा नव्हताच. जगतसिंहावर त्याचा राग होता त्याचें खरें कारण, त्यानें दुर्गेशनंदिनी तिलोत्त-मेशीं विवाह केला होता हें. त्या चुकीबद्दल माफी करायला मानसिंह तयार नव्हता.

एकदां मानसिंह आपली लाडकी राणी उर्मिलादेवीच्या अंतःपुरांत गेला असतां उर्मिलादेवी म्हणाली—"राज्यलक्ष्मी स्वतःच्या मुलीसारखी माझ्याशीं मोकळेपणी वागते. तिला सोडून क्षणभर राहाणें देखील मला शक्य होईल कीं नाहीं, शंकाच."

"एवढेंच ना, मग तिला आपल्या जवळच कां नाहीं ठेवून घेत? तिच्या आईवडिलांकडे सांगून पाठवितो कीं मुलीला कांहीं दिवस ठेवून घेतली आहे."

"तिला फक्त ठेवून घेतल्यानें भागेल का? त्यांना व या मुलीला जे कष्ट सहन करावे लागत आहेत ते दूर व्हायला हवेत." उर्मिला म्हणाली.

"तिला कसली अडचण आहे?"

"तिला देवानें सौंदर्य दिलें आहे व ती गुणवती पण आहे. पण दुर्दैवी आहे बिचारी. तिच्या नवऱ्यानें मोठ्या हौसेनें तिच्याशीं लग्न केलें. पण आतां तो म्हणतो कीं तूं खालच्या जातीची आहेस. म्हणून तिला बरोबर ठेवून घ्यायला पण तो तयार नाहीं."

"कुळगोत्राचा कांहीं दोष आहे का तिच्यांत?"

"मला माहीत आहे त्यावरून तसा विशेष दोष असेलसें मला नाहीं वाटत. आणि असला तरी त्या बिचारीचा त्यांत काय दोष? कुळगोत्रांत कांहीं दोष असला म्हणून रूप व गुण नको का पाहायला?"

"इतक्या चांगल्या मुलीला टाकून देणें बरोबर नाहीं. काय करतो काय तिचा नवरा?"



"तुमच्याच सैन्यांत नोकरीला आहे. तुमची कृपा झाली तर बिचारीचें भाग्य उदयाला येईल."

"तो माझ्या पदरींच नोकरी करीत असेल तर मी त्याच्या वडीलधाऱ्या मंडळींना बोलावून घेऊन त्यांनीं तिच्या पतीला तिला स्वीकारण्यास परवानगी द्यावी असें मी त्यांना समजावून सांगूं शकेन. पण तिचा नवरा तिला घेऊन गेल्यावर मग तुझा जीव तिच्यावर लागला आहे, त्याचें काय?"

"तरी ती माझ्या जवळच राहील. तिच्या आनंदांत मला पण आनंद होईल.



"एवढें काम तुम्ही करून द्यावेंच!" बोलत असतां उर्मिलेच्या डोळ्याला टिपें आलीं.

मानसिंह तिचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाला—"मी तुझ्या मनाविरुद्ध कांहीं केलें आहे का? हें काम करण्याचें मी वचन देतो. त्याबद्दल लोकांनीं मला नांवें ठेवलीं तरी मग हरकत नाहीं."

"महाराज! तर मग तिलोत्तमेला आपली सून म्हणून घरांत वावरण्याची परवानगी द्यावी!"

राज्यलक्ष्मीनें पुढें येऊन मानसिंहांना नमस्कार केला.

"तिलोत्तमेची गोष्ट आतां कशाला काढलीस?"

"महाराज! राज्यलक्ष्मीच आपली सून तिलोत्तमा आहे!"

मानसिंह थोडा वेळ मान खालीं करून मौनपणें उभे राहिले. थोडा विचार करून म्हणाले—"तुझ्या मनाविरुद्ध मी दिलेलें वचन मोडणार नाहीं. आजपासून तिलोत्तमेला राजघराण्याच्या अंत:पुरांत मानानें राहतां येईल."

"महाराज! आपली ही कृपा मी आजन्म विसरणार नाहीं." तिलोत्तमा म्हणाली.

मानसिंहांना आयशा पाटण्याला आली असल्याचें व एका श्रीमंत पठाणाच्या घरीं उतरली असल्याचें हेरांकडून कळलें होतें. पठाण व मोगल यांच्या भेटी गांठी होत व त्यांची परस्परांशीं वागणूक मोकळेपणाचीच होती. म्हणून आयशानें ती पाटण्याला येत असल्याचें पूर्वींच कळविलें असतें तर नवाब कतलखानाच्या मुलीला साजेल अशी तिच्या स्वागताची तयारी केली गेली असती. परंतु ती आली ती गुप्तपणें. म्हणून तिच्या स्वागताचा प्रश्नच उद्भवला नाहीं. आतां ती एक तर गुप्तपणें



आली होती व एका श्रीमंत पठाणाच्या घरीं उतरली होती.

बंगालच्या पठाणांनीं मोंगलांची सत्ता आनंदानें स्वीकारली नव्हती व ओरिसाच्या पठाण नवाबांनीं उघड उघड मोगल सत्ता झुगारून टाकण्यासाठीं तयारी सुरू केली होती. अशा परिस्थितींतहि कतलखानाची मुलगी गुप्तपणें येऊन एका पठाणाकडेच उतरली होती. ती गोष्ट मानसिंहांना आवडली नसली तरी त्यांनीं तिकडे दुर्लक्षच केलें होतें.

परंतु एका आठवड्यानंतर सुलेमानखान व उस्मानखान दोघांनीं जगन्नाथपुरीवर स्वारी केली असल्याची व रामचंद्रदेव पळून गेल्याची बातमी कळली. म्हणजे पठाणांनीं उघड उघड संधी मोडून बंडाचें निशाण उभारल्यासारखें होतें.

मानसिंहांना या गोष्टीचा मनस्वी संताप आला. पठाणांचा कांटा कायमचा काढून टाकण्याचें त्यांनीं मनाशीं ठरविलें व युद्धाची तयारी सुरू केली. आणखी एक गोष्ट त्यांच्या मनांत आली. आयशाला कैद केल्यास उस्मानखान ताळ्यावर येईल. उस्मानचें नाक दाबून तोंड उघडायला



तो एक उपाय होता. म्हणून त्यांनीं आयशा ज्याच्याकडे उतरली होती त्या ताजखान नांवाच्या पठाणाच्या घराला वेढा देण्यासाठीं शिपाई पाठविले. ताजखान हा, काश्मीरी बेगमचा एक दूरचा नातेवाईक होता. ताजखानाची बेगम मागें एकदां काश्मीरी बेगमच्या भेटीसाठीं कतलखानाच्या महालांत गेली होती व तिनें काश्मीरी बेगमला व आयशाला पाटण्याला येण्याविषयीं आग्रह केला होता. म्हणून आयशा आली होती. ताजखान व काश्मीरी बेगम दोघांनीं तिचें प्रेमानें स्वागत केलें.









एके दिवशीं संध्याकाळीं एका एकीं शिपायांनीं त्यांच्या घराला गराडा दिलेला पाहून ताजखानानें कारण विचारलें. परंतु शिपायांपैकीं एकहि कारण सांगूं शकला नाहीं.

दुसऱ्यादिवशीं सकाळीं स्वतः ताजखान मानसिंहाकडे गेला व घराला शिपायांनीं गराडा घातला असल्याचें सांगून कारण विचारलें. मानसिंहांनीं स्पष्ट सांगितलें, तुझ्या घरीं कतलखानाची पोरगी उतरली आहे. तिला कैद करण्यासाठीं शिपाई गेले आहेत. तूं तिला शिपायांच्या हातीं दिलेंस तर ते परत येतील."

ताजखानाला त्याचा अर्थ कळेना. म्हणाला—"महाराज! मी एक व्यापारी माणूस. माझ्या घरीं थोरांमोठ्यांचें येणें जाणें असणारच. मी तें बंद केलें तर माझा व्यापार कसा काय चालणार?"

"मला तें सर्व कांहीं माहीत नाहीं. आयशाला कैद करण्याचा हुकूम मी काढला आहे. त्या हुकमाची अंमलबजावणी झालीच पाहिजे. त्याची जबाबदारी तुझ्यावर पण आहे. नबाबकुमारीच्या मानमरातबाला कांहीं उणीव पडूं न देण्याची जबाबदारीपण तुझ्या-वरच आहे. ती आमच्या अंतःपुरांत नबाबी थाटानें राहूं शकेल."

"जिवंत जीव असेपर्यंत मी आपल्या पाहु-णीची अटक होऊं देणार नाहीं." असें सांगून ताजखान आपल्या सैनिकांबरोबर निघून गेला.

ती गोष्ट आयशाला कळली. ती ताज-खानाला म्हणाली—"स्वतः मला मानसिंहाना भेटण्याची इच्छा आहे. आवश्यक ती व्यवस्था झाल्यावर ती, दोन दासींनाबरोबर घेऊन ताज-खानाबरोबर मानसिंह महाराजांना भेटायला गेली. [पुढील गोष्ट पुढील अंकीं]



# चिंतामणि

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व मौनपणें स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं कोणत्या तरी अद्भुत शक्तीची प्राप्ती व्हावी म्हणून अप-रात्रीच्या वेळीं तूं इतका कष्ट सहन करीत आहेस. परंतु तुला त्या शक्तीची प्राप्ती झाल्यावर ती नकोशीं वाटूं लागेल उत्पलला मिळालेला चिन्तामणि असाच निरुपयोगी ठरला होता. मी तुला त्याची गोष्ट सांगतों, ऐक." असें सांगून त्यानें गोष्ट सांगायला सुरवात केली.

नर्मदेच्या काठीं रानांत उत्पल नांवाचा एक तरुण मुलगा व त्याची आई राहात असत. उत्पल रानांत जाऊन कंदमुळें घेऊन येई व त्यावरच दोघां मायलेकांचा

वेताळाच्या गोष्टी



उदरनिर्वाह चाले. उत्पलला कोणी सोबती सवंगडी नव्हता. म्हणून त्यानें एक कुत्रें व एक मांजर पाळलें होतें. तो त्यांच्या बरोबर खेळे व हिंडेफिरे. त्याची आई त्याला म्हणे—“ अरे वेड्या ! आहे तें आपल्यालाच पुरत नाहीं आणि हे दोन प्राणी कशाला पाळले आहेस ?” परंतु उत्पल तिकडे दुर्लक्ष करी. ते दोघे सोबती पशुजातीचेच होते, पण ते त्याला व त्याच्या आईला पुष्कळ मदत करीत.

उत्पल आपल्या या सोबत्यांबरोबर बोले. त्यांना तें कळत असे कीं नाहीं, त्याची त्याला फिकीर नव्हती. त्याच्या इंगितावर त्याचे सोबती सर्व कामें करीत, एवढें मात्र खरें.

एकदां उत्पल दूर जंगलांत गेला. तेथें एक खेडेगांव होतें. गांवकऱ्यांनीं रान जंगल कापून लागवड केली होती. परंतु एक उंचवट्याची जागा होती. तेथील गवताला त्यांनीं हात लावला नव्हता. तें पाहून उत्पलनें त्यांना त्याचें कारण विचारलें.

एक गांवकरी म्हणाला—“ या उंच गवतांत एक नाग सांप शिरून बसला आहे. गवत कापून त्याला उघड्यावर आणलें तर तो आम्हांला चावेल.”

उत्पलला कोणत्याहि श्वापदाची भीति नव्हती. कारण रानांत त्याला रोज अनेक श्वापदें व जिवाणू दिसत. त्याच्या मनांत त्या सर्वांविषयीं एक तऱ्हेचें प्रेम सतत वसत असे. त्याला कधीं भीति वाटली नाहीं कीं त्यांच्यावर राग आला नाहीं. म्हणून तो त्या उंचवट्यावरच्या दाट गवताजवळ गेला व म्हणाला—“ नागसांपा ! बाहेर ये ! मी तुला आपल्या घरीं घेऊन जाईन.” त्याबरोबर एक सांप खरोखरच बाहेर आला. उत्पल त्याला उचलून खांद्यावर ठेवून घरीं निघाला.





त्याची आई त्याला एक सांप गळ्यांत घालून आलेला पाहून म्हणाली—“ अरे खुळ्या ! एक कुत्रें व एक मांजर आणून ठेवलें आहेस तें नाहीं पुरलें का ? आणखी हा एक सांप कशाला ?”

“ आई ! किती छान आहे ग सांप ! मला तो फार आवडला.” उत्पल म्हणाला.

कांहीं दिवसांनीं उत्पलच्या लक्षांत एक गोष्ट आली. सांप निर्जीव अर्धमेल्यासारखा पडून राहूं लागला. म्हणून तो कुत्र्या-मांजराला उद्देशून बोले तसा सांपाला म्हणाला—“ कायरे झालें तुला ? असा मलूल कां दिसतोस कांहीं दिवसांपासून ?” परंतु त्याला मनुष्यांच्या भाषेंत सांपानें उत्तर दिलें, तें ऐकून आश्चर्य वाटलें.

सांप म्हणाला—“ मी नागवंशाच्या राजाचा मुलगा—युवराज आहें. माझ्या वडिलांच्या डोक्यावर एक मणी आहे म्हणून सर्व त्याला नागराज म्हणतात व मानतात. तो मणी ज्याच्याजवळ असतो त्याला त्याच्या मनांत येईल ती वस्तु लगेच मिळते. खरोखर पाहिलें तर तो एक चिंतामणि आहे. मी एकदां आपल्या तरुण मित्रमंडळीं बरोबर उघड्या हवेंत मैदानांत खेळत होतों. त्यावेळीं गरुडानें झटकन् झडप मारली. माझे इतर मित्र निसटून पळून गेले. मी मात्र गरुडाच्या पंजांत सांपडलों. गरुड उडत या बाजूला आला. गरुडाचें आपल्याकडे लक्ष नाहीं व दुसरें कोणतें तरी सावज पकडण्यासाठीं त्यानें पंजा सैल केला असल्याचें ओळखून मी आपली सुटका करून घेतली. पण एकट्यानें घरीं जाण्याला धीर होईना, म्हणून मी गवतांत पडून होतों. तूं आलास व मला प्रेमानें घरीं ठेवून घेतलेंस. याबद्दल मी तुझा फार



आभारी आहें. परंतु वडिलांना भेटण्याची फार इच्छा आहे मला."

"तूं इतके दिवस कां नाहीं बोललास? बरें तर मी तुला तुझ्या घरीं पोंचता करतो." असें सांगून उत्पलनें त्या नागयुवराजाला उचलून घेतलें. सांपानें त्याला उत्तरेकडे चलायला सांगितलें.

उत्पल अनेक दिवस चालत राहला. पुढें वाट जास्त जास्त भयंकर होत गेल्याचें दिसलें. वाटेंत त्याला कांहीं खायला मिळालें नाहीं. गांधीलमाशा चांवत होत्या. इतर श्वापदें व भयंकर जिवाणू खायला धांवत होते. परंतु त्या सर्वांची उत्पलनें पर्वा केली नाहीं व नागराजाच्या राज्यांत येऊन पोंचला. तेथें मोठमोठे भयंकर सांप दिसले. परंतु एकाहि सांपानें त्याच्याकडे वळूनदेखील पाहिलें नाहीं. कारण त्याच्या गळ्यांतला सांप आपल्या भाषेंत त्यांना कांहींतरी सांगत होता.

एका मोठ्या मैदानाच्या मध्यभागीं नागराजाचा सुंदर राजवाडा होता. सूर्यप्रकाशांत तो छान चकाकत होता. उत्पलनें आंत प्रवेश करून नागराजाला नमस्कार केला तेव्हां त्याला नागराजाच्या डोक्यावर एक मणी दिसला. त्याचें तेज पाहून उत्पलला तोच चिंतामणि असावा या गोष्टीची खात्री पटली.

युवराज सुखरूप परत आलेला पाहून नागराजाला अपार आनंद झाला. त्यानें काय वाटेल तें मागून घ्यायला उत्पलजवळ विनंति केली.

उत्पलनें निस्संकोच चिंतामणि देण्यास विनंति केली. तशी त्याला कोणत्याहि वस्तूची उणीव भासत नव्हती. आपण जें मागूं तें मिळेल या हेतूनें त्यानें मुळींच तो मणि मागितला नव्हता.

नागराजाला इतका आनंद झाला होता कीं त्यानें आपल्या शिरावरचा मणी काढून दिला. देत असतां म्हणाला—"हा मणी एक चिंतामणि आहे. ज्या गोष्टीचा विचार तुझ्या मनांत येईल ती वस्तु इच्छिल्याबरोबर तुला मिळेल. कधीं काळीं तुला या मण्याचा उपयोग राहाला नाहीं तर मात्र तूं तो आणून मला परत द्यावास."

उत्पलनें तें कबूल केलें आणि मणी घेतला. आपण घरीं जावें असें त्याच्या मनांत आल्याबरोबर तो आपल्या घरीं जाऊन पोंचला. त्याला ज्या ज्या वस्तूची गरज भासली ती वस्तु त्याला इच्छिल्याबरोबर मिळाली. आतां त्याला कोणत्याहि गोष्टीची उणीव म्हणून राहाली नाहीं.

उत्पलला हळूहळू जंगलांत झोंपडींत राहाण्याचा वीट आला. आपण कोणत्या तरी नगरांत राजवाड्यांत रहावें असें त्याच्या मनांत आल्याबरोबर त्याच्या मनांत उत्तमोत्तम वस्त्राभूषणांची इच्छा उत्पन्न झाली. त्याबरोबर त्याला तीं मिळालीं. तो तीं नवीन वस्त्रें व अलंकार घालून एका घोड्यावर बसून निघाला.





तो सरळ आपल्या देशाच्या राजाच्या राजवाड्यांत गेला. त्याचा तो थाट पाहून राजाला वाटलें कीं कोणीतरी राजकुमार येत असावा. म्हणून राजा याच्या स्वागतासाठीं पुढें सामोरा आला. परंतु त्याची वागणें व बोलणें पाहून मंत्र्याला व राजकन्येला तो एक असंभ्य रानटी मनुष्य असावा असें वाटलें.

उत्पल कांहीं दिवस राजाचा अतिथि म्हणून राहाला. एक दिवस तो राजाला म्हणाला—"राजकन्येशीं विवाह करण्याच्या हेतूनें मी आलों आहें."

तें ऐकून राजा चकित झाला. त्याला तसें विचारणें विचित्र वाटलें. परंतु जो पाहुणा म्हणून राहाला त्याला घराबाहेर काढणें असभ्यपणाचें होईल असा विचार करून तो कांहींच बोलला नाहीं.

परंतु नंतर उत्पलला नकार देण्याऐवजीं अशक्य असें काम सांगून परतविण्याच्या विचारानें तो म्हणाला—"येथून पूर्वेला एक डोंगर आहे. तो अर्धा जमिनींत पुरून त्यावर एक राजवाडा बांध व तीस एकर जमीन नांगरून पीक तयार झालें म्हणजे माझ्याकडे ये. मी तुझ्याशीं राजकन्येचें लग्न करून देईन."

राजाच्या मनांतला खरा हेतू माहीत नव्हता, म्हणून उत्पल म्हणाला—"ठीक, मी तें सर्व करतों." राजाच्या दरबाऱ्यांनीं त्याला मूर्खांत काढलें.

परंतु दुसऱ्या दिवशीं उत्पल दरबारांत येऊन म्हणाला—"महाराज! आपण सांगितलेली अट मी पुरी केली आहे. आतां आपण वचन दिल्याप्रमाणें राजकन्येशीं माझा विवाह करून द्यावा."

राजा व त्याचे दरबारी सर्वांना तें ऐकून आश्चर्याचा धक्काच बसला. खात्री करून



घेण्यासाठीं सर्व त्याबाजूला गेले तेव्हां खरोखरच डोंगर अर्धा अधिक जमिनींत रुतलेला दिसला व एका मोठ्या शेतांत पीक कांपणीला तयार असल्याचें दिसलें.

वचन दिल्याप्रमाणें राजाला राजकन्येशीं उत्पलचा विवाह करून द्यावा लागला. राजकुमारीला पण लग्नाला कबुली द्यावी लागली. दोघांचें सुमुहूर्तावर लग्न झालें. परंतु उत्पलनें ज्या सुखाची कल्पना करून राजकन्येशीं लग्न केलें होतें तें सुख त्याला मिळालें नाहीं. कारण राजकुमारी पदोपदीं त्याचा अपमान करी. एकदां ती त्याला म्हणाली—"येऊन जाऊन तूं रानटी. विद्येचा गंध नाहीं तुला!"

"तें सर्व काय करायचें आहे तुला? तुला काय हवें तें सांग." उत्पल म्हणाला.

"तूं म्हणतोस तें तुला करतां येईल हें कसें काय कळावयाचें?" राजकन्येनें विचारलें.

तिची खात्री पटावी म्हणून उत्पलनें तिला तो चिंतामणि दाखविला व त्याचा महिमा वर्णन करून सांगितला. त्यावर तिनें उत्पलवर तिचें फार प्रेम आहे असें नटून दर्शविलें. त्यादिवशीं रात्रीं तिनें स्वतः



सैंपाक केला व एक पेय तयार करून त्यांत मूळ टाकली. तें प्याल्याबरोबर उत्पल बेशुद्ध होऊन पडला. राजकुमारीनें त्याच्या जवळचा तो चिंतामणि काढून घेतला आणि, या पतीच्या हातांतून आपल्याला सुटका मिळावी व त्याला त्या चिंतामणीच्या प्रभावानें मिळालें आहे त्याला तो पारखा व्हावा असें तिनें इच्छिल्याबरोबर तसें झालें.

उत्पलला शुद्ध आली तेव्हां तो रानांत आपल्या झोपडींत होता. त्या झोपडींत फक्त कुत्रा व तें मांजर होतें. त्याची आई कांहीं दिवसांपूर्वींच वारली होती. प्रथम आपण



आहों कुठें ? होतों कुठें त्याला कांहींच कळलें नाहीं. पण कांहीं वेळ विचार केल्यावर त्याला सर्व आठवलें व राजकन्येनें आपल्याला फंसवून तो मणी आपल्याजवळून काढून घेतल्याचें कळलें. तें सर्व दुःख तो कोणाजवळ सांगणार ? कुत्रा व मांजरच होतें ती गोष्ट ऐकायला. त्यानें त्यांनाच ती गोष्ट सांगितली.

त्या दिवशीं रात्रीं कुत्रा व मांजर दोघं राजवाड्यांकडे गेलीं. राजवाड्याच्या चारी-बाजूला उंच तट होता व तटाच्या चारी बाजूला खंदक. खंदकावर एक पूल होता. पुलावर पाहारा होता. म्हणून दोघं मागच्या बाजूला गेलीं. कुत्र्यानें मांजराला पाठीवर बसवून घेतलें व खंदकांतल्या पाण्यांत पोहून पलीकडे गेला. तेथें तटावर चढून जायला उंचवटा होता. दोघं आंत गेलीं व राजवाड्यांत शिरलीं.

मांजर सर्व खोल्या पहात राजकन्या झोंपली होती त्या खोलींत शिरली. तिच्या हातांत तो मणि होता. मांजरानें एक उंदीर पकडून राजकन्येच्या अंगावर सोडला. राजकुमारी घाबरून उठली. तेव्हां तिच्या हातांतून मणि खालीं पडला. तो उचलून घेऊन मांजर धूम पळालें व आल्या वाटेनें दोघं उत्पल झोंपला होता तेथें येऊन पोंचलीं. मणी मिळतांच उत्पलनें दोघांना प्रेमानें कुरवाळलें व म्हणाला—" जगांत माझे सखा व बंधू तुम्हीच दोघं !"

दुसऱ्या दिवशीं त्यानें राजाकडे जाऊन राजकन्येनें त्याला कसें फंसविलें हें सांगितलें. राजा म्हणाला—" ती तुझी पत्नी आहे. तिला वाटेल ती शिक्षा देण्यास तुला अधिकार आहे."

उत्पल म्हणाला—" तिच्या इच्छेविरुद्ध तिच्याशीं माझें लग्न झालें. तें खरोखरीं लग्नच नव्हे. ती स्वतंत्र आहे. तिच्या इच्छे-प्रमाणें तिचें दुसरें लग्न करून द्यावें." असें सांगून उत्पल निघून गेला.

नंतर तो नागराजाकडे आला व तो मणी त्याला परत देऊन म्हणाला—" मला या मण्याची यापुढें गरज नाहीं. हा ठेवून घ्यावा." नागराजानें उत्पलला सर्व कारण विचारून घेतलें व आग्रह करून आपल्या दरबारीं ठेवून घेतलें.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— " राजा ! मला हें कळलें नाहीं कीं उत्पलला चिंतामणि मिळाला असतां सर्व सुखें उप-भोगण्याचा विचार त्यानें कां सोडला ? त्यानें तो मणी परत कां केला ? याचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींत तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—" तो मणि मिळाल्या-नंतर उत्पलच्या सर्व इच्छा पुऱ्या झाल्या असल्या तरी त्याला सुख कोठें मिळालें ? इच्छा वाढल्या म्हणून तो आपल्या आईला आणि आवडत्या कुत्र्याला व मांजराला सोडून निघून गेला. त्याला वैभव मिळालें पण तो सभ्य होऊं शकला नाहीं. राज-कन्येशीं त्याचा विवाह पण झाला, पण राजकन्येचें प्रेम संपादन करण्यास त्या मण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून त्याला तो मणी निरुपयोगी वाटला व त्यानें नागराजाला वचनदिल्याप्रमाणें तो परत केला."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला."

( कल्पित )





# यमराजाला मरण

फार प्राचीन काळीं देवांचीं अपत्यें मनुष्य उत्तरध्रुव प्रदेशांत रहात असत. त्यामुळें त्यांना देवांच्याकडे जाणेंयेणें सोपें जात असें. त्या प्रदेशांत सूर्यप्रकाश अहोरात्र असे. म्हणून वेळेचें माप, दिवस, महिने किंवा वर्ष कांहींच नव्हतें. सर्वांत प्रथम मानव कुटुंब म्हणजे यम व यमी. यम हा सूर्याचा मुलगा.

कांहीं दिवसांनीं यमाला मरण आलें. तो पहिलाच मृत्यु असल्यामुळें मरण म्हणजे काय हें कोणालाच माहीत नव्हते. तेव्हां देव येऊन म्हणाले—"मनुष्य जातीनें अमृत-पान न केलें असल्यामुळें त्यांना यमाप्रमाणेंच इहलोक सोडून जावें लागेल. त्यालाच मरण हें नांव आहे."

मानव जातींत मरण आलेला सर्वांत प्रथम यम होता. म्हणून ब्रह्म इंद्रादिक देवांनीं त्याचा विशेष आदर केला. त्याला त्यांनीं एक दिक्पालक व पितृलोकाचा अधिपति म्हणून नेमला.

इकडे त्याची पत्नी यमी पतिविरहानें रडत होती. परंतु दिवस रात्र होत नसल्या मुळें किती काळ लोटला हें कळायला मार्गच नव्हता. यम गेल्यानंतर काय काय घडलें तिकडे तिचें लक्षच नव्हतें. तिला पतीचा विसर मुळींच पडला नाहीं.

"मनुष्य एक मर्त्य प्राणी आहे. मेलेला मनुष्य पुन्हां जिवंत होत नाहीं, हें देवादिकांनीं सांगितलें होतें. म्हणून यमाला विसर असें." सर्वांनीं तिला सांगितलें.

पण यमी म्हणे,—"हें सर्व तुम्ही काय सांगतां? त्यांना जाऊन कितिसा काळ लोटला आहे?" यमीप्रमाणेंच इतर मनुष्यांचा मृत्यू झाल्यामुळें त्यांच्या बायका व मुलें पण रडूं लागलीं. त्यांनादेखील काळाची नसल्यामुळें आपल्या मृत आप्तेष्टांचा विसर पडला नाहीं.

हें सर्व पाहून देवांनीं काळाचें माप करून देण्याचें ठरविलें. कारण त्या शिवाय मानव जातींतलें दुःख कमी होणार नाहीं, असें त्यांना वाटलें. म्हणून त्यांनीं सूर्याला दूर पाठवून दिलें. लगेच रात्र पडली व इहलोकांत सर्वत्र अंधःकार पसरला.

रात्र झाल्यामुळें लोक झोंपले. झोंप लागल्यावर त्यांचें दुःख ओसरलें. परंतु रात्र किती मोठी ठेवावी हें ठरविणें आवश्यक झालें. कारण रात्रीच्यावेळीं राक्षस येत व गाई व धान्य लुटून पळवून नेत.

म्हणून देवांनीं रात्र व दिवस यांचा अवधी ठरवून काळाची विभागणी केली. सूर्याला बोलावून आणण्यासाठीं उषेला पाठविलें. उषा येतांच तिच्या पाठोपाठ सूर्योदय झाला व रात्र संपली. तेव्हां पासून दिवस व रात्र आळी पाळीनें येऊं लागलीं व काळाचें माप ठरवून देणें जमलें. परंतु रात्रीच्या वेळीं राक्षस येत व लूटमार करीत. त्यांना कोणी अड-विलें तर त्याला मारून टाकीत. तेव्हां मनुष्यांनीं इंद्राकडे गाऱ्हाणें नेलें. त्यानें मान-वाला स्वरक्षणासाठीं अग्निहोत्राची व्यवस्था करून दिली.

काल निर्णयाची एक घडी बसल्यावर यमीचें रडणें थांबलें. परंतु तिला पतीचा विसर पडला नाहीं. म्हणून म्हणें, यम वर्षांतून एकदां दिवाळीच्या वेळीं आपल्या पत्नीला भेटायला येतो. म्हणे तीच यम द्वितीया झाली.

श्री शा. भो. पवार





# परोपकारी गोपाळ

एकदां गोपाळ आपल्या सासुरवाडी गेला. तेथें त्याची थोडी जमीन होती. जमिनीचें उत्पन्न सुमारें तीनशें रुपये येई. तें शेतकऱ्याकडून वसूल करून तो आपल्या गांवीं निघाला. वाटेंत हृदयाला हालवून सोडणारी एक गोष्ट घडली.

त्याला एक गाडी येत असलेली दिसली. गाडींत तांदुळाची पोतीं भरलेलीं होतीं. एकटा बैल इतकीं पोतीं कशी ओढूं शकला ह्याचें गोपाळलादेखील आश्चर्य वाटलें.

त्या निर्जनस्थानीं गोपाळला येत असलेला पाहून गाडीवाला त्याला म्हणाला—"मी जरा पाणी पिऊन येतों त्या काल्व्यावरून, तुम्ही गाडीवर लक्ष ठेवतां का जरा?"

"बरें जाऊन ये!" गोपाळ म्हणाला आणि गाडीजवळ उभा राहाला.

थोड्यावेळानें गाडीवाला पाणी पिऊन आला. म्हणाला—"फार उपकार झाले माझ्यावर आपले! या कलियुगांत आहे कोण विचारणारा? मी चार आणे देऊन दोघांना गाडी ढकलायला सांगितलें ते घेऊन आले ढकलत गाडी व येथेंच मध्यें वाटेवर सोडून निघून गेले. आतां तुम्हींच सांगा, मी एकटा काय करूं?" असें सांगून त्यानें बैलाला एक चाबूक मारला.

एकटा बैल, इतकें ओझें काय ओढणार? म्हणून गाडीवाला बैलाला बडवूं लागला. गोपाळानें गाडीवाल्यांच्या हातांतला चाबूक ओढून घेतला व म्हणाला—"अरे, तूं तरी बराच दिसतोस कीं रे! स्वतः पाणी पिऊन ताजा तवाना होऊन आला आहेस म्हणजे बैलाला पण पाणी मिळालें असें वाटलें होय तुला. त्याला देखील भूक तहान आहेच कीं नाहीं?" तो बैलाला सोडून काल्व्याकडे घेऊन जाऊं लागला.



गाडीवाल्याला लाज वाटली. म्हणाला—"माफ करा! चुकलों. तुम्ही कशाला एवढी तसदी घेतां? मी घेऊन येतों पाणी पाजून." असें सांगून बैलाची दोरी स्वतःच्या हातांत घेऊन जाऊं लागला.

"तहानेबरोबर बिचाऱ्याला भूक पण लागली असेल! थोडा वेळ चरायला पण सोड! तूं येईपर्यंत मी पाहातों गाडी!" गोपाळ म्हणाला.

कांहीं वेळानें गाडीवाला बैलाला घेऊन परत आला. त्याला गाडीला जुंपून पुन्हां हाकूं लागला. पण बैल जागचा हालेच ना.

तें पाहून गोपाळ म्हणाला—"तुम्ही इतकीं पोतीं भरली आहेत! अहो दोन बैलांच्या गाडींत तरी कोणी इतकीं पोतीं भरतो का? तो एकटा जीव कशी ओढणार गाडी? अर्धी पोतीं उतरवून ठेवा. पहली खेप पोंचती करून मग घेऊन जा दुसऱ्या खेपेंत. मी राहातों येथें राखण करायला."

"खरोखर देवासारखे पावलांत बघा. परंतु इतकी पोतीं एका खेपेंत पोंचती करण्याचें ठरलें आहे." गाडीवाला म्हणाला.

गोपाळनें विचारलें—"ऐकूं तर दे कीं काय ठरलें होतें तें."

गाडीवाल्याचें नांव विठ्या होतें. तो गाडींत सामान पोंचते करून पैसे मिळवी. तोच त्याचा धंदा होता. बैल विकून कांहीं सामान विकत घ्यावें व तें गाडींत घालून स्वतः ती ओढून घेऊन जावी असा विचार त्याच्या मनांत आला. जवळच्या गांवचे भिकूशेट यांनीं बैलाची किंमत विचारली, तेव्हां विठ्यानें ती शंभर रुपये सांगितली.

त्यावर भिकूशेट त्याला म्हणाला–"या मरतुकड्या बैलाला शंभर रुपये द्यायला मी कांहीं वेडा आहे काय? भाताचें एक पोतें तरी ओढून न्यायला जीव आहे का तुझ्या बैलाच्या अंगांत?"

"हा बैल जितकें वजन ओढूं शकेल तेवढें दुसरा एकच बैल काय, दोनदोन बैलदेखील ओढूं शकणार नाहींत. हा नाहीं ओढूं शकला तर मी फुकट बैल देईन." विठ्या म्हणाला होता.

"असें होय! तर मग मी एक सामानाची यादी करून देतों. तेवढें सामान गाडींत भरून एका सावकाराकडे पोंचतें करायचें आहे. तेवढें करून दाखविलेंस तर मी शंभर रुपये देतों तुला." भिकूशेट म्हणाला.

विठ्यानें मूर्खपणानें तें कबूल केलें होतें. म्हणून गोपाळला म्हणाला–"यादीप्रमाणें सामान गाडींत भरलें. पण गाडी जागची हाले ना. म्हणून दोघां मजुरांना गाडी ढकलायला ठरवून घेतलें. एक मैल कशी-बशी गाडी आली. त्यानंतर ते मजूर म्हणाले, आतां नाहीं आमच्यानें ढकलवत, आणि निघून गेले. अजून एक मैल जायचें आहे. सामान पोंचतें नाहीं केलें तर गाडीचें भाडें मारलें जाईल आणि वर बैल फुकटांत द्यावा लागेल."





तें सर्व ऐकून गोपाळला विठ्याच्या खुळेपणाची कींव आली. "अरे तूं कांहीं कबूल केलेंस म्हणून बैलाचा असा जीव घेणार का? येऊन जाऊन तुला बैलाची किंमत शंभर रुपयेच पाहिजे आहे. मी देतों शंभर रुपये. मला दे बैल."

विठ्या चकित मुद्रेनें गोपाळकडे पाहूं लागला. गोपाळनें शंभर रुपये काढून दिले व ते विठ्यानें घेतले पण. गोपाळनें बैलाला चरायला मोकळा सोडला.

"मी जाऊन दोन बैलांची गाडी पाठवून देतों. तूं त्या गाडींत सामान पोंचतें कर. सांग, वाटेंत तूं बैल विकून टाकलास म्हणून?" गोपाळ म्हणाला.

"तें बरोबर! पण तुमचे हे उपकार मी कधीं विसरणार नाहीं. ती पहा एक गाडी रिकामी येते आहे. मी पोंचतें करतों सर्व सामान." विठ्या म्हणाला.

गोपाळ निघून गेल्यावर विठ्यानें ती गाडी थांबवून सर्व सामान आपल्या गाडींतून काढून त्या गाडींत भरलें व त्या गाडी बरोबर स्वतःची रिकामी गाडी ओढून घेऊन भिकूशेटच्या घरीं गेला.

"कायरे सामान पोंचतें झालें. पण बैल कोठें आहे?" भिकूशेटनें विचारलें.

"मी तुमचें सामान घेऊन अर्धी वाट चालून आलों असेन कीं वाटेंत एक गृहस्थ भेटला व त्यानें बैल कोणाचा म्हणून विचारलें. इतकें सामान ओढून सहजीं नेणारा बैल पाहून त्याला आश्चर्य वाटलें. मी शंभर रुपयाला बैल द्यायला कबूल झालों आहें, हें त्याला सांगितलें, तेव्हां तो वर वीस रुपये द्यायला तयार झाला व बैल घेऊन गेला.

तुमचें सामान पोंचविण्याची जबाबदारी मी घेतली होती ना? म्हणून त्यांनीं आपली गाडी घेऊन जायला सांगितलें व निघून गेले." विठ्यानें तिखटमीठ लावून बैलाच्या विक्रीचें वर्णन केलें.

भिकूशेटला आश्चर्य वाटलें व त्यानें कोणी बैल विकत घेतला म्हणून चवकशी केली. विठ्या म्हणाला—"मला नाहीं माहीत त्या गृहस्थाचें नांव. कोणी असो, बैलाची जात त्याला कळते," असें सांगून व भिकूशेटचा निरोप घेऊन विठ्या निघून गेला. भिकूशेटला तें खरें वाटलें व एक चांगला बैल हातचा गेल्याबद्दल वाईट पण वाटलें.

आणखी कांहीं दिवसांनीं संक्रांत आली. बैलाचें प्रदर्शन भरलें. तीन महिने गोपाळनें बैलाला खूप खायला घातलें होतें म्हणून बैल छान माजला होता. इतर बैल त्याच्या-समोर काय टिकणार? त्या बैलालाच पारितोषिक मिळालें. प्रदर्शन पहायला विठ्या व भिकूशेटपण आले होते.

विठ्यानें भिकूशेटची गोपाळशीं ओळख करून दिली व म्हणाला—"पाहिलात माझा पाडा? यांनींच विकत घेतला होता तो बैल!"

भिकूशेट गोपळला म्हणाला—"मी घेणार होतों हा बैल. पण तुम्ही घेतलांत. चूक माझीच होती म्हणा. कारण मी बैलाची परीक्षा घ्यायचें ठरविलें होतें. तुम्हांला हा बैल विकायचा असेल तर मी घ्यायला तयार आहें."

"पाहिजे तर जा घेऊन. माझी ना नाहीं!" गोपाळ म्हणाला.

भिकूशेटनें दीडशें रुपये दिले व बैल घेऊन गेला.





# समुद्राणीचे गुलाम

पश्चिमेकडील समुद्राच्या काठीं एक राजा राज्य करीत असे. त्याला समुद्रावर सफरी करण्याची फार हौस. त्याच्याजवळ एक जहाज होतें. त्या जहाजाला रेशमी शिडें होतीं. बंदरालगत राहण्यासाठीं त्यानें एक राजवाडा बांधला होता. त्याचें जहाज बंदरांत नांगर टाकून कोणत्याहि सफरीला निघायला नेहमीं तयार असे.

एकदां तें जहाज समुद्राच्या मधोमध एकाएकीं थांबलें. वारा अनुकूल दिशेला होता. पण जहाज हालण्याचें नांव घेईल तर शपथ. राजानें वांकून पाण्यांत पाहिलें व ओरडून म्हणाला—"माझें जहाज कोणी अडविलें असेल नम्रपणें मी विनंति करतों कीं कृपाकरून माझें जहाज सोडावें. मी सुखरूप पोंचल्यावर जहाज अडविणारा मागेल तें देईन."

त्याचें उत्तर समुद्रांतून बायकी आवाजांत आलें—"आतां तूं जें वचन दिलें आहेस तें विसरूं नकोस. पोंचतांच तुला जो कोणी प्रथम किनाऱ्यावर दिसेल तो तूं मला दिला पाहिजेस. कबूल केलेंस तरच तुला समुद्रा-बाहेर जाऊं देईन.

"ठीक! मी वचन देतों." राजानें तें कबूल केलें. लगेच जहाज हाललें. तो आवाज समुद्राच्या राणीचा आवाज असावा असें राजाला वाटलें. तिच्या विषयीं राजानें पूर्वी अनेक गोष्टी ऐकल्या होत्या.

दोन दिवसांनीं जहाज किनाऱ्याला लागलें. किनारा दुरून दिसत असतां किनाऱ्यावर राजाला जो सर्वांत प्रथम दिसला, तो त्याचा धाकटा मुलगा होता. त्याच्या हृदयाला एक धकाच बसला. त्यानें

श्री. शामराव पाटील



आपले तोंड एका बाजूनें झांकून घेतलें. त्याच वेळीं त्याला पाण्यांत एक बदक तरंगत असलेलें दिसलें. राजानें दुसरीकडे पाहालें तेव्हां त्याला एक डुक्कर दिसलें.

त्यानें विचार केला कीं हें बदक व डुक्कर मारून समुद्रांत टाकलें कीं राणीला दिलेलें वचन पाळल्यासारखें होईल. त्या प्रमाणें त्या दोन्ही प्राण्यांना बळी म्हणून त्यानें समुद्रांत टाकून दिलें आणि किनाऱ्यावर उतरून आपल्या वाड्यांत निघून गेला.

त्याच वेळीं समुद्रांतून एक मोठी लाट राजवाड्यापर्यंत आली व त्याबरोबर मेलेलें बदक व डुक्कर किनाऱ्याला लागलें. ती लाट राजाच्या मुलाला ओढून नेणार होती. परंतु त्याच वेळीं राजानें त्याला धरून वर ओढून घेतलें म्हणून तो वांचला.

परंतु तेव्हांपासून राजाच्या मनाला एक धास्ती मात्र राहून गेली. आपला मुलगा मिळेपर्यंत राणीच्या मनाचें समाधान होणार नाहीं. त्या विषयीं त्यानें आपल्या राणीचा व मोठ्या मुलाचा सल्ला घेतला. असें ठरलें कीं मुलाला समुद्रकाठीं कधीं जाऊं दिलें नाहीं कीं झालें. तेव्हां पासून तो मुलगा राजवाड्याच्या तटाबाहेर कधीं गेला नाहीं.

कित्येक वर्षें लोटलीं. राजकुमार लहानाचा मोठा झाला. त्याला अठरावें वर्ष लागलें. एकदां मित्रमंडळींच्या आग्रहावरून तो समुद्रावर फिरायला म्हणून गेला. पुष्कळ वर्षें लोटलीं आहेत. समुद्राची राणी ती गोष्ट विसरून गेली असेल, असें त्याला वाटलें.

परंतु त्यानें काठावरच्या वाळूंत पाऊल टाकतांच एक मोठी लाट आली. पाण्यांतून वर एक बाईचा हात दिसला. त्यानें राजकुमाराला पाण्यांत ओढून नेलें. पाण्यांत बुडाला तरी राजकुमार भ्याला मात्र नाहीं. आणि आश्चर्य म्हणजे त्याला एक मोठें



उद्यान दिसलें. तेथें त्याला कोणीतरी ओढून घेऊन गेला. त्या उद्यानाच्या मधोमध एक राजवाडा होता. तो वाडा समुद्राच्या राणीचा असावा असें त्याला वाटलें. त्याला त्या वाड्यांतल्या एका दालनांत नेण्यांत आलें. त्या दालनांत दागिन्यांनीं अक्षरशः लदलेली एक कुरूप स्त्री उभी होती. ती म्हणाली—"मी कित्येक दिवसांपासून तुझी वाट पहात आहें. उद्यांपासून तुला कामावर लावीन. आज मुलांमुलींबरोबर तूं मौज कर.

असें सांगून ती त्याला आणखी एका खोलींत घेऊन गेली. तेथें अनेक मुलेंमुली खेळत होतीं व गप्पा मारीत होतीं. ती सर्व कोणत्या तरी राजघराण्यांतलीं होतीं. एका राजकन्येशीं त्याची चांगली ओळख झाली. ती दिसायला फारच सुंदर होती.

"ही राणी फार वाईट आहे. हिच्याकडे मी गेलीं सात वर्षें गुलाम म्हणून राहातें आहें. मला हिच्या सर्व दुष्ट कारवाया माहीत आहेत. तरी हिच्या हातांतून निसटून पळून जाणें सोपें नाहीं. परंतु जर आपण दोघांनीं मिळून प्रयत्न करून पाहिला तर कदाचित यश मिळेलहि." ती गुलाम राजकन्या म्हणाली.



तिच्या बरोबर मैत्रीनें राहण्यांत राजकुमाराला कांहींच हरकत नव्हती. तो तिला म्हणाला—"तूं सांगशील तें करण्यास मी तयार आहें."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं समुद्रराणीनें राजकुमाराला बोलाविलें व विचारलें—"काय रे! तूं माझ्या दासींपैकीं सर्वांत सुंदर दासीशीं सख्य केलें आहेस, म्हणे? मी तुला तीन कामें देतें. तीं तूं केली नाहींस तर तिला भेटण्याची परवानगी सुद्धां तुला मिळणार नाहीं. लक्षांत ठेव. परंतु तूं जर तीं कामें पुरी केलीस तर



तिच्याशीं लग्न करून घेण्यासदेखील मी तुला परवानगी देईन. कामें पुरी झाली नाहींत तर मात्र जन्मभर तुला माझा गुलाम म्हणून रहावें लागेल." राणी म्हणाली.

नंतर ती त्याला बरोबर यायला सांगून एका मैदानांत गेली. "या मैदानांत जें गवत उगवलें. आहे तें कापून पुन्हां तें संध्याकाळच्या आंत जसेंच्या तसें चिकटवून ठेव." असें सांगून राणी निघून गेली.

राजकुमार विळा घेऊन गवत कापूं लागला. परंतु संध्याकाळच्या आंत सर्व गवत कापून काम पुरें करणें शक्य नाहीं, हें कळायला त्याला फारसा वेळ लागला नाहीं. नंतर तें पुन्हां चिकटवून ठेवण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. तो आपल्या नशिबाला दोष देत स्वस्थ विचार करीत एका जागी बसून राहाला.

थोड्या वेळानें त्याची प्रेमिका त्या बाजूला आली. तिनें त्याला उदास मनानें बसून राहण्याचें कारण विचारलें. राजकुमारानें सर्व थोडक्यांत सांगून टाकलें. राजकुमारीनें त्याच्या हातांतून विळा मागून घेतला. तो उलटा करून गवतावर घासूं लागली. त्याबरोबर गवत कापलें जाऊन जमिनीवर पडलें. नंतर ती विळा सरळ करून कापलेल्या गवतावर रगडूं लागली. कापलेलें गवत जसेंच्या तसें पुन्हां चिकटूं लागलें. कापून चिकटवलेलें गवत व न कापलेलें गवत यांत थोडा फरक दिसत होता. कांपल्या जागीं जोडल्यानंतरदेखील सांधा दिसत होता.

तें गुपित कळल्यावर राजकुमारानें तसेंच गवत कापून चिकटवायला सुरवात केली.

संध्याकाळ व्हायला अजून पुष्कळ उशीर होता. म्हणून दोघें बराच वेळ गप्पा मारीत बसून होतीं. राणी येण्याची वेळ झाली तेव्हां राजकन्या उठून निघून गेली. राणीनें येऊन सर्व गवत पाहिलें व म्हणाली—"हें सर्व काम तूंच केलेंसें दिसत नाहीं."

दुसऱ्या दिवशीं राणीनें राजकुमाराला दुसरेंच काम दिलें. तबेल्यांत शंभरावर घोडे होते. कधीं कोणी तबेला झाडला नव्हता कीं साफ केला नव्हता. संध्याकाळपर्यंत तबेला साफ करण्याचें काम राणीनें राजकुमाराला सांगितलें.

राजकुमार केरसुणी घेऊन तबेल्यांत गेला. तेथें पडलेली लीद व कचरा यांचा ढीग पाहिला. तो पाहूनच त्याचा सर्व उत्साह थंड पडला. पुन्हां राजकुमारी त्याच्याजवळ आली. तिला तो उदास होण्याचें कारण समजलें. तिनें तबेल्याच्या भिंतीला लोंबत असलेली एक सोन्याची काडी घेतली व एका म्हाताऱ्या घोड्यासमोर फिरविली व म्हणाली—"सर्व तबेला झाडून स्वच्छ कर." लगेच तो घोडा आपल्या खुरांनीं आकाशांत धूळ उडवूं लागला. राजकुमार व राजकुमारी दोघं बाजूला जाऊन उभीं राहालीं.

कांहीं वेळानें दोघं परत आलीं तोंपर्यंत सर्व तबेला स्वच्छ झालेला होता. गवताची एक काडीदेखील नव्हती. राजकन्येनें एक



फडकें घेऊन तें जमिनीला लावलेंमात्र, सर्व जमीन धुवून पुसून स्वच्छ झाली व स्फटिकासारखी चकचकीत दिसूं लागली.

संध्याकाळीं राणी येऊन म्हणाली—"हें सर्व काम स्वतः तूं केलेलें दिसत नाहीं."

तिसऱ्या दिवशीं सकाळीं राणीनें राजकुमाराला तिसरें काम दिलें. डुकरें कोंडण्याची जागा होती ती. एक हजार डुकरें होतीं त्या जागीं. कधीं कोणी ती जागा स्वच्छ केली नव्हती. संध्याकाळच्या आंत ती जागा स्वच्छ करावयाचें काम त्याला देण्यांत आलें होतें.

राजकन्येच्या मदतीशिवाय हें काम शक्य नाहीं असा विचार करून तो तिची वाट पहात बसून राहाला. ती आल्याबरोबर त्यानें तिला, जें काम त्याला दिलें होतें तें सांगून कसें करावयाचें हें विचारलें. तिनें डुकरखान्यांतल्या कोपऱ्यांतली एक काठी घेतली व तेथें एक डुकर होतें त्याला त्या काठीनें मारलें व म्हणाली—"डुकरा! तूं माझें एवढें काम करून दिलेंस तर तुला पळून जायला मी मदत करीन." डुकर उठून उभें राहूं लागलेलें पाहून दोघं दूर पळून गेलीं. कारण, एक तर तशीच तेथें घाण होती. नंतर तें डुकर ती जागा स्वच्छ करूं लागल्यावर किती घाण सुटते कोणास ठाऊक?

थोड्या वेळानें दोघं तेथें आलीं तोंपर्यंत तो डुकरखाना राणीच्या जेवणाच्या खोली-सारखा स्वच्छ झाला होता. घाण मुळींच नव्हती. डुकरखाना साफ करून तें डुकर पळून गेलें. संध्याकाळ होईपर्यंत दोघं गप्पा मारीत बसून होतीं. नंतर राजकन्या निघून गेली. थोड्या वेळानें राणी आली. म्हणाली—"हें कामदेखील तूं स्वतः केलेलें दिसत नाहीं. तरी पण मी वचन दिल्याप्रमाणें तुला त्या गुलाम राजकन्येशीं लग्न करायला मी परवानगी देतें. लग्नाला आवश्यक सर्व वस्तू माझी बहीण वनराणी हिच्याकडे आहेत. तूं उद्यां जाऊन घेऊन ये."

राजकुमाराला आनंद झाला. त्याला वाटलें, समुद्रराणी वाटली होती तितकी वाईट नसावी. समुद्रराणी वनराणीकडे कसें जावयाचें हें सांगून निघून गेली.

(पुढील अंकीं संपूर्ण)





# हरवलेलें धान्य

एका गांवीं हयग्रीव नांवाचा एक गृहस्थ रहात असे. एक तर तो गरीब होता आणि त्यांत तो नेहमीं आजारी असे. उदर निर्वाह करणें त्याला अशक्य वाटूं लागलें. आपल्या बायका-मुलांचे हाल त्याला पहा-वेना. म्हणून तो कोणाला कांहीं सांगि-तल्याशिवाय घर सोडून निघून गेला. कांहीं मिळकत झाली तरच घरीं परत जायचें त्यानें आपल्या मनाशीं ठरवून घेतलें होतें.

गरीब काडी पहेलवानाला कोण काम देणार? हयग्रीवला कोठेंहि कांहीं काम मिळालें नाहीं. त्याला जिवाचा वीट आला. रानांत दूर एका नदींत उडी मारून जीव देण्याचें ठरवून त्यानें उडी मारली.

जवळच एक ऋषी स्नान करीत होते. त्यांनीं त्याला नदींत उडी मारीत असतां पाहिलें. त्यांनीं पण नदींत उडी मारून हयग्रीवला बाहेर काढलें. त्यानें आपली करुण कथा त्यांना सांगितली.

ऋषी त्याला म्हणाले—"मी तुला एक मंत्र शिकवितों. त्याच्या मदतीनें तुला तीन दिवस वाटेल तितकें खाद्य मिळेल. त्यानंतर तुला तो मंत्र उपयोगी पडणार नाहीं. तो मंत्र दुसऱ्या कोणाला शिकवून दिलास तर त्याचा उपयोग त्याला होईल. पण जर मंत्र देण्या लायक तुला कोणी भेटला नाहीं तर तूं मंत्र तसाच सोडून दे. मंत्रशक्ति असेपर्यंत तूं पौष्टिक पदार्थ खाऊन घे व प्रकृति सुधारल्यावर कामधंदा करूं लाग."

हयग्रीव तो मंत्रोपदेश घेऊन आनंदानें घरीं आला. मुनींनीं त्याला शिकवलेल्या मंत्राचा जप करून आपल्या बायका-पोरांना

श्री. वा. वि. मिसाळ



आवश्यक ते तांदूळ, डाळ, गहू, भाजी, दूध, तूप वगैरे पदार्थ मागून घेतले.

तीन दिवस सर्व कुटुंबाचा उदरनिर्वाह आनंदानें झाला. तिसऱ्या दिवशीं हयग्रीवनें तीन दिवसांकरिता आवश्यक सर्व पदार्थ पुन्हां मागून घेतले.

त्यानंतर त्या मंत्राचा कांहीं उपयोग होणार नाहीं असा विचार करून तो मंत्र कोणाला शिकवावा या विवंचनेंत तो बसला असतां एक भिकारी येऊन दारासमोर उभा राहाला आणि तेथेंच बेशुद्ध होऊन पडला. हयग्रीवला मनुष्य बेशुद्ध झाला म्हणजे काय होतें हें माहीत होतें. कारण तो स्वतःदेखील अन्नाभावीं बेशुद्ध झाला होता. म्हणून तो त्या गरीब भिकाऱ्याला आपल्या घरांत उचलून घेऊन गेला. औषधपाणी केलें व तो शुद्धीवर आल्यावर त्याला खायला प्यायला घातलें.

नंतर त्यानें त्याला मंत्रशिकवून दिला व म्हणाला—"त्या मंत्राच्या सहाय्यानें तीन दिवस सुखानें खा पी व त्यानंतर तो दुसऱ्या कोणाला तरी देऊन मोकळा हो."

भिकाऱ्यानें हयग्रीवकडून मंत्र शिकून घेतला. त्यानें एक पोतें भरून तांदूळ मागून घेतले. पोतें भरून तांदूळ पाहून भिकाऱ्याच्या बायकोला अपरंपार आनंद झाला. भिकाऱ्यानें पोत्यांतले तांदूळ घेऊन त्याला हवे होते तेवढे ठेवून घेतले व बाकी बाजारांत विकून टाकले. जे पैसे मिळाले त्याचा उपयोग त्यानें इतर कामाच्या वस्तू विकत घेण्यासाठीं केला.

तो मंत्र आणखी दोन दिवस त्याच्या कामाचा होता. त्यानें त्या दोन दिवसांत त्या मंत्राचा उपयोग कसा करून घ्यावा या विषयीं आपल्या पत्नीचा सल्ला घेतला. तीन दिवस त्याचा उपयोग करून घेऊन तो मंत्र बायकोला शिकवून द्यावा असें ठरलें. अशातऱ्हेनें त्याच्या घरीं तो मंत्र आणाखी पांच दिवस राहूं शकला. त्या पांच दिवसांत सर्व आवश्यकता पुऱ्या करून घ्यायच्या होत्या.

दोघें भिकारी नवराबायको फार लोभी होतीं. गांवकरी त्यांना रोज फुकट भिक्षा घालायला तयार नसत. कधीं कधीं रागावून त्यांना हाकलून लावीत. या मंत्रबळानें त्यांनीं आपल्या सर्व इच्छा पुऱ्या करून घेऊन गांवकऱ्यांचा सूड घ्यायचें पण ठरविलें. परंतु तो उद्देश्य पुरा होण्यास त्यांची झोपडी पुरेशी नव्हती. म्हणून भिकारी रानांतल्या एका जुन्या पडक्या ओसाड घरांत बायको बरोबर राहाला व मंत्र म्हणून म्हणाला—"आमच्या गांवांतले सर्व धान्य घेऊन या घरांत येऊन ये."

त्याची बायको त्याच्याहून वस्ताद होती. मंत्र शिकून घेतल्यावर ती म्हणाली—"देशांत जितकें धान्य आहे तें सर्व आमच्या या घरांत आणून ठेव." त्यानंतर तिच्याजवळची मंत्रशक्ति पण नाहींशी झाली.



दोघां नवराबायकोला वाटत होतें कीं आपण सारें जग जिंकलें. सर्व देश गरीब श्रीमंत सर्व धान्य कोठें नाहींसें झालें कीं भुताटकी झाली या काळजींत अन्नाच्या शोधार्थ निघाले. कांहीं लोकांनीं कंदमुळें व फळें खाऊन आपला उदर निर्वाह चालविला. राजानें हें सर्व धान्य कसें व कोठें गेलें याचा शोध लावण्यासाठीं आपले हेर पाठविले.

इतक्यांत एक आश्चर्याची गोष्ट घडली. प्रत्येक घरांतून उंदीर बाहेर पळून जाऊं लागले. कारण त्यांना खायला घरांत कांहीं नव्हतें. परंतु अन्न कोठें आहे हें वासानेंच त्यांना कळलें व त्यामुळें

लक्षावधि उंदीर एकाच दिशेला पळूं लागले. तें कळल्यावर राजानें आपल्या शिपायांना उंदरांच्या पाठोपाठ तपास करायला पाठवून दिलें.

उंदरांचे थवेच्या थवे रानाच्या दिशेनें पळत त्या जुन्या पडक्या घरांत शिरूं लागले. शिपायांनीं त्या घराला चारी बाजूंनीं गराडा घातला. कांहीं शिपाई आंत गेले. त्यांना हें पाहून आश्चर्य वाटलें कीं घरांत शेकडों तांदुळांचीं व गव्हाचीं पोतीं भरून ठेवलेलीं होतीं. कित्येक खोल्यांत तांदूळ जमिनीवर पसरलेले होते.

शिपायांना पाहून भिकारी व त्याची बायको पळून जाऊं लागली. परंतु शिपायांनीं त्यांना कैद केलें. त्यांनीं त्यांना विचारलें—"तुम्ही या रानांत कां राहतां? व तुमच्याकडे इतके तांदूळ कोठून आले?"

पण दोघें काय उत्तर देणार? म्हणून शिपायांनीं त्यांना राजासमोर नेऊन उभें केलें. म्हणाले—"यांच्या जवळ सर्व अन्न जमा झालेलें आहे."

भिकाऱ्यानें राजाला सर्व वृत्त निवेदन करून माफी मागितली. म्हणाला—"हा सर्व मंत्रप्रताप आहे. मी गांवकऱ्यांवर सूड उगवण्याच्या हेतूनें हें सर्व केलें. हयग्रीवानें मंत्र दिला होता. मी त्याचा स्वतःसाठीं उपयोग करून समाधान मानण्याऐवजीं त्याचा दुरुपयोग केला.

राजानें हयग्रीवला बोलावून विचारलें तेव्हां त्यानें मंत्र खरा असल्याची गोष्ट सांगितली. नंतर राजानें रानांतून धान्य मागवून गांवकऱ्यांना परत वांटून दिलें.

भिकारी व त्याची बायको दोघांना कैदेची शिक्षा झाली.





# पुरलेला ठेवा

एका गांवीं एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला तीन मुली होत्या. मुलगा एकदेखील नव्हता. सर्व म्हणत कीं त्यानें पुष्कळ धन पुरून ठेवलें असावें. तो रोज गाडींत बसून आपल्या शेतांत जाई. तो नित्याप्रमाणें गाडींत बसून निघाला.

तासाभरानें काळोख पडूं लागलेला पाहून गाडीवाल्यानें विचारलें—"काका! गाडी परत फिरवूं का?" पण गाडींतून उत्तर आलें नाहीं तेव्हां गाडीवाल्यानें मागें पळून पाहिलें. त्याचा मालक मरून पडला होता.

गाडी घरीं परत गेली. तेथें बायकोनें व मुलींनीं श्रीमंताचें प्रेत पाहिलें तेव्हां त्या टाहो फोडून रडूं लागल्या जमीनदारानें मागें काय ठेवलें आहे हें त्यांच्या पैकीं कोणालाहि माहीत नव्हतें. त्याहून दुःखाची गोष्ट म्हणजे तिजोरींत अगदीं मोजके पैसेच मिळाले. सर्वांच्या कल्पनेप्रमाणें लक्षावधी रुपये निघाले नाहींत.

जमीनदारणीवर आकाशच कोसळलें. तीन मुलींचीं लग्नें, कांहीं लहान गोष्ट झाली? गाडीवाल्या शिवूशिवाय त्यांची चवकशी करणारा पुरुष दुसरा कोणी नव्हता. म्हणून गरीबी आली होती तरी जमीनदारणीनें त्याला नोकरीवरून काढलें नाहीं.

कांहीं दिवसांनीं घरांत रात्रीं कोणी तरी चालत असल्याचा भास होऊं लागला. एकदां जमीनदाराची बायको घाबरून जागी झाली. सैंपाकघरांत भांडीं व डबे फेकल्याचा आवाज ऐकूं आला. तिनें प्रत्यक्ष आपल्या पतीला सैंपाकघरांतून झोंपण्याच्या

सौ. सरोजिनी परब



खोलींत येत असतां आणि पलंगावरून बिछानें खालीं ओढून काढीत असतां पाहिलें. नंतर तो एकामागून एक सर्व खोल्यांतून गेला. घाई घाईनें सामानाची हलवाहलव करीत असतां त्यांतलें बरेंच तुटलें किंवा फुटलें. उजाडेपर्यंत सामानाची बरीच नासधूस झाली. सर्वांच्या झोंपा मोडल्या.

घरांत खाण्यापिण्याची काळजी होतीच. आतां भुताटकी सुरू झाली. उजाडल्यावर शिवू आला. जमीनदारणीनें त्याला रात्रीं घडलेलें सर्व वृत्त सांगितलें व म्हणाली— "रोज रात्रीं हे असे येऊन सामानाची नासधूस करूं लागले तर आम्हांला येथें राहाणें अशक्य. आणखी कोठें तरी रहायला गेलें पाहिजे. त्यापेक्षां हा सर्व प्रकार चालू असेपर्यंत तूं आमच्या घरीं रात्रीं झोंपायला येत जा. आम्हां बायकांना थोडा तरी धीर होईल."

"ज्यांच्या इच्छा पुऱ्या होत नाहींत तो भूत होऊन जगांत असाच वावरतो. तरी तुम्ही भिऊं नका! आज रात्रीं मी येतो तुमच्या सोबतीला." शिवू म्हणाला.

त्या दिवशीं रात्रीं तो झोंपण्याच्या खोलींत एका पलंगाखालीं लपून पडून राहाला. रात्रीं भूत आलें. प्रथम तें सैंपाकघरांत गेलें. नंतर रात्रभर सर्व घरभर धुडगूस घालीत राहालें.

उजाडल्यावर जमीनदारणीनें शिवूला विचारलें—"कायरे, शिवू! तुझे धनी असे रात्रभर धुडगूस घालीत राहाले तर आमचें कसें व्हायचें या घरांत? कोणाला सोबत म्हणून बोलवावें तर भुताटकी पाहून कोणी येणार देखील नाहीं."

शिवू म्हणाला—"मालकीण बाई! घाबरूं नका! मालक हें जें कांहीं करीत आहेत, खात्रीनें त्याचा कांहीं तरी अर्थ असावा. आजची रात्र तुम्ही सर्व माझ्या घरीं जाऊन झोंपा. मी एकटा झोंपतों घरांत."

त्याप्रमाणें शिवू एकटा घरांत झोंपला आणि मालकिणीला व तिच्या मुलींना आपल्या घरीं पाठवून दिलें. काळोख पडल्यावर तो मालक झोंपत असे त्या खोलींत गेला व तेथें पडून राहाला. कांहीं वेळानें मालकाचें भूत आलें व नित्य नियमाप्रमाणें सामानाची आदळ आपट सुरू केली. शिवूदेखील चमचे, पळ्या वगैरे त्याच्यासारखाच फेंकूं लागला. भुतानें तें पाहिलें व त्याच्याकडे वळून म्हणालें—

"काय रे शिवू तूं येथें कसा आणि काय करतो आहेस?"

"मालक! जिथें धनी तिथें दास! मी पण आलों आपल्या पावलावर पाऊल टाकीत." शिवू म्हणाला.

"म्हणजे तूं केव्हां मेलास रे? मला नाहीं कळलें?" भुतानें विचारलें.

"कसें कळणार मालक? परवांच तर मेलों!" शिवू म्हणाला.

"बरें झालें, आतां मला एक विश्वासू नोकर मिळाला तर येथें सुद्धां. तर मग चल झोंपायच्या खोलींत जाऊं आणि





तेथल्या वस्तू पाहूं." असें सांगून भूत बंद दरवाज्यांतून सरळ आंत निघून गेलें. पण शिवूनें हळूंच दार उघडलें व आंत जाऊन पुन्हां बंद करून घेतलें. नंतर तो देखील मालकाबरोबर सामान फेंकूं लागला.

थोड्या वेळानें शिवूनें मालकाला विचारलें—"धनी! पण तुम्ही हें सर्व कशाला करतां?"

"अरे शिवू! आतां तुझ्याजवळ काय लपवून ठेवूं? मी तीन दगडांखालीं तीन हंडे पुरून ठेवले आहेत. एका हंड्यांत सोनें आहे, एकांत चांदी व आणखी एकांत रत्न माणिक्यें व दागिने. ती गोष्ट माझ्याशिवाय इतर कोणाला माहीत नाहीं. म्हणून घाबरत होतों. काय करावें हें सुचत नाहीं मला. म्हणून हा धंदा चालविला आहे." मालक म्हणाला.

"असें सांगा तर! बरोबर आहे. हें पहा, मी फक्त शंभर वराह नाणीं आयुष्यभरांत जमा केलीं. त्यांची काळजी मला इतकी आहे तर आपल्याला इतक्या मोठ्या ठेव्याची हुरहुर लागून राहल्यास त्यांत आश्चर्यच काय?" शिवू म्हणाला.

"तूं देखील पुरून ठेवलें आहेस का?" भुतानें विचारलें.

"जिथें आपण गाडी ठेवतों ना तेथें एका कोपऱ्यांत मी पुरून ठेवले आहेत मालक." शिवू म्हणाला.

दोघे सामानाची आदळ आपट करून शेवटीं सामानाच्या कोठींत आले. तेव्हां शिवूनें मालकाला विचारलें—"तर मग! मालक आपण याच खोलींत पुरून ठेवला आहे ना ठेवा?"

"होय! या कोपऱ्यांतल्या दगडाखालीं सोनें पुरून ठेवलें होतें आणि या दगडाखालीं चांदी आणि या दगडाखालीं दागिने. हें धन ज्यांना मिळायला हवें त्यांना न मिळतां दुसरें कोणाला मिळूं नये एवढीच माझी इच्छा आहे." भूत कांपऱ्या आवाजांत म्हणालें.

भुतानें दाखविलेल्या दगडावर शिवूनें खूण करून ठेवली. उजाडण्याची वेळ झाली तेव्हां भूत म्हणालें—"आतां आपण येथून निघून गेलें पाहिजे. येथें राहून भागणार नाहीं."

"होय तुम्ही व्हा पुढें, माझे वराह जागच्या जागीं सुरक्षित आहेत कीं नाहींत हें मी पाहून येतों. मी आलोंच पळत तुमच्या पाठोपाठ. कोणी वराह खणून घेऊन गेला असावा अशी मला शंका आहे." शिवू म्हणाला.

भूत शिवूसाठीं थांबलें नाहीं. तें निघून गेलें.

उजाडल्याबरोबर मालकीण आपल्या मुलींना घेऊन घरीं आली. शिवूनें रात्रीं जें घडलें तें सर्व सांगितलें व त्यांच्यासमोरच त्यानें ते तिन्ही दगड खणून काढले. तेव्हां भुतानें सांगितलें होतें तसें त्याला तिन्ही दगडांखालीं अनुक्रमें सोनें, चांदी व दागिने मिळाले.












"आतां मालकांचें भूत तुम्हांला त्रास देणार नाहीं. आतां मी येतों." शिवू मालकिणीला म्हणाला.

पण मालकीण शिवूला म्हणाली—"आम्हांला सोडून कोठें निघालास? दोन तीन दिवस रात्रीं आरामानें गेल्या नाहींत तर आम्ही जिवंत राहूं कीं नाहीं आम्हांला शंका आहे. दोन तीन दिवस तूं आमच्या-कडेच रात्रीं झोंपत जा. पुढें पाहून घेऊं काय करावयाचें तें."

शिवू त्यांच्या विनंतीला मान देऊन दोन दिवस त्यांच्या घरींच राहाला. भूत त्या बाजूला फिरकलें देखील नाहीं. तिसऱ्या दिवशीं मालकीण शिवूला म्हणाली—"शिवू! तुझे उपकार आम्ही जन्मभर विसरणार नाहीं. माझ्या मनांत एक गोष्ट आहे. माझ्या तिघी मुली लग्न करून निघून गेल्या-वर मी घरांत एकटी राहीन. म्हणून निदान एका मुलीनें घरीं रहावें अशी माझी फार इच्छा आहे. सगळ्यांत धाकट्या मुलीचा मला जास्त लळा आहे. ती तुझ्या जोगती आहे. मी तुला आपला जांवई करून घ्यावा म्हणतें, तुम्ही दोघें राहलांत तर माझें पुढलें आयुष्य सुखानें जाईल. त्यांत तुझें कांहीं नुकसान नाहीं व आमचा फायदा होईल."

प्रथम शिवूला तें ऐकून आश्चर्याचा धक्काच बसला. परंतु त्याला मागाहून कळलें कीं तिसऱ्या मुलीचें त्याच्यावर प्रेम आहे. तेव्हां मात्र त्याला कबूल करावें लागलें. दोघां मोठ्या मुली श्रीमंत घरीं गेल्या. शिवूनें धाकटीशीं लग्न करून घेतलें व तो त्या घरीं राहूं लागला.





# उत्तरकांड

रावण वरुणलोकांतून लंकेला परत येत असतां वाटेंत त्याला देवलोकांतली कोणी स्त्री, किंवा अप्सरा दिसली कीं तिला पुष्पक विमानांत बसवून घेऊन लंकेला आला. ही संख्या सहस्रावर पोंचली. त्यांनीं रावणाची पुष्कळ निंदा केली.

रावण लंकेला पोंचला तेव्हां त्याची बहीण शूर्पणखा रडत त्याला भेटायला आली. ती म्हणाली—"दादा! तूं हें काय रे केलेंस? इतर कालकेयांबरोबर माझ्या पतीचा वध करून तूं मला हें वैधव्य दिलेंस! आपल्या मेहुण्याचा विचार कसा काय तुझ्या मनांत आला नाहीं?"

"आतां झालें त्याबद्दल दुःख करीत बसण्यांत काय अर्थ आहे? युद्ध करीत असतां मला कळलेंच नाहीं कीं माझा शत्रू कोण व मित्र कोण? यापुढें तूं खर याच्या बरोबर रहा. तो तुला कोणत्याहि वस्तूची उणीव भासूं देणार नाहीं. मी त्याच्याकडे दूषणाला चौदा हजारांचें सैन्य बरोबर देऊन दंडकारण्याच्या रक्षणासाठीं पाठवीत आहें. सर्व तुझ्या आज्ञेप्रमाणें वागतील." रावणानें असें सांगितल्यावर शूर्पणखा दंडकारण्यांत जाऊन राहू लागली.

नंतर रावण निकुंभ वनांत गेला. तेथें त्याचा मुलगा मेघनाद यज्ञ करीत



होता. रावण आपल्या लाडक्या युवराजाला प्रेमानें भेटला व म्हणाला—"तूं येथें काय करतो आहेस रे?"

त्याचें उत्तर शुक्राचार्यांनीं दिलें—"तुझ्या मुलानें अग्निष्टोम, अश्वमेध, राजसूय, गोमेध वैष्णव आदि यज्ञच नव्हें, तर अत्यंत कठिण असा महेश यज्ञदेखील करून त्यानें शंकराला प्रसन्न करून घेतलें आहे व त्याच्याकडून कामगमन रथ, सर्वत्र अंधःकार करणारी माया आणि धनुष्यबाण मिळविले आहेत. आतां तो अगदीं शेवटचा यज्ञ करीत आहे."

शुक्राचार्यांच्या त्या उत्तरानें रावणाच्या मनाचें समाधान झालें नाहीं. तो म्हणाला—"आपण त्याच्याकडून हे सर्व यज्ञ करविलेंत तें बरोबर नाहीं. आमचा शत्रू जो इंद्र त्याला खूष करण्यासाठीं माझें द्रव्य कां खर्च करविलेंत?" असें सांगून तो मेघनादला-बरोबर चलण्यास आग्रह करूं लागला.

त्याच वेळीं बिभीषणानें रावणाला राग येणारी बातमी येऊन सांगितली. रावणाच्या आईचा चुलता माल्यवन्त याच्या मुलीला कुंभीनस नांवाची एक मुलगी होती. रावण तिला आपली बहीण मानीत असे. ती त्याच्याकडेच लहानाची मोठी झाली. तिला, मधु नांवाचा एक राक्षस पळवू घेऊन गेला. त्यावेळीं रावण दिग्विजय करीत हिंडत होता. कुंभकर्ण झोपलेला होता. बिभीषण जलमग्न स्थितींत तपश्चर्या करीत होता व मेघनाद यज्ञ करीत होता.

रावणानें स्वतः कित्येक देव, नाग वगैरे जातींच्या कन्यांचें अपहरण केलें होतें. पण त्याच्या बहिणीला कोणी अपहरण करून घेऊन गेल्याचें ऐकून त्याला भयंकर राग आला. त्यानें कुंभकर्णाला जागें केलें. आणि मधु राक्षसाच्या प्रदेशावर हल्ला केला.



परंतु कुंभीनस स्वतःच्या इच्छेनें मधु-राक्षसाबरोबर पळून गेली होती व तिनें त्याच्याशीं लग्न करून घेतलें होतें. ती पुढें आली व रावणाला म्हणाली—"दादा! तूं स्वतःच्या मेहुण्याविरुद्ध शस्त्र धारण करीत आहेस हें बरोबर नाहीं. तुझ्याच बहिणीला त्यामुळें वैधव्य येईल त्याची चाड काय?"

रावण तिला म्हणाला—"ठीक! मी तुझ्या पतीच्या अंगाला स्पर्शदेखील करणार नाहीं. परंतु तो आहे कोठें हें तर सांग! मी देवलोक जिंकण्यासाठीं जात आहें. त्याला बरोबर घेऊन जाईन."

कुंभीनस आपल्या पतीला जाऊन म्हणाली—"माझा भाऊ स्वर्ग जिंकण्यास जात आहे. तो तुला मदतीला बोलावीत आहे."

पत्नीच्या शब्दाला मान देऊन मधुराक्षस रावणाला येऊन भेटला. रावण रात्रभर त्याच्या घरीं राहला. मधुराक्षसानें त्याचा सर्व प्रकारें अतिथिसत्कार केला. दुसऱ्या दिवशीं वैश्रवण याचें निवासस्थान कैलाश-पर्वताकडे गेला. सायंकाळची वेळ होती रावणाच्या सैन्यानें तेथेंच पडाव टाकला.

रात्रीं दुधासारखें शुभ्र चांदणें पडलें होतें. झाडींत किन्नरांचें गायन चालू होतें.



कुबेराच्या वाड्यांतून अप्सरांचें मधुर गायन ऐकूं येत होतें. चहूं कडे सुगंध दरवळत होता. रावणाला त्या वेळीं तो एकांत असह्य वाटूं लागला. विरह वेदनेनें तो दुःखी झाला.

त्याच वेळीं अप्सरांत अत्यंत सुंदर म्हणून प्रसिद्ध असलेली रंभा, निद्रामग्न झालेल्या राक्षस सैन्याच्या छावणींतून रावण बसला होता तिकडे आली. तिच्या अंगावर सुंदर रत्नाभरणें व पुष्पमाळा होत्या. एक पातळ काळा पदर तिनें अंगावर टाकला होता. तिला पाहून ती कोणी लक्ष्मीच आहे कीं काय असा रावणाला भास झाला. रावण



उठून तिच्याजवळ गेला. तिचा हात आपल्या हातांत घेऊन तिला म्हणाला— "कोणाकडे निघाली आहेस तूं ! कोण आहे तो भाग्यवान पुरुष ? त्रिलोकांत माझ्या सारखा पराक्रमी दुसरा कोण आहे !"

रंभा तें ऐकून कांपऱ्या आवजांत म्हणाली— "तुमच्या सारख्या थोर पुरुषानें माझ्याशीं असें बोलूं नये. माझ्या अंगाला इतर कोणी स्पर्श केला तर तुमच्या सारख्यांनीं माझें रक्षण केलें पाहिजे. माझें वय तुमच्या सुनेला शोभेल एवढें आहे. आपले वडील बंधु नलकुबेर यांचे चिरंजीव माझी वाट पहात आहेत."

"तुम्हां अप्सरांना पति आणि पातिव्रत्याच्या गप्पा शोभत नाहींत." असें सांगून रावणानें रंभेवर बलात्कार केला. हातानें चिरडून टाकलेल्या फुलासारखी तुटून पडलेल्या लतेसारखी रंभा लज्जावनत होऊन नलकुबेराकडे गेली व घडलेलें सर्व वृत्त त्याला सांगितलें.

नलकुबेरानें जलस्पर्श करून "रावणाला शाप दिला कीं रावणानें या पुढें स्त्रीजातीकडे कुदृष्टीनें पाहून कोणत्याहि स्त्रीशीं तिच्या इच्छेविरुद्ध बलात्कार केला तर त्याच्या प्रत्येक डोक्याचीं छकलें शतधा होऊन जमिनीवर लोळूं लागतील." ती शापवाणी ऐकून रावणाच्या तुरुंगवास भोगणाऱ्या स्त्रियांना परमानंद झाला. त्या दिवसापासून रावणानें एकाहि परस्त्रीच्या अंगाला स्पर्श न करण्याचें ठरविलें.

रावण कैलास पर्वतावरचा सैन्याचा तळ हलवून स्वर्गलोकाकडे निघाला. रावणाच्या राक्षस सैन्यानें स्वर्गाला वेढा घातला. ती बातमी ऐकून इंद्रानें आपलें सैन्य तयार केलें आणि स्वतः मदत मागण्यासाठीं विष्णूकडे निघाला. तो विष्णूला म्हणाला— "रावणानें खुद्द स्वर्गावरच स्वारी केली



आहे. तुझ्या मदतीनें मी कित्येक राक्षसांना जिंकलें आहे. तूं आपलें सुदर्शन चक्र घेऊन माझ्या मदतीला यावेंस."

"मी त्याच्याशीं युद्धाला तयार नाहीं. त्याचें मरण माझ्या हातीं नाहीं. त्याची वेळ आली म्हणजेच त्याला मरण येईल. तूर्त तूंच त्याच्याशीं युद्ध कर. तुला भिण्याचें मुळींच कारण नाहीं." विष्णु म्हणाला.

सुरासुरांचें घन घोर युद्ध झालें. रावणाचा आजा सुमाली रावणाच्या सैन्याचा सेनापति होता. सावित्र नांवाच्या एका वसूच्या हातीं त्याचा वध झाला. राक्षस सैन्याचें पण फार मोठें नुकसान झालें. इंद्रानें फार मोठा पराक्रम गाजविला आणि रावणाला कैद केलें. तें कळल्यावर मेघनादाला भयंकर राग आला. त्यानें मायास्त्र फेंकलें व अदृश्यपणें इंद्राशीं युद्ध करूं लागला. त्यानें इंद्राला कैद केलें व आपल्या बापाला सोडविलें, आणि घोषणा केली— "युद्ध संपलें. आम्ही इंद्राला जिंकून त्याला कैद केलें आहे."

इंद्राला जिंकून मेघनादानें इंद्रजितही पदवी मिळविली. रावण इंद्राला घेऊन मेघनादाबरोबर लंकेला आला. इंद्राला



सोडवून आणण्यासाठीं देव लंकेवर चालून गेले. ब्रह्मदेव रावणाला म्हणाला—"तुझ्या मुलानें जो पराक्रम दाखविला तो अवर्णनीय असाच आहे. मला त्याचा अभिमान वाटतो. आजपासून जग त्याला इंद्रजित या नांवानें ओळखेल. तो या जगांत अजिंक्य आहे. आतां इंद्राला कैदेंत ठेवून तुला काय मिळणार ? तूं त्याला सोडून यावेंस."

"आजोबा ! मी इंद्राला सोडून यावें असें जर आपलें मत असेल तर आपण मला अमरत्व यावें." इंद्रजित म्हणाला.



ब्रह्मदेव म्हणाला—"इहलोकांत जो जन्माला येतो त्याला मरण हें येणारच. तें सुटत नाहीं. पूर्ण अमरत्व कसें मिळेल?"

"मला तरी पूर्ण अमरत्वाची हाव कोठें आहे?" मी देखील तुम्हांला प्रसन्न करण्यासाठीं दररोज मंत्र म्हणून हव्य देऊन अग्नीची अर्चना करीत जाईन. मी युद्ध करण्यास निघालों म्हणजे अग्नीनें मला रथ जोडून द्यावा. मी जोपर्यंत त्या रथांत असेन तोंपर्यंत मला अमरत्व असावें. मी हा वर आपणांजवळ मागत आहें. जर अग्निपूजेंत कांहीं अंतर पडलें तर मला मृत्यु येवो!"

ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणाला. त्यानंतर मेघनादानें इंद्राला सोडून दिलें. इंद्राला बरोबर घेऊन देव स्वर्गलोका कडे परतले.

युद्धाच्या धुंदींत रावणानें भूलोकांत पर्यटन केलें त्यावेळीं त्याचा एक दोन जागीं पराभव पण झाला. त्याचें वर्णन अगस्त्य ऋषींनीं रामाला वर्णन करून सांगितलें.

सहस्रबाहु कार्तवीर्याजुनाला जिंकण्यासाठीं आपलें सैन्य घेऊन रावण माहिष्मती नगरीस आला. तेव्हां त्याला कळलें कीं कार्तवीर्याजुन सपत्नीक नर्मदा नदींत जलक्रीडा करण्यासाठीं गेला आहे.

रावण देखील सपत्नीक नर्मदा नदीवर गेला. तेथें स्नानादि आटोपून तो शंकराच्या पूजेस बसला. त्याच्या मंत्र्यांनीं पुजेसाठीं फुलांची रास नदीकाठीं लावली. रावण नेहमीं जवळ एक सुवर्णलिंग ठेवीत असे. तें जमिनीवर ठेवून त्यानें त्याची पुजा केली. नंतर त्याच्यासमोर स्तोत्र म्हणत नाचूं लागला.

नर्मदा नदी पूर्वेकडून पश्चिमेकडे वाहाते व शेवटीं समुद्राला जाऊन मिळते. अशी नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहूं लागली. एवढेंच नव्हें तर नदीला उसळी आली व रावणाची सर्व फुलें लाटेबरोबर नदींत



जाऊन पडली आणि वाहून गेली. तें पाहून रावणानें शुक व सारण दोघांना चुटकी वाजवून जवळ यायला खूण केली व नर्मदा उलटीकडे वाहूं लागल्याचें कारण काय म्हणून विचारलें.

त्यांनीं जाऊन पाहिलें तेव्हां कार्तवीर्याजुन सपत्नीक जलविहार करीत असल्याचे त्याला दिसलें. त्यानें आपल्या सहस्र बाहूंनीं नदीचें पाणी अडवून धरलें होतें. म्हणून नदी उलटीकडे वाहूं लागली होती. दोघांनीं एक वृक्ष नदी अडवून मध्यें खडला आहे असें रावणाला जाऊन सांगितलें. तो वृक्ष नसून कार्तवीर्याजुनच असावा हें रावणानें ओळखलें. तो रागानें आपलें सैन्य घेऊन त्याच्या समाचाराला निघाला. कार्तवीर्याजुनाच्या मंत्र्यांना बोलावून रावण त्यांना म्हणाला—"जाऊन आपल्या राजाला सांगा कीं मी युद्धाला आवाहन करीत आहें."

"युद्धासाठीं तूं वेळ चांगली शोधून काढलीस! आमचा राजा आपल्या राण्यांसह जलक्रीडा करीत असतां का तो युद्धाला येणार आहे? उद्यां येऊन युद्धाची खुरखुरी मिटवून घे." कार्तवीर्याजुनाचे मंत्री त्याला म्हणाले. पण रावण म्हणाला—"मी शत्रूची



सोय गैरसोय पाहून युद्धाला आलों आहें असें वाटलें होय तुम्हांला?" तेव्हां कार्तवीर्याजुनाचे मंत्री त्याला म्हणाले—"तर मग आमच्याशीं प्रथम युद्ध करून घ्यावें, नंतर आमच्या प्रभूकडे जावें."

त्याप्रमाणें त्यांचें युद्ध झालें. राक्षसांनीं कार्तवीर्याजुनाच्या अनेक वीरांना ठार केलें. कित्येकांना जिवंत गिळून टाकलें. ओरडा ऐकून कार्तवीर्याजुनानें आपल्या राण्यांना धीर दिला आणि आपल्या पांचशें हातांत पांचशें गदा घेऊन त्या फिरवीत रावणावर चालून गेला. प्रहस्त मुसळ घेऊन त्याला

अडवून उभा राहाला. त्यानें कार्तवीर्यार्जुनावर मुसळ टाकलें. गदा प्रहारानें मुसळ तोडून कार्तवीर्यार्जुन त्याच्या पाठीस लागला. त्याच्यावर गदाप्रहार करून व त्याला बेशुद्ध करून तो पुढें निघाला. त्याला पाहून मारीच, शुक, सारण, धूम्राक्ष, महोदर वगैरे राक्षस पळून गेले.

त्यानंतर रावणाशीं युद्ध झालें. दोघांनीं परस्परांवर गदाप्रहार केला. कोणी मागें सरकला नाहीं. डोंगरासारखे दोघे समोरा-समोर उभे होते. परंतु कार्तवीर्यार्जुनाचा गदा प्रहार एकदां रावणाच्या छातीवर होतांच तो बेशुद्ध होऊन खालीं पडला. त्याच्या मुसक्या बांधून कार्तवीर्यार्जुन रावणाला आपल्या राजधानींत घेऊन गेला.

ती बातमी स्वर्गांत पुलस्त्य ब्रह्मदेवाला कळली. त्याला आपल्या नातवाची फार काळजी वाटली व तो धांवत धांवत कार्तवीर्याची राजधानी माहिष्मती येथें आला. कार्तवीर्यार्जुनानें त्याला सामोरा जाऊन त्याचा सर्वप्रकारें आतिथ्यसत्कार केला आणि येण्याचें कारण विचारलें.

तो म्हणाला—"मुला! तूं आज जिंकलें आहेस तो माझा नातू. त्यानेंच त्रिलोक जिंकला होता. त्याचा तूं पराभव केलास. तुझ्या पराक्रमाची थोरवी गावी तेवढी थोडी. तूं अशा उद्धटाला शिक्षा दिलीस हें बरें केलेंस. आतां त्याला सोडून दे."

कार्तवीर्यार्जुनानें त्याला उलट उत्तर केलें नाहीं व रावणाला मुक्त केलें. अग्निसमक्ष दोघांनी परस्परांशीं सख्य राखण्याची प्रतिज्ञा केली. रावणाला वस्त्राभरणें देऊन मोठ्या प्रेमानें कार्तवीर्यार्जुनानें त्याला निरोप दिला.





# प्रद्युम्नाची गोष्ट

जटासुराच्या मुलाचें नांव शंबरासुर असें होतें. आकाशवाणी झाली कीं कृष्ण व रुक्मणीच्या मुलाच्या हस्तें शंबरासुराला मृत्यू येईल. तें ऐकून शंबर काकरूप धारण करून द्वारकेला गेला. प्रद्युम्नाचा जन्म होऊन फक्त आठच दिवस झाले होते. त्याला उचलून नेऊन त्यानें समुद्रांत टाकलें व आतां आपल्याला यापुढें मरण नाहीं असें मनाचें समाधान करून घेऊन परत घरीं आला.

शंकराच्या शापाला भस्म झालेला काम-देव कृष्ण-रुक्मिणीच्या पोटीं प्रद्युम्न होऊन जन्मला होता. मन्मथाची बायको रती शंबराची मुलगी होऊन जन्मली. तिचें नांव मायावती असें होतें.

शंबरानें प्रद्युम्नाला समुद्रांत टाकल्यावर त्याला एका माशानें गिळून टाकलें. त्या माशाला एका कोळ्यानें धरलें. त्यानें तो मासा शंबराची मुलगी मायावती हिला विकला. मासा कापला तेव्हां त्यांतून एक मूल निघालें. तिनें त्या मुलाचें पालनपोषण स्वत:च्या मुलासारखें केलें.

शंबराला ती गोष्ट फार उशिरां कळली. स्वत:चा मृत्यु ज्याच्या हातीं लिहिलेला आहे तो शत्रू आपल्याच घरीं आपल्या मुलीकडे वाढावा, हें शंबराला कसें आवडणार? तो त्याला ठार करण्यासाठीं गेला. परंतु दोघांचें युद्ध झालें त्यांत शंबरच मारला गेला.

मायावतीनें प्रद्युम्नाला आपल्या पूर्वजन्माचा वृत्तांत सांगितला. दोघं एकत्र कांहीं काळ सुखानें राहाले. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं तिनें प्रद्युम्नाला द्वारका येथें पोंचतें केलें.

शेवटीचें मलपृष्ठ



रुक्मिणीचा भाऊ रुक्मी याला रुक्मावती नांवाची मुलगी होती. दोघांचें स्वयंवर ठरलें. स्वयंवराला इतर राजकुमारांबरोबर प्रद्युम्न पण हजर होता. परंतु स्वयंवर होण्यापूर्वींच तो रुक्मावतीला उचलून रथांत बसून पळून गेला. दोघांचें लग्न झालें. त्यांना अनिरुद्ध नांवाचा एक मुलगा झाला.

वज्रपुराला वज्रनाभ नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्यानें तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला खूष केलें आणि कोणी देव त्याला जिंकूं शकणार नाहीं व त्याच्या परवानगीशिवाय कोणी त्याच्या राजधानींत प्रवेश करूं शकणार नाहीं असा वर मिळविला. तो वर मिळाल्याबर तो देवलोकांत शिरून देवांना त्रास देऊं लागला. त्यानें इंद्राला धमकी दिली कीं त्यानें सिंहासन इंद्रासन देण्यास सांगितलें. त्याच्याशीं युद्ध करून त्याला जिंकण्याची हिंमत इंद्रांत नव्हती. म्हणून तो व वज्रनाभ कश्यप मुनींकडे गेले. दोघांनीं त्यांच्या सल्ल्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें. त्यानंतर इंद्र कृष्णाला भेटला व गुप्तपणें कांहीं तरी कारस्थान ठरलें. तें काम प्रद्युम्न करील असें कृष्णानें वचन दिलें.

वज्रनाभला प्रभावती नांवाची एक मुलगी होती. तिची व प्रद्युम्नाची भेट घडवून आणून प्रद्युम्न तिच्याकडे ओढला जावा यासाठीं इंद्रानें त्याला वज्रपुरला पोंचविण्याची व्यवस्था करून दिली. त्यानें त्या कामावर शुचिमुखी नांवाच्या एका हंसकुमारीला नेमलें. ती प्रभावतीच्या उद्यानांत गेली व प्रद्युम्नाच्या सौंदर्याचें वर्णन प्रभावतीसमोर केलें. तें वर्णन ऐकून ती प्रद्युम्नावर इतकी भाळली कीं तिनें त्याच्याशींच लग्न करण्याचें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. तिनें त्या हंसकुमारीच्या विनवण्या केल्या कीं कसेंतरी करून प्रद्युम्नाच्या मनांत देखील तिच्याशींच लग्न करण्याची इच्छा उत्पन्न कर.

शुचिमुखी प्रद्युम्नाकडे गेली व म्हणाली—"तुझ्या हातून एक महत्कार्य होणार आहे. तुझ्या हातून वज्रनाभ याचा वध करविण्यासाठीं तुझे वडील श्रीकृष्ण यांनीं इंद्राला वचन दिलें आहे. तूं वज्रनाभाची राजधानी वज्रपुर येथें पोंचलास तर तुला आणखी एक फायदा होईल. वज्रनाभाची मुलगी प्रभावती एक त्रिलोकसुंदरी आहे. तिचा लाभ होईल."

प्रद्युम्नाला, हंसकुमारीनें जें कांहीं सांगितलें तें तेवढें आवडल्यासारखें दिसलें नाहीं. परंतु हंसकुमारी निघून गेल्यावर तिनें प्रभावतीचें जें रूपवर्णन केलें होतें त्याचें त्याला बारंबार स्मरण होऊं लागलें व तिच्या प्रेमामुळें त्याला दुसरें कांहीं काम सुचत नासें झालें. त्यानें एका पोपटाबरोबर एक चिठ्ठी लिहून ती हंसकुमारीकडे पाठविली.

शुचिमुखी वज्रनाभाकडे गेली व म्हणाली—"भद्र नांवाचा एक नट आहे. त्याचें नृत्य ज्यानें पाहिलें नाहीं त्याचा जन्म व्यर्थ असेंच म्हणावें लागेल."

वज्रनाभाच्या मनांत नटाचें नृत्य पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली व त्यानें



त्याला घेऊन येण्यासाठीं हंसकुमारीला सांगितलें.

शुचिमुखी प्रद्युम्नाला जाऊन भेटली व त्याला एक नटरूप घेऊन बरोबर यायला आपलें नांव भद्र आहे असें देखील सांगितलें. सांगायला सांगितलें. वज्रनाभाच्या अनुमती शिवाय वज्रपूर मध्यें कोणी प्रवेश करूं शकणार नाहीं असा वर मिळाला होता. परंतु त्यानें स्वत:च आपल्या मृत्यूचें आवाहन केलें.

प्रद्युम्नानें नाचत असतां संकेत करून असें दर्शविलें कीं तो प्रभावतीला भेटणार आहे. प्रभावतीला अर्थातच तें कळलें. परंतु वज्रनाभला मात्र तें कांहीं कळलें नाहीं.

त्या दिवशीं प्रभावतीकडे फुलांचे हार नेण्यांत आले त्यांत एका भ्रमराचें रूप धारण करून प्रद्युम्न तिच्या महालांत गेला. प्रभावती एकटी आहे असें पाहून तो प्रगट झाला. दोघांचा गांधर्व विवाह झाला. त्यानंतर प्रद्युम्न प्रभावतीच्या महालांतच कित्येक दिवस लपून छपून राहाला. पुढें कांहीं दिवसांनीं प्रभावतीला एक मुलगा झाला. त्याचें नांव प्रभावंत असें ठेवण्यांत आलें.

इतके दिवस लोटल्यावर वज्रनाभला कळलें कीं त्याच्या राजवाड्यांत कोणी अनोळखी मनुष्य शिरला आहे. त्यानें हुकूम सोडला कीं जो कोणी त्याच्या अंत:पुरांत शिरला असेल त्याला धरून आणावें. प्रद्युम्न वज्रनाभ यांचें युद्ध झालें. वज्रनाभला वर मिळाला असल्यामुळें त्याला जिंकणें इंद्राला शक्य नव्हतें. पण त्यानें प्रद्युम्नाला सर्व प्रकारें मदत केली. त्या युद्धांत वज्रनाभ ठार झाला.

प्रद्युम्नानें प्रभावतीचा मुलगा प्रभावंत याला वज्रपुरच्या गादीवर बसविलें व स्वत: प्रभावतीसह द्वारकेला आला.





# ५०. प्राचीन सायप्रस वृक्ष

मेक्सिको देशांतील हे जुने वृक्ष कॅलिफोर्नियांतील रेडवुड वृक्षांसारखे विलक्षण जातीचे वृक्ष होत. कधीं काळीं टेक्सकोको सरोवरानजीकच्या प्रदेशांत या झाडांचीं दाट अरण्यें होतीं. आतां यांचीं तुरळक झाडीं किंवा झुडप दृष्टोत्पत्तीस येतें. एका जागीं २०० सायप्रस वृक्षसमूहाच्या मध्य भागीं १७५ फूट उंच व ५० फुटाचें खोड असलेला वृक्ष आहे. त्याचें वय ७०० वर्षांचें आहे.





# भारताचा इतिहास




देवगिरीच्या यादव वंशाच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या राजकीय, साहित्यिक, सांस्कृतिक व इतर परंपरांचा पाया पडला. परंतु अल्लाउद्दिनाच्या हातीं रामचंद्रदेव याचा पराभव झाल्यावर त्यांच्या स्वातंत्र्यावर गदा आली. त्यानंतर सुमारें चाळीस वर्षांनंतर बहामनी राज्याच्या किंवा त्यानंतरच्या मुसलमान राज्यांच्या दरबारीं मराठे सरदार प्रमुख हुद्यांवर कामें करूं लागले. पुढें तर सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत भारताच्या इतिहासांत त्यांना अग्रस्थानच मिळालें. या शतकांतच मराठ्यांना राजकीय व राष्ट्रीय दृष्ट्या एक महत्व आलें. जातीय ऐक्याची स्थापना करण्याचें श्रेय छत्रपती शिवाजी महाराज यांनाच मिळतें त्या ऐक्य-स्थापनेच्या कामीं त्यांच्या पूर्वीं पुष्कळ कामगिरी झाली होती.

याला एक मुख्य कारण महाराष्ट्राची नैसर्गिक भूमि व परिस्थिति. समुद्रापासून थोड्या अंतरावर पश्चिमेकडे दक्षिणोत्तर पसरलेला सह्याद्रि पर्वत, पूर्व पश्चिम पसरलेला विन्ध्य पर्वत व सातपुडा यांच्या रांगा, नर्मदा, तापी वगैरे नद्या व अनेकानेक अजिंक्य डोंगरी किल्ल्यांचें जाळें हीं सर्व महाराष्ट्राच्या रक्षणाला कारणीभूत झालीं. खडकाळ जमीन व अवर्षण शेतकीच्या उन्नतीला बाधक. म्हणून मराठा जातींत जात्याच विलासीवृत्ति किंवा आलस्य नव्हतें. त्यांचा आत्मविश्वास दांडगा आणि स्वभाव निष्कपट व परिश्रमी. याखेरीज स्वाभिमान, साहस व धैर्य इत्यादि गुण पण त्यांच्या अंगीं होते. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, समर्थ रामदास इत्यादिकांनीं समाजांत विचारांची क्रांति घडवून आणली होती.

मानवाची समता व समभाव यांचें बाळकडू संतांच्या वाणीच्या रूपें त्यांना मिळालें होतें. राजकीय चैतन्य येण्यास तेंच मूळ कारण झालें. शिवाजीचे गुरु समर्थ रामदास यांनीं आपला सुप्रसिद्ध ग्रंथ 'दासबोध' लिहून धार्मिक व सामाजिक क्रांति घडवून आणली व राष्ट्रीय पुनर्जीवनाचा भक्कम पाया घातला. पंधराव्या व सोळाव्या शतकांत निर्मिलेलें वाङ्मय नवीन चैतन्य व जागरण उत्पन्न करण्यास सहाय्यक ठरलें. सर्व महाराष्ट्राला स्वभाषेच्या व स्वसंस्कृतीच्या अभिमाना बरोबर आपण एक राष्ट्र आहों याची जाणीव झाली ती सतराव्या शतकांत. त्यांना उणीव भासूं लागली ती स्वतःच्या राज्याची. शिवाजी महाराजांनीं ती पुरी केली. दिल्लीच्या बादशाहानें महाराष्ट्र पादाक्रांत केला तेव्हां शिवाजीच्या दोघां पराक्रमी मुलांनीं खंबीरपणें बादशाहाच्या असंख्य सैन्याला तोंड दिलें. कित्येक वर्षें त्यांना शत्रूबरोबर युद्ध करावें लागलें. पण शेवटीं शत्रूची घमेंड जिरली व मोंगलांचें दक्षिणेकडील साम्राज्य खिळखिळें झालें. पेशव्यांच्या काळांत महाराष्ट्राचा भगवा झेंडा पूर्वेला कटक पर्यंत व उत्तरेला अटक पर्यंत फडकूं लागला.



मुसलमान सुलतानांच्या दरबारांत मोठ-मोठ्या हुद्यांवर कामें केलीं असल्यानें मराठ्यांना राजकीय धोरण आणि युद्धकला अवगत झाली. शिवाजीचे वडील शाहजीराजे अहमदनगरच्या निजामाच्या पदरीं मोठ्या हुद्यावर पोंचले व त्यांनीं मोठमोठ्या जहागिरी मिळविल्या. निजाम शाहीला उतरतीकळा लागली त्यावेळीं सर्व राज्य सूत्रें त्यांच्यांच हातीं होतीं. त्यांची ही उन्नति इतर सरदारांच्या डोळ्यांत सलत होती. शाहजहान बादशाहाने अहंमदनगरचें राज्य १६३६ मध्यें खालसा केल्यानंतर शाहजी राजे

विजापूरच्या सुलतानाच्या पदरीं नोकरी करूं लागले. तेथें देखील त्यांनीं कीर्ति आणि मोठमोठ्या जहागिरी मिळविल्या.

शिवाजीच्या आईचें नांव जिजाबाई. ही शाहजीची पहली बायको. शिवाजीचा जन्म शिवनेरीच्या किल्ल्यांत १६३० या वर्षी झाला. (बिकानेरच्या किल्ल्यांतील ग्रंथालयांत मिळालेल्या जन्म कुंडलीवरून १९२७ मध्यें). शाहजीनें त्याच्या जहा-गिरीचें काम पाहणारे दादाजी कोंडदेव यांच्याकडे जिजाबाई व शिवाजी यांना पाठवून दिलें व स्वत: आपल्या धाकट्या बायको बरोबर नवीन मिळविलेल्या जहा-गिरींत जाऊन राहूं लागला.

जिजाबाई फार धार्मिक वृत्तीची बाई होती. तिनें आपल्या एकुलत्या एका मुलाला रामायण, महाभारत व पुराणांतील शौर्याच्या व साहसाच्या गोष्टी सांगून धर्माभिमान व स्वाभिमान उत्पन्न केला. दादाजी कोंडदेव तर शिवाजीला गुरुतुल्य होते. त्यांनीं त्याला राजकारण आणि युद्धकला यांचें शिक्षण दिलें. यामुळें शिवाजीच्या मनांत स्वदेश व स्वधर्म यांच्या विषयीं अभिमानाचीं बीजें चांगलीं रुजलीं आणि त्यानें परकीय सत्तेचें जूं झुगारून टाकण्याचा दृढ निश्चय केला.

सह्याद्रीच्या खोऱ्यांत ९० मैल लांब व १२ ते १४ मैल रुंद असा जो मावळ प्रांत आहे तेथील मावळ्यांशीं बालपणींच शिवाजीचा परिचय झाला. मोठेपणीं त्याला तो फार उपयोगी पडला. शूर सैनिकापासून ते सेनापतीच्या पदापर्यंत काम करणारे शिवाजीचे बालमित्र मावळेच होते.



# नेहरू चरित्र



[ २० ]

जवाहरलाल नेहरूंनीं जैतो येथें आपल्या अनुयायांसह पोंचल्याबरोबर तेथील ब्रिटीश अधिकाऱ्यानें त्यांच्याकडे एक पत्र पाठविलें. पत्रांत नाभा संस्थानांत प्रवेश करूं नये, केल्यास ताबडतोब संस्थानाबाहेर निघून जावें असें लिहिलें होतें.

त्यांना तें पत्र नाभा संस्थानांत प्रवेश केल्यावरच मिळालें असल्यामुळें, संस्थानाच्या हद्दींत प्रवेश करूं नये हा हुकूम निरर्थकच होता. परत गाडी केव्हां जायला आहे हें नक्की माहीत नसल्यामुळें ताबडतोब संस्थानाबाहेर निघून जाणें शक्य नव्हतें. जवाहरलालजींनीं, ती नोटीस देणाऱ्या अधिकाऱ्याला हें सर्व सांगून, जत्थ्याबरोबर ते आले नसल्याचें व नाभा संस्थानाचा कायदा मोडण्याची आपली इच्छा नसल्याचें सांगितलें. तरी पोलीस अधिकाऱ्यांनीं नेहरूंसह तिघांना कैद केलें.

दिवसां ते पोलीस 'लॉकअप' मध्येंच होते. संध्याकाळीं तिघांना स्टेशनपर्यंत चालत घेऊन गेले. संतानम् यांच्या डाव्या हाताला व जवाहरलालजींच्या उजव्या हाताला मिळून एक हातकडी घालण्यांत आली होती. त्या हातकडीला जोडून एक सांखळी होती ती धरून पोलीस शिपाई पुढें चालत होता. गिडवानी यांच्या हातांतदेखील एक हातकडी घातली होती व ते दोघांच्या पाठीमागें चालत होते, कुत्र्यांनाच जणुंकांहीं धरून नेत आहेत. अशातऱ्हेनें जैतो गांवांत त्यांची मिरवणूक निघाली. रात्रीं त्यांना रेल्वेच्या थर्डक्लासमधून नेऊन नाभाच्या 'लॉकअप' मध्यें आणि दुसऱ्या दिवशीं









पाहिल्याशिवाय खटल्याचा निकाल सांगण्यांत आला. कारण तो निकाल पूर्वीच तयार करून ठेवलेला असावा. दोन्ही आरोपाबद्दल दोन वर्षांची शिक्षा सांगण्यांत आली.

या अनुभवावरून इंग्रज अधिकारी स्वतंत्र संस्थानांचा कारभार कसा चालवीत हें त्यांना याच वेळीं कळलें. पोलीस अधिकाऱ्यांना न्यायाधिशाची फिकीर नाहीं. पोलीसांचा नुसता नामोच्चार केला कीं न्यायाधिशांची घाबरगुंडी उडून जाई. पुढें काय झालें नकळे, निकाल सांगितला त्या दिवशीं रात्रीं सुपरिंटेंडंटनें तिघांना सुटका देऊन रेलवे स्टेशनवर पोंचतें केलें.

अंबाला जाणारी गाडी येतांच सर्व गाडींत बसले. जवाहरलालजी अंबाल्याहून दिल्लीला व तेथून अलाहाबादला आले. पंधरा दिवसांचा तुरुंगवास तिघांना चांगलाच भोंवला. तिघांना विषमज्वर झाला. जवाहरलालजी तीनचार आठवड्यांनीं चांगले बरे झाले.

हें नाभा प्रकरण एवढ्यावर थांबलें नाहीं. आणखी सहा महिन्यांनंतर गिडवानी ५०० स्वयंसेवकांसह एक जत्था घेऊन जैतो येथें गेले. त्यांना कैद करण्यांत आलें. त्यांची तब्येत पुष्कळ बिघडली, एका वर्षानंतर ते सुटले. गिडवानी कैद झाल्याची बातमी ऐकून जवाहरलालजींनीं निघण्याचें ठरविलें. परंतु त्यांच्या मित्रमंडळींनीं त्यांना जाऊं दिलें नाहीं. आपल्या मनांत नाभा संस्थानच्या तुरुंगांची जी धास्ती होती ती लपविण्यासाठीं मित्रांनीं दिलेला सल्ला आपण मानला असावा असा विचार करून जवाहरलालजींना स्वतःचीच फार लाज वाटली.





# नवाबकुमारी

[ ७ ]

नवाबकुमारी स्वतःच त्याच्याकडे आलेली पाहून मानसिंह महाराज तिला म्हणाले—

"मुली! तूं राजकन्या आहेस. कांहीं राजकीय कारणांमुळें तुला माझ्याकडून थोडा कष्ट झाला त्याबद्दल मला फार वाईट वाटतें. तुला कांहीं विचारावयाचें असेल तर अगदीं मोकळेपणें विचार."

"बोलायला काय आहे? आपल्या अंतःपुरांत कांहीं काळ रहायला मला कोणत्याहि प्रकारें हरकत नाहीं." आयशा म्हणाली.

"तुला बोलावयाचें नसेल, पण मला पुष्कळ ऐकावयाचें आहे तुझ्या तोंडून. मी कांहीं गोष्टी विचारतों त्यांचीं उत्तरें दिलीस तर बरें वाटेल मला."

"आपण विचाराल त्या प्रश्नांचीं खरीं खरीं तींच उत्तरें मी देऊन."

"आपल्या घरच्या सर्व लोकांना सोडून पाटण्याला यायला असें काय कारण झालें?"

"आपले चिरंजीव जगतसिंह यांना सुटका मिळाली तर पहावें म्हणून."

"कोणता उपाय करण्याचा विचार होता किंवा आहे, तुझ्या मनांत?"

"युवराजांकडून बादशाहांकडे एक अर्ज पाठवून पहावयाचा!"



"मी सुभेदार म्हणून येथें असतां माझ्या नकळत तो अर्ज कसा काय पाठविणार होतीस तूं !"

"तुम्हीच नाहीं का स्वत: त्यांना शिक्षा केलीत ? त्याच्या विरुद्ध कांहीं करावयाचें झालें तर तुम्ही कशी काय मदद करणार ? तसें केलेंत तर तुम्ही न्यायाची थट्टा केलीत असें नाहीं का होणार ?"

"पण अर्ज तयार नको का व्हायला ?"

"तो तर केव्हांच तयार झाला आहे ! आतांपर्यंत तो प्रयागच्या पुढेंपर्यंत पोंचला-देखील असेल."

"जगतसिंहाच्या खोट्या सहीनेंच ना ?"

"नाहीं. तुरुंगांत जगतसिंहांनीं तो अर्ज वाचून त्यावर सही केलेली आहे."

"तो तुरुंगांत असतां तो अर्ज त्याच्या-कडे कसा काय पोंचता झाला ?"

"तें तसें सहज झालें नाहीं. तुरुंगाच्या अधिकाऱ्याची मूठ गरम करावी लागली !"

"मोठी कर्तबगार मुलगी दिसतेस अर्ज बादशाहांच्या हातांत पोंचता होण्यासाठीं कांहीं व्यवस्था केलीच असशील ?"

"होय ! दरबारांत पाऊल टाकतांच त्यांच्या हातांत तो पोंचता होईल."

तें ऐकून मानसिंहांना राग आला नाहीं. आनंदच झाला.

"पण तूं ही सर्व जबाबदारी स्वत:वर कां घेतलीस हें कळावें असें फार वाटतें." मानसिंहांचा तो प्रश्न ऐकून आयशा मान खालीं करून बसून राहाली.

"तें सांगणें तुला इष्ट दिसत नाहीं. मी तो प्रश्न विचारीत नाहीं. तूं जगतसिंहाची भेट घेतली आहेस का ?"

"नाहीं !"

"तूं आल्याची बातमी त्याला कळविली होतीस का ?"

"नाहीं !"

"तुझा प्रयत्न यशस्वी झाल्यावर तरी तूं त्याची भेट घेशील का ?"

"भेटणार नाहीं. भेटण्याची इच्छा पण नाहीं."

आयशा व जगतसिंह दोघांचें परस्परांवर प्रेम आहे हें मानसिंहानें जें ऐकलें होतें तें तिनें दिलेल्या सर्व उत्तरांवरून सहजीं खरें ठरलें होतें. म्हणून उघड म्हणाले—

"मुली ! राजकीय कारणांमुळें तुझ्यावर अनेक प्रतिबंध लावावे लागले. त्याबद्दल मला मनापासून दिलगिरी वाटते. ओरिसांत अफगाणांनीं युद्धाला बोलावणें दिलें आहे. उद्यां मी तिकडेच जात आहें. मी येईपर्यंत तूं खुशाल येथें रहा. या युद्धाविषयीं तुला कांहीं सांगावयाचें किंवा विचारायचें आहे का ?" महाराजांनीं आयशाला विचारलें.

"त्याविषयीं आम्हां बायकांना काय कळणार ?"

"उस्मानखानाला कांहीं कळविण्यासारखें आहे का ?"

"काय असणार ? नवाब साहसी व पराक्रमी आहेत. मी त्यांना कांहीं सल्ला देणें बरोबर नाहीं. त्यांनीं जें काम करण्याचें



ठरविलें असेल त्याचा परिणाम त्यांना ठाऊक असणारच. त्याला तयार होऊनच ते पाऊल टाकायला तयार असणार."

"युद्धावरून परत येईन तेव्हां तुझ्याशीं सावकाशपणें बोलतां येईल. ताजखानाला त्याच्या घरीं परत पाठवून दे !" असें सांगून मानसिंह निघून गेले.

युद्धाची खूप तयारी करून मानसिंह ओरिसा प्रांतांत गेला. वर्धमानहून सैय्यद-खान पण एक मोठें सैन्य घेऊन आला.

पठाण तरी स्वस्थ झोंपा काढीत नव्हते. संधी मोडल्यावर युद्ध होणार हें त्यांना पण



माहीत होतें. उस्मानखानानें युद्धाची जय्यत तयारी चालू केली होती.

वनपूर नजीक दोन्ही सैन्यें परस्परांसमोर येऊन उभी राहालीं. पठानांनीं हत्तींचें एक मोठें सैन्य बरोबर आणून तें समोर उभें केलें होतें. मोगलांनीं तोफा आणल्या होत्या. तोफांचा मारा सुरू होतांच त्यांच्या आवाजाला भिऊन जाऊन हत्ती वाट फुटेल तिकडे पळूं लागले. त्यांच्या पायांखालीं पठाणांचें बरेंच सैन्य चेंगरून ठार झालें. सर्व बेत थोडे ढासळले. तरी पठाण शौर्यानें लढले. परंतु त्यांचा पराभव झाला. वनपूरच्या युद्धांत जय मिळाल्यावर मानसिंह पुढें निघाला. किल्ल्यामागून किल्ले सर करीत व गांवामागून गांवें काबीज करीत मानसिंहानें सर्व ओरिसा प्रांत पादाक्रांत केला. जलेश्वर, कटक आणि पठाणांची राजधानी स्वर्णदुर्ग मोगलांच्या हातीं गेला. प्रत्येक किल्ल्यावर मोंगलांचा झेंडा फडकूं लागला. इतर कांहीं तरुणोपाय नाहीं असा विचार करून उस्मानखानानें आपला पराभव स्वीकार केला. सुलेमानखान व उस्मानखान दोघांनीं अकबराचे मांडलिक राजे म्हणून खंडणी देण्याचें कबूल केलें. ओरिसा प्रांत मोंगल साम्राज्यांत सामील करण्यांत आला.

हा विजय मिळाल्यामुळें अकबर बादशाहाला अर्थातच फार आनंद झाला. कारण ओरिसा प्रांत त्याच्या डोळ्यांत बरेच दिवस सलत होता. म्हणून त्यानें बंगाल व बिहार प्रांतांबरोबर ओरिसा प्रांताचा सुभेदार म्हणून मानसिंहाची नेमणूक केली.

या युद्धाचा शेवट असा होईल ह्या गोष्टीची उस्मानखानाला स्वप्नांतदेखील कल्पना नव्हती. त्याच्या सर्व आशा व अपेक्षांवर पाणी फिरलें. युद्ध चालू असेपर्यंत निरनिराळ्या विचारांचें काहूर त्याच्या मनांत चालू होतें. युद्धाला सुरवात व्हायला थोडा अवकाश असतां नेमकी त्याच वेळीं आयशा नवाबाच्या अंत:पुरांतून निघून गेली. ती निघून गेल्यानंतर उस्मानखानाच्या जगांत चहूकडे काळोखानें राज्य पसरलें. कारण तो तिच्या प्रेमासाठीं प्राणोत्सर्ग करावयास देखील तयार होता. तिच्याबरोबर आपल्या नशिबानें देखील पाठ फिरविली असें त्याला वाटलें.

मानसिंहाच्या अंत:पुरांत आयशाला पठाणांचा पराभव होत गेल्याची बातमी मिळत असे. तिला तेथें राहून दोन महिने होत आले होते. त्या अवधींत उस्मानखानाचें भाग्य रसातळाला येऊन भिडलें होतें. त्याला कारण आपण त्याच्या अंत:पुरांत त्याच्याजवळ नसल्यानें त्याला वाटलेला निरुत्साह आहे असें आयशाला वाटूं लागलें. आपण त्याच्याशीं किती कृतघ्नपणा केला हा! मोगलांनीं ओरिसा प्रांत गिळंकृत करून उस्मानखानाला आपला मांडलिक करून घेतलें या दोन्ही गोष्टी आपल्या कृतघ्नपणाचाच परिणाम नव्हे काय? इतका अपमान सहन करून तो अजून



जिवंत आहे तो आपल्यासाठींच नव्हें काय? असे अनेक विचार तिच्या मनांत घोळत होते.

मानसिंह लवकरच पाटण्याला परत येत असल्याची बातमी आली. त्यानें तिच्यावर ज्या कारणास्तव प्रतिबंध घातला होता. तें कारण आतां उरलें नव्हतें. उस्मानचा त्या युद्धांत पूर्ण पराभव झाला होता.

एकदां तिलोत्तमा तिसऱ्या प्रहरीं आयशाकडे आली. किती दिवसांनंतर त्यांची ती भेट झाली होती. दोघी परस्परांना भेटल्या. दोघींचे कंठ गहिंवरले.



आयशा म्हणाली—“ तुझी भेट होईलसें स्वप्नांत देखील वाटलें नव्हतें. तुझ्या मामंजींनीं आदरपूर्वक तुला अंत:पुरांत प्रवेश करायला परवानगी दिल्याचें ऐकून मला किती किती आनंद झाला म्हणून सांगूं ?”

“ आनंद कसला ! अजून ते तर तुरुंगांतच आहेत ना ?” तिलोत्तमा म्हणाली.

“ तूं वीर पत्नी आहेस. थोडा धीर धरून हा थोडा कष्ट सहन नको का करायला ?”

जगतसिंहाच्या सुटके करितां प्रयत्न चालू असल्याची गोष्ट तिलोत्तमेला माहीत नव्हती. तें आयशानें तिला सांगितलें.

जगतसिंहावर दोघींचें प्रेम होतें. पण त्या दोघींच्या प्रेमांत किती फरक होता ? जगतसिंहाचा विरह तिलोत्तमेला अगदीं असह्य वाटत होता. याउलट आयशा त्याची भेट पुन्हां न व्हावी यासाठीं मनाला आवरून होती. तिचें युवराजांवर प्रेम आहे ही गोष्ट इतरांना कळलेली देखील तिला आवडत नव्हती. इतकेंच काय पण, जगतसिंहाला सुद्धां न कळेल तर बरें असें देखील तिला वाटे.

पण तिलोत्तमेला तें माहित होतें. म्हणून ती म्हणाली—“ आपण युवराजांचें प्रेम वांटून घेऊं या.” हें तिनें मनापासून सांगितलें होतें. पण आयशानें तो विचार सोडून द्यायला तिलोत्तमेला सांगितलें. म्हणाली—“ या पुढें आपली भेट होणार नाहीं. मी ओरिसा प्रांतांत पुन्हां जाणार आहें. मोगल व पठाण यांच्या मध्यें सख्य स्थापन होणें अशक्यच वाटूं लागलें आहे. पठाणांचें नांव मिटलें तर आयशाचें नांव पण त्यांच्याबरोबर मिटेल. मला मरण आलें तर ती बातमी देखील तुला मिळेल कीं नाहीं शंकाच. हीच आपली शेवटची भेट.” त्याचवेळीं उर्मिलेचा निरोप आला म्हणून तिलोत्तमेला जावें लागलें.



मानसिंहानें ओरिसांतून परत आल्यावर आयशावरचे बरेंच प्रतिबंध कमी केले. ताजखानाच्या कुटुंबांतल्या बायका तिला भेटायला येत. तिकडे अभिरामस्वामी माफीचा अर्ज घेऊन दिल्लीला जात असतां वाटेंत तें माफी पत्र, धन, घोडे वगैरे सर्व लुटून नेल्याची बातमी कळली.

आयशानें एक लांबलचक पत्र उस्मानखानाला लिहिलें. त्यांत तिनें विचारल्याशिवाय निघून आल्याबद्दल वाईट वाटत असल्याचें लिहून त्याच्याजवळ माफी मागितली. आपल्या वडिलोपार्जित इस्टेटीची विल्हेवाट लावण्यासाठीं तिनें ओरिसाची राजधानी सोडली नव्हती. एका निराळ्याच कामासाठीं सोडली होती. तें काम पुरें होत आल्याचें व परत स्वदेशीं येणार असल्याचें तिनें लिहिलें होतें. तें पत्र तिनें ताजखानाच्या घरच्या मंडळींबरोबर पाठवून दिलें.

रात्रीं मानसिंह महाराजांनीं उर्मिला व आयशा दोघांना म्हणाले—“ मुली ! तुझ्यावरचे सर्व प्रतिबंध काढून घेतले आहेत. कोठें जायचा विचार आहे ?”

“ कोठें जायचें हें ठरविलें नाहीं. दिल्ली जावें म्हणतें !” आयशा म्हणाली.



“ तिकडेच तुला राहतां येईल. तिकडे तुझ्या ओळखीचे लोक असतीलच. ओरिसांत पठाणांचें स्वत:चें असें कांहीं उरलें नाहीं. तूं त्यांना सोडून गेलीस तरी हरकत नाहीं.” मानसिंह म्हणाला.

“ तुम्ही सांगितलें तें ठीक आहे ! परंतु संकटकाळीं ज्यांनीं माझी जबाबदारी घेतली त्यांच्यावर संकट आलें असतां मी त्यांना कशी काय सोडून जाऊं ?”

“ तूं कोठें जायची गरजच काय आहे, मी म्हणतें ! तूं मुलीसारखी आमच्याजवळच रहा !” उर्मिला म्हणाली.

"तुम्ही मला आईसारख्या आहांत म्हणून सांगतें. युवराजांची सुटका व्हावी म्हणून मला दिल्लीला गेलेंच पाहिजे." आयशा म्हणाली.

"त्यासाठीं माफीपत्र गेलें आहे, नाहीं का ?" मानसिंहानें विचारलें.

"पण तें सर्व चोरांनीं चोरून नेल्याचें कळलें. म्हणून स्वतः गेल्याशिवाय काम होणार नाहीं."

"शिक्षा झालेल्याला अशी मदत करणें हा एक गुन्हा आहे. मी त्याबद्दल एकदां माफ केलें. पण या खेपेस मी तुला माफ करणार नाहीं." मानसिंह म्हणाला.

"शिक्षा करण्याचा अधिकार आपल्याला आहे ही गोष्ट खरी असली तरी त्याचा उपयोग आपण करणार नाहीं हें पण तितकेंच खरें आहे." आयशा म्हणाली.

"कां ?"

"आपल्याला देखील युवराजांची सुटका व्हावी असें वाटत आहे म्हणून ! आपली प्रतिष्ठा वाढावी म्हणून आपण आपल्या मुलाला स्वतःच्या हातानें शिक्षा केलीत. परंतु त्यानें शिक्षा भोगावी असें आपणांस खात्रीनें वाटत नसावें."

"यांत तुझा स्वार्थसुद्धां नाहीं वाटतें ?"

"दोघांचा स्वार्थ असल्यास मला शिक्षा करून आपल्याला काय सुख मिळेल ?"

उर्मिला मध्येंच म्हणाली—"तें कांहीं असो. तुला आपली सून करून घेतल्या-शिवाय मात्र मी सोडणार नाहीं."

"तेवढें माझें भाग्य कोठें आहे ? माझ्या भाग्यांत काय लिहिलें आहे तें त्यापूर्वीच होऊन जाईल !" आयशा म्हणाली.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# भागीदार

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं.

तो पुन्हां झाडाजवळ गेला. खांद्यावर प्रेत काढून घेतलें व श्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुला या अपरात्रीं इतका कष्ट सहन करीत असलेला पाहून मला भैरवाची गोष्ट आठवते. भैरवानें अनेंच पुष्कळ कष्ट सहन केले व शेवटीं यश त्याच्या हातीं येतां येतां निसटून गेलें. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

भैरव एका खेडेगांवांत जन्मला. त्याचा जन्म झाल्यावर कांहीं दिवसांनीं त्याचे वडील वारले. तरी त्या कुटुंबाची आर्थिक स्थिति वाईट नव्हती. विद्याभ्यास संपल्यावर व वयांत आल्यावर भैरवनें विचार केला कीं कोठें तरी पेठेच्या गांवीं जाऊन रहावें व



थोडेंसें भांडवल लावून व्यापारधंदा करावा. असा विचार करून तो पेठेच्या गांवीं निघाला. खर्चासाठीं थोडे पैसे त्यानें बरोबर घेतले.

कांहीं अंतर चालून गेल्यावर भैरवला एका गांवाबाहेर एक करुण प्रसंग बघायला मिळाला. एक तरुण युवक एका स्त्रीच्या प्रेताजवळ बसून रडत होता. भैरवनें जवळ जाऊन त्याला विचारलें— "कायरे बाबा! कोण तूं आणि ही बाई कोण? या निर्जन स्थानीं तुम्ही कसे काय आलांत?"

"मी एक फुटक्या नशिबाचा आहें. ही माझी बायको. माझे वडील एक मोठे दर्यावर्दी व्यापारी होते. व्यापारासाठीं तीन जहाजें भरून जात असतां ते आणि मालासह जहाजें समुद्रांत बुडून गेलीं. माझ्या वांट्याला उरलें तें फक्त कर्ज घरदार सर्व, विकलें तरी कर्ज फिटणार नाहीं. अपमान सहन करून आपल्या गांवांत राहण्यापेक्षां परगांवीं अज्ञातवास करणें बरें असा विचार करून आम्ही दोघं निघालों होतों. काल रात्रीं माझी बायको वारली. गांवकर्‍यांसमोर हात पसरणें बरोबर वाटलें नाहीं म्हणून स्वतः बायकोचें प्रेत खांद्यावर घेऊन गांवाबाहेर आलों. या प्रेताचा दहनसंस्कार करण्या-पुरेसे पैसेदेखील माझ्याजवळ नाहींत." असें सांगून तो तरुण युवक आणखी जास्त मोठ्यानें रडूं लागला.

"तूं उगीच दुःखी होऊं नकोस. मी गांवांत जाऊन क्रियेला जरूर ती सर्व तयारी करून येतो." भैरव त्याला म्हणाला.

"माफ करा! तुमचें दान स्वीकारणें मला शक्य नाहीं. मी कर्ज घेणार नाहीं. येथेंच जीव देणार आहें. कोल्हीं कुत्रीं खाऊन टाकतील आम्हांला. तुम्ही आपल्या



वाटेनें जावें अशी माझी विनंति आहे." तो तरुण म्हणाला.

भैरव म्हणाला—"मी तुला दानहि करीत नाहीं नि कर्ज पण देत नाहीं. मी व्यापार करण्यासाठीं निघालों आहें. माझ्याजवळ थोडे पैसे आहेत. तुझ्यासाठीं मी खर्च करायला तयार आहें. त्याबद्दल तूं एक भागीदार म्हणून व्यापारांत मदतीला ये. जो फायदा होईल तो आपण वांटून घेऊं.

"अहो पण, मी तुमचे पैसे घेऊन बायकोचा दहन संस्कार आटोपला तर व्यापार करण्यासाठीं भांडवल कोठून उरणार? माझ्याजवळ एक फुटकी कवडी देखील नाहीं." तो तरुण युवक म्हणाला.

"माझ्याजवळ माझ्या आईनें दिलेले दागिने आहेत. नवशिक्याला कमी पैशांत व्यापार कसा करावयाचा हें कसें कळणार? परंतु तुला व्यापाराचें ज्ञान आहे. तुझें ज्ञान व माझे हे थोडेसे पैसे ही दोघांची भागी झाली कीं नाहीं?" भैरवनें त्याला विचारलें.

तो तरुण युवक तेव्हां कोठें निरुत्तर झाला व त्यानें, भैरवनें दिलेले पैसे घेऊन आपल्या मृत पत्नीचा दहनसंस्कार आटोपला. त्या तरुणाचें नांव कुमारगुप्त होतें.



दहनसंस्कार आटोपला तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता. भैरव आणि कुमारगुप्त दोघांनीं स्मशानाजवळच्या तलावांत आंघोळ केली व तलावाच्या काठींच दोघे पडून राहाले. पहाटे भैरवला एक स्वप्न पडलें. त्याला स्वप्नांत एक तरुण स्त्री दिसली. ती त्याला म्हणाली—"तुम्ही माझ्या पतीला पुनर्जन्मच दिला आहे. त्या उपकाराची फेड म्हणून मी एक गुपित तुम्हांला सांगतें. माझ्या चितेचें भस्म आंधळ्यांच्या डोळ्याला लावल्यास त्यांना छान दिसूं लागेल." एवढें सांगून ती तरुण स्त्री अदृश्य झाली.



तेव्हांच भैरवची झोंप मोडली. कुमारगुप्ताच्या बायकोच्या शब्दांचा प्रतिध्वनि अजून त्याला ऐकूं येत होता. कांहीं असो, पाहूं तर या, असा विचार करून भैरवनें कुमारगुप्त जागा होण्याच्या आधीं चितेंतली थोडी राख आणण्याचें ठरविलें.

उजाडल्यावर दोघे मित्र निघाले व दुपारच्या सुमारास एका गांवीं धर्मशाळेंत उतरले. धर्मशाळेच्या ओसरींतच त्यांना एक आंधळा भिकारी बसलेला दिसला. भैरवनें आपल्या गाठोड्यांतून थोडी राख काढून त्या आंधळ्याच्या डोळ्यांना चोळली. लगेच त्याला दिसूं लागलें. एकदम उजेड सहन न झाल्यामुळें तो डोळे बारीक करून ओरडला—"अरे मला दिसूं लागलें !"

ती बातमी गांवभर पसरली. गांवभरचे आंधळे व ज्यांच्या ज्यांच्या कानावर ती बातमी गेली ते सर्व जवळपासचे आंधळे आले. भैरवनें सर्वांची चिकित्सा केली व सर्वांना छान दिसूं लागलें. राजाच्या कानावर ती गोष्ट पोंचली राजाचे डोळे कांहीं दिवसांपूर्वींच एकाएकीं गेलें होते. कित्येक वैद्यांनीं औषधपाणी केलें होतें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. धर्मशाळेंत कोणीतरी परदेशी आला आहे व तो नेत्र चिकित्सा करतो हें ऐकून राजानें आपल्या प्रधानानास भैरवला बोलावून आणण्यास पाठविलें. कुमारगुप्तला धर्मशाळेंतच रहा, मी लवकर परत येतों असें सांगून भैरव राजवाड्यांत गेला.

राजवैद्यांनीं भैरवला अनेक प्रश्न केले. तूं कोणाकडे नेत्रविद्या शिकलास? तूं डोळ्यांना चोळतोस त्या भस्मांत कोण कोणतीं द्रव्यें आहेत? वगैरे. "मी नेत्रवैद्यक शिकलों नाहीं. हें भस्म करण्याची रीत मला कोणी शिकविली नाहीं. व कोणाकडे तें मिळणें पण शक्य नाहीं. माझ्याजवळ देखील तें जास्त नाहीं. तें आहे तोंपर्यंतच त्याचा उपयोग मी करूं शकणार." भैरवनें स्पष्ट करून सांगितलें. नंतर त्यानें राजाच्या डोळ्यांना तें भस्म चोळलें. त्याबरोबर राजाला छान दिसूं लागलें.

नंतर भैरव राजाला म्हणाला—"महाराज! मला आतां निरोप द्यावा."

"मी तुझ्या उपकारांची अल्प का होईना फेड केल्याशिवाय निरोप देऊं म्हणतोस? माझे डोळे गेले तेव्हांपासून मी मनांत ठरविलें होतें कीं जो कोणी औषधपाणी करून माझे डोळे बरे करील त्याच्याशीं मी आपल्या मुलीचें लग्न करून देऊन त्याला आपलें अर्धें राज्य देईन. त्याप्रमाणें तुला...."

"माफ करा महाराज! मी या उपकाराबद्दल प्रत्युपकाराची अपेक्षा ठेवली नव्हती." असें नम्रपणें सांगून भैरव धर्मशाळेंत परत आला. नंतर कुमारगुप्ता बरोबर आणखी एका गांवीं निघून गेला. तेथें त्यानें आपल्या आईचे दागिने विकून टाकले व दोघांनीं मिळून व्यापार सुरू केला. कुमारगुप्ताच्या मदतीनें व्यापारांत पुष्कळ फायदा झाला. कांहीं दिवसांनीं गांवांतल्या श्रीमंत व्यापाऱ्यांत दोघांची गणना होऊं लागली.



येथवर गोष्ट सांगून वेताळानें विक्रमार्काला विचारलें—"राजा ! मला एका गोष्टीचा संदेह आहे. भैरवनें राजाच्या विनंतीला मान देऊन राजकन्येशीं लग्न करून अर्धें राज्य कां घेतलें नाहीं? राज्य म्हणजे कांहीं भयंकर वस्तू आहे म्हणून? निदान व्यापाराला भांडवल म्हणून त्यानें राजाकडे थोडें धन कां नाहीं मागून घेतलें? या प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून तूं दिली नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला-"भैरव व कुमारगुप्त दोघे भागीदार झाले होते. जो लाभ होईल तो दोघांनीं वांटून घ्यायचें ठरलें होतें. चितेंतलें भस्मदेखील दोघांचें मिळूनच भांडवल होतें. एकट्या भैरवची मालकी त्याच्यावर नव्हती. त्याचा उपयोग करून भैरवनें राजाला दृष्टिलाभ करून दिला होता. त्याचा मोबदला म्हणून मिळलेली राजकन्या दोघांची बायको कशी होणार? अशा परिस्थितींत राजाकडून कांहीं मागून घेणें तरी त्याला कसें शोभणार? अभिमान म्हणून कांहीं असतोच कीं नाहीं? राज-कन्येपेक्षां, अर्ध्या राज्यापेक्षां दोघांची भागीदारी त्याला जास्त किमतीची व स्वाभिमानाची वाटली. परोपकार झाला तरी तो राजानें केलेला परोपकार होता. त्यांत त्याची मान खालींच झाली असती. पण उपकार करून प्रत्युपकाराची फिकीर न करण्यांतच त्याचा मान होता."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# स्वप्नांतलें सत्य

एका गांवीं किलिंदक नांवाचा एक मनुष्य रहात असे. त्याच्या बायकोचें, तिच्या स्वभावाला साजेसेंच नांव कर्कशा असें होतें. तिला सोनें जमा करण्याची फार हाव. बायकोच्या त्रासामुळें त्याला वाटूं लागलें कीं गळ्याला फास लावून मोकळें व्हावें. शेवटीं एक दोरी घेऊन तो एका जंगलांत एका निर्जन स्थानीं गेला. एका झाडाला दोरीचें एक टोंक बांधून दुसऱ्या टोंकाचा फांस त्यानें आपल्या गळ्यांत घातला.

पण त्याला मरण आलें नाहीं. कारण झाडाची फांदी तुटून गेली. आणखी एक विचित्र गोष्ट घडली. फांदी तुटल्याबरोबर झाडावरून एक यक्ष किलिंदकच्या समोर येऊन उभा राहला व त्यानें फांस लावून घेण्याचें कारण विचारलें. कारण कळल्यावर यक्ष म्हणाला—"हें पहा, तुझे कष्ट दूर व्हावे म्हणून मी तुला मंत्रवलेल्या बिया देतों. रोज झोंपण्यापूर्वी तूं एक बी खाऊन टाक. तुला त्याचा महिमा सकाळीं कळेल. तुला सोनें मिळेल." असें सांगून यक्षानें किलिंदकाच्या हातांत तीन बिया दिल्या व अदृश्य झाला.

किलिंदक घरीं गेला व झोंपतांना त्यानें एक बी खाली. लगेच त्याला गाढ झोंप लागली. झोंप लागतांच त्याला एक अपूर्व स्वप्न पडलें. स्वप्नांत तो घराबाहेर पडला व चालत त्यानें पूर्वी कधीं न पाहालेल्या प्रदे-शांत एका गुहेंत येऊन पोंचला. एक सांखळी हातांत घेऊन कोणीतरी अप्सरा कोणाची तरी वाट पहात असल्यासारखी त्याला दिसली. त्या सांखळींत एकच एक सोन्याचें कमळ होतें. तें पाहूनच डोळे

दिपून जात. त्या कमळाकडे किलिंदकाला टक लावून पहात असलेला पाहून त्या स्त्रीनें स्मित करून तें कमळ तोडून त्याच्या हातांत दिलें आणि म्हणाली—"मागें पाहाल्या-शिवाय घरीं निघून जा."

सकाळीं झोंप मोडली तेंव्हां तें सोन्याचें कमळ हातांत असलेलें पाहून त्याला स्वप्न खरें असल्याचें कळलें. त्यानें तें सोन्याचें कमळ बायकोला दिलें व तें त्याला कसें मिळालें हें देखील सांगितलें.

नवऱ्याची वाखाणणी करण्याचें तर दूरच उलट ती त्याला रागावून म्हणाली—"तूं तरी नशिबाचा फुटकाच. समोर इतकी कमळें असतां त्यांतलें एकच एक कमळ घेऊन तूं आलास व तेवढ्यावर उड्या मारतो आहेस होय!"

दुसऱ्यां दिवशीं झोंपण्यापूर्वी किलिंदक आणखी एक बी खाऊन झोंपला. लौच त्याला छान झोंप लागली. त्या रात्रीं पण त्याला तसेंच स्वप्न पडलें. तीच सांखळी व तीच अप्सरा त्याला दिसली. या खेपेसपण त्या अप्सरेनें त्याच्या हातांत एकच एक कमळ दिलें आणि त्याला परत जायला सांगितलें.



पुन्हां नवऱ्यानें एकच एक सोन्याचें कमळ आणून दिलेलें पाहून कर्कशाच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन भिडली. शेजारपाजारच्या लोकांसमक्ष तिनें त्याच्यावर पोटभर तोंडसुख घेतलें. लोकांची गर्दी जमा झाली. राजाच्या कानावर पण ती गोष्ट गेली. राजानें दोघां नवरा-बायकोला रस्त्यावर असा ओरडा करून शांतिभंग कां केला म्हणून जाब विचारला.

किलिंदकनें घडलेलें वृत्त जसेंच्या तसेंच सांगून टाकलें. राजाचा विश्वासा बसेना. म्हणून त्यानें दोघां नवराबायकोला राजवाड्यांतच रात्रभर राहायला सांगितलें. रात्रीं राजानें स्वत: किलिंदकाकडून ती बी मागून घेतली आणि खाऊन झोंपला.

राजादेखील स्वप्नांत त्या अप्सरेकडे गेला. परंतु त्याची दृष्टि त्या अप्सरेवरच खिळून राहाली. तिला धरून आपल्या राजा घरीं निघाला.

ती स्त्री हात सोडवून दूर पळून गेली व राजाला म्हणाली—"राजा! मी स्वतंत्र स्त्री नाहीं. एकदां सांखळीकडे पहा तर!"

राजानें ती सांखळी पाहिली. ती रक्तानें माखलेली होती. त्या सांखळींत



राजाला कमळा ऐवजीं सर्पफण दिसले. सर्व दृश्य भयंकर होतें.

ती स्त्री म्हणाली—"राजा ! मी राज्यलक्ष्मी आहें. माझ्याकडे न वळतां फक्त या सांखळीवरच ज्याची नजर पडते त्याला सर्प फणांच्या जागीं एकेक सोन्याचें कमळ दिसतें. हा फणवाला एक राक्षस सर्प आहे. तो मला येथून हालूं देणार नाहीं. माझ्या अंगाला कोणी हात लावला तर दोघांचा जीव धोक्यांत पडेल." असें ती स्त्री म्हणाल्याबरोबर राजानें तलवार उपसली.

"राजा ! अशी घाई करूं नकोस. ह्याला कोणाच्याहि हातानें, कोणत्याहि शस्त्रानें मरण येणें शक्य नाहीं. त्याला एकाच उपायानें मरण येईल. माझ्यावर ज्याचें खरें खुरें प्रेम आहे त्याच्या हृदयाचें रक्त याच्या डोक्यावर शिंपडलें तर याला तत्काल मरण येईल." ती म्हणाली.

"तसें असेल तर तूं माझ्या हृदयाचें रक्त ह्याच्या डोक्यावर शिंपड." असें सांगून राजानें स्वतःच्या हृदयांत तलवार खुपसून घेतली व बेशुद्ध होऊन पडला.

राजाला सकाळीं शुद्ध आली तेव्हां पहाटेचा नगारा व मंगलवाद्यें वाजत होतीं. त्यानें डोळे उघडून पाहिलें तेव्हां तो आपल्या शयनगृहांत असल्याचें व राज्यलक्ष्मी त्याला वारा घालीत असल्याचें त्याला दिसलें. त्याच्या गादीच्या चारी बाजूला सोन्याचीं कमळें चकाकत होतीं.

"हें सर्व स्वप्न आहे कीं प्रत्यक्ष घडलेली गोष्ट !" चकित होऊन राजानें विचारलें.

"स्वप्न खरें ठरलें !" राज्यलक्ष्मी म्हणाली.

त्यानंतर राजा राज्यलक्ष्मीला आपली पट्टराणी करून घेऊन राज्य करूं लागला.

कर्कशानें आपला हट्ट व मूर्खपणा सोडून दिला व आपल्या नवऱ्याबरोबर त्याच्या मताप्रमाणें वागूं लागली.





# पोपटवाला ज्योतिषी

एका गांवीं दगडू नांवाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याला सर्व बावळट व मूर्ख म्हणत. लहानपणीं आई वडील त्याला मूर्ख, गाढव, वगैरे वगैरे शब्दांनीं शिव्या देत. लग्न झाल्यावर त्याला बायकोच्या शिव्या ऐकाव्या लागत. सर्वांचे शिव्याशाप ऐकून ऐकून त्याला आपल्या घराचा व जीविताचा वीट आला आणि एके दिवशीं तो घर सोडून जायचें ठरवून निघाला.

गांवाबाहेर एका झाडाखालीं त्याला पोपटवाला ज्योतिषी दिसला. त्या ज्योतिष्याकडे एक पोपट होता. ज्योतिषी समोर एक पंचा अंथरून त्यावर कांहीं चिठ्ठ्या ठेवून देई. येणारे जाणारे त्याला दोन आणे देऊन आपलें भविष्य विचारीत. ज्योतिष्यानें पिंजरा उघडल्याबरोबर पोपट बाहेर येऊन एक चिठ्ठी उचलून ज्योतिष्याला देई. ती चिठ्ठी वाचून तो ज्योतिषी दाखवी. दगडूनें पण आपलें भविष्य विचारून घ्यायचें ठरविलें. त्यानें ज्योतिष्याला दोन आणे दिले व भविष्य विचारलें. ज्योतिष्यानें पिंजरा उघडल्याबरोबर पोपटानें एक चिठ्ठी उचलून दिली. ज्योतिष्यानें भविष्य वाचून सांगितलें तें असें—"देवाची कृपा दृष्टि तुझ्यावर झाली आहे. आज पासून तुझें भाग्य पालटलें आहे. म्हणूनच तुला हें भविष्य ऐकण्याची बुद्धि झाली."

पण त्याला हें कळेना कीं भाग्य पालटलें आहे म्हणजे काय ? त्यानें त्या ज्योतिष्याला विचारलें.

"तूं काय वाटेल तें कर. तुला कोणी आडवा येणार नाहीं. कोणाचें तोंड फोड,



कंबर मोड, नाहींतर शेंडी धरून ओढ, तुझें कांहीं नुकसान होणार नाहीं. लाभच होईल. एवढेंच कशाला, तुझ्या पायाजवळ भरलेली घागर आली व तूं लाथेनें दूर फेंकलीस तरी तुला फायदाच होईल. पोपटानें वर्तलेलें भविष्य खोटें ठरणार नाहीं."

त्या सर्व गोष्टी दगडूच्या डोक्यांत जशाच्या तशाच उतरल्या. तो पुढें निघाला. त्याला समोर एक तलाव दिसला. तो तलावाच्या काठीं जाऊन उभा राहला. त्याला समोर एक म्हातारा कण्हत असलेला व त्याच्या जवळ त्याचा तरुण मुलगा उभा असलेला दिसला. दगडूनें मागचापुढचा कांहीं एक विचार केला नाहीं व त्या म्हाताऱ्याच्या तोंडावर जोरानें एक बुक्का मारला. म्हाताऱ्याचे दोन दांत पडले व तोंड रक्तबंबाळ झालें. तें पाहून मुलाला इतका राग आला कीं दगडूला बडवून काढण्यासाठीं तो बाह्या वर करूं लागला. परंतु म्हातारा ओरडला—"अरे, थांब! तो कोणीतरी देव पुरुष आहे. माझे दोन दांत दुखत होते. त्यानें ते पाडले व पहा आतां मला कसें बरें वाटतें आहे तें."

मुलगा चकित होऊन बापाकडे व दगडूकडे पाहूं लागला. बाप त्याला म्हणाला—"याच्या रूपानें मला देव पावला बघ. हे घे बाबा!" असें म्हणून त्यानें दगडूला दोन रुपये काढून दिले.

दगडूचा पोपटवाल्याच्या ज्योतिषावर पूर्ण विश्वास बसला. तो पुढें निघाला. थोड्यावेळानें त्याला समोर एक मनुष्य कंबर धरून ओणवा उभा असलेला दिसला. त्याचें तोंड बाजूला वळलें होतें. मान लचकली होती कीं आणखी कांहीं झालें होतें, नकळे. दगडूनें पाठीमागून धांवत जाऊन त्या बिचाऱ्याच्या कंबरेवर जोरानें लाथ मारली. तो 'ओय' 'ओय' करून मोठ्यानें किंचाळला व "कोण रे दुष्टा तूं?" असें म्हणत मागें वळून पाहूं लागला. त्याची उग्र मुद्रा पाहून दगडूची वाचाच बसली. तरी तो म्हणाला—"भाग्य पालटलें म्हणतात, याला।" आश्चर्य म्हणजे त्या गृहस्थाच्या तोंडावरचा राग पार उतरल्यासारखा दिसला. त्याची मान सरळ झालेली होती. म्हणाला—"कोण रे बाबा तूं? देवानेंच पाठविलें तुला. या कंबरेचें दुखणें म्हणजे यमयातनेहून भयंकर होतें बघ. एका क्षणार्धांत माझें दुखणें बरें केलेंस. केलेल्या उपकाराची अल्प फेड म्हणून हे दहा रुपये तूं ठेवून घे." असें सांगून त्यानें दहा रुपये काढून दिले

आतां मात्र दगडूचा पूर्ण विश्वास बसला त्या ज्योतिष्यावर. तो दुप्पट उत्साहानें पुढें निघाला. एका घरीं लग्नाची तयारी त्याला दिसली. मांडवांत वाजंत्री वाजत होतीं. सनई वाजवणाऱ्याची लांब शेंडी हालत होती. ती पाहून दगडूनें झटकन ती धरली व त्या सनईवाल्याला धरून बाहेर ओढूं लागला. ढोल, तासे, झांज वाजणारे होतेच. ते सनई वाजवणाऱ्या रक्षणासाठीं





दगडूवर धांवले. त्याच क्षणीं ते बसले होते तो मांडव खालीं कोसळला.

धांवा धांव सुरू झाली. घडलेली गोष्ट ऐकून सर्व दगडूकडे पाहून म्हणूं लागले, "कोणी तरी महात्मा असावा हा. मांडव कोसळण्याच्या आधीं सर्व बाहेर पडले म्हणून वांचले." लग्न घरच्या लोकांनीं दगडूला वीस रुपये दिले लग्न आणि संपेपर्यंत रहावें अशी विनंति केली.

लग्नाच्या वेळीं 'नागवली' म्हणून एक संस्कार असतो. त्या संस्कारासाठीं सरबत तयार करून चांदीच्या घागरी मांडवांत आणून ठेवण्यांत आल्या होत्या. घागरीला लाथ मार असें ज्योतिष्यानें सांगितलें होतें. ती गोष्ट दगडूला आठवली. त्यानें उठून एका चांदीच्या घागरीला लाथ मारली. घागर गणगळत गेली व मांडवभर सरबताचें पाणी पसरलें. लोकांना दगडूचा भयंकर राग आला. कांहीं तरुण मंडळी म्हणाली– "अहो, पाहतां काय? धक्के मारून बाहेर काढा लेकाला!"

"अहो भाग्य पालटलें आहे. विसरूं नका!" असें दगडू मोठ्यानें ओरडला.

इतक्यांत एक जण ओरडला–"अहो! सांप आहे, सांप!" त्यानें घागर सारखी करण्याचा प्रयत्न करीत असतां घागरींतला सांप पाहिला तो मेलेला होता. सरबतांत कसा पडला, देव जाणें.

सर्व चकित होऊन दगडूकडे पाहूं लागले. तो आला नसता तर आज लग्न घरच्या सर्वांना मरण आलें असतें. लहान थोर सर्वांनीं दगडूला नमस्कार केला. वरपक्ष व वधूपक्ष दोन्ही घरच्या लोकांनीं दगडूला धोतर जोडी व उपरणें देऊन वर सुवर्ण दक्षिणा दिली. नंतर त्याच्या बायकोसाठीं देवी पार्वतीला म्हणून एक पैठणी दिली व दगडू 'नको नको' म्हणून सांगत असूनहि त्याला मेण्यांत बसवून निरोप दिला.

नवरा एकाचा राजासारखा घरीं परत येत असलेला पाहून दगडूच्या बायकोला आश्चर्य वाटलें. तिच्यासाठीं नवऱ्यानें आणलेली पैठणी, जरी कांठीं लुगडीं व सोन्याच्या पुतळ्या पाहून तिनें चकित होऊन नवऱ्याला विचारलें–"काय हो हें सर्व तुम्हांला कोठें व कसें काय मिळालें?"

दगडूनें घडलेला सर्व वृत्तांत सांगितला व म्हणाला–"त्या लग्न घरच्या लोकांनीं मेण्यांत बसवून घरीं बळजबरीनें पाठविलें म्हणून मी आलों. नाहींतर माझी या घरीं यायची मुळींच इच्छा नव्हती. कारण मी आणखी किती तोंडें फोडलीं असतीं, कितीकांच्या कंबरा मोडल्या असत्या, कितीकांना त्यांच्या शेंड्या धरून ओढलें असतें व कित्येक भरलेल्या घागरी लाथ मारून उलटून टाकल्या असत्या."

नवऱ्याचें भाग्य पालटलें असलें तरी अकलेंत कांहीं विशेष फरक पडला नाहीं, एवढें त्याच्या बायकोला कळलें. म्हणाली– "घरीं स्वस्थ पडून राहलांत म्हणजे पुरे!"



परंतु दगडूचा पोपटवाल्याच्या ज्योतिषावरचा विश्वास तिळमात्र कमी झाला नाहीं. म्हणून तो बायकोला सांगितल्याशिवाय घराबाहेर पडला. काळोख पडूं लागण्याच्या सुमारास एका गांवीं येऊन पोंचला. तो ज्या धर्मशाळेंत उतरला होता त्या धर्मशाळेंत एका साधूचें प्रवचन चालू होतें. खूप गर्दी होती. दगडूनें मूठ पिळवटून साधूच्या तोंडांत एक मुक्का मारला. सर्व तोंड रक्तबंबाळ झालें. लोकांनीं दगडूला धरून खूप बडवलें. त्याची चांमडी लोळूं लागली तेव्हां कोठें त्यांच्या मनाचें समाधान झालें. "भाग्य पालटलें आहे हो!" असें दगडू कितीदां ओरडला तरी त्यांचे मारणें थांबलें नाहीं.

"अहो तो कोणी वेडा दिसतो आहे. त्याला कशाला मारतां? सोडा बिचाऱ्याला." असे साधू आपल्या भक्तांना सांगूं लागला. नाहितर दगडूला वांचविलें नसतें तर त्या दिवशीं त्याला इहलोकाची यात्रा संपवून परलोकीं प्रयाण करावें लागलें असतें.

ज्योतिष्यावर त्याचा होता नव्हता तो सर्व विश्वास उडाला व दगडू रडत कुथत कसाबसा घरीं परत आला. घरीं आल्यावर त्यानें घडलेलें सर्व वृत्त आपल्या बायकोला सांगितलें.

"मी जाऊं नका म्हणून किती सांगितलें. पण तुम्हीं ऐकाल तर ना? भाग्य कसें तरी आपो आप पालटतें कोणी सांगून पालटतें का? नशिबीं आलें त्यावर समाधान मानून रहावें लागतें." बायकोनें दगडूला सदुपदेश केला. तेव्हांपासून दगडू त्याची बायको सांगेल तसेंच वागूं लागला पुढें दोघे सुखी झालीं.





# समुद्राणीचे गुलाम

[ २ ]

दुसऱ्या दिवशीं राजकुमार वनराणीकडे जायला निघाला तेव्हां त्याची प्रेमिका आली. तो तिला आनंदानें त्यांच्या लग्नाची शुभवार्ता सांगण्यासाठीं उत्सुक होता. म्हणाला—"आपल्या लग्नाला समुद्राणीनें परवानगी दिली आहे व त्यासाठीं आवश्यक त्या सर्व वस्तु वनराणीकडून आणायला सांगितल्या आहेत."

"म्हणूनच घाईघाईनें तुला सावध करून ठेवण्यासाठीं मी धांवत इकडे आलें आहें. ती वनराणी या समुद्राणीच्या चौपट दुष्ट आहे. तिच्या हातांतून तूं जिवंत परत आलास म्हणजे स्वतःला भाग्यशाली समज. मी सांगतें तें सर्व लक्षपूर्वक ऐकून घे. मी सांगितलेल्या गोष्टीपैकीं कोणतीहि गोष्ट विसरलास तर आपली परस्परांची ही शेवटचीच भेट हें विसरूं नकोस. मी तुला दोन चाकू, दोन कुऱ्हाडी आणि दोन पाव रोट्या देतें. वनराणीकडे जाण्याच्या वाटेवर त्या वस्तूंची गरज असलेले जे कोणी तुला भेटतील त्यांना तूं त्या वस्तू देऊन टाक. वनराणीकडे पोंचल्यावर तूं काय काय गोष्टी लक्षांत ठेवायला हव्या त्या पण सांगून ठेवतें. ही उशी देतें आहें, ती वनराणीनें पाठलेल्या सांपाला दे. तो सांप वनराणीच्या घरांत ओसरींत जमिनीवर वेटोळें करून पडून असतो. त्याच ओसरींत निरनिराळ्या रंगाच्या खुर्च्या तुला दिसतील. त्या सर्व धोक्याच्या खुर्च्या आहेत. तांबड्या खुर्चीवर बसलास तर एकदम मी जळूं लागेल व क्षणार्धांत





तुझ्या सर्व अगाची राखरांगोळी होऊन जाईल. पांढऱ्या खुर्चीवर बसलास तर एकदम पाण्याचा लोंढा येऊन तूं त्यांत बुडून जाशील. निळ्या खुर्चीवर बसलास तर तुझ्या सर्व रक्तवाहिन्या फुगून जातील व तुला तत्काल मरण येईल. पिवळ्या खुर्चीवर बसलास तर एकदम पित्त वाढेल व तूं मरून जाशील. त्याच ओसरींत एका कोपऱ्यांत एक काळी खुर्ची ठेवलेली आहे. त्या खुर्चीवर तूं बसायला हरकत नाहीं. आणखी एक गोष्ट सांगून ठेवतें. वनराणीनें कांहीं जरी खायला दिलें तर तूं चुकून देखील तें खाऊं नकोस. मी सांगितलेल्या सर्व गोष्टी नीट लक्षांत ठेव." त्याची प्रेमिका म्हणाली.

"तूं सांगितलेल्या सर्व गोष्टी लक्षांत राहाणें कठीण आहे. पण प्रयत्न करीन." असें सांगून राजकुमार वनराणीकडे निघाला. तो समुद्राच्या काठाकाठानें कांहीं अंतर चालून पुढें एका जंगलांत निघाला. जंगलांत त्याला दोघे जण मोडक्या चाकूनें लाकूड तासींत बसलेले भेटले. त्यांना त्यानें ते चाकू चांगले उपयोगी पडतील असा विचार करून प्रत्येकाला एकेक चाकू राजकुमारीनें सांगितल्याप्रमाणें देऊन टाकला. चाकू मिळाला म्हणून त्यांना पण परमानंद वाटला.

आणखी पुढें गेल्यावर त्याला दोघे जण एक मोठें झाड तोडण्याच्या प्रयत्नांत दिसले. त्यांना कुऱ्हाडीचा उपयोग होईल असा विचार करून त्यानें त्या दोन्ही कुऱ्हाडी त्यांना देऊन टाकल्या. त्यांच्या बोथट कुऱ्हाडींपेक्षां राजकुमारानें दिलेल्या कुऱ्हाडींनीं झाड चांगलें कांपलें जात असल्याचें पाहून त्यांना आनंद झाला.

आणखी थोडें पुढें गेल्यावर एक लांडगा व अस्वल त्याच्या अंगावर धांवून आलें. त्यानें एका रोटीचे दोन तुकडे करून एकेक प्रत्येकासमोर टाकला. तोंडांत तुकडे धरून लांडगा व अस्वल परतले व आपापल्या जागेवर जाऊन खात बसले. त्यानंतर तो वनराणीच्या घरांत निर्भयपणें शिरला.

आंत एका सिंहासनावर वनराणी बसलेली होती. त्याला येण्याचें कारण विचारून घेऊन ती म्हणाली—"म्हणजे माझ्या धाकट्या बहिणीनें तुला पाठविलें आहे तर? दुरून आला आहेस, बस घटकाभर आरामानें." असें सांगून तिनें त्या रंगीत खुर्च्यांकडे बोट दाखविलें. तो त्यापैकीं एकाहि खुर्चीवर बसला नाहीं व कोपऱ्यांत ठेवलेल्या काळ्या खुर्चीवर जाऊन बसला.

तें पाहून वनराणीचें तोंड उतरलें. तरी स्वतःला सावरून ती म्हणाली—"तुला खायला थोडें आणून देतें. खाऊन पाणी पी." असें सांगून ती आंत गेली. मध्यें थोडा वेळ मिळाला तेवढ्यांत तो सांप वेटोळें करून कोठें बसला आहे हें पाहून तो त्याच्याजवळ गेला. सांप आपला फण वर करून फूत्कार सोडूं लागला. राजकुमारानें सांपापुढें उशी ठेवून दिली. लगेच सांप उशीवर डोकें टेकून झोंपी गेला.



तेवढ्यांत वनराणी एका ताटलींत लाडू घेऊन आली व तो त्याच्यासमोर ठेवीत म्हणाली—"खा सावकाश! तुझें खाऊन होईपर्यंत तुझ्याबरोबर जें कांहीं पाठवायचें आहे तें तयार करतें." असें सांगून निघाली. जातां जातां म्हणाली—"नागा, ए नागा! या पाहुण्यांची काळजी घे बरं का?"

ती आंत गेल्यावर राजकुमारानें लाडू उचलून खिशांत ठेवून दिला. कांहीं वेळानें वनराणी परतली. एका गाठोड्यांत लग्नाला आवश्यक त्या सर्व वस्तू ती घेऊन आली होती. आल्याबरोबर सांपाला



हाक मारून तिनें विचारलें—“ नागा ! पाहुण्यांना कोणत्याहि प्रकारचा त्रास झाला नाहीं ना ? ”

पण सापानें उत्तर दिलें नाहीं. तो उशीवर डोकें टेंकून झोंपलेला होता. तें पाहून तिला वाईट वाटलें. परंतु ताटली रिकामी पाहून तिचा चेहरा थोडासा खुलला.

म्हणाली—“ लाडू आवडला का ? हें पहा, तुझ्या लग्नाला लागणारें समान ! ये वरें का आतां ! ” असें सांगून तिनें त्याला निरोप दिला.

त्यानें घराबाहेर पाऊल टाकलें असेल नसेल, घराच्या आवारांत आल्याबरोबर त्याच्या खिशांतला लाडू फुगूं लागला व फुगतां फुगतां भोपळ्या एवढा झाला. तो खाल्ला असता तर आपली गत काय झाली असती याची कल्पना करूनच त्याच्या अंगावर शहारे उभे राहाले.

तेव्हां कोठें वनराणीला हा गडी हातांतला निसटला या गोष्टीची खात्री झाली असावी. म्हणून ती ओरडून म्हणाली—“ ए लांडग्या, ए अस्वला ! पकडा त्याला ! ”

लांडगा व अस्वल त्याला खायला त्याच्या अंगावर धांवले. त्यानें त्याच्याजवळ जी दुसरी रोटी होती. तिचे दोन तुकडे करून दोघांच्या समोर टाकले. दोघे ते तुकडे तोंडांत धरून आपल्या जागीं जाऊन बसले व खाऊं लागले. राजकुमार पुढें निघून गेला.

वनराणी पुन्हां ओरडली—“ ए लाकूड-तोड्यांनो ! झोंपलांत काय ? ”

लाकूडतोड्यांनीं डोकें वर करून पाहिलें व त्यांना कुऱ्हाडी देणाऱ्याला ओळखून त्यांनीं त्याला पुढें जाऊं दिलें.

वनराणीनें आणखी एकदां ओरडून पाहिलें. ज्यांना त्यानें चाकू दिले होते त्यांनी चाकू देणाऱ्याला ओळखून त्याला पुढें जाऊं दिलें.

तो आपल्या मोठ्या बहिणीकडे जाऊन देखील सुखरूप परत आलेला पाहून समुद्र-राणीला आश्चर्य वाटलें. म्हणाली—“ आलास सुखरूप परत ! खरंच किती हुशार आहेस रे तूं ! ”

राजकुमार तिच्या त्या बोलण्यावर फुलून गेला. परंतु राजकुमारी रात्रीं त्याला येऊन भेटली व म्हणाली—“ ही राणी म्हणजे सामान्य नव्हे, कैदाशीण आहे कैदाशीण ! आपण रात्रीं नाहींसे झालो नाहीं तर दोघं प्राणाला मुकूं. तूं तबेल्यांत जाऊन एका घोड्यावर सोन्याचें खोगीर आणि एका घोडीवर चांदीचे खोगीर घालून तयार ठेव. रात्रीं समुद्रराणी झोंपल्यावर आपण पळून जाऊं. जो थोडा वेळ आहे तेवढ्यांत एक दोन कामें उरकून घ्यावी लागतील मला.” राजकुमारी म्हणाली.

ती आपल्या झोंपायच्या खोलींत गेली. राणीच्या शयनगृहाशेजारींच होती ती. राजकुमारी राणीची मुख्य दासी होती. म्हणून तिला मुद्दामजवळ खोली दिली होती. आपल्या खोलींत जाऊन तिनें-





एका फडक्याच्या तीन चिंध्या केल्या व प्रत्येकाला गांठी मारून एक राणीच्या पलंगाजवळ, एक खोलीच्या मध्यें व एक दारांत ठेवून दिली आणि म्हणाली— "राणीनें हाक मारली तर माझ्याऐवजीं तुम्ही उत्तर द्या."

नंतर राजकुमार घोड्यावर व राजकुमारी घोडीवर बसले व आपापल्या घोड्यांना टांच दिली. घोडे वायुवेगानें धावूं लागले.

एक प्रहर रात्र गेल्यावर राणीनें हाक मारून विचारलें—"मुली! झोपली आहेस का ग?"

"नाहीं बाईसाहेब! अंथरूण गुंडाळते आहें." एक गांठ म्हणाली. राणी दुसऱ्या कुशीवर वळून पुन्हां झोंपली. तासाभरानें तिची झोंप मोडली तेव्हां तिनें विचारलें— "मुली! काय करते आहेस ग?"

"केर काढतें आहे बाईसाहेब!" दुसरी गांठ म्हणाली.

तासाभरानें राणीनें पुन्हां झोंप मोडल्यावर विचारलें—"झाला का केर काढून?"

"केव्हांच झाला! चूल पेटवायला जातें आहें." तिसरी गांठ म्हणाली.

आणखी तासाभरानें राणीनें विचारलें— "चूल पेटली का ग चांगली?"

पण उत्तर आलें नाहीं.

राणीला संशय आला. उठून राजकुमारीच्या खोलींत जाऊन पाहिलें. तिला गांठी दिसल्या. "अगोबाई! माझ्याकडून शिकलेल्या मंत्रविद्येचा माझ्यावर प्रयोग? त्या राजकुमाराशीं तिचें लग्न मी होऊं देणार नाहीं." असें पुटपुटत ती तबेल्यांत गेली. तिला वाटत होतें तेंच झालें. दोन उत्तम घोड्यांची जोडी नाहींशी झालेली दिसली.

लगेच घोड्यांचें दाणापाणी करणाऱ्या मुलाला बोलावून म्हणाली—"माझ्या एडक्या-



वर बसून जा आणि वाटेंत तुला जो कोणी प्राणी वा मनुष्य दिसेल त्याला धरून घेऊन ये." राणीचा एडका वायुवेगानें धांवत असे. मुलगा त्यावर बसून निघाला.

तोंपर्यंत राजकुमार व राजकुमारी पुष्कळ दूर निघून गेले होते. परंतु अजून पुष्कळ दूर त्यांना जावयाचें होतें. राजकुमारी राजकुमाराला म्हणाली—"तो आवाज ऐकला का, राणीच्या एडक्याचें ओरडणें?" तिनें घोड्यांना मंत्र टाकून दोन झुडपें करून टाकलें व स्वतःला व राजकुमाराला उंदीर करून घेतलें. नोकर जवळ आला व दोन उंदीर पाहून—"उंदीरच वाटतें. कशाला हे?" असें म्हणत परतला व राणीला जाऊन म्हणाला—"राणीसरकार! अहो दोन झुडपें व दोन उंदीर दिसले. त्यांना धरून घेऊन येऊं का?"

"मूर्खा! हें विचारायला का तूं येथवर आलास? दिसेल त्या प्राण्याला घेऊन ये!" राणी म्हणाली.

तो येऊन पोंचला तोंपर्यंत राजकुमारीनें आपल्या दोन्ही घोड्यांना दोन झाडें करून दोघांना दोन चिमण्या करून घेतलें. नोकरानें दोन चिमण्या पाहिल्या आणि परत जाऊन म्हणाला—"या खेपेस उंदीर नाहीं, पण चिमण्या दिसल्या. धरून घेऊन येऊं का?" याच्या हातून होणारें काम नाहीं हें, असा विचार करून राणी स्वतः निघाली. परंतु ती जवळ येण्यापूर्वीच दोघें दूर जमिनीवर पोंचली होतीं. म्हणून तिला हताश होऊन परतावें लागलें. राजकुमार आपल्या घरीं गेला. त्यानें आपल्या प्रेमिकेची ओळख आईवडिलांना करून दिली. राजानें त्या दोघांचें थाटामाटानें लग्न करून दिलें.



     





# चाणाक्ष हेर

एकदां चंपापुरीचा राजा व नीलगिरीचा राजा यांचें परस्परांशीं कांहीं कारणानें वैर वाढत गेलें आणि शेवटीं युद्धापर्यंत मजल येऊन पोंचली. चंपापुरीच्या राजाला नीलगिरीचा राजा युद्धाची तयारी करीत असल्याचें त्याच्या हेरांनीं सांगितलें. तेव्हां पासून शत्रूच्या हेरांना आपल्या राज्यांत प्रवेश मिळूं नये व शत्रूकडची इत्थंभूत बातमी आपल्याला मिळत रहावी यासाठीं त्यानें कांहीं हेर नेमले.

एक हेर मजुराचा वेष करून निघाला. तो राजधानींतल्या मुख्य रस्त्यावरून चालत नगराबाहेर दूर निघून गेला. थोड्या वेळानें त्याची वहाण तुटली. आतां काय करावें या विचारांत तो पडला असतां सुदैवानें त्याला एका झाडाखालीं एक चांभार बसलेला दिसला. हेरानें आपली तुटलेली वहाण त्याला देत म्हटलें—"लवकर शिवून दे."

चांभार वहाण शिवूं लागला तेव्हां वाटेनें जाणारा एक जण चांभाराला पाहून थांबला व विचारूं लागला—"काय काका ? कांट्यांना कुंपण घालतां आहां वाटतें ? पायांना मोक्ष मिळाल्याचें कांहीं कळलें का ?"

"कां कळलें नाहीं ? तीन प्रहर होऊन गेले, दोन पायांनीं तिघेजण सूर्य शोषण करतो तें शोषण करून मेले. तीन वर्षां पूर्वीं मेलेल्याच्या मदतीनें तिघांना जाळून टाकलें." खदखदां हंसत चांभार म्हणाला.

"म्हणजे बळ आहे पुरेसें म्हणतोस ?" वाटेनें जाणाऱ्यानें विचारलें.

"खुळ्या ! उद्यां येणाऱ्या पायां-साठीं समुद्राचीं मुलें वाट पहात आहेत. भूमीचें पोट भरेल, म्हणा !" चांभार म्हणाला.

वाटेनें जाणारा मनुष्य पुढें जाऊं लागलेला पाहून हेरानें आपली तलवार उपसून त्याला अडविलें व त्याला दोरीनें बांधून टाकले.

चांभार मधें पडून त्याला सोडून द्यायला सांगू लागला—"अहो वेडा आहे तो ! त्याला कशाला पकडतां ?"

तत्क्षण हेरानें त्या चांभाराचे पण हात पाठी मागून बांधून टाकले व दोघांना नेऊन दरबारांत हजर करून म्हणाला—"हे दोघे शत्रूचे वस्ताद हेर आहेत. दोघांची चवकशी करून दोघांना योग्य ती शिक्षा करावी."

पण चांभारानें किंवा त्याच्याशीं बोलणारा तो मनुष्य दोघांपैकीं एकानेंदेखील शत्रूचे हेर असल्याचें कबूल केलें नाहीं. म्हणाले—"आम्ही दोघे थट्टेत कांहीं तरी बोलत होतों व उगीच आमच्यावर संशय करून आम्हां दोघांना धरून आपल्या समोर हजर केलें आहे." "बरें पण तुम्ही थट्टेथट्टेंतच काय बोललांत हें सांगाल कीं नाहीं ?" मंत्र्यानें त्यांना विचारलें. तेव्हां दोघांनीं, निरर्थक कांहीं तरी बोललों असल्याचें व तें आतां आठवत पण नसल्याचें सांगितलें.



तेव्हां मंत्र्यानें आपल्या हेराला विचारलें. त्यानें एक अक्षरदेखील न चुकतां सर्व जसेंच्या तसें सांगितलें. तें ऐकून चकित होऊन मंत्री राजाला म्हणाला—"महाराज ! आपला हेर खरोखरच फार चाणाक्ष आहे. त्याच्या चाणाक्षपणामुळें देशावरचें एक मोठें संकट टळलें. त्याला बक्षिस द्यावें व शत्रूच्या दोघां हेरांचा शिरच्छेद करावा."

"परंतु त्यांच्या संभाषणावरून राज्यावर कोणतें संकट येणार होतें हें नाहीं कळलें मला !" राजा म्हणाला.

"याहून मोठा धोका आणखी काय असणार महाराज ! उद्यां आपलें सैन्य जाणार आहे त्या वाटेवरच्या तलावांत यांनीं विष टाकलें आहे. त्या तलावाचें पाणी पिऊन एक गरोदर स्त्री व तिचा मुलगा मेले. उद्यां आपले सैनिकदेखील तें पाणी पिऊन मरतील असा या दोघांच्या बोलण्याचा अर्थ आहे." मंत्री म्हणाला.

"पण हें सर्व तुम्हांला कसें काय कळलें !" राजानें विचारलें.

"स्पष्ट नाहीं का सर्व ! कांठ्यांना कुंपण घालणें म्हणजे वहाण शिवणें. वहाणांना खिळे होतेच. बाजूला शिवण घालणें म्हणजे कुंपण. त्या सांकेतिक भाषणावरून दुसऱ्यानें चांभाराला तो त्याचाच एक साथी म्हणून ओळखलें. पायांना मोक्ष मिळाला म्हणजे मरण. कोणी मेला का, असा शत्रूच्या हेराचा चांभाराला प्रश्न होता. दोन पायांवर तिथे आले म्हणजे एक गरोदर स्त्री एका मुलाला कडेवर घेऊन आली व सूर्य शोषण करतो तें म्हणजे पाणी, तें शोषण करून तिथे मिळे, असें चांभारानें सुचविलें. तीन वर्षांपूर्वी मेलेल्या झाडाचीं लाकडें तोडून त्यांचा दहन संस्कारदेखील आटोपला. बळ पुरेल का, याचें उत्तर पाण्यांतलें विष सर्व सैन्याचें प्राण हरण करायला पुरेल का ? उद्यां येणाऱ्या पायांची, म्हणजे पायदळ सैन्याची, समुद्राचीं मुलें म्हणजे तलाव व इतर जलकुंड वाट पहात आहेत. अधिक लोक मेलेच तर त्यांना पुरून टाकल्यावर भूमीचें पोट भरणार नाहीं का ?" असा अर्थ मंत्र्यानें स्पष्ट करून सांगितला.

राजानें शत्रूच्या दोघां हेरांचा शिरच्छेद करण्यास हुकूम दिला व त्यांना धरून आणणाऱ्या आपल्या हेराला मोठें बक्षिस देऊन मोठ्या हुद्यावर त्याची नेमणूक केली.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या गांवीं रहात असे तेथून सुमारें चार पांच कोसावरच्या गांवीं राजाराम नांवाचा एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्याच्याकडे अलोट पैसा होता. पण एक पैसा काढून द्यायचा म्हणजे त्याच्या जिवावर येत असे. त्याला हृदय विकार झाला. जिवावरचें दुखणें. वेळेवर औषध पाणी झालें नाहीं तर काय होईल कोणास ठाऊक ? पण पैसा खर्च होणार म्हणून, हा आजार पण हळूहळू कमी होईल असा विचार करून राजारामानें तिकडे दुर्लक्ष केलें. दुखणें कमी होई व पुन्हां वाढे. कमी झालें कीं सुटलो आतां असें राजारामाला वाटे. पण तें पुन्हां वाढे. तेव्हां राजारामाला वाटे 'हा आजार शनीसारखा पाठीस लागला आहे माझ्या !'

राजारामाच्या घरीं विठू नांवांचा एक नोकर होता. म्हणजे पगार ठरवून ठेवलेला नोकर नव्हे. त्यानें राजारामाकडून कांहीं कर्ज घेतलें होतें. तें कर्ज फेडूं शकला नाहीं तेव्हां काम करून फिटेल म्हणून नोकरी करीत होता. त्याला बोलावून राजारामानें विचारलें—"कायरे हृदयविकाराची चिकित्सा करणारा कोणी वैद्य आहे का तुला माहीत !"

"आमच्या गांवांत एक हृदयविकारनें आजारी पडलेला मनुष्य आहे. त्याचें औषधपाणी करणारा एक वैद्य आहे. त्याचाकडे जाऊन चवकशी करतो. तो भस्म वगैरे देऊन रोग बरा करतो म्हणे." विठू म्हणाला.

"तें सर्व कशाला ? त्या आजाऱ्याकडेच जा व दोन आण्याचें किंवा चार आण्याचें



"औषध मागून घेऊन ये म्हणजे झालें." राजारामानें सूचना केली.

विठूकडे कर्जाची रक्कम अजून होती म्हणून राजारामानें त्याच्या हातांत पैसे दिले नाहींत. विठूनें आपल्या गांवच्या आजाऱ्याचे पाय धरून थोडें औषध मागून घेतलें व राजारामाला आणून दिलें. तो त्यांतलें रोज थोडें थोडें घेऊं लागला. पण दुखणें कमी झालें नाहीं व औषध संपलें. म्हणून त्यानें विठूला पुन्हां थोडें औषध घेऊन यायला सांगितलें. पण विठू म्हणाला—"धनी, आतां त्यांच्याकडे तें औषध नाहीं. हृदयविकार बरा झाला त्याचा, म्हणून औषध बंद केलें त्यानें."

"बरें तर तो वैद्य कोठें राहतो व औषध कसें देतो, जाऊन चवकशी करून ये." राजाराम म्हणाला. विठूनें दुसऱ्या दिवशीं येऊन चवकशी करून कळलें तें सांगितलें. त्या वैद्याचें घर चार मैलावर होतें. गरिबांकडून एका आठवड्याला लागणाऱ्या औषधासाठीं चार आणे घेतो. इतरांकडून एक रुपया घेतो.

तें ऐकून राजारामाला फार वाईट वाटलें. दर आठवड्याला एक रुपया काढून द्यायचा म्हणजे किती खर्च! पण जिवावरचें दुखणें. तीन दिवस मनांतल्या मनांत ऊहापोह करून त्यानें कांहीं तरी मनांत ठरविलें.

एक दिवशीं दुपारीं विठूला बोलावून म्हणाला—"हें पहा, मी बाहेर जातों आहे एका अगत्याच्या कामासाठीं. तूं घरीं रहा, कोठें जाऊं नकोस मी परत येई पर्यंत." असें सांगून तो सरळ विठूच्या गांवीं विठूच्या झोंपडीतच गेला. घरांत विठूची दोन मुलें होतीं. त्यानें त्यांना विचारलें—"तुमची आई कोठें गेली रे?" "गवत कापून घेऊन यायला गेली आहे!" मुलें म्हणालीं.





विठूच्या मोठ्या मुलाचें वय असेल बाराचें. त्याच्या हातांत चार आणे देऊन राजाराम म्हणाला—"भस्म वैद्याचें घर माहीत आहे का रे तुला? त्याच्याकडे जाऊन तुझ्या बाबांना छातींत दुखतें आहे असें सांगून एका आठवड्यापुरेसें औषध मागून घेऊन ये. वैद्याला काय सांगशील?"

"आमच्या बाबांच्या छातींत दुखतें आहे. एका आठवड्यापुरेसें औषध द्या म्हणून सांगतों." विठूचा मुलगा म्हणाला.

"फार दुखतें आहे म्हणून सांग, बरं का? तूं येईपर्यंत मी येथेंच वाट पाहातों." स्वस्तांत औषध मिळेल या आशेनें त्यानें ही युक्ति केली होती.

मुलगा धांवत शेतामधून वैद्याकडे जात असतां त्याच्या आईनें त्याला पाहिलें व विचारलें—"कोठें रे चाललास?"

"बाबांच्या छातींत फार फार दुखतें आहे म्हणें, राजाराम भाऊंनी आपल्या घरीं येऊन मला हे चार आणे दिले व लवकर औषध घेऊन ये म्हणून मला पाठविलें आहे." मुलानें ऐकलें होतें तें जसेंच्या तसें सांगितलें.

विठूची बायको घाबरून गेली. म्हणाली—"आपलें भाग्यच फुटलें कीं रे मग! ते पैसे माझ्याकडे दे. तूं काय आणतोस औषध? मीच घेऊन येतें औषध." असें सांगून तिनें मुलाकडून पैसे मागून घेतले व वैद्याच्या घरीं जाऊन वैद्याला म्हणाली—"वैद्यबुवा! गरिबाचें भाग्यच फुटलें बघा! मुलांच्या बाबांना छातींत दुखतें आहे हो. हे चार आणे घेऊन औषध द्या व गरिबावर दया करा!"

वैद्यानें तिला म्हटलें—"हें पहा, रोग्याला पाहिल्याशिवाय औषध कसें देऊं बाई?"

"पांच मैल दूर राजारामभाऊंच्या घरीं काम करतात ते. इतके दूर कशी आणूं



त्यांना ? दया करून औषध द्यावें !" पाय धरून विनंती केली तिनें.

"राजारामभाऊ म्हणजे प्रसिद्ध श्रीमंत गृहस्थ आहेत. त्यांच्या घरांत काम करणाऱ्याचें त्यांनीच औषध पाणी केलें पाहिजे. म्हणजे मी एक रुपया तरी एका आठवड्याच्या औषधासाठीं घेणार." वैद्य म्हणाला.

तिचा नवरा नौकरीला असला तरी त्याला पगार नसून कर्जाची फेड करण्यासाठीं तो काम करीत आहे असें सांगून तिनें रोग्याला बघायला येण्याचा कष्ट करावा अशी विनंति केली.

वैद्य म्हणाला—"हें पहा, माझ्याकडे कित्येक लोक येतात. मी कसा येऊं ? हे गृहस्थ आपली गाडी घेऊन मला नेण्यासाठीं आले आहेत." वैद्याला नेण्यासाठीं आलेले गृहस्थ म्हणजे गोपाळ सर्व ऐकतच होता. म्हणाला—"बाई ! चल माझ्या गाडींत घेऊन येऊं तुझ्या नवऱ्याला."

गोपाळ विठूच्या बायकोबरोबर राजारामाच्या घरीं गाडी घेऊन आला. विठू तेथेंच होता. बायकोला गाडींत बसून आलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें. नवऱ्याची तब्येत छान असलेली पाहून तिनें विचारलें—"प्रकृति बरी झाली वाटतें ?"

"मला काय झालें ?" विठूनें विचारलें.

विठूच्या बायकोनें घडलेलें वृत्त सांगितलें.

"मालकांची तब्येत पण छान आहे. आज उजाडतांच उठून कोठें तरी कामाला म्हणून गेले. वाटेंत मुलगा भेटला असेल, कांहीं तरी काम [illegible] असेल. तें त्याला बरोबर कळलें नसेल." विठू म्हणाला.

नवराबायकोनें गोपाळला उगीच तसदी दिल्याबद्दल त्याच्याजवळ क्षमा मागितली. गोपाळ गाडी घेऊन आपल्या गावीं निघाला. तिकडे विठूच्या घरीं राजाराम मुलाची



वाट पहात बसला होता. मुलगा येतांच त्यानें विचारलें—"कायरे कोठें आहे औषध ? आणि इतका लवकर कसा काय आलास ?"

"माझी आई गेली आहे औषध आणायला." मुलगा म्हणाला.

विठूची बायको अजून कां बरें आली नाहीं ? असा विचार करीत राजाराम बराचवेळ बसला. इकडे छातींत जास्त दुखूं लागलें. शेवटीं वैद्याच्या गांवीं जातों असें मुलाला सांगून तो निघाला. वाटेंत विठूची बायको औषध घेऊन येतांना भेटेल असें वाटलें होतें त्याला.

ती वाटेंत भेटली नाहीं तर त्याला स्वतःच वैद्याकडे जावें लागेल व एक श्रीमंत समजून वैद्य एक रुपया खात्रीनें घेईल ही धास्ती पण मनांत होतीच. त्या भीतीनें त्यानें बोटांतल्या अंगठ्या कनवठीचे पैसे सदऱ्यांत बांधून त्याचें गाठोडें केलें. तें एका हातांत घेतलें व दुसऱ्या हातानें दुखत असलेली छाती धरून चालूं लागला. पण बेशुद्ध होऊन वाटेंतच कोठें तरी पडला.

त्याच वाटेनें गोपाळ गाडी घेऊन येत होता. त्यानें त्याला बेशुद्धावस्थेंत पाहून पाणी शिंपडून शुद्धीवर आणलें. डोळे












उघडतांच म्हणाला—"औषध आणलेंस का बाई!" त्याचा अर्थ गोपाळला काय कळणार? त्यानें राजारामाला गाडींत बसवून गाडी वैद्याच्या घरासमोर जाऊन उभी केली.

वैद्य रोग्याला तपासून म्हणाला—"कोण हा? रोग मुरलेला आहे. रोज तपासून औषध बदलावें लागेल. नाहीं तर जिवाला धोका आहे!"

"कोण आहे कोणाला ठाऊक? मी घेऊन येईन त्याला रोज गाडींतून. जो खर्च होईल मी देईन. गरीब दिसतो आहे कोणी!" गोपाळ म्हणाला.

राजारामाला दुसऱ्या दिवशीं सुद्धां शुद्ध आली नाहीं. शुद्ध आल्यावर त्यानें गोपाळला विचारलें—"मी कोठें आहें? कोण तुम्ही?"

"घाबरूं नकोस? चांगल्या जागींच आहेस? कोण तूं? नांव काय तुझें?" गोपाळनें विचारलें.

"माझें नांव ऐकून काय करणार? आहें एक दुर्दैवी गरीब. माझें गाठोडें कोठें आहे?" त्यानें विचारलें.

गोपाळ म्हणाला—"तुझें गाठोडें आहे सुरक्षित माझ्याजवळ. आठवड्याभरानें बरा झालास म्हणजे तुला मनाला वाटेल तसा जा परत." राजाराम सांगितल्याशिवाय पळून जाईल अशी भीति वाटत असावी.

राजारामाचा शोध तिकडे चालू होता. शेवटीं तो गोपाळच्या घरीं सांपडला. तो चांगला श्रीमंत आहे हें कळल्यावर गोपाळनें त्याला खूप झाडलें—"प्राणापेक्षां तुला पैसा जास्त वाटला होय?"

पण राजाराम आजारांत बेशुद्ध होऊन मी काय बोललों काय केलें हें कळलें देखील नाहीं हो असें सांगून औषधाचा व गोपाळकडे राहण्याचा जो खर्च झाला तो सर्व देऊन आपल्या घरीं परत गेला.





# उत्तरकांड

कार्तवीर्यार्जुनाच्या हातीं पराभव झाल्यानंतर देखील रावणाचा गर्व भंग झाला नाहीं. सर्व जगाला पादाक्रांत करण्याचें ठरवून तो दिग्विजय करीत किष्किंधेला आला.

वालीचा मंत्री तार हा रावणाला म्हणाला—"रावणा! वाली तूर्त किष्किंधेला नाहीं व इतर कोणी तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. वाली संध्येसाठीं समुद्र तीरीं गेला आहे. हा पहा हाडांचा डोंगर, वालीच्या हातीं मरण आलेल्या वीरांच्या त्या अस्थी आहेत. तुलादेखील या डोंगरावर जाऊन पडावयाचें असेल तर थोडा वेळ थांब. वाली परत आल्यावर ती इच्छा पण पुरी होईल. घाई असेल तर दक्षिणेकडे समुद्रतीरावर जा. ती इच्छा जास्त लवकर पुरी होईल."

रावणाला तार वानराचा भयंकर राग आला. म्हणाला—"तुझ्या मालकाचा समाचार घेऊन येतों ती तुझ्या समाचाराला." रावण पुष्पक विमानांत बसून दक्षिणेकडे समुद्र-तीरीं गेला. तेथें मेरुपर्वतासारख्या विशाल आणि वज्रदेही वालीला संध्या करतांना त्यानें पाहिलें.

रावण पुष्पक विमानांतून उतरला. आपण आल्याची चाहूल देखील वालीला लागूं नये या हेतूनें मांजराच्या पावलानें त्याला धरण्यासाठीं जवळ गेला. पण वाली लगेच





मागें वळला आणि रावण जवळ येतांच त्याला बगलेंत धरून आकाशांत उडाला. रावणाला सोडविण्यासाठीं त्याच्या मंत्र्यांनीं पुष्कळ आरडा ओरडा केला. परंतु वालीला अडवून मालकाला सोडविण्याची शक्ति त्यांच्यापैकीं एकांतहि नव्हती.

वालीनें रावणाला पश्चिम किनाऱ्यावर टाकून समुद्र स्नान करून संध्या केली. नंतर उत्तरेकडच्या समुद्रकाठीं स्नान संध्या करून पूर्वेकडच्या समुद्रतीरीं आला. तेथें स्नानसंध्यादिक आटोपून रावणाला बगलेंत धरून किष्किंधेला आला.

किष्किंधेच्या उद्यानांत रावणाला उतरवून त्यानें विचारलें—"रावणा! तूं इतडे कसा काय आलास?"

रावणानें वालीची क्षमा मागितली आणि म्हणाला—"तुझ्यासारखा बलवान व वेगवान या जगांत कोणी दुसरा नाहीं. तूं एकट्यानें मला चारही समुद्रांचें स्नान करविलेंस. मी अग्नीला साक्षी ठेवून तुझ्या मैत्रीची भिक्षा मागत आहें."

त्या प्रमाणें दोघांनीं अग्नीसमक्ष परस्पर मैत्रीची प्रतिज्ञा केली. रावण किष्किंधेला एक महिनाभर राहाला. वालीच्या घरीं रावणाला वालीचा सख्खा भाऊ सुग्रीव याच्यासारखाच आदर मिळाला. त्यानंतर रावणाला त्याचे मंत्री बोलावून घेऊन गेले.



अगस्त्य ऋषी वाली-रावणांच्या मैत्रीची कथा येथवर सांगून म्हणाले—"रामा! तुझ्या एका बाणानें ज्याचा वध झाला तो वाली इतका बलवान होता."

राम म्हणाला—"महर्षि! वाली व रावण दोघे बलवान होते यांत शंका नाहीं. परंतु दोघांहून हनुमान अधिक बलवान आहे. त्यानें शंभर योजनें समुद्र पार करून लंकेंत प्रवेश केला. रावणाच्या अंतःपुरांत शिरला. एकट्यानें सहस्रावधी राक्षसांचा वध केला. एवढेंच नव्हें तर लंकेला आग लावली. त्यानें जीं साहसाचीं कामें केलीं तीं त्रिलोकांत इतर कोणाला साध्य झालीं असतीं असें नाहीं मला वाटत. त्याच्यासारख्या बलवानानें वालीचा वध कां केला नाहीं हें नाहीं मला कळलें. तो असून सुग्रीवाला इतके कष्ट कां सहन करावे लागले?"

अगस्त्य मुनी म्हणाले—"रामा! हनुमानाच्या शक्तीचें तूं जें वर्णन केलें आहेस तें सर्व खरें आहे. त्याच्यासारखा बलवान,



वेगवान व बुद्धिवान दुसरा कोणी नाहीं. त्यानें बालपणींच कित्येक चकित करून सोडणारीं कामें केलीं आहेत. त्याला कदाचित तीं आठवत देखील नसावीं. त्याला एक शाप होता. ती एक विचित्र गोष्ट आहे. ती सांगतों ऐक."

मारुतीचा बाप केसरी मेरुपर्वतावर राज्य करीत असे. केसरीच्या बायकोचें नांव अंजना. तिला वायुदेवाच्या कृपेनें हनुमान हा मुलगा झाला. म्हणूनच त्याला वायुसुत व आंजनेय अशीं नांवें मिळालीं. अंजना आपल्या लहान मुलाला एका जागीं झोपवून



रानांत कंदमुळें आणायला गेली. इकडे आंजनेय जागा झाला व भूक लागली होती म्हणून रडूं लागला. त्याच वेळीं सूर्योदय झाला. त्यालाच एक फळ समजून आंज-नेयानें तें घेण्यासाठीं उड्डाण केलें. सूर्याकडे सूर्यासारख्याच तेजस्वी आंजनेयाला जाऊं लागलेला पाहून देव, दानव व यक्ष चकित झाले. कारण त्याचा वेग तेव्हांच वायू व गरुड यांच्याहून जास्त होता.

वायूनें आपल्या मुलाला सूर्याकडे धाव-तांना पाहिलें व त्याच्या उष्णतेचा त्याला त्रास होऊं नये म्हणून त्यानें त्याच्यावर हिमवृष्टि सुरू केली. यामुळें आंजनेय सूर्या-जवळ पोंचला तरी आंजनेयाला कांहींच त्रास झाला नाहीं.

आंजनेय सूर्याजवळ पोंचत असतां त्याच वेळीं त्याला ग्रसण्यासाठीं राहु त्याच्या रथांत शिरला. राहूला पाहून आंजनेयानें सूर्याला सोडलें व राहूला पकडण्यासाठीं धांवला. राहु घाबरून पळून गेला. तो सरळ इंद्राच्या दरबारांत गेला व म्हणाला—"इंद्रा! हा अन्याय आहे. मी पर्व समयीं सूर्याला गिळण्यासाठीं गेलों असतां तूं दुसऱ्या एका राहूला पाठवून दिलेंस. तो सूर्याबरोबर मला देखील गिळण्याच्या प्रयत्नांत होता."

लगेच इंद्र राहू बरोबर ऐरावतावर बसून सूर्याकडे निघाला. आंजनेय राहू परत येण्याची वाट पहात असावा. राहूला पाहून तो त्याला धरण्यासाठीं धांवला. राहु ओरडला—"पाहि माम्, पाहि माम्!"

इंद्र म्हणाला—"घाबरूं नकोस! मी याला आत्तांच्या आत्तां ठार करतो." इंद्र बोलतच होता, आंजनेयानें पांढऱ्या ऐरावताला पाहिलें व त्याला एक फळ समजून खायला धांवला. इंद्रानें आंजनेयावर हळूच वज्र प्रहार केला. त्या प्रहारानें आंजनेय एका डोंगरावर जाऊन आदळला व त्याच्या डाव्या हनुवटीला जखम झाली.

या गोष्टीचा वायुदेवाला राग आला. त्यानें इंद्राला या गोष्टीचा चांगला धडा मिळावा यासाठीं जगांत संचार करण्याचें सोडून दिलें आणि आपल्या मुलाला घेऊन एका गुहेंत जाऊन राहूं लागला. वायूचा अभाव झाल्यानें सर्व प्राण्यांना श्वासोच्छवास घेणें देखील अशक्य झालें. गंधर्वादिक देव ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्याचे पाय धरून कांहीं मार्ग काढण्यास विनंति केली.

ब्रह्मदेव त्या सर्वांना बरोबर घेऊन वायुदेव जेथें गुहेंत जाऊन बसला होता तेथें गेला. ब्रह्मदेवाला पाहून वायुदेवानें आपल्या मुलाला घेऊन साष्टांग प्रणिपात केला.

ब्रह्मदेवानें आंजनेयाच्या अंगावर हात फिरविल्याबरोबर त्याला शुद्धी आली. वायु-देवाला आनंद झाला व वायुसंचार पूर्वीसारखा सुरू झाला.

वायुदेवाला आणखी जास्त प्रसन्न करण्यासाठीं ब्रह्मदेवानें सर्व दिक्पालकांना आज्ञा केली कीं त्यांनीं उपयुक्त वर द्यावा. इंद्रानें वज्र प्रहार केल्यामुळें आंजनेयाच्या





हनुवटीला जखम झाली होती. त्याचें प्रायश्चित्त म्हणून त्यानें वर दिला कीं वज्र-प्रहार झाला तरी त्याच्या देहाला कांहीं कष्ट होणार नाहीं. तेव्हां पासून आंजनेयाला वज्रदेही हें नांवपण मिळालें.

सूर्यानें आपल्या तेजाचा एक शतांश आंजनेयाला दिला आणि असा वर दिला कीं तो एक महा विद्वान व भक्त होईल.

वरुणानें त्याला वर दिला कीं त्याला पाण्यांत प्रवेश केला तरी पाण्यापासून त्रास होणार नाहीं. यमानें वर दिला कीं काल-दंडाचा त्याच्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं. कुबेरानें वर दिला कीं त्याच्या गदेचा प्रहार झाला तरी हनुमानाच्या देहाला त्याचा कांहीं एक त्रास होणार नाहीं. शिवानें वर दिला कीं त्याच्या कोणत्याहि शस्त्राचा मारुतीच्या देहावर कांहीं परिणाम होणार नाहीं. विश्वकर्म्यानें देखील असाच कांहीं तरी वर दिला.

हे वर मिळाल्यामुळें हनुमान अजेय झाला. त्याला कामरूप व इच्छागमन पण लाभलें होतें. आतां वायुदेवाच्या आनंदाला पारावार नव्हता.

त्यानंतर हनुमान अपार बलशाली झाल्यामुळें वाटेल तिकडे व वाटेल तेव्हां जाऊं येऊं लागला, एवढेंच नव्हें तर रानांत तपश्चर्या करणाऱ्या ऋषी मुनींच्या आश्रमांत शिरून नासधूस करूं लागला. तो वायुसुत आहे, ब्रह्मदेवाची त्याच्यावर कृपा झाली आहे, दिक्पालकांनीं त्याला वर दिले आहेत इत्यादि गोष्टीचा विचार करून ऋषींनीं व मुनींनीं बरेच दिवस गय केली. परंतु हनुमान तपोवनाचीं झाडें उपटून टाकी, मुनींचीं वल्कल वस्त्रें फाडून टाकी व त्यांचीं भांडीं फोडून टाकी. केसरी व वायदेव दोघांनीं त्याला हा उपद्व्याप सोडून द्यायला

समजाऊन सांगितलें. पण हनुमानानें तिकडे दुर्लक्ष केलें. तेव्हां मुनींनीं त्याला शाप दिला—"तूं आपल्या शक्तीच्या जोरावर हा उपद्व्याप करीत आहेस. म्हणून जोंपर्यंत कोणी तुला तुझ्या शक्तीची आठवण करून देणार नाहीं तोंपर्यंत तुला तुझ्या शक्तीचा उपयोग होणार नाहीं. तुला तुझ्या अंगांत एवढी शक्ति आहे हें कळणार देखील नाहीं."

तेव्हां पासून हनुमानाला आपल्या शक्तीचा भास देखील होईनासा झाला व तो एका मुग्ध मुलासारखा आश्रमांत वावरूं लागला. तोंपर्यंत वाली व सुग्रीव यांचा बाप ऋक्षरचस हा वानरांचा राजा मरण पावला होता. वानरांनीं त्याचा मोठा मुलगा वाली याला राज्याभिषेक करून गादीवर बसविलें व त्याचा धाकटा भाऊ सुग्रीव हा युवराज झाला. हनुमान व सुग्रीव यांची लहानपणींच मैत्री जमली. हनुमानाला आपल्या शक्तीची कल्पनाच नव्हती म्हणून वाली व सुग्रीव यांचें भांडण वाढत गेलें तरीं मारुती वालीविरुद्ध आपला मित्र सुग्रीव याला कांहीं मदत करूं शकला नाहीं.

येथवर हनुमानाची गोष्ट सांगून पुढें अगस्त्य मुनि म्हणाले—"रामा! हनुमाना व्याकरण शिकण्यासाठीं सूर्याबरोबर उदय-गिरीपासून अस्तगिरीपर्यंत हिंडत असे. कोणत्याहि विद्येंत त्याची बरोबरी करूं शकणारा दुसरा कोणी नाहीं. हा एक भावी ब्रह्मदेव आहे."

हनुमानाची कथा ऐकून रामानें विचारलें—"मुनिवर! वाली व सुग्रीव यांचा बाप ऋक्षरचस हा कोण? त्यांच्या आईचें नांव काय? त्यांची कथादेखील सांगण्याची कृपा करावी!"





# पूर्वजन्मीचें पुण्य

कावेरी नदीच्या काठीं एका गांवीं एक वेदपरायण ब्राह्मण रहात असे. त्याला कित्येक नवस केल्यानंतर उतारवयीं एक मुलगी झाली. मुलीचें नांव त्यानें शारदा असें ठेवलें. आईवडिलांनीं मुलीचे सर्व लाड पुरविले. मुलगी लहानाची मोठी झाली तेव्हां त्यांना तिच्या लग्नाची काळजी वाटूं लागली. एका गांवीं एक विद्वान वैदिक तरुण पाहून व तो आपल्या मुलीला योग्य वर होईल हें ओळखून त्यांनीं शारदाचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. परंतु दुर्दैव असें कीं लग्नाच्या दिवशींच मांडवांतच नवऱ्या मुलाला सांप चांवला व सर्व लोकांना शोकसागरांत लोटून परलोकीं निघून गेला. शारदेवर तर आकाशच कोसळलें. आपले सर्व दागिने व सौभाग्य चिन्हें काढून टाकून जन्मभर वैधव्य भोगणें तिच्या नशिबीं आलें. पुढें कांहीं दिवसांनीं ध्रुव नांवाचा एक जन्मांध म्हातारा साधू शारदाच्या घरीं आला. शारदानें त्याला नमस्कार केल्यावर त्यानें तिला "अखंड सौभाग्यवती भव!" असा आशीर्वाद दिला.

शारदा तो आशीर्वाद ऐकून म्हणाली—"बुवा! हा काय आशीर्वाद दिलात? माझें भाग्य फुटलें आहे."

साधू म्हणाला—"मुली! जन्मांध असल्या-मुळें मला तें कळलें नाहीं. माझ्या तोंडां-तून निघालेला आशीर्वाद मात्र कदापि खोटा ठरणार नाहीं. मी तुझ्या करवीं उमामहेश्वरव्रत करवितों."

शारदेनें श्रद्धाभक्तिपूर्वक त्या साधूनें सांगितल्याप्रमाणें व्रत केलें. पार्वतीनें प्रसन्न

होऊन वर मागायला सांगितलें. तेव्हां साधूनें देवीला घडलेलें वृत्त निवेदन केलें व हात जोडून विनंति केली कीं ही जितकी या मुलीची परीक्षा आहे तितकीच माझी पण आहे. यासाठीं या मुलीला अखंड सौभाग्याचा वर द्यावा. तें ऐकून पार्वतीनें शारदेच्या पूर्वजन्मीचा वृत्तांत सांगितला. म्हणाली—"पूर्व जन्मीं शारदा पांड्य देशांतील एका ब्राह्मणाची एक पतिव्रता स्त्री होती. त्याला दोन बायका होत्या. शारदा दुसरी व धाकटी बायको. शारदा फार सुंदर होती म्हणून तिच्यावरच पतीचें प्रेम जास्त होतें. तो रात्रंदिवस तिच्या भोंवतींच फिरे. हे सवतीमत्सरानें त्याच्या मोठ्या बायकोला पाहवलें नाहीं. पतीच्या प्रेमाचा गर्व चढल्यामुळें सवत तिचा पदोपदीं अपमान करी व तिच्या कडूनच घरांतली सर्व कामें करवी. पतीकडून मिळालेला निरादर व सवतीची वागणूक असह्य झाल्यानें तिला आयुष्याचा वीट आला व त्यामुळेंच तिला मरण पण आलें.

तिकडे शारदाचें सौंदर्य पाहून एक तरुण तिचें मन आपल्याकडे वळवून घेण्यासाठीं यत्न करूं लागला. परंतु पतिव्रता शारदानें त्याला लवचळपणा करूं दिला नाहीं. त्यामुळें तो भ्रमिष्टासारखा फिरूं लागला व त्यांतच त्याला मरण पण आलें.

या जन्मीं त्याच तरुणाशीं शारदाचें लग्न झालें होतें. लग्न प्रसंगीं पूर्वजन्मीच्या शारदाच्या सवतीनें या जन्मीं सर्पजातींत जन्म घेऊन तिच्या पतीला चावून तिच्यावर सूड उगवला.

तो वृत्तांत सांगून पार्वती पुढें म्हणाली—शारदानें श्रद्धेनें व भक्तिपूर्वक हें व्रत केलें आहे? म्हणूनच मी तिला सौभाग्य लाभ व्हावा यासाठीं आवश्यक तो सर्व उपाय करतें. तिच्या पूर्वजन्मीच्या पतीचा जन्म पांड्य देशांत झाला आहे. केव्हां तरी दोघांची भेट होईल व शारदाला सौभाग्य प्राप्ती होईल." असें सांगून पार्वती अंतर्धान पावली.

"शारदे! तूं पार्वतीनें जो आशीर्वाद दिला तो ऐकलाच आहेस. तुझें व्रत पूर्ण झालें. पार्वतीवर अढळ विश्वास ठेवून जें होईल त्यांत सुख मानून रहा." असें सांगून साधू निघून गेला.

त्या दिवसापासून शारदाला रोज स्वप्नांत एक ब्राह्मण तरुण दिसूं लागला. तो तिच्या












बरोबर नेहमीं असतो असें देखील तिला स्वप्नांत दिसूं लागलें. कांहीं दिवसांनीं ती गरोदर झाली. गांवांत बोभाटा झाला. लोकांनीं तिचे नाककान कापून टाकण्याचें ठरविलें.

त्याच वेळीं एक आकाशवाणी झाली—"ही एक महा पतिव्रता आहे. तिची जो कोणी निंदा करील त्याला तत्क्षण मरण येईल." ती आकाशवाणी ऐकून लोकांचीं तोंडें बंद झालीं. तिनें देवी प्रसन्न झाल्याचा वृत्तांत सांगून तिच्या आशीर्वादानें तिला स्वप्नांत पतिलाभ झाल्याचें सांगितलें. तिला मुलगा झाला. तो देवीचाच प्रसाद [illegible] चें पण तिनें सांगितलें.

कांहीं काळ लोटल्यावर शारदा आपल्या मुलाला घेऊन गोकर्ण क्षेत्रीं गेली. तेथें क्षेत्र दर्शनासाठीं देशाच्या कानाकोपऱ्यांतून लोक आले होते. त्यांपैकीं पांड्य देशाचा एक ब्राह्मण तरुण शारदाला पाहून त्याला स्वप्नांत दिसणारी बाई ती हीच हें आठवून तिच्या जवळ जाऊन म्हणाला—"बाई! तुम्हांला मी रोज स्वप्नांत पहात असें!" शारदेनें पण तिला स्वप्नांत दिसणारा तरुण तो तोच हें ओळखून चकित होऊन त्याच्याकडे पाहिलें.

त्यानंतर दोघांनीं परस्परांच्या स्वप्नां-तल्या गोष्टी सांगून वृद्ध साधूनें दिलेल्या आशीर्वादाचें व देवीनें प्रसन्न होऊन पूर्वजन्मीचें जें वर्णन केलें होतें तें सांगितलें. तें ऐकून तो ब्राह्मण तरुण तिला आपली पत्नी व तिच्या मुलाला आपला मुलगा म्हणून मानून स्वदेशीं गेला. त्यांचें पुढील आयुष्य सुखाचें गेलें. अशातऱ्हेनें पूर्वजन्मीचें पुण्य फळास आलें.



## ५१. रश्मोर शिखर

गुटजन बोरग्लम या शिल्पकारानें चवदा वर्षें काम करून अमेरिकेंतील या पर्वत शिखरावर वाशिंग्टन, जफर्सन, थियोडोर रूझवेल्ट व अब्राहमलिंकन या चार अध्यक्षांचे पुतळे कोरून काढले आहेत, प्रत्येक डोकें ६० फुट उंचीचें आहे. १९४१ सालीं हा शिल्पकार स्वर्गलोकीं गेला.













# भारताचा इतिहास



शिवाजीची आई देवगिरीच्या यादवराज वंशांतली होती. वडील शूर व साहसी इतिहासप्रसिद्ध मेवाडच्या सिसोदिया वंशांतले होते. म्हणून सामान्य सैनिक असूनहि शिवाजीच्या मनांत एक स्वतंत्र राज्य स्थापन करण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न झाली. त्या काळच्या राजकीय परिस्थितीकडे पाहतां एक दुःसाहसच म्हटलें गेलें असतें.

दख्खनचीं मुसलमानराज्यें कमकुवत झालीं असल्यामुळें व दिल्लीचे बादशाह उत्तरेकडील युद्धांत व भाऊ बंदकींत गुंतले असल्या कारणानें महाराष्ट्राचीं स्थापना करण्यास परिस्थिती फारच अनुकूल अशीच होतीं. १६४६ मध्यें शिवाजीनें तोरणा किल्ला जिंकून स्वराज्याचें तोरण बांधलें. तेथून पांच मैलावरच राजगडचा किल्ला बांधला. दादाजी कोंडदेवांना हें आवडलें नाहीं. १६४७ मध्यें ते वारल्यावर शिवाजीला थोडी जास्त स्वतंत्रता मिळाली. त्यानें आणखी अनेक किल्ले जिंकले. त्यांपैकीं बरेच किल्ले बिजापुरच्या आदिलशाहीचे किल्ले होते आणि कांहीं इतरांचे. हे किल्ले जिंकण्यासाठीं शिवाजीनें साम, दाम, दंड, भेद सर्व उपायांचा प्रयोग केला. या किल्ल्यां-व्यतिरिक्त शिवाजीनें अनेक किल्ले बांधले. अशा तऱ्हेनें राज्यविस्तार करून त्याच्या रक्षणासाठीं या किल्ल्यांचा उपयोग केला.

शिवाजीचा उपद्रव वाढत गेलेला पाहून बिजापूर दरबारानें शिवाजीचे वडील शाहाजी राजे यांना कैद केलें. आणि त्यांना सांगून पाठविलें कीं शिवाजीच्या कारवायांना आळा बसेपर्यंत कैदेंतच रहावें लागेल. म्हणून १६४९-५६ च्या दरम्यान शिवाजीनें बिजापूरच्या मुलखावर स्वाऱ्या केल्या नाहींत. परंतु तो आपली शक्ति वाढवीत राहिला. जावळीचा प्रांत चंद्रराव मोरे याच्या आधीन होता. शिवाजीनें चंद्रराव मोरे याला गुप्तपणें वाटेला लावलें आणि १६५६ मध्यें जावळी प्रांत मराठा राज्याला जोडला. तोपर्यंत शिवाजीची प्राप्ती दुप्पट वाढली होती.

१६५७ मध्यें शिवाजीचें मोगलांशीं प्रथम युद्ध झालें. त्यावेळीं औरंगजेबानें बिजापूरला वेढा दिला असल्याचें पाहून अहमदनगर व जुन्नरच्या प्रदेशावर शिवाजीनें हल्ले चढविले. मराठ्यांनीं जुन्नर लुटलें. लगेच औरंगजेबानें आपलें सैन्य पाठवून शिवाजीला माघार घ्यायला लावलें. आदिलशाहनें औरंगजेबाशीं संधी करून घेतल्याचें कळतांच शिवाजीनें पण त्याच्या संधीची बोलणी सुरू केली. परंतु औरंगजेबाचा शिवाजीच्या बोलण्यावर विश्वास बसला नाहीं. तरी बाप आजारी पडल्याचें ऐकून व दिल्लीला वेळेवर गेल्यास स्वतः बादशाह होण्याची आशा वाटल्यामुळें तो शिवाजीशीं संधी करून घेऊन दिल्लीला गेला. नंतर शिवाजीनें उत्तर कोंकणच्या भागावर हल्ले करायला सुरवात केली. कल्याण, भिवंडी वगैरे जिंकून तो महाडपर्यंत जाऊन पोंचला.



बिजापूरच्या सुलतानाला आतां दिल्लीच्या मोगल बादशाहाची भीति वाटेनाशी झाली होती. म्हणून त्यानें शिवाजीचा कांटा दूर करण्याचें ठरविलें. १६५९ च्या सुरवातीला अफजलखान नांवाच्या आपल्या पराक्रमी सेनापतीला एक मोठें सैन्य बरोबर देऊन शिवाजीला जमीनदोस्त करून टाकण्यासाठीं पाठविलें. त्यानें शिवाजीला जिवंत किंवा मृतावस्थेंत पकडून आणण्याची प्रतिज्ञा केली होती. पंधरा दिवसांनीं अफजलखान साताऱ्यांच्या उत्तरेला २० मैलावर वाईला येऊन पोंचला. तो शिवाजीला प्रतापगड

किल्ल्याच्या बाहेर काढूं शकला नाही. म्हणून त्यानें शिवाजीशीं सलोख्याची बोलणीं सुरू करण्याचें ठरवून कृष्णाजी भास्कर यांस पाठविलें. कृष्णाजी भास्कर यांचा सर्व प्रकारें सत्कार करून शिवाजीनें त्यांना विचारलें— "अफजलखानाचा खरा हेतू काय आहे हें सांगा!" कृष्णाजी भास्करांनीं अफजलखानाच्या मनांत काळकूट विष भरलें असल्याचें सांगितलें. शिवाजीचा दूत गोपीनाथ यानें देखील अफजलखानाच्या गोटांत शिरून त्याचा खरा हेतू काय होता हें सांगितलें. 'शठेशाठ्यं' या न्यायाप्रमाणें शिवाजी कवच घालून व वाघनखें घालून औरंगजेबाच्या भेटीस गेला.

अफजलखान एक आजानुबाहु हृष्टपुष्ट पठाण होता. शिवाजी त्या मानानें गिड्डा होता. परस्परांस भेटण्यासाठीं म्हणून प्रेमालिंगनाचें मिश करून अफजलखानानें डाव्या हातानें शिवाजीला आवळून उजव्या हातानें त्याला ठार करण्यासाठीं तलवार उपसली. परंतु कवच असल्यामुळें शिवाजीला दुखापत झाली नाहीं. त्याचवेळीं शिवाजीनें अफजलखानाच्या पोटांत वाघनखें खुपसून त्याच्या आंतड्या बाहेर ओढून काढल्या आणि त्याला ठार केलें. शिवाजीचें सैन्यजवळच झाडींत लपून होतें. त्यानें अफजलखानाच्या सैन्यावर छापा मारून त्याच्या सैन्याला पळवून लावलें व छावणी लुटून अपार धन, दारुगोळा व शस्त्रास्त्रें मिळविलीं.

कांहीं इतिहासकारांच्या मतें शिवाजीचें हें कृत्य अन्यायपूर्ण होतें. परंतु मराठा इतिहासकारांच्या मतें अफजलखानाच्या कावेबाजपणाला दुसरें उत्तर असणेंच शक्य नव्हतें.



# नेहरू चरित्र

[ २१ ]

काकिनाडा येथें कांग्रेस महासभेचें अधिवेशन १९२३ च्या डिसेंबर महिन्यांत झालें. मौलाना महंमद अली अध्यक्ष होते. त्यांचा आग्रह होता की जवाहरलाल नेहरूंनाच कांग्रेसचे मंत्री म्हणून नेमावें. पुढच्या कार्यक्रमाची कांहीं रूपरेषा तयार झाल्याशिवाय नुसतें मंत्रीपद स्वीकारण्यास जवाहरलालजींचें मन तयार होईना. परंतु महंमद अलींचा शब्ददेखील मोडवेना. म्हणून त्यांनीं कांग्रेसचें मंत्रीत्व स्वीकारलें.

दोघांच्या मनांत परस्परांविषयीं फार आदर होता. परंतु कांहीं लहानसहान गोष्टींबाबत मतभेद पण होता. धर्ममत इत्यादि विषयांवर दोघांमध्यें क्वचित्‌च एक मत नव्हतें. महंमद अलींचे विचार धार्मिक प्रश्नांवर फार कडक होते. जवाहरलालजींचा धर्मावरच मुळांत विश्वास नव्हता. मौलाना महंमद अली धार्मिक गोष्टी बोलूं लागले कीं जवाहरलाल विषय बदलून इतर विषयांवर चर्चा सुरू करीत.



त्या वर्षभराच्या कार्यानंतर महंमद अलींनीं कांग्रेसच्या राजकारणांत तसा जास्त भाग घेतला नाहीं. १९३० मध्यें त्यांनीं कांग्रेसच्या ठरावाविरुद्ध लंडनच्या राउंड टेबल कान्फरन्स मध्यें भाग घेतला.

१९२९ मध्यें लाहोर येथें भरलेल्या कांग्रेस अधिवेशनांत ते दिसले तेवढेच. जवाहरलालजींच्या अध्यक्ष भाषणावर महंमद अलींनीं पुष्कळ टीका केली. ते म्हणाले— "जवाहर! मी तुला सांगतों, तुझे सर्व मित्र तुला सोडून जातील. ते तुला फांशी द्यायला मागें पुढें पाहणार नाहींत." ते वारस्याची

       



व मित्रमंडळींना भेटायला परवानगी होती. जवाहरलालजी आपल्या वडिलांबरोबर त्यांना भेटण्यासाठीं गेले होते.

गांधीजी बरे झाल्यावर सरकारनें त्यांना पुन्हां तुरुंगांत पाठविलें नाहीं. त्यांना सोडलें. ते जुहू येथें आपली प्रकृति सुधारण्यासाठीं राहिले. नेहरू एक कुटीर भाड्यानें घेऊन तेथें जवळच रहात होते.

नेहरूंना ही जणुंकांहीं सुट्टीच होती. समुद्रस्नान करणें व समुद्रकाठीं धांवणें हा नित्याचा कार्यक्रम असे. स्वराज्य पार्टीचा कार्यक्रम गांधीजींना समजावून सांगून त्यांना आपल्या बाजूला वळवून घेण्याच्या प्रयत्नांत मोतीलालजी होते आणि जवाहरलालजी गांधीजींचा पुढील कार्यक्रम जाणण्यास उत्सुक होते. परंतु दोघांना त्या कामीं यश मिळालें नाहीं.

गांधीजींना स्वराज्य पार्टीचा कार्यक्रम बिलकुल पसंत पडला नाहीं. दोन्ही पक्ष परस्परांच्या दृष्टिकोणाकडे आदरानें पहात. जवाहरलालजींच्या मनांतल्या एकाहि संदेहाचें समाधान झालें नाहीं. कारण गांधीजींना पुढल्या कार्यक्रमाविषयीं फार विचार करण्याची विशेष संवय किंवा रुचि नव्हती. गांधीजींनीं त्यांना फक्त जनसेवा करीत राहण्यास व चळवळ सुरू होईपर्यंत वाट पाहण्यास सांगितलें. भारतीय पुढाऱ्यांना आपलें उद्देश्यपण स्पष्ट झालें नव्हतें. जवाहरलालजींना हें मुळींच पसंत पडलें नाहीं. कारण कांहीं लोक पूर्ण स्वातंत्र्याची घोषणा करीत तर सप्रू वगैरे मंडळी ब्रिटीश साम्राज्याची स्तुति करीत. अशा प्रकारें या मवाळ विचाराच्या मतांत व जवाहरलालजींच्या मतांत फार मोठें अंतर होतें.





# नवाबकुमारी

[ ८ ]

जगतसिंहाला तुरुंगांतून सोडविण्यासाठीं एक अर्ज घेऊन अभिरामस्वामीनें पांच जणांना बरोबर घेऊन दिल्लीकडे प्रयाण केलें. ते साहीजण घोड्यावरून जात होते. अर्ज बादशाहासमोर जाण्यासाठीं व त्या प्रयत्नांत यश येण्यासाठीं पुष्कळ पैशाची गरज होती. कारण, अमीर उमरावांच्या मुठी गरम केल्याखेरीज जगतसिंहाला सुटका मिळणें जवळजवळ अशक्यच होतें. म्हणून आयशानें तिच्याजवळचीं उत्तमोत्तम रत्नें व पैसे पण बरोबर दिले होते. तिनें दिल्ली दरबारांतील मुख्य मुख्य मानकऱ्यांना व बादशाहाच्या अंत:पुरांतल्या कांहीं प्रमुख व्यक्तींना पत्रें लिहून दिली होतीं. मानसिंहाची बहीण म्हणजे अकबर बादशाहाची पट्टमहिषी हिच्या नांवीं पण एक पत्र दिलें होतें.

अभिरामस्वामीवर कांहीं प्रारंभिक कामाची जबाबदारी टाकण्यांत आली होती. त्यानंतर बाकीचें काम स्वत: आयशा दिल्लीला जाऊन करणार होती. परंतु ती मानसिंहांच्या अंत:पुरांत कैदेंत होती. म्हणून तिला कांहीं करतां येणें शक्य नव्हतें. तरी तिच्या मनाला त्या गोष्टीची सारखी हुर हुर लागून होती. कारण तिनें











बंदिनी होण्यापूर्वीच आवश्यक ती सर्व तजवीज करून ठेवली होती.

पांचव्या दिवशीं अभिरामस्वामी आपल्या अनुयायांसह कानपुरपर्यंत पोंचला. त्याला अकबर बादशाह दिल्लीला नसून आग्र्याला असल्याचें कळलें. तो एक शुभशकुन आहे असें त्याला वाटलें. कारण कानपुरहून आग्रा दोन दिवसाच्या वाटेवर होतें.

साही घोडेस्वार दुपार उलटल्यावर कानपुर येथें पोंचले आणि चौकांत एका वडाच्या झाडाखालीं उतरले. घोडे व त्यांचे मालक दमून गेले होते व त्यांना भूक लागली होती. अभिरामस्वामीनें एका वडाखालीं आपला घोडा बांधून विश्रांती-साठीं व्यवस्था केली तर त्याच्या पांच अनुयायांनीं दुसऱ्या झाडाखालीं एक तंबू उभा केला.

अभिरामस्वामीनें आपल्या पाठीवरची चामड्याची पिशवी अंथरली व गाठोडें उशाशीं ठेवून आडवा झाला. त्याच गाठोड्यांत तो माफीचा अर्ज व आयशानें दिलेले दागिने व रत्नें होतीं.

बाकी पांच जण विहिरीवर जाऊन पाणी आणून घोड्यांच्या दाणापाण्याच्या व आपल्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेला लागले.

ते पांच जण मिळून सैंपाकाला लागले. आपल्या साठीं आज काय करूं, त्यांनीं येऊन अभिरामस्वामीला विचारलें. मला कांहीं नको. थोडेंसें सातूचें पीठ, गूळ किंवा साखर घालून आणून द्या असें अभिरामस्वामीनें त्यांना सांगितलें.

सैंपाक सुरू होई होईतों संध्याकाळ झाली. सैंपाक सुरू करण्यापूर्वी त्यांनीं दिवे लावून ठेवले. आठ वाजण्याच्या सुमारास ते सर्व जेवायला बसणार कीं चौकांत कोठेतरी आग लागली. आरडाओरडा सुरू झाला. अभिरामस्वामी आपल्या अनुयायांना म्हणाला. पाहतां काम? धांवा, पळा! मदत करा जाऊन!"

ते तसेच तिकडे धांवले. इतक्यांत एका बाईचा आवाज ऐकूं आला—"वांचवा! माझा मुलगा...." अभिराम-स्वामी त्या आवाजाच्या रोखानें धांवला व त्यानें त्या जळत असलेल्या घरांतून त्या बाईच्या मुलाला बाहेर काढलें. मुलगा मरतां मरतां वांचला.

आग विझेपर्यंत रात्रीचे बारा वाजले. अभिरामस्वामीचे अनुयायी परत आले. अभिरामस्वामीपण त्यांच्या पाठोपाठ परतला. परंतु ते परत आले तेव्हां त्यांना एकहि घोडा दिसला नाहीं कीं इतर सामानसुमान दिसलें नाहीं. चामड्याच्या पिशवी खालीं ठेवलेलें गाठोडें पण नाहींसें झालें होतें.

अशा तऱ्हेनें सर्व प्रयत्न अयशस्वी झाल्याबद्दल अभिरामस्वामीच्या सर्व उत्सा-हावर व आनंदावर विरजण पडल्यासारखें झालें. कित्येक दिवसाचे बेत व इतकी मेहनत सर्व फुकट गेले.

उरलेली रात्र हताश होऊन त्यांनीं त्या वडाच्या झाडाखालींच काढली. दुसऱ्या दिवशीं





सकाळीं ते कोतवालींत गेले. कोतवाल एक दुष्ट व कठोर मनुष्य होता. बादशाहाच्या दरबारापेक्षां जास्त त्याच्या कचेरीची दहशत त्या इलाख्यांतील लोकांना बसली होती. समोर येईल त्याला वाटेल तें बोलण्याची त्याला संवय होती. अभिरामस्वामी आपलें गाऱ्हाणें निवेदन करायला आरंभ करणार त्याच्या आधींच तो म्हणाला—"हे लोक चोरांच्या टोळींतले दिसत आहेत. हा संन्याशाचा वेष करून आलेला त्यांचा सरदार दिसतो आहे. कोठून तरी चोरी करायला हे येथें आलेले दिसत आहेत. चोरी गेलेल्या मालाचें मिष करून येथें निश्चितपणें रहायला मिळेल, चोरी करायला मिळेल या हेतूनें हे आलेले दिसत आहेत. प्रथम यांना तुरुंगांत टाका." त्यानें हुकूम सोडला.

अभिरामस्वामीवर तर प्रसंगच ओढवला. तुरुंगांत काळोख होता व कसला तरी घाण वास येत होता. काजीसमोर त्यांना उभें करण्यांत येणार होतें. तो काजी कोतवाला पेक्षां जास्त दुष्ट होता. तो आपल्याला खात्रीनें शिक्षा देणार असें वाटून त्यांनीं तुरुंगांतून पळून जाण्याचें ठरविलें. आदल्या-दिवशीं कांहीं खालें नव्हतें व त्या दिवशींपण त्यांना कांहीं खायला मिळालें नव्हतें. तरी जिवाची पर्वा न करता ते एका खिडकीचे गज वांकवून एकामागून एक पांचहि जण पळून गेले.

उजाडल्यावर शिष्ये शिष्ये दोन दिशेला निघाले. अभिरामस्वामीनें शिष्यांना पाठण्यास ताजखानाच्या घरीं जाऊन आयशाला सर्व वृत्त कळविण्यासाठीं पाठविलें व स्वतः दोघांना बरोबर घेऊन आग्र्याकडे निघाला. रानांत जीं फळें मिळालीं तीं खाऊन व ओढ्याचें पाणी पिऊन त्यांनीं आपली भूक



भागविली. रात्रीं झाडाखालीं पडून रहात व दिवसां पायीं पुढचा प्रवास करीत ते तीन चार दिवसांनीं आग्रा येथें यमुनेच्या काठीं येऊन पोंचले.

जवळच्या रानांत घोडे गेल्याचीं चिन्हें त्यांना एका जागीं स्पष्टपणें दिसलीं. अभिरामस्वामीला काय वाटलें कोणास ठाऊक त्यानें आपल्या एका अनुयायाला घोड्यांच्या टापांच्या अनुरोधानें जाऊन सहज पाहून यायला सांगितलें.

तो मनुष्य हुशार होता. तो रानांत जाऊन आला व अभिरामस्वामीला म्हणाला—"ते तर आपलेच घोडे आहेत व त्यांच्या पाठीवरचें सामान पण आपलेंच आहे. दहा जण आहेत त्यांच्याबरोबर!" तेच चोर असल्याचें त्यांना कळलें. तेव्हां त्यांनी कोतवालींत जाऊन बातमी देण्याचें ठरविलें.

"मी पुढें आग्र्याला जाऊन कोतवालींत चोरांच्या टोळीची बातमी देऊन मदतीला शिपाई घेऊन येतो. आम्ही परत येईपर्यंत यांच्या हालचालीवर तुम्ही दोघे नजर ठेवा. एकानें त्यांच्या पाठोपाठ जावें व एकानें येथें वाट पहात रहावें." असें सांगून तो निघून गेला.





अभिरामस्वामीला वाटलें होतें कीं रात्रींच परत येतां येईल परंतु परत येईपर्यंत उजाडलें होतें. त्याच्याबरोबर कोतवाल व शिपाई होते.

परंतु सुदैवानें चोर अद्याप त्याच जागीं पडाव टाकून होते. अभिरामस्वामीनें चोरी गेलेल्या मालाची यादी व घोड्यांचें वर्णन केलें होतें त्याप्रमाणें चोर मुद्देमालासह सांपडले. परंतु तो माल किंवा घोडे अभिरामस्वामीला परत करणें शक्य नव्हतें. कारण काजीसमोर चोरांना हजर करून गुन्ह्याची पुरी चवकशी झाल्यावरच काजी देईल त्या निवाड्याप्रमाणें करण्याचें ठरलें. अभिरामस्वामीनें सांगितलेल्या वस्तू ओळखून त्या सर्व त्याच्याच आहेत हें शाबीत करण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. चोरी गेलेला माल व कागदपत्र मिळाले. परंतु ते हातीं न आल्यामुळें कामांत विघ्न पडल्याबद्दल अभिरामस्वामीला फार वाईट वाटलें.

त्याच्याजवळ एक पैदेखील नव्हती. भीक मागून दिवस काढायची वेळ आली होती. एका रजपूत शिपायानें त्यांच्यावर दया करून त्यांना एक रुपया खर्चासाठीं दिला व लवकर माल सोडवून देवविण्याचें वचन देऊन त्यांना थोडा धीर दिला.

अभिरामस्वामी स्वस्थ बसून राहिला नाहीं. त्यानें राजधानीभर हिंडून जो कोणी हिंदू किंवा मुसलमान भेटे त्याला आपली दुःखकथा सांगून त्यांची मदत मागितली. गांवभर ती बातमी पसरली.

तेवढ्यांत त्याला आयशा आम्याला घेऊन एका उमरावाच्या घरीं उतरली असल्याचें कळलें. पण अभिरामस्वामीची तिच्याशीं भेट होऊं शकली नाहीं. परंतु एका दुसऱ्याच मार्गानें कांहीं तोड निघत आहे अशी अशा मात्र त्यांना वाटूं लागली. कारण कोतवालाकडे असलेल्या सर्व वस्तू तिच्याकडे व ज्याच्या ज्याच्याकडे पोंचत्या व्हायला पाहिजे होत्या पोंचत्या होऊं लागल्या. अशा तऱ्हेनें त्याचें काम थोडें हलकें झालें. म्हणून परत स्वदेशीं जाण्याचें त्यानें ठरविलें. जाण्यापूर्वी त्यानें आयशाची भेट झाल्यास करून घेण्यासाठीं प्रयत्न करून पाहिला, पण त्यांत त्याला यश मिळालें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो कोतवालाला भेटण्यासाठीं गेला. कोतवालानें त्याला व त्याच्या अनुयायांना पांचशें मोहरा देऊन त्यांचे घोडे परत केले. नंतर तो आयशाला भेटण्यासाठीं त्या उमरावाच्या घरीं गेला. आयशाची भेट होऊं शकली नाहीं, पण तिनें त्याचें नांवीं एक पत्र पाठविलें. त्यांत तिनें लिहिलें होतें कीं.

"यापुढें आपली दोघांची भेट होईलसें मला वाटत नाहीं. युवराज जगतसिंह आयुष्यभर सुखी होवोत हीच त्या खुदावंद करीम याच्याजवळ माझी प्रार्थना आहे. मला त्यांची भेट घेण्याची गरज नाहीं. माझ्याविषयीं कोणी काळजी करण्याचें कारण नाहीं. यानंतर माझ्याविषयीं तुम्हांला













काही बातमी कळत राहील असे देखील मला वाटत नाहीं."

पत्र वाचून अभिरामस्वामीचे डोळे ओले झाले. तो आपल्या दोघां अनुयायांसह घोड्यावर बसून स्वदेशीं निघाला.

आयशाला जहाजांत बसून कटकला पोंचावयाचें होतें. कटक पासून एका मैलावर महानदीच्या काठीं उस्मानखान घाटावर दोघां सैनिकांसह आयशाची वाट पहात होता. नदींत पुष्कळ जहाजें व नावा होत्या.

दुपारीं आयशा बसून येत असलेली नाव दिसली. ठरल्या वेळेपेक्षां तिला पोंचायला थोडा उशीर झाला होता. उस्मानखानाला त्या जहाजाच्या खिडकींतून कोणी तरी हात हलवीत असल्याचें दिसलें. त्याला आणखी हें देखील पाहून आश्चर्य वाटलें की तें जहाज हळू हळू पाण्यांत बुडत आहे. उस्माननें पाण्यांत उडी मारली व छातीपर्यंत खोल पाण्यांत जाऊन ओरडून म्हणाला—"आयशा! बाहेर उडी मार! आंत आणखी कोणी असेल त्यांना पण उड्या टाकायला सांग! जहाज बुडत आहे!!"

खलाशीदेखील जहाजाला वांचवूं शकले नाहींत. किंकर्तव्यविमूढ होऊन जहाजाकडे पहात उभे राहिले.

"उस्मान! तूं पाण्याबाहेर जा! हें काय करतो आहेस?" आयशा ओरडली. जहाजांतले लोक रडत होते. आयशानें जहाजाबाहेर पाऊल टाकण्याचा यत्न देखील केला नाहीं. उस्मानखानाला परत जाण्यासाठीं खूण करून ती स्वतः जहाजाबरोबर पाण्यांत बुडाली. [पुढल्या अंकांत संपूर्ण]



# सांपडलेला ठेवा

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला व प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुला जो हा कष्ट सहन करावा लागत आहे त्याबद्दल वाईट वाटून घेऊं नकोस. कारण समुद्रशूराला ज्याप्रमाणें कष्टसमयीं शुभलाभ झाला त्याप्रमाणें तुलादेखील होणार नाहीं कशावरून? मी ती गोष्ट तुला सांगतों. ऐक!" असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

फार पूर्वी हर्षपुर येथें हर्षवर्मा नांवाचा राजा राज्य करीत असे. राजधानींत समुद्रशूर नांवाचा एक व्यापारी रहात असे. तो माल घेऊन व्यापारासाठीं सुवर्णद्वीपाला निघाला. जहाज सुवर्णद्वीपानजीक पोंचलें तेव्हां वादळाचीं लक्षणें दिसूं लागलीं. सोसा-



त्याचा वारा सुटला. एक जोराची लाट आली व समुद्रशूराचें जहाज पाण्यांत बुडूं लागलें. समुद्रशूरानें समुद्रांत उडी मारली व पोहूं लागला. पोहोत असतां त्याच्याजवळ एक प्रेत वहात येत असलेलें त्याला दिसलें. त्यालाच होडक्यासारखें वापरून समुद्रशूर किनाऱ्यावर आला.

त्यानें 'तें प्रेत पाण्यांतून बाहेर ओढून आणलें त्या प्रेताच्या कमरेला कांहीं तरी बांधलेलें त्याला दिसलें. त्यानें तें उघडून पाहिलें तेव्हां त्याला त्यांत एक मूल्यवान रत्नहार दिसला. इतका सुंदर व मूल्यवान हार त्यानें पूर्वीं कधीं पाहिला नव्हता. समुद्रांत बुडून गेलेल्या मालाहून कितीतरी पटीनें जास्त किंमत त्या रत्नहाराची होती. म्हणून त्याचा माल बुडाला होता त्यामुळें त्याचें झालेलें नुकसान तो पार विसरून गेला आणि कलशपुर नांवाच्या गांवीं येऊन पोंचला. गांवाबाहेरच्या धर्मशाळेंतच तो विश्रांतीसाठीं उतरला. दमून भागून गेल्यामुळें ओसरींतच जरा आडवा होतांच त्याला झोंप लागली. तो रत्नहार त्या वेळीं त्याच्याच हातांत होता.

कांहीं वेळानें राजधानीच्या रक्षणासाठीं गस्त घालणारे पाहरेदार त्या बाजूला आले. त्यांनीं त्याच्या हातांतला रत्नहार पाहतांच ओळखला. तो राजकन्येचा होता. झोंपलेला मनुष्यच चोर असावा असें वाटून त्यांनीं समुद्रशूराला कैद करून राजासमोर हजर केलें.

"कोणरे तूं ! आणि हा रत्नहार तुझ्याजवळ कसा काय आला ?" राजानें दरडावून त्याला विचारलें.

समुद्रशूरानें घडलेलें वृत्त जसेंच्या तसें सांगितलें आणि म्हणाला—"मला ज्या प्रेताच्या कमरेला बांधलेला तो रत्नहार मिळाला तें प्रेत अजून तेथेंच असण्याची





शक्यता आहे. वाटल्यास कोणाला तरी पाठवून पाहून यायला सांगावें."

राजा पुढें कांहीं बोलणार एवढ्यांत एका घारीनें झडप मारून राजाच्या हातांतला तो हार ओढून घेतला व उडून गेली.

चोरीचा माल अज्ञातऱ्हेनें निघून गेला तरी आरोपीवरचा आरोप नाहींसा झाला नाहीं. चवकशी होणें जरूर होतें. म्हणून राजानें समुद्रशूराबरोबर समुद्रतीरावर नोकरांना पाठविलें. प्रेत अजून तेथेंच होतें. तें प्रेत गांवांतल्या एका अट्टल चोराचें होतें. राजाच्या शिपायांनीं राजाला येऊन सांगितलें. समुद्रशूरानें जें सांगितलें होतें तें खरें ठरलें. राजा धर्मभीरु होता. त्यानें समुद्रशूराला कांहीं पैसे व माल देऊन त्याला एका जहाजांत बसवून निरोप दिला.

या खेपेस समुद्रशूराचा प्रवास सुखरूप पार पडला. तो एका रानांतून आपला माल घेऊन हर्षपुराकडे जाण्यास निघाला. सर्व व्यापारी जंगलाच्या मार्गानें प्रयाण करीत रात्रीं एका जागीं जंगलांतच पडाव टाकून झोंपले. रात्रीं चोरांच्या टोळीनें त्यांच्यावर हल्ला केला व हातीं लागलें त्यावर संतुष्ट न होऊन समोर आडवा आला त्याला कापून काढूं लागले. चोरांची नजर चुकवून समुद्रशूर पळून गेला आणि वडाच्या झाडावर चढून पानांच्या आड लपून बसला. चोर हातीं लागला तो माल घेऊन पळून गेले.

समुद्रशूर चांगलें उजाडेपर्यंत झाडावरच बसून राहाला. नंतर झाडावरून उतरण्याचा विचार करूं लागला. तेव्हां त्याला जवळच झाडाच्या एका पोकळींत कांहीं तरी चमकल्यासारखें दिसलें समुद्रशूर जवळ गेला. तोच राजकन्येचा हार होता. एक रत्नहार त्याला दिसला. दूर समुद्रापलीकडे घारीनें उचलून नेलेला हार अशा परिस्थितींत पाहून

त्याला आश्चर्य वाटलें. अशा तऱ्हेनें अनपेक्षितपणें त्याला तो हार दोनदां मिळाला.

तो झाडावरून खालीं उतरला आणि आपल्या गांवीं परत येऊन त्यानें आपल्या गांवच्या राजाला तो विकला. त्याला चांगली मोठी किंमत मिळाली. इतकी कीं त्यानें व्यापार करण्याचें सोडून दिलें व घरीं बसून सुखानें राहूं लागला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा! समुद्रशूरानें तो हार कलशपूरच्या राजाकडे पोंचता करण्याऐवजीं स्वतःकडे कां ठेवून घेतला? लोभानें कीं पुन्हां चोरीचा आळ लागेल या भीतीनें? या प्रश्नाचीं उत्तरें माहीत असून तूं दिलीं नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"तो रत्नहार दोनदां राजाच्या हातांतून गेला होता. तिसऱ्यानें घालवून बसणार नाहीं कशावरून? याउलट समुद्रशूराला दैवयोगें तो दोनदां मिळाला होता. स्वच्छेनें तो कां सोडावा? तसेंच एकदां व्यापाराचा माल समुद्रांत बुडाला, दुसऱ्या खेपेस चोरांनीं चोरला. त्याच्या नशिबीं व्यापार करण्याचें लिहिलेलें नाहीं, असें समजून त्यानें व्यापाराचा नाद सोडला. समुद्रप्रयाण केल्याखेरीज राजाकडे तो हार पोंचता करणें शक्य नव्हतें. म्हणून समुद्रशूरानें स्वतःच त्याचा उपयोग करून घ्यायचें ठरविलें."

अशाप्रकारें राजाचें भाने भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.

( कल्पित )





# स्त्री - सहाय्य

कधीं काळीं वर्धमान नांवाच्या एका राजाचें मंजरी नांवाच्या एका राजकन्येशीं लग्न झालें. राणी रूपवती व गुणवती होती. तिच्या प्रेमांत राजा राज्य कारभाराचीं कामें पार विसरून गेला. पांच वर्षें लोटलीं. दरबारी व मंत्री काळजींत पडले. कारण, पांच वर्षें लोटलीं तरी राजाला मूलबाळ झालें नाहीं. राज वंशकसा चालणार?

ज्योतिष्यांनीं मंजरीची जन्मकुंडली पाहून तिला मूलबाळ नाहीं असें भविष्य सांगितलें. प्रधानानें राणीची एकांतांत भेट घेऊन ही गोष्ट सांगितली तेव्हां मंजरी म्हणाली—"राजवंश चालावा म्हणून मी राजाचें दुसरें लग्न करून देण्याची खटपट करतें."

परंतु राजानें मंजरीच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. म्हणाला—"मी दुसरें लग्न केलें तर दोघींचा सवतीमत्सर [illegible] पाहवणार नाहीं. एकाद्या चांगल्या मुलाला दत्तक घेतला तर राज्याला वारस मिळेल."

"मी आपल्या सवतीला धाकट्या बहिणीसारखी मानून राहीन." मंजरी म्हणाली.

"परंतु तुझी सवत तुला मोठी बहीण मानून तुझा आदर करील हें कशावरून?" राजा म्हणाला.

राणीच्या प्रेमांत राजा राज्याचीं कामें विसरून गेलेला पाहून सेनापतीला दुर्बुद्धि झाली. त्यानें राजाच्या बाजूला असणाऱ्या लोकांना लोभ दाखवून आपल्याकडे वळवून घेतलें आणि राजवाड्याला वेढा दिला.

एका रात्रींतच राजधानींत राज्यक्रांति घडून आली. राजाचे अंगरक्षक व विश्वासपात्र म्हणून जेवढे होते त्या सर्वांना सेनापतीनें

       



ठार केलें. परंतु एक विश्वासपात्र अधिकारी आपल्या धर्माला जागला. त्यानें राजाला सोडविलें आणि राजधानी बाहेर रानांत सुखरूप पोंचतें केलें.

मंजरी कोठें गेली व तिचें काय झालें राजाला कळलें नाहीं. इतर नोकरांबरोबर तिलादेखील सेनापतीनें ठार केलें असावें असें समजून राजा फार दुःखी झाला. त्यामुळें त्याला राज्याचा व स्वतःच्या जीविताचा वीट आला. त्यानें जंगलांतच एक पर्णकुटी बांधून घेतली व तेथेंच तपश्चर्या करूं लागला.

परंतु राजाला वाटलें होतें तशी मंजरी ठार झाली नव्हती. पुरुषवेष करून घोड्यावर बसून ती निर्भयपणें राजवाड्याबाहेर निघून गेली. लहानपणींच ज्योतिष्यांकडून तिच्या नशिबीं अपत्यसुख नाहीं हें कळल्या-पासून तिनें लग्नच करायचें नाहीं असें मनाशीं ठरवून पुरुषाला शोभेल असें युद्धविद्येचें शिक्षण घेतलें होतें. शिकार करणें घोड्यावर बसणें वगैरे गोष्टींची तिला विशेष आवड होती.

राजवाड्यांतून पळून गेल्यावर ती राजा जेथें पर्णकुटींत रहात होता तेथून थोड्या अंतरावर शिकाऱ्याच्या पुरुष वेषांतच राहूं लागली. राजाला त्याचें राज्य परत मिळवून द्यायचें एकमेव ध्येय तिच्या समोर होतें.

एकदां एक विचित्र गोष्ट घडली. जंगलांत एका सरोवराच्या काठावर ती बसली असतां एक सांप पोहोत पाण्यांतून बाहेर काठावर आला. तो सांप फार मोठा होता. त्या सांपाला जिवंत सोडलें तर जवळपासच्या लोकांना तो चावेल असा विचार करून तिनें चटकन तलवार उपसून त्या सांपाचें डोकें उडविलें त्या बरोबर त्या सांपाच्या तोंडांतून एक नील मणि खालीं पडला.

मणि खालीं पडल्याबरोबर त्या सांपाच्या जागीं तिला मेलेला एक भयंकर राक्षस दिसला.

क्षणार्धांत झालेला तो बदल पाहून तिला आश्चर्य वाटलें. मणि तोंडांत होता म्हणून राक्षसाला सांपाचें रूप मिळालें होतें कीं काय असेंदेखील तिला वाटलें. तिनें तो मणि धुऊन तोंडांत धरला. त्या बरोबर तिला नागरूप मिळालें. राक्षसाचें घर खोल पाण्यांत कोठें तरी असलें पाहिजे असा विचार करून ती नागरूपांतच बुडी मारून खोल पाण्यांत शिरली.







सरोवराच्या तळाला बराच वेळ फिरल्या-नंतर मंजरीला कांच्याच्या जाळ्याखालीं झांकलेलें एक भोंक दिसलें. मागचा पुढचा विचार न करतां ती त्यांत शिरून पलीकडे गेली. पलीकडे तिला पायऱ्या दिसल्या. पायऱ्या चढून ती वर गेली तेव्हां पाण्याच्या वरच्या पातळीच्या जरा खालीं तिला आणखी एक दार दिसलें. तें देखील कांच्या आड झांकलेलें होतें. ते कांटे राक्षसानेंच लावून ठेवलेले होते.

मंजरी तें कांच्यांचें जाळें बाजूला सारून पलीकडे गेली. तेथें एक मोठें दालन होतें. त्यांत एक रूपवती मुलगी बसलेली होती. ती सांपाला पाहून घाबरून गेली छातीवरून गेल्यासारखें झालें तिला.

मंजरीनें आपल्या तोंडांतला मणी खालीं जमिनीवर टाकला. त्या बरोबर तिला स्वतःचें रूप मिळालें. ती त्या मुलीला म्हणाली– "मुली, घाबरूं नकोस. मी राक्षस आहें असें तुला वाटलें असेल. मी त्याला ठार केलें आहे. कोण तूं? इकडे कशी काय आलीस? माझ्या हातून तुला कांहीं मदत झाली तर मला आनंदच होईल." जवळ येऊन त्या मुलीला धीर देत ती म्हणाली.

"मी वज्रगिरीच्या राजाची राजकन्या आहें. माझें नांव सौदामिनी. मला राक्षसानें कालच येथें आणून कैदेंत ठेवलें मी त्याच्याशीं लग्न करायला तयार झालें नाहीं तर तो मला ठार करील अशी धमकी त्यानें दिली आहे. तूं मला घरीं पोंचतें केलेंस तर मी तुझे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं." ती मुलगी म्हणाली.

"आतां तुला त्या राक्षसाला भिण्याचें कारण नाहीं. कारण त्याला मी ठार केलें आहे. मी तुला या कैदेंतून सोडवून बाहेर नेतें. नंतर तुझ्या वडिलांकडे तूं कशी पोंचणार याचा विचार आपण करूं." मंजरी म्हणाली.

असें सांगून तिनें पुन्हां नील मणि तोंडांत धरला. तिला नागरूप मिळालें व कांच्यांच्या जाळ्यापलीकडे येऊन तिनें तो मणि सौदा-मिनीला मिळेल अशा बेतानें पलीकडे टाकला. सौदामिनीनें तो मणि तोंडांत धरल्याबर तिलादेखील नागरूप मिळालें. अशा तऱ्हेनें दोघी सरोवराच्या बाहेर आल्या. दोघींना मनुष्यरूप मिळालें होतें.

तोपर्यंत मध्यरात्र लोटून गेली होती. मंजरीनें पुन्हां पुरुषवेष धारण केला व म्हणाली–"मी तुला एका महापुरुषाच्या आश्रमांत घेऊन जातें. परंतु तूं माझ्याविषयीं त्याच्या जवळ एक चकार शब्द बोलतां कामा नये. बजावून ठेवतें तुला. त्यानें तुला तुझ्या माहेरी पोंचतें करावें, इतर कांहीं प्रश्न विचारूं नये असें त्याच्याजवळ सांग. आपली लवकरच भेट होईल." असें सौदा-मिनीला सांगून मंजरी तिला राजा जंगलांत रहात असे त्या आश्रमाजवळ आली. दूरून आश्रम दाखवून व सौदामिनीचा निरोप घेऊन मंजरी निघून गेली. ती गेल्यानंतर सौदामिनीनें दारावर थाप दिल्याबरोबर





राजानें येऊन दार उघडलें. एका अपरिचित मुलीला समोर उभी पाहून त्याला आश्चर्य वाटलें व त्यानें विचारलें–"कोण पाहिजे?"

एका निर्जन वनांत आश्रम करणारा कोणीतरी वानप्रस्थाश्रमी वृद्ध राजा असणार असें सौदामिनीला वाटलें होतें. पण समोर उभा एक तरुण तपस्वी. अर्थातच तिला एका तरुणाशीं बोलतांना लाज वाटली. मान खालीं करून ती म्हणाली–"मी वज्रगिरीची राजकन्या आहे. मला माझ्या वडिलांकडे पोंचती करूं शकलांत तर फार उपकार होतील आपले."

त्यानंतर राजानें तिला आणखी एक देखील प्रश्न विचारला नाहीं. तिचें नांव देखील विचारलें नाहीं. त्यानें आपला घोडा तयार केला व तिला त्या घोड्यावर स्वतः बरोबर बसवून रात्रीच्या सुमारास वज्रगिरीला येऊन पोंचला. मुलगी सुखरूप घरीं परत आलेली पाहून वज्रगिरीच्या राजाला परमानंद झाला. मुलीला पोंचता करणारा वर्धमान राजा आहे हें कळतांच त्यानें विचारलें–"आपली गादी आपल्या सेनापतीनें बळकावली असल्याचें मी ऐकलें. आपण अरण्यवास करीत असल्याचें पण मुलीनें सांगितलें. परंतु ही आपत्ति आपणांवर कां आली! कांहीं सहाय्य करण्यासारखें असल्यास सांगावें. आपलें राज्य परत मिळवून देणें अगदींच अशक्य नाहीं."

वर्धमान म्हणाला–"मला राज्याचा मोह नाहीं. प्रजेलादेखील माझ्यावर कांहीं प्रेम आहे असें नाहीं. प्रजेच्या इच्छेविरुद्ध सेनापती इतकें साहस करूं शकला नसता. प्राणाहून प्रिय अशी माझी राणी वारली. आतां मला या जगाचा मोह नाहीं."

"असा विचार करणें बरोबर नाहीं. आमच्या सौदामिनीला तुमच्या आश्रमांत आश्रय मिळेल असें एका व्यक्तीनें सांगितल्याचें तिच्याकडून मला कळलें. त्या व्यक्तीला तुमच्यावर अपार भक्ति व श्रद्धा आहे असें पण माझी मुलगी म्हणाली. आमच्या सौदामिनीच्या मनांत देखील तुमच्या विषयीं किती आदर आहे. तिनें आपली मदत मागितल्याबरोबर आपण तिला एकदेखील प्रश्न न विचारतां तावडतोब तिला सुखरूप आणून इतक्या दूर पोंचतें केलेंत. आपल्या सारखीं थोर माणसें या जगांत क्वचित पहायला मिळतात. ऐन पंचवीशींत हें वैराग्य कांहीं शोभत नाहीं. भाग्यांत होतें तें झालें. आपण आमच्या सौदामिनीशीं विवाह करून आमचें हें लहान राज्य स्वीकारलें आपण केलेल्या उपकाराची फेड अल्प का होईना, होईल."

वज्रगिरीच्या राजाच्या त्या प्रेमळ शब्दांचा वर्धमानच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. विचार करून उत्तर देतों असें प्रथम तो म्हणाला. परंतु कांहीं दिवसांनीं सौदामिनीचें प्रेम पाहून तो तिच्याशीं लग्न करण्यास तयार झाला.

तिकडे मंजरी सौदामिनीला आपल्या पतीच्या आश्रमाकडे जायला सांगून ती



दोघं घोड्यावर बसून निघून जाईपर्यंत आड उभी होती. नंतर ती परत आपल्या राज्यांत त्या पुरुष वेषांतच निघून गेली. तिनें नीलमणीच्या सहाय्यानें रात्रीं हिंडून राजधानींतली सर्व परिस्थिति ओळखून घेतली. सेनापतीविरुद्ध एक चकार शब्द बोलण्याची छाती कोणाची नव्हती. कारण तावडतोब शिरच्छेद होईल ही धास्ती सतत प्रजेच्या मनांत वसत होती. प्रजा, कोणी उद्धारकर्ता येतो का याची वाट पहात होती.

तें कळल्यावर मंजरी प्रधानाला व इतर मुख्य अधिकाऱ्यांना गुप्तपणें भेटली व राजानें वज्रगिरीची राजकन्या सौदामिनीशीं दुसरा विवाह केला असल्याची बातमी सांगितली. तें ऐकून प्रधानानें लगेच आपला एक दूत वज्रगिरीला पाठवला व वर्धमानानें मध्यरात्रीच्या सुमारास राजवाड्यावर एका लहानशा सैन्यानिशीं छापा मारावा असें ठरलें होतें. त्याप्रमाणें अपरात्रीच्या वेळीं एकदां सेनापति आपल्या कांहीं प्रमुख अनुयायांसह मद्यपान करून नृत्यगान करण्यांत मग्न असतां सैनिकांनीं राजवाड्याला वेढा दिला व सर्वांना कैद केलें. दुसऱ्या दिवशीं वर्धमानाचा पुन्हां राज्याभिषेक झाला. प्रजेला आनंद झाला. राजद्रोह्यांना फाशीची शिक्षा झाली. राज्यभर तीन दिवस सर्वत्र आनंदी आनंद होता. त्यांत राजानें दुसरें लग्न केलें असल्याचें व नवी राणी गरोदर असल्याचें ऐकून त्या आनंदाला पारावारच नव्हता.

राजाचें लक्ष राज्यकारभाराकडे वळलें. मंजरीच्या मनासारखें झालें. तिनें सौदामिनीला धाकट्या बहिणीप्रमाणें वागवून कोणतीहि उणीव भासूं दिली नाहीं. वज्रगिरीचें राज्य पण वर्धमानलाच मिळालें.





## मधमाशीचें पोळें

आफ्रिकेच्या डोंगराळ प्रदेशांतील एका अरण्यभागांत दोघे भाऊ रहात असत. दोघे शिकार करीत आणि कुटुंबाच्या उपजीविकेला आवश्यक सर्व वस्तू रानांतून आणीत. एके दिवशीं दोघे भाऊ एकेक चामड्याची पिशवी व धनुष्यबाण घेऊन शिकार करण्यास निघाले. जंगलांत वाटेनें कांहीं वेळ चालल्यानंतर पुढें एक दाट अरण्य लागलें. पुढें वाटदेखील नव्हती. तरी ते त्या दाट झाडींत शिरले.

कांहीं अंतर चालून गेल्यावर एका जागीं त्यांना मडकीं उपडीं ठेवलेलीं दिसलीं.

"काय बुवा म्हणायचें तरी, या निर्जन-स्थानीं हीं कोणी घरें ठेवलीं असावीत!" धाकट्या भावानें चकित होऊन विचारलें.

"आपल्याला काय त्याच्याशीं करायचें आहे! त्यांत काय ठेवलें आहे कोण जाणे!" मोठा भाऊ म्हणाला. तसा थोडा भित्राच होता तो. पण धाकटा भाऊ धीट होता. म्हणाला—"त्यांच्या खालीं काय आहे, हें पाहिलेंच पाहिजे." तो एकेक मडकें उचलून सरळ उताणें करून ठेवूं लागला, तेव्हां मोठा भाऊ दूर उभा राहून तें पाहूं लागला.

धाकट्या भावानें एका मागून एक मडकें उताणें केलें. कांहीं सांपडलें किंवा दिसलें नाहीं. पण त्यानें शेवटचें मडकें उचलतांच खालून एक खुजी म्हातारी उडी मारून बाहेर आली. तिनें तिला सोडवणाऱ्या धाकट्या भावाला पाहिलें नाहीं. दूर उभा असलेल्या मोठ्या भावाला पाहिलें व म्हणाली—"भित्र्या! असा शुंभासारखा



काय दूर उभा आहेस? माझ्याबरोबर आलास तर गमतीदार चित्रें मी तुला दाखवीन."

पण मोठा भाऊ जागचा हालला नाहीं.

"मूर्ख, भित्रा!" या शब्दांनीं त्याला नांवें ठेवीत धाकट्या मुलाकडे वळून तिनें त्याला बरोबर यायला सांगितलें. सर्वाला तयार असलेला धाकटा भाऊ तिच्याबरोबर निघाला. दोघे कांहीं अंतर चालून गेल्यावर म्हातारी थांबली व त्याच्या हातांत एक कुऱ्हाड देऊन म्हणाली—"हें झाड तोड!"

त्यानें त्या झाडाच्या बुंधावर कुऱ्हाडीचा एक घाव केल्याबरोबर त्या झाडांतून एक गाय प्रकट झाली. अशा तऱ्हेनें त्यानें केलेल्या प्रत्येक घावाबरोबर एक गाय, बकरी, मेंढी किंवा बैल झाडांतून प्रकट झाला. थोड्या वेळांत त्याच्या भोंवती गुरांचा एक कळपच जमा झाला.

"हीं सर्व गुरें तुझीच. तूं हीं सर्व घेऊन जा." ती म्हातारी म्हणाली.

त्यानें तिचा निरोप घेतला व त्याचा मोठा भाऊ त्याची वाट पहात बसला होता तेथें सर्व गुरें घेऊन येऊन म्हणाला—"त्या म्हातारीनें पहा मला काय दिलें आहे तें. तिनें बोलाविलें आणि तूं गेला नाहींस."

धाकट्या भावाला त्या गुरांचा लाभ कसा झाला हें सर्व मोठ्या भावानें शांतपणें ऐकून घेतलें. कांहीं बोलला नाहीं. दोघे गुरांना घेऊन आपल्या गांवच्या वाटेनें चालूं लागले.

ऐन दुपारची वेळ होती. कडक ऊन पडलें होतें. दोघांना खूप तहान लागली. गुरें देखील पाण्यासाठीं ओरडत होतीं.

कांहीं अंतर चालून गेल्यावर धाकटा ओरडला—"तें पहा पाणी!" त्यांच्या वाटेवरच एका खोल दरींत लहानसा ओढा होता. परंतु तेथवर जायचें कसें. डोंगराचा उभा कडा होता तेथें.



"माझ्या कमरेला दोरी बांधून खालीं सोडतोस का? मी आपली तहान भागवून वर येतों." मोठा भाऊ धाकट्याला म्हणाला. धाकट्या भावानें त्याप्रमाणें त्याला खालीं सोडलें. पोटभर पाणी पिऊन तो वर आला आणि त्यानें धाकट्या भावाच्या कमरेला तशीच दोरी बांधून खालीं सोडलें. गुरांकडे पाहून त्याच्या मनांत दुष्टबुद्धि उत्पन्न झाली. त्यानें आपल्या हातांतली दोरी पण खालीं दरींत फेंकून दिली. आपला भाऊ कसा वर परत येईल याची त्याला फिकीर नव्हती. गुरें घेऊन तो एकटा घरीं परत आला.

त्यानें घरीं येऊन आपल्या वडिलांना त्याला एका म्हातारीनें तीं गुरें दिलीं आहेत असें खोटें सांगितलें.

"असें होय? पण तुझा धाकटा भाऊ कोठें आहे?" बापानें विचारलें.

"म्हणजे तो अजून घरीं परत आला नाहीं तर? दुपारीच तो माझ्या आधीं परतला." मोठा भाऊ म्हणाला.

त्या दिवशीं धाकटा भाऊ घरीं परत आला नाहीं. घरच्या मंडळींना वाटलें तो शिकार करीत कोठें तरी दूर रानांत गेला



असेल. येईल उद्यां परवां परत. त्यांना तेवढी जास्त काळजी वाटली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं पहाटे गांवांतल्या बायका पाणी भरून आणायला गेल्या तेव्हां त्यांना मध खाणाऱ्या एका विशिष्ट जातीच्या पक्ष्याचा किलबिलाट ऐकूं आला. त्या पक्ष्यांचा आवाज ऐकूं आला म्हणजे जवळ-पासच्या पंचक्रोशींत कोठें तरी मधाचें पोळें आहे असें समजावें. पक्ष्यांच्या आवाजाच्या रोखानें गांवकरी मधमाश्यांच्या पोळ्याचा शोध काढीत व पोळें मिळाल्यावर मध काढून आणीत. म्हणून आवाज ऐकूं आल्या बरोबर

बायका घरीं धांवल्या व घरच्या पुरुष मंडळींना म्हणाल्या मधुपक्ष्यांचा आवाज ऐकूं येत आहे.

दोघां भावांचे आईवडील गांवकऱ्यां-बरोबर त्या आवाजाच्या अनुरोधानें मधमाशांचें पोळें शोधायला निघाले. परंतु पक्षी उडत पुष्कळ दूर गेले व त्यांच्या पाठोपाठ गांवकरी दोनतीन कोस गेले. म्हणून निराश होऊन बरेचसे गांवकरी परतले. परंतु कांहीं हिंमतवान गांवकरी व दोघां भावांचें वडील मागें परतले नाहींत.

मधु पक्षी एका दरींत उतरले. तेथें पोळें असून नसून सारखेंच. डोंगराचा कडा भिंतीसारखा सरळ उभा होता तेथें. आंत कसें उतरायचें ? त्या दोघां भावांच्या बापानें आंत वांकून पाहिलें. त्याला मधु पक्षी दिसला नाही. परंतु मनुष्य दिसला. त्याचा आवाज देखील खोल व हळू ऐकूं येत होता.

"अरे! तो तर माझा धाकटू! आंत दरींत आहे." बाप मोठ्यानें ओरडला.

चार पांच जणांनीं त्याला काढण्यासाठीं दोरी आंत सोडली. धाकटा वर आला.

धाकट्या मुलाकडून थोरल्या मुलाच्या दुष्टपणाचें वर्णन ऐकून बापाला त्याचा फार राग आला. म्हणाला—"इतका दुष्टपणा केला त्यानें. मधुपक्षाचें ओरडणें ऐकूं आलें नसतें तर आम्ही इकडे आलोंच नसतों व तुझी जी गत झाली असती ती देवच जाणें!"

"त्या थोरल्याला जिवंत चिरून आगींत भाजून काढला पाहिजे!" सर्व म्हणाले.

थोरल्या भावाला शंका होतीच. तो पहिल्यानेंच बाप व गांवकरी घरीं परत येण्यापूर्वी घर सोडून पळून गेला. त्यानंतर त्याला कोणी भेटला नाहीं.





# गुणशर्माची कथा

उज्जैन नगरीं आदित्यशर्मा नांवाचा एक तरुण ब्राह्मण रहात असे. एक संन्यासी भिक्षूबरोबर त्याचा स्नेह जडला. त्या भिक्षूजवळ एक यक्षिणी रहात असे. तिच्याकडून त्याला कळलें कीं यक्षिणींत सुलोचना नांवाची यक्षिणी सर्वांत सुंदर आहे. नंतर तो दक्षिणेकडे गेला. विष्णुगुप्त नांवाच्या एका संन्यासी भिक्षूकडून सुलोचना भिक्षुणीचा अनुग्रह प्राप्त करण्यासाठीं त्यानें यज्ञादि विधी शिकून घेतला. त्या प्रमाणें होम केल्यावर त्याला सुलोचनेचा लाभ झाला. सुलोचनेनें आदित्यशर्माकडून सहा महिने पूर्ण ब्रह्म-चर्याचें पालन करण्याचें वचन घेतलें व नंतर एक मुलगा होईपर्यंत त्याच्या बरोबर राहण्यास ती कबूल झाली. त्यानंतर ती त्याला अलकापुरीला घेऊन गेली. वचन दिल्याप्रमाणें त्यानें सहा महिने ब्रह्मचर्य पाळलें. तें पाहून कुबेर प्रसन्न झाला व त्यानें आदित्यशर्माचा सुलोचनेशीं देव विवाह करून दिला. त्यानंतर त्यांना यथावेळीं गुणशर्मा नांवाचा मुलगा झाला.

कांहीं काळ लोटल्यावर कुबेराकडे इंद्र आला. इंद्र आला त्यावेळीं तेथें हजर असलेले सर्व देव त्याचा सत्कार करण्यासाठीं उभे राहाले. पण आदित्यशर्मा अन्यमनस्क असल्या कारणानें उभा राहाला नाहीं. इंद्राला राग आला. त्यानें त्याला शाप दिला कीं "तो मर्त्यलोकांत परत जाईल." परंतु सुलोचनेनें आपल्या पतीच्या वतीनें इंद्राची माफी मागितली. तेव्हां इंद्र म्हणाला—"माझा शाप मला परत घेतां येणार नाहीं. त्याच्या ऐवजीं त्याचा मुलगा मर्त्यलोकांत



जाऊं शकेल, एवढाच बदल मी करूं शकेन."

त्याप्रमाणें आदित्यशर्मा आपला मुलगा गुणशर्मा याला मर्त्यलोकांत आपल्या मामा-कडे पोंचता करून अलकापुरीस परत आला.

उज्जैन येथें गुणशर्मा व उज्जैनचा राजा महासेन दोघांची मैत्री जमली. गुणशर्माला कांहीं दिव्य मंत्रविद्या अवगत होत्या. तो एक तर फार सुंदर होता त्यांत सर्व विद्या व शास्त्र यांतहि तो पंडित होता. म्हणून राजाची त्याच्यावर खास मर्जी होती. राजा व राणी अशोकवती दोघांना प्रसन्न करण्यासाठीं गुणशर्मा नृत्य गान व वीणा-वादन करी.

हळूहळू अशोकवती गुणशर्माच्या गुणांवर इतकी भाळली कीं राजाच्या परवानगीनें गुणशर्मा जवळ वीणावादन शिकण्याचें मिश करून तिनें त्याला आपल्या प्रेमबंधनांत बांधण्याचा यत्न सुरू केला. शेवटीं तिनें त्याचा वध करण्याची व आत्महत्या करून घेण्याची धमकी देऊन देखील पाहिलें. म्हणून गुणशर्मानें चातुर्यानें घाईंत तसें कांहीं करूं नये असें तिला सांगून आपली कशी तरी सुटका करून घेण्याचें ठरविलें.

पुढें कांहीं दिवसांनीं उज्जैनचा राजा महासेन याला सोमक नांवाच्या त्याच्या एका शत्रूशीं युद्ध करावें लागलें. ती संधी साधून विक्रमशक्ति नांवाच्या एका गौड राजानें उज्जैनच्या राज्यावर स्वारी केली. दोन शत्रूंच्या मध्यें सांपडलेल्या महासेन राजाला गुणशर्मानें आपल्या अंतर्धान विद्येचा प्रयोग करून सहाय्य केलें. तो रात्रीं विक्रम-शक्तीच्या शिबिरांत शिरला आणि त्याला म्हणाला—"राजा ! मी विष्णूचा दूत आहें. तूं वैष्णव भक्त आहेस म्हणून स्वतः विष्णूनें मला तुझ्याकडे पाठवून तुला या युद्धांतून आपलें अंग काढून घेण्यास त्याचा सल्ला कळविण्यास सांगितलें आहे. तूं महासेनाशीं संधी करून परत निघून गेला नाहींस तर तुझ्यावर व तुझ्या राज्यावर ईश्वरी कोप होईल."

विक्रमशक्ती तो विष्णूचाच निरोप आहे असें समजून उज्जैनहून स्वदेशीं निघून गेला. महासेननें सोमकचा पराभव केला. त्यानंतर पुढें कांहीं दिवसांनीं विक्रमशक्तीला आपली फसवणूक झाल्याचें कळल्यावर त्यानें महा-सेनशीं द्वन्द्वयुद्ध केलें. दोघांचें द्वन्द्वयुद्ध चालू असतां महासेनचा पाय घसरला व तो खालीं पडला. विक्रमशक्तीनें त्याला ठार करण्यासाठीं आपली तलवार वर केल्या-बरोबर गुणशर्मानें चक्र फेंकून त्याचा हात वरच्यावर कापून टाकला व त्याला ठार केलें. अशातऱ्हेनें महासेन बांचला व त्याच्या हातीं विक्रमशक्तीनें राज्यदेखील आलें.

महासेनबरोबर गुणशर्मा पुन्हां उज्जैन नगरी परत आला. अशोकवतीनें पुन्हां त्याचें मन आपल्याकडे वळविण्याची खटपट सुरू केली. परंतु गुणशर्माचें मन अढळ राहालेलें पाहून तिनें त्याच्यावर खोटा आरोप लावला कीं दुष्ट हेतूनें अनेक वेळां त्यानें अधिक प्रसंग केला. राजानें मागचा





पुढचा कांहीं एक विचार न करतां त्याचा वध करण्याचें ठरविलें. परंतु उघडपणें तसें करणें शक्य नव्हतें. कारण त्यानें अनेक वेळां त्याचा जीव वांचविला होता. म्हणून अगदीं निराळ्या तऱ्हेनें त्याचा वध करण्याचें राजानें ठरविलें.

एक दिवशीं राजा भर दरबारांत म्हणाला—"मी आजपर्यंत या गुणशर्माला आपला एक स्नेही समजून वागवीत आलों. परंतु माझा शत्रु विक्रमशक्ति यानें एका हेराला एक सैंपाकी म्हणून माझ्याकडे पाठविलें. त्यानें माझ्या अन्नांत विष कालवलें होतें. त्या वेळीं गुणशर्मानें मला वेळींच सावध करून वांचविलें होतें. परंतु माझा पूर्ण विश्वास संपादन करण्यासाठीं तो त्याचा डाव होता. नंतर त्यानें आम्हां दोघांकडून पैसा उपटून आमचा समेट करून दिल्याचें दर्शविलें." असें सांगून राजानें अशा राजद्रोह्याला शिरच्छेदाशिवाय दुसरी शिक्षा नाहीं असेंदेखील सांगितलें.

राजाचे शिपाई गुणशर्माला कैद करण्यासाठीं पुढें होतांच अंतर्धान विद्येचा प्रयोग करून वाटेंत येणाऱ्या शिपायांना ठार करीत. तो पळून गेला आणि उज्जैनच्या दक्षिणेकडील एका राज्यांत जाऊन पोंचला. एका जागीं अग्निदत्त नांवाचा एक ब्राह्मण वटवृक्षाखालीं आपल्या शिष्यवृंदास शिकवीत बसला होता. त्यानें त्याला नम्रपणें नमस्कार केला आणि आपलें पूर्ववृत्त निवेदन करून आपल्या आश्रमांत ठेवून घेण्यास विनंती केली. त्या ब्राह्मणानें आनंदानें तें कबूल केलें.

अग्निदत्ताचें घर मोठें होतें. त्याच्याकडे गाईगुरें पण पुष्कळ होतीं. जमीनजुमला पण बराच होता. त्याला सुंदरी नांवाची एकुलती एक सुंदर कन्या होती. गुणशर्मा तिच्याशीं लग्नाला तयार झाला तर त्याच्याशीं



तिचें लग्न करून देऊन त्याला आपला घरजांवई करून घ्यावें असें त्यानें आपल्या मनाशीं योजलें होतें. गुणशर्माला ज्योतिषहस्तमुद्रादिकाची चांगली माहिती आहे हें कळल्यावर त्यानें त्याला मुलीचा हात पाहून तिचें भविष्य सांगावें असें सांगितलें.

गुणशर्मानें तिच्या नाकावर व कंठाखालीं वक्षस्थलावरचा तिळ पाहून हिला सवतींचा योग आहे, असें भविष्य वर्तवलें.

"हें कांहीं अवलक्षण म्हणतां येणार नाहीं. कारण कोणा भाग्यवानालाच अनेक पत्नींचा योग असतो." अग्निदत्त म्हणाला.

कांहीं दिवसांनंतर यज्ञशर्मानें आपल्या मनांतला हेतु त्याला कळविला. म्हणाला—"मला हीच एक मुलगी. हिच्याशीं लग्न करून घे."

"मला याहून जास्त आनंदाची गोष्ट ती काय वाटणार ? परंतु उज्जैनच्या राजानें माझ्याशीं जो दुर्व्यवहार करून माझा अपमान केला आहे त्याची त्याला अद्दल घडविल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं."

"तूं एवढा विद्वान व पंडित व तूं हें सर्व काय खुळ्यासारखा बोलतो आहेस ! त्या मूर्खानें तुझा अपमान केला म्हणून तुझा



मोठेपणा कमी होईल का ? की अशोकवतीच्या वागण्यानें तुला स्त्री जातीचाच राग आला आहे ?" अग्निदत्तानें विचारलें.

"तसें कांहीं नाहीं! उज्जैनचें राज्य येथून फार दूर नाहीं. तेथील राजा मला त्रास देण्यास सहजीं इकडे येऊं शकेल. एका जागीं राहण्यापेक्षां देशाटन करण्याचा विचार आहे." गुणशर्मा म्हणाला.

"शास्त्रांत सांगितलें आहे कीं अग्निकार्य किंवा पितृकार्य करण्याची शक्ति ज्यांना नाहीं त्यांनाच तीर्थयात्रेचा अधिकार असतो. तुझ्यासाठीं मी एक स्वतंत्र पाताळगृह बनवून तुझ्या रक्षणाची सर्व व्यवस्था करून देतों. तूं माझ्या मुलीशीं लग्न करून घेऊन येथेंच सुखानें रहा." अग्निदत्तानें आग्रह केला.

"सुंदरीसारख्या सुंदर मुलीशीं लग्नाला कोण तयार होणार नाहीं ? पण ईश्वराराधना करून त्या कृतघ्न महासेनाला प्रायश्चित्त करायला भाग पाडीपर्यंत मी लग्नाला तयार नाहीं."

अग्निदत्त त्याला कबूल झाला. त्यानें गुणशर्मासाठीं एक सुंदर पाताळगृह बांधून त्याला कुमारमंत्र नांवाचा मंत्र शिकविला व त्याचा जप करायला सांगितलें. गुणशर्मानें अनन्यभावें कुमारमंत्राचा जप करून कुमारस्वामीला प्रसन्न करून घेतलें. कुमारस्वामीनें त्याला अक्षय धनराशी दिली. नंतर त्यानें सुंदरीशीं विवाह करून घेऊन एक मोठें सैन्य उभें केलें व उज्जैन नगरीवर स्वारी करून महासेन राजाचा पराभव केला आणि अशोकवतीला तिच्या दुष्ट आचरणाबद्दल शिक्षा केली. नंतर तो स्वतः उज्जैनच्या गादीवर बसला. अनेक राजकन्यांशीं त्याचें लग्न झालें व एक चक्रवर्ती म्हणून राज्य करूं लागला.





# मेघबालक

त्रिगर्तदेश शेतकऱ्यांचाच एक देश होता. जमीन सुपीक व पाणी मुबलक म्हणून दोन दोन तीन तीन पिकें निघत. निसर्गाची एवढी कृपा असल्यावर आणखी काय पाहिजे ? परंतु हें सर्व सुख वरुणदेवतेच्या कृपेनें आपल्याला लाभलें आहे ह्या गोष्टीची त्यांना फिकीर नव्हती. कारण इतर सर्वदेवी व देवतांची ते आराधना करीत.

म्हणून वरुणानें आपल्या सेवकांची, म्हणजे मेघांची एक सभा बोलवून त्यांना असें सांगितलें कीं त्रिगर्तदेशाकडे त्यांनीं जाऊं नये. म्हणून त्या वर्षी पावसाळ्यांत एक थेंब देखील पाऊस पडला नाहीं. लोक आकाशाकडे नजर लावून उभे होते. परंतु पाण्याचा एक थेंबदेखील पडेल तर शपथ! सर्वत्र हाहाकार उडून गेला. वरुणाला फार आनंद झाला.

परंतु त्याच्या या आनंदांत एका लहानग्या मेघबालकाच्या पोरकटपणामुळें थोडेंसें विरजण पडलें. त्यानें कोणाला विचारलें नाहीं कीं कोणाची पर्वा केली नाहीं आणि त्रिगर्त देशांत जाऊन थोडी वृष्टी करून आला.

त्रिगर्तच्या रहिवाशांना आनंद झाला. पाऊस आलेला पाहून त्यांनीं शेतें नांगरून बियाणें लावलें.

तिकडे मेघमंडळींत खळबळ उडून गेली त्यांनीं त्या मेघबालकाला बोलावून त्याची खूप हजेरी घेतली. म्हणाले—"आम्ही सर्वांनीं मिळून त्रिगर्तदेशाचा पूर्ण बहिष्कार करण्याचें ठरविलें व तुला काय हा मूर्खपणा सुचला ?"

तो म्हणाला—“लहान तोंडीं मी मोठा घास घेऊं नये, तरी तुम्हांला माझा खरा हेतू कळूं नये याबद्दल आश्चर्यमात्र वाटतें. या निमित्तानें त्यांच्याजवळ बियाणासाठीं म्हणून ठेवलेलें धान्य होतें तें देखील त्यांच्याकडून मी खर्च करविलें. आतां त्यांना त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं.”

मोठे मेघ त्रिगर्त देशाची उडालेली गंमत पाहाण्यासाठीं त्या देशाच्या आकाशांत घिरट्या घालूं लागले. मेघबालकानें सांगितल्याप्रमाणें त्रिगर्त देशांत हाहाकार उडून गेला होता. पावसाळा सुरू झाला असा विचार करून त्यांनीं बियाणें लावलें. परंतु त्यानंतर पाऊस पडलाच नाहीं. अशा तऱ्हेनें त्यांची सर्व प्रकारें निराशा झाली. म्हणून ते आकाशाकडे टक लावून वरुणदेवाला प्रसन्न करण्यासाठीं त्याचें स्तवन करूं लागले.

त्यांची ती स्थिति पाहून वरुणदेवाच्या हृदयाला पाझर फुटला. मेघ त्या मेघबालकाला म्हणाले—“पाहिलेंस, तुझ्या त्या थट्टेचा कसा दुष्परिणाम झाला आहे तो?” असें त्याला दटावून त्यांनीं त्रिगर्तदेशावर पावसाची वृष्टी केली.

त्यांच्या प्रार्थनेला स्वीकारून वरुणदेवानें कृपा केली म्हणून त्रिगर्तदेशाचे रहिवासी त्याची पूजा करूं लागले. त्या देशावर पुन्हां कधीं अनावृष्टी झाली नाहीं. तो एक शस्यश्यामलदेश म्हणून जगांत प्रसिद्ध झाला.

मेघबालकानें बालिशपणानें जें कांहीं केलें त्याचा परिणाम शेवटीं चांगलाच निघाला. त्रिगर्तदेशाच्या रहिवाशांना वरुणदेवाची पूजा केल्यास अनावृष्टीचें संकट येणार नाहीं हें कळलें व रुष्ट झालेल्या वरुणदेवाच्या मनाचें देखील समाधान झालें.





# परोपकारी गोपाळ

एकदां डोंगरावरची जत्रा होती व गोपाळ सकुटुंब जत्रा पाहायला गेला. तसें तें लहानसें निर्जनस्थानीचें एक खेडे गांव होतें. परंतु जत्रेच्या वेळीं तेथें लोकांची गर्दी होई. पताका व तोरणें बांधून आरास करून लोक आपलीं दुकानें लावीत. पाळणा, चकरी वगैरे वगैरे गमती पण पुष्कळ असत. गोपाळ एका धर्मशाळेंत उतरला होता. डोंगराखालच्या ओढ्यावर तो स्नानाला गेला होता. स्नान करून परत येत असतां एका म्हाताऱ्याच्या तोंडचें हे शब्द कानीं पडले—“आतां नाहीं चालवत बुवा!” असें म्हणत तो खालीं बसला. तो म्हातारा गोपाळच्या ओळखीचा होता. गोपाळला जवळ आलेला पाहून म्हातारा म्हणाला—“गोपाळ! तूं देवासारखा पावलास बघ! एक कृपा कर या म्हाताऱ्यावर. या डब्यांत एका गाठोड्यांत पैसे बांधून ठेवले आहेत. तेवढे देवाच्या हुंडींत टाक. कसाबसा येथवर आलों, पण आतां पुढें पाऊल नाहीं टाकवत. येतांना प्रसाद तेवढा आणून दे.”

त्यानें दिलेला डबा घेऊन गोपाळ पायवाटेनें डोंगर चढूं लागला. एका जागीं त्याला एक लहान मुलगी हरवून गेल्यामुळें “आई, आई!” म्हणून रडत असलेली दिसली. ती जत्रेच्या गर्दीकडे चालली होती.

गोपाळनें तिला उचलून घेतलें व तिच्या पाठीवर हात फिरवून व प्रेमानें गोंजारून विचारलें—“काय नांव तुझें बाळ? कोठें गेली तुझी आई?” त्यानें आजूबाजूला पाहिलें. पण कोणी दिसलें नाहीं. बोबड्या आवाजांत मुलीनें आपलें नांव मालती असल्याचें व



[ श्री. मा. गो. मोरे



त्यांचें सामान कोणी चोरानें उचलून नेल्याचें सांगून रडूं लागली. 'आई आई!' म्हणून तिचा तोंडानें सारखा जप चालू होता.

गोपाळ जत्रेच्या गर्दीत मुलीची आई भेटेल म्हणून बराच वेळ फिरला. त्यानें एक केळें मुलीला खायला दिलें. तिनें पाळण्यांत बसतें म्हटल्याबरोबर गोपाळनें डबा खालीं ठेवून तिला पाळण्यांत बसविलें. नंतर मुलीला उचलून घेऊन पुन्हां डबा उचलायला म्हणून खालीं वांकला तर डबा नाहींसा झालेला.

त्यानें जवळ उभे असलेल्या दोघां तिघांना त्यांनीं डबा पाहिला का विचारलें. तेव्हां एक जण म्हणाला—"तुम्ही मुलीला पाळण्यांत बसवायला गेलांत तेव्हांच एक जण पाळण्यांतून उतरला व डबा उचलून घेऊन निघून गेला, आम्हांला वाटलें तो डबा त्याचाच असावा." त्यांनीं त्या माणसाचें थोडक्यांत वर्णन पण केलें. म्हणाले—"त्याच्या डोक्याला पागोटें होतें. हिरव्या रंगाचा सदरा घातला होता. लांब मिशा व दाढीपण होती त्याला.

गोपाळ त्या मुलीच्या आईला हुडकत होता. त्याच बरोबर त्याला पागोटें व हिरवा सदरा घातलेल्या दाढी मिशावाल्या माणसाचा पण त्या डब्यासाठीं शोध करावा लागला.

इतक्यांत एक बाई "मालती!" म्हणून ओरडत जवळ आली व तिनें गोपाळच्या हातांतून मुलीला ओढून घेतलें.

"ही मुलगी तुमचीच का? किती वेळ झाला, मुलगी रडत आहे!" गोपाळ म्हणाला.

त्या बाईनें मुलीला पोटाशीं धरून व तिच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवीत गोपाळला दटावून विचारलें—"मुलीच्या अंगावरचे सर्व दागिने काढून घेऊन लबाडा! मुलीच्या आईला शोधत असल्याचें खोटें बोलतोस होय!"





मुलीला सुखरूप पोंचतें केल्याबद्दल आभार मानण्याचें सोडून त्याच्यावर चोरीचा आळ लावल्याचें ऐकून गोपाळला आश्चर्याचा धक्काच बसला व त्यानें त्याला ती मुलगी केव्हां व कशी मिळाली हें सांगितलें. मालतीनें पण तिला पाळण्यांत बसायला व केळें खायला मिळाल्याचें सांगितल्यावर तिचा गोपाळच्या बोलण्यावर विश्वास बसला. नंतर ती दागिने गेले तर गेले, मुलगी सुखरूप मिळाली याबद्दल मनाचें समाधान करून घेऊन मुलीला घेऊन निघून गेली.

आतां गोपाळला म्हाताऱ्याच्या डब्याची काळजी वाटूं लागली. काय करावें, गोपाळला सुचेना. याच विचारांत तो धर्मशाळेंत गेला. पोंचतांच त्याच्या बायकोनें त्याला विचारलें—"आपला मुलगा दिसला का कोठें? तुम्हांला यायला बराच वेळ झाला व मुलगा पण दिसला नाहीं तेव्हां मला वाटलें कीं तुम्ही दोघे कोठें तरी फिरत असाल. पण बरोबर मुलाला न पाहून विचारतें आहें."

"असेल गर्दीत कोठें तरी गंमत पहात फिरत. येईल थोड्या वेळानें!" गोपाळनें अन्यमनस्क पणें उत्तर दिलें.

अहो, असें काय बोलतां? सकाळीं खाऊन निघाला तो अजून आला नाहीं! आतां जेवायची वेळ होऊन गेली तरी आला नाहीं म्हणून जास्त काळजी वाटते. जाऊन पाहून या जरा." बायको म्हणाली.

"आतां पर्यंत मी या गर्दीत कोठें कोठें फिरलों, काय हरवलें व काय गावलें हें देखील मला माहीत नाहीं. एका चोरानें चोरी केली आणि सर्व जबाबदारी येऊन पडली आहे माझ्या डोक्यावर. आतां नाहीं मी जात कोठें भटकायला." गोपाळ म्हणाला.

सुदैवानें त्याच वेळीं दहा वर्षें वयाचा त्याचा मुलगा धांवत धापा टाकीत आला आणि म्हणाला—"आहो बाबा! ठाऊक आहे का काय झालें तें! त्याच्या हातांत तेव्हां एक चाकू, एक दाढी व हा डबा होता." तो डबा पाहतांच गोपाळच्या जिवांत जीव आल्यासारखें झालें.

घडलेलें सर्व वृत्त मुलगा सांगूं लागला. म्हणाला—"सकाळीं मी धर्मशाळेंतून निघालों आणि माकडांची गंमत पहात हिंडत होतों. तेव्हां एक लाल लाल पागोटें वाला, हिरवा सदरा घातलेला एक मनुष्य येऊन मला विचारूं लागला—"खाणार का रे?" आणि त्यानें फुटाणे दाखविले. मी जवळ जातांच त्यानें माझा हात धरला व दुसऱ्या हातानें चाकू दाखवून म्हणाला—'ओरडलास तर खबरदार! चल माझ्याबरोबर!' असें सांगून तो मला एका खडकाळ जागेंत घेऊन गेला.

"नंतर त्यानें आपल्या हातांतला चाकू दगडावर ठेवून दिला व माझ्या कानांतले डूल काढूं लागला. तेव्हां एक गोष्ट आली माझ्या लक्षांत. त्याची दाढी नकली होती. मी चटकन चाकू उचलून घेतला आणि त्याची दाढी ओढत ओरडलों "चोर! चोर!"



"तिकडे लोक धांवले चोर पळूं लागला. मी त्याचा डबा उचलला व चोराच्या पाठी मागें धावूं लागलों. परंतु चोर ओढ्या पलीकडे पळत निघून गेला व मी त्याची नकली दाढी, चाकू व हा डबा घेऊन आलों आहें."

आपल्या मुलाचें साहस व प्रसंगावधान पाहून गोपाळनें आपल्या मुलाची पाठ थोपटली. नंतर सर्वांनीं देवळांत जाऊन देवदर्शन केलें. गोपाळनें म्हाताऱ्याच्या डब्यांतले सर्व पैसे हुंडींत ओतले. गोपाळ म्हाताऱ्याकडे जायला निघाला तेव्हां त्याचा मुलगा पण त्याच्या बरोबर निघाला. ओढ्याच्या काठीं तो म्हातारा विश्रांती घेत पडला होता तेथें आणखी एक मनुष्य विश्रांती घेत पडून असलेला त्यांना दिसला."

"आजोबा! कोण हो हा?" गोपाळनें त्या म्हाताऱ्याला डबा देत त्या माणसाकडे बोट दाखवून विचारलें.

"नाहीं माहीत बुवा! पायांत कांटा मोडला कीं खिळा, नकळें, एक पाऊल देखील पुढें टाकणें अशक्य झालें म्हणून पडून आहे बिचारा!" म्हातारा म्हणाला.

तें ऐकून तो झोपलेला मनुष्य उठून उभा राहाला. गोपाळच्या मुलाला पाहून त्याची पांचावर धारण बसली. तो त्याला ओळखून म्हणाला—"बाबा! हाच तो चोर!"

चोराला पाय दुखत असल्यामुळें एक पाऊल देखील पुढें टाकवत नव्हतें. गोपाळनें त्याला धरलें. त्याच्या जवळ मुलाचा एक डूल सांपडला. गोपाळनें त्याला पोलीस ठाण्यावर पोंचतें केलें व म्हाताऱ्याला प्रसाद देऊन सकुटुंब घरीं परत आला.





# न्यायपीठ

कुंदनपुराचा राजा चंदन याला वाटे कीं न्याय देण्याची उत्तम व्यवस्था त्याच्या राज्यांत असली पाहिजे. न्यायविचारांत चूक म्हणून होतां कामा नये. परंतु न्यायाधीश किती झाला तरी मनुष्यच ना आणि मनुष्याच्या हातून चूक नकळत होतेच.

परंतु ही चूक सुद्धां घडतां कामा नये या विचारानें चंदन त्यासाठीं तपश्चर्या करूं लागला. धर्मदेव प्रसन्न होऊन समोर उभा राहाला आणि त्यानें त्याला विचारलें— "कोणत्या हेतूनें तूं ही तपश्चर्या करीत आहेस?" राजा म्हणाला—"देवा! मला एक न्यायपीठ द्यावें, कीं त्यावर बसून कोणी खोटें बोलला कीं त्याचें तोंडच वांकडें व्हावें."

धर्मदेवानें त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला न्यायपीठ दिलें आणि अंतर्धान पावला. राजा तें न्यायपीठ वाजत गाजत राजधानींत घेऊन आला. आपल्या दरबारांत त्याची स्थापना केली व त्याचा महिमा वर्णन करून सर्वांना सांगितला. जो कोणी त्यावर उभा राहून किंवा बसून खोटें बोलला त्याचें तोंड वांकडें झालेलें पाहून सर्वांना त्या गोष्टीचा प्रत्यय पण आला. तेव्हां पासून राजाची कीर्ती राज्यभर पसरली कीं त्याचा दरबारीं कधीं चुकीचा न्याय मिळणें शक्यच नाहीं. राजाच्या मनाचें अशाप्रकारें समाधान झालें.

"आतां जोंपर्यंत माझ्याकडे हें न्यायपीठ आहे तोंपर्यंत माझ्या राज्यांत अन्याय होणें शक्य नाहीं." असें घमेंडीत राजा म्हणाला.

तें ऐकून मंत्री स्मित करून म्हणाला— "महाराज! न्यायपीठाविषयीं इतका अंध-विश्वास मनांत बाळगणें बरोबर होणार नाहीं. याला फसवूनदेखील अन्याय करणें कोणाकोणाला शक्य होईल."

राजाला राग आला—"न्यायपीठाचा असा अपमान! याहून जास्त उर्मटपणा काय असूं शकेल! तूं तीन दिवसांच्या आंत या न्यायपीठाला पण फंसविणें शक्य आहे हें साबीत करून दाखविलें नाहींस तर तुझा शिरःच्छेद करण्यांत येईल." राजानें बजावून मंत्र्याला पाठवून दिलें.

कुंदनपुरांत हेमकुरंगी नांवाची एक वेश्या रहात असे. तिला आपल्या सौंदर्याचा अपार गर्व होता. म्हणून ती सर्वांचा पदोपदीं अपमान करी. मंत्र्यानें तिचे व राजाचे डोळे एकदम उघडावे यासाठीं बेत केला.

त्यानें एका योग्याचें सोंग केलें व हेमकुरंगीच्या दारासमोर जाऊन बसला. येणारा जाणारा त्याला पैसे, सोनें देई व तो त्याचें दुप्पट त्यांना देऊन त्यांना निरोप देई.

तें पाहून हेमकुरंगीच्या तोंडाला पाणी सुटलें. रात्रीं जवळपास कोणी नाहीं हें पाहून ती योगिराजाकडे आली व तिनें आपलें सर्व सोनें व रत्नें योगिराजासमोर ठेवलीं. "दुसऱ्यादिवशीं येऊन घेऊन जा. दुप्पट करून देतों" असें सांगून योग्यानें तिला निरोप दिला आणि सर्व सोनें व रत्नें आपल्या झोळींत ठेवून दिलीं.



हेमकुरंगीनें आपले नोकर योगिराजावर नजर ठेवण्यासाठीं नेमले होते. सकाळीं येतांच तिनें योगिराजाला विचारलें— "योगिराज! मी दिलेलीं रत्नें व सोनें दुप्पट झालें आहे ना तें द्यावें."

"तुझी एकहि वस्तु माझ्याकडे नाहीं." योगिराज म्हणाले.

हेमकुरंगीला भयंकर राग आला. योगी आहे असा विचार करून मी आपलें सर्वस्व

श्री. का. म. खासनीस

याला दिलें आणि हा मला फंसवतो आहे. तिनें योग्याविरुद्ध राजाकडे आपलें गाऱ्हाणें सांगितलें. योगी त्या सर्वाला कबूल झाला व हेमकुरंगीबरोबर निमूटपणें राजदरबारीं गेला.

हेमकुरंगीचें गाऱ्हाणें ऐकून राजानें योग्याला न्यायपीठावर उभा राहून उत्तर द्यायला सांगितलें. हेमकुरंगीकडे कुबडी टाकून योगी म्हणाला—"या हेमकुरंगीची एक फुटकी कवडीदेखील माझ्याकडे नाहीं. असें सांगून तो खालीं उतरला." त्याच्या तोंडांत कांहीं बिघाड झाला नाहीं.

इतकें सपशेल खोटें बोललेलें ऐकून हेमकुरंगी स्वतःला आवरूं शकली नाहीं. योग्याची कुबडी हातांत घेऊन योग्याकडे ती दाखवून व न्यायपीठावर उभी राहून ती ओरडून म्हणाली—"या जोगड्याला मी आपलें सर्व सोनें व रत्नें दिलीं आहेत. पण यानें मला त्यांतली एक देखील वस्तु परत दिली नाहीं." तिच्या तोंडांतलें वाक्य पुरें होण्यापूर्वीच तिचें तोंड वांकडें झालें व सर्व लोक हंसू लागले.

मंत्र्यानें योग्याचा वेष काढून फेंकून दिला व घडलेलें सर्व वृत्त निवेदन करून म्हणाला—"पाहिलेंत तुमच्या या न्यायपीठानें हेमकुरंगी विरुद्ध साक्ष देऊन किती अन्याय केला!"

हेमकुरंगी जाणून बुजून खोटें बोलली नव्हती. तिच्या हातांत योग्याचे जें दाणकें होतें त्यांतच सर्व सोनें व दागिने ठेवले होते. म्हणून तिच्या रूपांत बदल झाला.

तेव्हां कोठें राजाला आपल्या त्या न्यायपीठाबद्दल जो गर्व वाटत होता तो कमी झाला.





# उत्तरकांड

अगस्त्य ऋषीनें रामाला वाली व सुग्रीव या दोघां बंधूंची कथा सांगितली ती अशी.

मेरु पर्वताचें मधलें शिखर देवांना देखील पूज्य असें आहे. त्यावर चतुर्मुख ब्रह्मदेव याचें वास्तव्य आहे.

एकदां ब्रह्मदेव योगाभ्यास करीत असतां डोळ्याला आलेला पाण्याचा थेंब त्यानें पुसला तेव्हां त्यांतून एक वानर प्रगट झाला. ब्रह्मदेवानें त्याला कांहीं दिवस मेरुपर्वतावर कंदमुळें व फळें खावयास सांगितलें. त्यानंतर तो वानर दिवसभर झाडावर हिंडेफिरे व त्याला जीं फळें व कंदमुळें मिळत तीं खाऊन रात्रीं ब्रह्मदेवाकडे परत येई.

एकदां त्या वानराला तहान लागली तो मेरुपर्वताच्या उत्तरेकडील शिखरावर गेला. तेथें त्याला एक सरोवर दिसलें. त्यांत पुष्कळ पक्षी विहार करीत होते. वानर आपलें अंग झाडून सरोवराच्या कांठीं जाऊन बसला. तेव्हां त्याला पाण्यांत आपली पडछाया दिसली. त्याला वाटलें कीं तो कोणीतरी दुसरा वानर असावा व त्याला आपला शत्रु समजून त्याला मारण्यासाठीं त्यानें पाण्यांत उडी मारली. पण दुसरा वानर असेल तर ना मिळेल! म्हणून तो पुन्हां काठावर येऊन बसला. तेव्हां त्याला एका सुंदर स्त्रीचें रूप आलें होतें



त्याच वेळीं इंद्र व सूर्य ब्रह्मदेवाच्या दर्शनास जाऊन परत येत होते. त्यांनीं त्या सुंदर स्त्रीला पाहिलें. त्या रूपावर दोघे इतके भाळले कीं तिच्याबरोबर त्यांनी विहार केला. त्या दोघांपासून तिला दोन मुलें झालीं. तेच वाली अन सुग्रीव. इंद्रानें आपला मुलगा वाली याला एक सुवर्ण-कमळांचा हार उपहार म्हणून दिला आणि सूर्यानें आपला मुलगा सुग्रीव याच्याशीं हनुमानाची मैत्री करून दिली.

त्यानंतर त्या वानराला स्वतःचें वानररूप मिळालें. त्यानेंच आपल्या दोघां मुलांना लहानाचें मोठें केलें. त्या वानराचें नांव ऋक्षरचस असें होतें. ब्रह्मदेवाच्या आज्ञे-प्रमाणें ऋक्षरचस आपल्या दोघां मुलांना बरोबर घेऊन किष्किंधेला आला. तेथें त्यानें वानरांचा राजा म्हणून स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला आणि सप्तखंडाचा वानर चक्रवर्ति म्हणून उपाधि ग्रहण केली." असें सांगून अगस्त्य ऋषींनीं वालीसुग्रीवांची जन्मकथा पूर्ण केली.

रामराज्याभिषेक आटोपल्यावर आलेले अतिथि रामाचा निरोप घेऊन आपापल्या राज्यांत निघून गेले. भरताला बरोबर पाठवून जनक महाराजांना, लक्ष्मणाबरोबर कैकेय देशाच्या राजाला निरोप दिला. भरताच्या खास निमंत्रणावरून आलेला काशीचा राजा प्रतर्धन व इतर राजे व महाराजे स्वदेशीं परतले.

रामानें सर्व वानर वीर सुग्रीव, अंगद, हनुमान आदिकांचा सत्कार करण्यांत कोणतीहि उणीव राहूं दिली नाहीं. त्याच-प्रमाणें विभीषण आदिक राक्षसांचा त्यानें सत्कार केला. सर्व रामाची स्तुति करीत आपापल्या राज्यांत परत गेले.

नंतर राजा रामचंद्र सीतेबरोबर नित्य नियमितपणें वन विहार करूं लागले. सीता



गरोदर असल्याचें कळल्यावर राम तिला म्हणाला—"सीते! तुला काम हवें असेल तें निःसंकोचपणें सांगत जा! गरोदर स्त्रीची प्रत्येक इच्छा पुरविणें पतीचें कर्तव्य आहे."

सीता स्मित करून म्हणाली—"मला वाटतें कीं गंगेच्या काठीं ऋषीमुनींच्या आश्रमांत राहून कंदमुळें खाऊन रहावें. वनश्री पाहिली कीं माझ्या मनाला कोण-त्याहि गोष्टीची उणीव म्हणून भासणार नाहीं.

राम म्हणाला—"ठीक! मी उद्यांच तुला वनश्री पाहण्याची व ऋषी मुनींच्या आश्रमांत राहण्याची व्यवस्था करून देतों."

सीतेला असें वचन देऊन राम आपल्या मित्रमंडळींत येऊन बसला. इतक्यांत भद्र नांवाचा दूत आलेला पाहून रामानें त्याला विचारलें—"भद्र! माझ्या विषयीं, सीते विषयीं, माझ्या भावंडांविषयीं व मातांविषयीं माझी प्रजा काय म्हणते हें सांग!"

भद्र म्हणाला—"महाराज! जितके लोक तितक्या गप्पा! रावणाचा आपण जो संहार केलात त्याच विषयीं लोक आपली जास्त प्रशंसा करीत आहेत."

रामाला संशय आला कीं 'जास्त प्रशंसा' या शब्दामागें कांहीं तरी दडलेले व्यंग्य



आहे. म्हणून राम म्हणाला—"भद्र! लोक फक्त प्रशंसाच करीत आहेत? निंदास्तुति दोन्ही निःसंकोचपणें सांग."

"महाराज! आपण समुद्रावर पुल बांधला. रावणाचा वध करून पृथ्वीचा भार हलका केला. आतां रावण सीतेला पळवून घेऊन गेला व आणि त्यानें तिला आपल्या अंतःपुरांत इतके दिवस ठेवून घेतलें. त्यांत आतां सीतेचा काय दोष? व आपण तिची अग्नि परीक्षा करवून घेऊन स्वीकारल्यावर आपला तरी काय दोष! पण या लोकांचें तोंड कोण बंद करणार? ते












म्हणत आहेत कीं तें सर्व ठीक तरी राजानें सारासार गोष्टीचा विचार करायला हवा कीं नाहीं. यथा राजा तथा प्रजा!"

तें ऐकून रामाच्या हृदयाला धक्काच बसला त्यानें तेथें बसलेल्या मित्रांना विचारलें "असेंच तुम्ही देखील कोणाच्या तोंडून ऐकलेंच असेल?"

उत्तर कोणीच दिलें नाहीं. त्यांचे तें मौनच नगारे वाजवून जणूं कांहीं सांगत होतें, "प्रजा तुझी निंदा करीत आहे!"

रामानें एका द्वार पालकाच्या हातीं निरोप पाठवून लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या तिघांना बोलवून आणायला सांगितलें. रामानें तिघांना प्रेमालिंगन करून बसायला सांगितलें. रामाच्या डोळ्यांत त्यावेळीं टिपें आलेलीं पाहून व त्याचा कंठावरोध झालेला ओळखून तिघे चकित झाले. रामानें त्यांना सीतेविषयीं प्रजा काय बोलत आहे हें सांगितलें.

श्रीराम पुढें म्हणाला—"मला माहीत आहे कीं सीता निर्दोष व निष्कलंक साध्वी आहे. प्रत्यक्ष अग्निनारायणानें साक्ष दिल्यावर हा संशय कोणाच्या मनांत कसा काय उद्भवतो, हेंच कळत नाहीं. लक्ष्मणा! तूं पण यावेळीं हजर होतास. ही निंदा असह्य आहे. मी प्राणत्याग करावयास तयार आहें पण सीतेचा परि त्याग करणें मला अशक्य आहे. ही अपकीर्तिपण कशी सहन होणार? प्रजारंजन हें राजाचें प्रथम व आद्य कर्तव्य आहे. राजाला स्वतःचें असें कांहीं नाहीं. पत्नी, पुत्र, बंधु, माता त्याचा कोणी नाहीं. प्रजा हेंच त्याचें अधिदैवत. तिच्या इच्छे-विरुद्ध एक क्षणभरदेखील राजा म्हणविण्याचा अधिकार नाहीं. म्हणून या आद्य कर्तव्याचें पालन करण्यासाठीं जिवापेक्षां जास्त प्रिय अशा सीतेचा परित्याग करणें माझ्या नशिबीं



आलें आहे. लक्ष्मणा, तूं उद्यां सकाळीं सीतेला वाल्मीकि ऋषींच्या आश्रमाशेजारीं वनांत पोंचती कर. हें तुझ्या मनाविरुद्ध कार्य आहे. परंतु तूं नकार देऊं नकोस. सीतेला पण हें सर्व कांहीं सांगूं नकोस. सीतेनें ऋषी आश्रम पाहाण्याची इच्छा व्यक्त केली होती व ती इच्छा पुरी करण्याचें वचन मी तिला दिलें होतें." रामानें एवढें सांगितलें खरें, पण लगेच तोंड फिर-वून घेतलें व हुंदका आवरेनासा झाल्यावर उठून निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं लक्ष्मण सकाळीं सुमंत्रा-कडे गेला. त्यावेळीं त्याचें तोंड उतरलेलें होतें. तो सुमंत्राला म्हणाला—"रामाची आज्ञा आहे कीं सीतेला वनांत ऋषींच्या आश्रमांत पोंचतें करून यावें. रथ तयार करून दे."

सुमंत्रानें त्याप्रमाणें रथ तयार करून आणून उभा केला. लक्ष्मण सीतेला जाऊन म्हणाला—"महाराज सांगत होते कीं आपण ऋषीमुनींचा आश्रम पाहण्याची इच्छा दर्शविली आहे. महाराजांचीं तशी आज्ञा झाली आहे. चलावें. भ्रातृ आज्ञेप्रमाणें पोंचवायला मी बरोबर येत आहें."



तें ऐकून सीतेला आनंद झाला. मुनीपत्नींस वस्त्रालंकार भेट करण्यासाठीं तिला जें कांहीं बरोबर घ्यावेंसें वाटलें तें घेऊन ती आनंदानें निघाली. रथ मंदगतीनें चालला होता. वाटेंत अपशकुन होऊं लागलेले पाहून तिला आश्चर्य वाटलें. तिनें लक्ष्मणाला तसें विचारलें पण. म्हणाली—"भाऊजी! सर्वांच्या तब्येती बऱ्या आहेत ना?" लक्ष्मण दुश्चित्तपणें म्हणाला—"होय! सर्वांच्या तब्येती ठीक आहेत!"

रात्र पडेपर्यंत रथ गोमतीच्या काठीं पोंचला. ती रात्र तेथेंच काढून उजाडतांच



दोघे पुढें निघाले व दुपारच्या सुमारास गंगाकाठीं येऊन पोंचले. गंगेचें दर्शन होतांच लक्ष्मणाचें हृदय उचंबळून आलें व तो स्वत:ला आवरूं शकला नाहीं. तें पाहून सीतेनें चकित होऊन विचारलें—" भाऊजी ! असे रडायला काय झालें एकाएकीं तुम्हांला ? कित्येक दिवसांनंतर आज माझी ही इच्छा पुरी होत आहे. लवकर गंगे पलीकडे पोंचती करून ऋषींचा आश्रम दाखवा. मुनिपत्नींना हीं वस्त्राभूषणें देऊन त्यांचा आशीर्वाद मिळाला कीं माझ्या मनाला बरें वाटेल. तेथें रात्र काढूं व जाऊं परत अयोध्येला. रामदर्शनासाठीं हें मन अधीर होऊं लागलें आहे."

लक्ष्मणानें डोळे पुसले. जवळ उभा असलेल्या नाविकाला बोलावून नाव आणायला सांगितलें. गंगेपार पोंचल्यावर लक्ष्मणानें हात जोडून विनंती केली—" दादानें माझ्या हृदयांत जणुं कांहीं एक भालाच खुपसला आहे. हें दुष्ट काम करण्याची पाळी माझ्यावर यावी यापेक्षां माझें प्राणहरण झालें असतें तर मला बरें वाटलें असतें." कंठावरोध झाल्यामुळें त्याला बोलतांच येईना.

सीता त्याच्याकडे पाहून घाबरून गेली. म्हणाली—" तुम्ही काय बोलता आहां मला मुळींच कळलें नाहीं. साफ स्पष्ट काय तें बोलाल कीं नाहीं ?"

लक्ष्मण स्वत:ला सावरून म्हणाला—" मित्रा समवेत बोलत असतां दादानें तुमची निंदा ऐकली व त्यांनीं तुमचा परित्याग केला आहे. दादाला तुम्ही निर्दोष आहां हें माहीत आहे. परंतु लोकनिंदेस्तव त्याला असें करावें लागलें. तुम्हांला येथें सोडून परत अयोध्येला यायची राजाज्ञा आहे. वाल्मीकि ऋषींचा

आश्रम जवळच आहे. कोणताहि त्रास होणार नाहीं."

तें ऐकून सीता निराश व हताश होऊन मटकन खालीं बसली. थोडा धीर करून म्हणाली—"भाऊजी! कष्ट सहन करण्यासाठींच मला जन्म मिळाला आहे. मागच्या जन्मीं मी काय पाप केलें होतें, देवच जाणें. वनवासांत रघुनाथांबरोबर असल्यामुळें मला राजवाड्याचें सुख मिळालें होतें. पण आतांचा हा वनवास पतिविना किती कष्टाचा होईल हें तरी मी कोणाजवळ सांगूं! वाल्मीकि मुनींनीं रामानें तुझा कां परित्याग केला असं विचारलें तर मी काय उत्तर देऊं! या गंगेंत मी बुडून मेलें तर सुटेन. पण तुमच्या वंशवृक्षाची वृद्धि खुंटेल. हा पतिद्रोह तरी मी कसा करणार! तुम्ही आपल्या दादाच्या, महाराजांच्या आज्ञेचें पालन केलेंत. आतां तुम्ही जा. माझ्या सासवांना माझ्या नम्र नमस्कार सांगा व आपल्या महाराजांना साष्टांग नमस्कार सांगून मी त्यांचा कुशल क्षेम-समाचार विचारला होता असें सांगा. त्यांचा निंदेचा कलंक धुवून निघून त्यांच्या हातून त्यांच्या भावंडांना व प्रजेला सुख मिळावें हीच माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे."

लक्ष्मण काय बोलणार? मान खालीं करून व नमस्कार करून तो निघून गेला. गंगेपार जाऊन सीतेकडे दुःखी मनानें पहात रथांत बसून निघून गेला.

सीता कांहीं वेळ रथाकडे पहात राहिली व त्या निर्जन गंगेकाठीं रडत राहिली. तिच्याबरोबर वनांतील वृक्ष व पशुपक्षीपण अश्रु ढाळूं लागले.





# मुदावतीची गोष्ट

विदुरथ नांवाच्या राजाला दोन मुलगे होते. एकाचें नांव सुनीत होतें व दुसऱ्याचें सुमति. त्याला मुदावती नांवाची एक मुलगी पण होती. मुदावती सुंदर होती तितकीच, साहित्य व संगीत विद्येंत प्रवीण होती.

एके दिवशीं तो शिकारीसाठीं रानांत गेला. शिकार करीत हिंडत असतां त्याला एक गुहा दिसली. ती पुष्कळ मोठी रुंद व खोल होती. ती गुहा किती मोठी व सुंदर आहे व आंत कोण राहातें याची माहिती काढण्याच्या विचारांत तो होता. तेवढ्यांत त्याला एक मुनि त्याच बाजूला येत असलेले दिसले. त्यानें नमस्कार करून त्यांना विचारलें—"मुनीवर्य! ही गुहा कशी काय झाली? केव्हांपासून आहे ही येथें?"

"राजा! ही गुहा पाताळलोकीं जाते. हिच्यांत एक राक्षस राहातो. त्याचें नांव कुजुंभ. तो या गुहेच्या वाटेनें या भूलोकांत येतो. त्याच्याजवळ सुनंद नांवाचें एक मुसळ आहे. त्याच्या मदतीनें तो वाटेल त्याला जिंकूं शकेल. विश्वकर्म्यानें हें मुसळ तयार केलें. पण या राक्षसानें तें चोरून नेलें. तें कळल्यावर विश्वकर्म्यानें त्याला शाप दिला कीं जर का एकाद्या स्त्रीच्या हाताचा स्पर्श झाला तर तें मुसळ निरुपयोगी होईल. पण त्या शापाची गोष्ट निकुंज राक्षसाला अद्याप कळलेली नाहीं. त्यानें या मुसळानेंच ही गुहा खोदून काढली." असें सांगून मुनी पुढें निघून गेले.

त्यानंतर विदुरथ घरीं परत आला. कुजुंभ राक्षसाविषयीं त्यानें जें कांहीं ऐकलें



हाने तें सर्व त्यानें आपल्या कुटुंबांतल्या मर्वांना व आपल्या दरबारांतल्या सर्व मानकऱ्यांना सांगितलें.

पुढें कांहीं दिवसांनीं मुदावती आपल्या मैत्रिणींबरोबर वनविहार करीत असतां कुजुंभ राक्षसानें तिचें सौंदर्य पाहिलें व तिला उचलून घेऊन पाताळ लोकांतल्या आपल्या राजधानींत गेला. मैत्रिणींनीं येऊन ती गोष्ट राजाला कळविली.

राजधानीभर हाहाकार उडून गेला. तेव्हां सुनीत व सुमति दोघे राजकन्येला सोडवून आणण्याची प्रतिज्ञा करून निघाले.

राक्षसानें तिला पकडल्यावर मुदावती अर्थातच प्रथम फार घाबरली. परंतु तिनें सूज्ञपणानें राक्षसाशीं भांडण्यापेक्षां सलोख्यानें वागून आपली सुटका करून घेण्याचें ठरविलें. कुजुंभनें मुदावतीच्या राहण्याची व खाण्यापिण्याची उत्तम व्यवस्था केली. नंतर त्यानें तिला तिचें नांव गांव वडील कोण वगैरे प्रश्न विचारून ती विदुरथ राजाची राजकन्या आहे, हें कळल्यावर त्यानें त्याच्याशीं तिनें लग्न करून घ्यावें अशी विनंती केली.

मुदावती म्हणाली "यापेक्षां आनंदाची गोष्ट मला किंवा माझ्या वडिलांना आणखी काय असणार? कारण माझें लग्न एका जगप्रसिद्ध शूराशीं व्हावें असें माझ्या आई-वडिलांना फार वाटतें. मी क्षत्रियकन्या आहे. म्हणून वडिलांच्या संमतीनें मी तुझ्याशीं शास्त्रोक्त विवाह करीन." राक्षस त्या गोष्टीस कबूल झाला.

दुसऱ्यादिवशीं सुनीत व सुमति युद्धास आलेले पाहून राक्षसानें मुदावतीला जाऊन सांगितलें. म्हणाला—"तूं म्हणाली होतीस कीं तुझ्या घरच्या मंडळींना आनंद होईल. पण हे तर माझ्याशीं युद्धाला आले आहेत!"



तूं मला उचलून आणलेस म्हणून त्यांना राग आला. त्यांच्याशीं युद्ध करण्याची तुला गरजच काय? तूं त्यांना धरून घेऊन ये." मुदावती म्हणाली.

राक्षसाला तें सर्व खरें वाटलें. त्यानें आपलें मायास्त्र टाकून त्या दोघांना कैद केलें. त्यांच्याबरोबर आलेलें सैन्य घाबरून पळून गेलें. राजकुमारांना राक्षसानें पकडल्याची गोष्ट राजाला कळली.

विदुरथानें विचार केला या लहान सहान उपायांनीं त्या दुष्ट राक्षसाला जिंकणें सोपें नाहीं. त्यानें आपल्या सर्व मित्र राजांना त्याच्यावर आलेल्या संकटाची वार्ता देऊन त्यांना मदतीला बोलाविलें. त्यानें असें जाहीर केलें कीं जो कोणी माझ्या मुलीला सोडवून आणील त्याच्याशीं मी आपल्या मुलीचें लग्न करून देईन. त्यानें आपल्या मित्र राजांची व राजकुमारांची एक सभा बोलाविली. त्या सभेला जनंद नांवाच्या राजाचा वत्संधु नांवाचा मुलगा आपल्या वडिलांबरोबर हजर होता. तो आपल्या वडिलांना म्हणाला "बाबा! मला तुम्ही परवानगी द्याल तर मी त्या राक्षसाचा पराभव करून विदुरथाच्या मुलीला सोडवून आणतों."



जनंद म्हणाला—"ठीक, जा! पण सावध राहून चौकस पणानें काम कर. तो राक्षस आहे फार बलिष्ठ. त्याला जिंकायला परमेश्वराचीच मदत पाहिजे. म्हणून आपला मूळ पुरुष सूर्य याची कृपा प्राप्त कर व त्या-नंतर त्या राक्षसावर स्वारी कर."

वत्संधु वडिलांच्या सल्ल्याप्रमाणें सूर्याची आराधना करून आपलें सैन्य घेऊन विदुरथ महाराजांकडे गेला आणि वडिलांची परवानगी घेऊन कुजुंभ राक्षसाशीं युद्ध करण्यास तयार असल्याचें सांगितलें. विदुरथानें त्याला आशीर्वाद देऊन निरोप दिला.

त्याच्याशी युद्ध करण्यासाठी कोणी येत असल्याचें कळतांच कुजुंभला भयंकर राग आला. आपलें मुसळ घेऊन तो निघाला. जातांना त्यानें मुदावतीला ती गोष्ट सांगितली.

"इतकें मोठें सैन्य घेऊन कोणी येत असतां तूं एकट्यानें जाणें बरोबर नाहीं," असें मुदावतीनें त्याला बजावून सांगितलें.

तेव्हां तो घमेंडींत म्हणाला—"वेड्या मुली! माझ्या हातांत हें मुसळ असेपर्यंत माझ्या केसालादेखील धक्का पोंचविण्याची शक्ति कोणाच्या अंगांत नाहीं. स्वतः ब्रह्मदेव जरी आला तरी मी त्याला जिंकीन. हें एक अजिंक्य मुसळ आहे."

मुदावतीनें तें मुसळ हातांत घेऊन त्याला विचारलें—"या मुसळानें म्हणतोस? तुझ्या हातांत असेपर्यंत कोणी तुला जिंकूं शकणार नाहीं? आश्चर्य आहे बुवा!" असें सांगून स्मित करून तिनें तें राक्षसाच्या हातांत दिलें.

स्त्रीचा हात लागल्यानें मुसळाचा महिमा नष्ट झाला होता. पण राक्षसाला ती गोष्ट माहीत नव्हती. कुजुंभ वत्संधूशीं युद्ध करण्यास गेला. आणि युद्ध करीत असतां ठार झाला.

नंतर वत्संधूनें सुनीत व सुमती दोघांना सोडविलें व मुदावतीला बरोबर घेऊन परतला. विंदुरथानें वचन दिल्याप्रमाणें मुदावतीशीं त्याचें लग्न करून दिलें.

वत्संधु कुजुंभच्या राजधानींतून जें धन व रत्नजवाहीर घेऊन आला होता तें सर्व राजानें त्यालाच बक्षिस म्हणून दिलें. मुदावतीनें सुनंद नांवाच्या मुसळाचा महिमा हरण करून सर्वांना आनंदित केलें म्हणून तिचें नांव सुनंदा असें ठेवण्यांत आलें.



# ५२. बादशाहांची मशीद

मुसलमान धर्माचा कट्टर अनुयायी औरंगजेब बादशाह यानें लाहोरची ही प्रसिद्ध मशीद १६७४ मध्यें बांधली. महंमद इकबाल या उर्दू कवीची कबर या मशीदीच्या मुख्यद्वाराजवळच आहे.












# भारताचा इतिहास



अफजलखानाच्या वधानंतर शिवाजीची दृष्टि दक्षिणेकडे-कोंकण व कोल्हापूरकडे वळली. परंतु जुलाई १६६० मध्यें सिद्दी जोहर नांवाच्या विजापूरच्या सरदारानें शिवाजीच्या कोल्हापूर नजीकच्या पन्हाळा किल्ल्याला वेढा दिला.

शिवाजीला तो किल्ला सोडून धावा लागला. त्याच वेळीं शिवाजीवर आणखी एक संकट आलें. दख्खनचा नवा सुबेदार शाहिस्तेखान यानें पुण्यावर स्वारी केली आणि चाकणचा किल्ला काबीज केला.

या नव्या संकटाला तोंड देण्यासाठीं शिवाजीनें विजापूर दरबारशीं संधी करून घेतली. या कामीं शिवाजीला त्याचे वडील शाहजी राजे यांची मदत मिळाली. मोगल सैन्याशीं सतत दोन वर्षे शिवाजीला युद्ध करावें लागलें. १५ एप्रिल १६६३ रोजीं शिवाजी आपल्या निवडक शूर मित्रांसह गुप्तपणें शाहिस्तेखानाच्या खास महालांत, तो झोंपला होता त्या खोलींत शिरला. जखमी शाहिस्तेखान होऊन पळून गेला. त्याच्या हाताचीं बोटें कापलीं गेलीं. पण त्या चकमकींत त्याचा मुलगा, एक सरदार, चाळीस नोकर आणि अंतःपुरांतल्या सहा स्त्रिया एकूण सुमारें पन्नास जण ठार झाले. तेथून शिवाजी सुखरूप सिंहगड किल्ल्यांत जाऊन पोंचला.

शिवाजीच्या या अनपेक्षित हल्ल्यामुळें मोगल सरदारांना त्याचा वचक बसला. शिवाजीनें त्यानंतर असेंच एक साहसाचें कार्य केलें. १६६४च्या १६ ते २० जानेवारीच्या दर्म्यान शिवाजीनें सुरत नगर लुटलें. त्यावेळीं पश्चिम किनाऱ्यावर त्याच्या तोडीचें दुसरें बंदर नव्हतें.

शिवाजीच्या या पराक्रमामुळें मोगलांचा धाक कमी झाला. म्हणून १६६५ मध्यें औरंगजेबानें अंबरचा राजा जयसिंह व दिलेरखान या दोघां सेनापतींना बरोबर एक मोठें सैन्य देऊन दक्षनच्या मोहिमेवर पाठविलें.

जयसिंह हा हुशार मुत्सद्दी व युद्धकलेंत प्रवीण होता. त्यानें पुरंदरच्या किल्ल्याला वेढा दिला. मोगलांनीं शिवाजीची राजधानी रायगडचा किल्ला त्याला पण वेढा दिला. मोगलांशीं युद्ध केल्यास फायदा कमी व नुकसान जास्त आहे हें ओळखून शिवाजीनें संधीची बोलणीं सुरू केलीं व पुरंदर येथें २२ जून १९६५ या रोजीं संधी करून घेतली. या संधीप्रमाणें शिवाजीनें फक्त १२ किल्ले स्वतःकडे ठेवून आपले २३ किल्ले मोगलांच्या स्वाधीन केले. ५००० घोडेस्वारांनिशीं मोगलांना मदत देण्याचें पण त्यानें कबूल केलें. पुढें जयसिंहानें विजापुरावर स्वारी केली तेव्हां शिवाजीनें मोगलसैन्याच्या बाजूनें त्या युद्धांत भाग घेतला. जयसिंहानें शिवाजीला मोगलांशीं सख्य केलास फायदा होईल हें सांगून बादशाहाच्या भेटीसाठीं जाण्यास त्याचें मन वळवून घेतलें. त्याप्रमाणें



शिवाजी आपला मोठा मुलगा संभाजी याच्या-सह ७ मे १६६६ या रोजीं आग्र्यास गेला.

परंतु मोगल दरबारांत शिवाजीचा अपमान झाला. औरंगजेबानें त्याला आपला पंचहजारी सरदार म्हणून त्यांच्या रांगेत बसायला सांगितलें. अर्थातच शिवाजीला तो अपमान सहन झाला नाहीं. त्यानें भर दरबारांत बादशाहाची निंदा केली. म्हणून बादशाहानें त्याला कैद करविलें. दुसरा कोणी असता तर हताश होऊन स्वस्थ बसला असता. पण शिवाजीनें आपली सुटका करून घेण्यासाठीं एक युक्ति योजली. प्रथम

त्यानें आजारी पडल्याचें सोंग केलें व पुढें तब्येत सुधारत असल्याचें सांगून मोठमोठे करंडे भरून ब्राह्मणांना व सरदारांना मिठाई वांटण्याचें काम सुरू केलें. पुढें कांहीं दिवसांनीं पाहारेकरी करंडे तपासून पाहणें अनावश्यक समजू लागले. संधी साधून एकदां शिवाजी व त्याचा मुलगा संभाजी दोन मोठमोठ्या करंड्यांत बसून पाहारेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन पळून गेले. मुलाला एका ब्राह्मणाच्या घरीं ठेवून शिवाजी स्वतः बैराग्याचा वेष करून प्रयाग, काशी, गया वगैरे तीर्थक्षेत्रांची यात्रा करीत तेलंगणाच्या प्रदेशांतून फिरत ३० नोव्हेंबर १६६६ या रोजीं सुखरूप स्वदेशीं येऊन पोंचला.

त्यानंतर तीन वर्षें पावेतों शिवाजी मोगलांच्या वाटेस गेला नाहीं. मध्यंतरी औरंगजेबानें शिवाजीला 'राजा' ही पदवी बहाल करून वरारची जहागीर दिली. १६७० मध्यें शिवाजी व मोगल यांच्यामध्यें पुन्हां वितुष्ट आलें. शिवाजीनें मोगलांना दिलेले सर्व किल्ले सर केले आणि १६७० मध्यें पुन्हां सुरत शहर लुटलें.

१६ जून १६७४ या रोजीं शिवाजीनें छत्रपति ही उपाधि धारण करून रायगड येथें विधिवत राज्याभिषेक करून घेतला. गोवळकोंड्याच्या सुलतानाशीं सख्य करून एका वर्षाच्या आंत जिंजी, वेल्लूर व आसपासचा प्रदेश जिंकला (१६७७). शिवाजीच्या कीर्तीबरोबर त्याचा राज्यविस्तारपण वाढत गेला. त्याच्या राज्यांत १०० किल्ले होते.

वयाच्या ५३ व्या वर्षी कीर्तीच्या उच्च शिखरावर पोंचला असतां १४ एप्रिल १६८० या रोजीं तो मरण पावला.



# नेहरू चरित्र

[२२]

लोकांची दृष्टि स्वराज्य पार्टीकडे व प्रांतीय कौंसिलांकडे अधिकाधिक वळूं लागली. केंद्रीय कौंसिलांत निवडून आलेले लोक प्रतिनिधि पुढें काय करणार हें कोणास माहीत नव्हतें. त्यांनीं बजेट पास होऊं दिलें नाहीं. पण व्हाइसराय बहादुरांची सही झाल्यावर तें कायद्याच्या सदरांत आलें.

अशाच तऱ्हेनें जीं बिलें प्रांतीय कौंसिलांत पास झालीं नाहींत तीं गव्हर्नराच्या सहीनें पास करून घेण्यांत आलीं. म्हणून स्वराज्य पार्टीचा जोर संपुष्टांत आल्यासारखा झाला. आतां जें कांहीं करावयाचें तें कौंसिलांबाहेरच करण्याशिवाय गत्यंतर उरलें नव्हतें.

१९२४ मध्यें अहमदाबाद येथें कांग्रेस महासभेची बैठक झाली. या बैठकींत गांधीजी व स्वराज्य पार्टी यांच्यामधील मतभेद वाढले. मोतीलाल नेहरू व चित्तरंजन दास यांच्यासह इतर लोक सभा त्याग करून निघून गेले. गांधीजींना आणखी एक गोष्ट कळल्याशिवाय राहाली नाहीं. कांग्रेसच्या कित्येक सभासदांचा अहिंसेवर पूर्ण विश्वास नव्हता. म्हणून शेवटीं गांधीजींनीं सर्वांचा निरोप घेऊन राजकीय कार्यांतून आपलें अंग काढून घेतलें. तेव्हां गांधीयुग संपलें, मोतीलाल व दास दोघांनीं गांधीजींना राजकीय क्षेत्रांतून बाहेर काढलें असें कित्येकांच्या तोंडीं ऐकूं येऊं लागलें. परंतु या सर्व गोष्टींत तथ्य नव्हतें. कारण गांधीजींवर सर्व सामान्य प्रजेचें प्रेम कमी झालेलें नव्हतें, उलट तें वाढतच गेलें. या उलट स्वराज्य पार्टीच्या अनुयायांचा उत्साह थंड पडूं लागला होता. सुरवातीला



मुसलमान शेतकरी. पंजाब व सिंध प्रांतांत सावकारीचा धंदा हिंदू करतात व मुसलमान कर्जदार आहेत. अशा प्रांतांत हिंदूविरुद्ध मुसलमानांचीं मनें बिथरविणें सोपें होतें. दंगा केल्यानें मुसलमान श्रीमंत झाले असते असें मुळींच नाहीं. त्यामुळें राष्ट्रीय चळवळीस मात्र फार मोठा धक्का बसला.

राजकीय दृष्ट्या ही स्थिति जास्तच बिघडत गेली. पदव्यांसाठीं ओढाताण, निवडणुकीसाठीं मारामारी हें सर्व राष्ट्रीय चळवळीचाच भाग होत गेलें. कांग्रेसमध्यें अनेक मुसलमान होते. त्यांत पुष्कळ राष्ट्रवादीपण होते. त्यांनीं राष्ट्रीय मुसलमानांची एक नवीन संघटणा उभी केली. परंतु ते सर्व अत्यंत उच्च वर्गांतले किंवा मध्यम वर्गांतले लोक होते. सामान्य जनतेचें पाठबळ त्यांना नव्हतें. धार्मिक कडव्या वृत्तीच्या मुसलमानासमोर त्यांचें तेज पडणें शक्य नव्हतें. तरी त्यांनीं सुरवातीला धार्मिक ऐक्य स्थापन करण्यासाठीं पुष्कळ यत्न केला.

गांधीजींनीं तीन आठवडेपर्यंत जेव्हां अनशनव्रत सुरू केलें तेव्हां कांग्रेसचे अध्यक्ष महंमद अली यांनीं १९२४मध्यें एक 'युनिटी कान्फरन्स' बोलाविली. ऐक्य स्थापनेसाठीं अनेक ठरावांवर विचार करण्यांत आला. पण त्यांपैकीं एक देखील स्वीकारला गेला नाहीं. कारण असले प्रश्न संमेलनें व सभा करून सोडवितां येण्यासारखे नव्हते.

हें संमेलन दिल्ली येथें चालूच होतें, संपलें नव्हतें कीं अलाहाबाद येथें हिंदू व मुसलमानांमध्यें दंगा शुरू झाला. जवाहरलालजी दिल्लीहून अलाहाबाद येथें गेले. दंगा थांबला होता, पण जें विष शरिरांत भिनलें होतें तें अद्याप नाहींसें झालें नव्हतें.






[ ० ]

बुडत असलेल्या नावेंतील लोकांना वांचविण्यासाठीं इतर नावांतील लोकांनीं नदींत भराभर उड्या टाकल्या. उस्मानखानानें पण बुडी मारली. एक मिनटानंतर तो पाण्याबाहेर आला तेव्हां पाण्याच्या आंतून तो कोणाला तरी ओढीत असल्याचा भास झाला. एक नाव त्याच्याजवळ आली, नावेंतून एक फेव्यासारखें कांहींतरी खालीं सोडण्यांत आलें तें त्यानें धरलें. नंतर हळूहळू त्याला वर ओढण्यांत आलें. त्याच्याबरोबर आयशा पण वर ओढली गेली. ती पूर्णपणें बेशुद्ध स्थितींतच होती. तिला शुद्धीवर यायला बराच वेळ लागला. काश्मीरी बेगमनें रात्रंदिवस तिची सेवा-शुश्रूषा केली. दारू पिऊन गुंग पडून राहणाऱ्या सुलेमानखानाला देखील आयशाला त्या स्थितींत पाहून फार वाईट वाटलें. तो दारूच्या पेल्याला शिवला देखील नाहीं व तिच्या सेवाशुश्रूषेला लागला.

आयशाची तब्येत हळूहळू सुधारूं लागली. अंथरुणांतून उठून ती थोडी थोडी हिंडूं फिरूं लागली. तिनें एकदां उस्मानला आपल्या खोलींत बोलाविलें. खोलींत तिच्या शिवाय दुसरें कोणी













नव्हतें. तिच्या पलंगा शिवाय बसायला दुसरी तिपाई किंवा खुर्ची देखील नव्हती. तिच्या सूचनेवरून उस्मान पलंगावरच एका बाजूला बसला.

आयशानें, त्याच्या परवानगीशिवाय परदेशीं निघून गेल्याबद्दल त्याची माफी मागितली.

"त्यांत तूं कांहीं फार मोठी चूक केली होतीस, असें मला कधींच वाटलें नाहीं. तूं परत आलेली पाहून पुन्हां माझ्या जिवांत जीव आला. माफी कसली मागते आहेस!" उस्मान म्हणाला.

"मी नव्हतें तेव्हां नशिबानेंच पाठ फिरवली आपल्याविरुद्ध असें नाहीं वाटलें का तुला?"

"होय, तुझ्याबरोबर खरोखरच आपण आपल्या भाग्याला पारखे झालों होतों."

"याला कांहीं उपाय नाहीं काय?"

"तुझ्या मनांत असेल तर उपायांला काय तोटा?"

"माझें सर्व सुख दुःख तुझ्या हातीं आहे हें मी सांगायला हवें का?"

"माहीत आहे म्हणून तर अजून पर्यंत जिवंत राहालों आहें. परंतु त्या स्थितींत तूं आम्हांला कां सोडून गेली होतीस?

"तूं हा प्रश्न विचारला नसतास तर बरें झालें असतें. युवराज जगतसिंहांना तुरुंगां-तून सोडविण्यासाठीं गेलें होतें. प्रथम पाटण्याला गेलें, नंतर आग्र्याला."

"मला त्यांतलें कांहीं कळलें नाहीं. तुझा तो प्रयत्न कदाचित माझ्या हितासाठींच होता." उस्मान म्हणाला.

"तो कसा काय?"

"जगतसिंहाचा वध करण्याचा निश्चय मी आपल्या मनाशीं केला आहे. तो आजन्म तुरुंगांतच राहला असता तर माझी ती इच्छा पुरी होऊं शकली नसती. म्हणून तूं त्याला सुटका मिळवून देऊन मला मदतच केली आहेस. माझें हें बोलणें ऐकून तुला राग येत असेल नाहीं?"

"नाहीं. माझ्या मनांत एवढाच विचार येतो आहे कीं देवानें मला या जगांत जन्मच का दिला? माझ्यामुळें आपसांत भांडणें आणि मारामाऱ्या या शिवाय दुसरें कांहीं झालें असेल तर ना? तुझ्यासारखा एवढा मोठा कर्तबगार पुरुष माझ्यासाठीं आपल्या सर्वस्वावर पाणी सोडायला तयार झाला याबद्दल मला वाईट वाटत आहे."

"अशा तऱ्हेनें आत्मबलिदान करण्यांत किती आनंद वाटतो! तूं माझ्याजवळ राहालीस कीं तेवढ्यानें माझ्या मनाचें समाधान होईल."

"माझ्यामुळें तुला इतके कष्ट सहन करावे लागत आहेत तरी मला वांचविण्या-साठीं तुझा यत्न चालूच आहे."

"जगतसिंहाला सोडविण्यासाठीं तूं कोणास ठाऊक कोठें कोठें निघून गेलीस? तुझ्या जिवाचें कांहीं बरें वाईट झालें असतें तर मी तर वेडाच झालों असतों."

"उस्मान मी हात जोडून विनंति करतें, तूं माझा नाद सोड आणि आपलें चित्त
















कोणत्या तरी चांगल्या व्यवसायांत लाव. तूं वीर आहेस, योद्धा आहेस, साहसी आहेस. आपल्या शौर्याच्या जोरावर साम्राज्य स्थापन कर."

उस्मानला तिचें मन वळविणें अशक्य होतें. परन्तु बरोबर राहून त्याच्या कष्टसुखांत भागीदार होण्यास ती तयार होती. तसें ती त्याला म्हणाली देखील. तें ऐकून उस्मान म्हणाला—"तूं एवढें केलेंस तरी मी स्वतःचें राज्य परत मिळविण्याचा यत्न करीन."

जगतसिंहाला सुटका मिळाली. मानसिंहांची मानमर्यादापण राखली गेली. जगतसिंह युवराजाला शोभतील अशी वस्त्रें धारण करून दरबारांत गेला. त्यानें वडिलांना नमस्कार करून त्यांची माफी मागितली.

"बाळ! अकबर बादशहांनीं तुला माफ केलें आहे." मानसिंह म्हणाला.

जगतसिंहाला सुटका मिळाली एवढेंच नव्हें तर त्याला बंगाल, बिहार व ओडिसा प्रांताचा सुबेदार नेमण्यांत आलें. बादशहानें मानसिंहाना बोलावून घेतलें. जगतसिंहाला काम काय देण्याचें ठरलें हें कोणालाहि माहीत नव्हतें. वडिलांच्या आज्ञेनें तो सिंहासनावर बसला. दरबाऱ्यांनीं नवीन सुबेदाराचें खुल्या दिलानें अभिनंदन केलें.

सभा संपल्यावर पितापुत्र घरीं गेले. तेथें उर्मिला देवींच्या महालांत जगतसिंह व तिलोत्तमा यांची भेट झाली. विमलानें तिला उर्मिला देवीकडे कसें आणून ठेवलें व नंतर जें कांहीं घडलें तें तिनें थोडक्यांत सांगितलें.

मानसिंह पाटण्याहून आग्र्याला आला तेव्हां त्यानें आपला धाकटा भाऊ महासिंह याला मागें रहावयास सांगितलें. तिलोत्तमेच्या घरची सर्व मंडळी, विमला, अस्मानी, लक्ष्मणी, दिग्गज वगैरे आणि इतर दास दासी पाटण्याला येऊन राहूं लागली.

जगतसिंहाचा कारभार कांहीं काळ निर्विघ्न चालू होता. जगतसिंह तिलोत्तमा यांचा संसार सुखाचा झाला. पण कांहीं काळ लोटल्यावर रामचंद्रदेव यांच्याकडून उस्मानखानानें पुन्हां स्वारी करण्याची तयारी सुरू केली असल्याचें कळलें. ओरिसा प्रांतांत पुन्हां बंडाळी सुरू होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. एवढेंच नव्हें तर उस्मान खानानें पुरीवर स्वारी केली असल्याचें कळलें. रामचंद्रदेव आणखी एका किल्ल्यांत स्वरक्षणासाठीं राहूं लागला होता. त्या किल्ल्यावर देखील पठाण स्वारी करणार यांत शंका नव्हती.

म्हणून महासिंहानें पठाणांची नांगी मोडण्याचें ठरवून मोठें सैन्य घेऊन ओरिसा प्रांताकडे कूच केलें. भद्रकजवळ दोन्हीं सैन्यांचें युद्ध झालें. उस्माननें या खेपेस शौर्य दाखविलें व मोगल सैन्याला माघार घ्यावी लागली.

त्यानंतर सर्व ओरिसा प्रांत पुन्हां पठाणांच्या हातीं आला. आयशाकडून प्रोत्साहन मिळाल्यानंतर उस्मानखानानें बंगाल प्रांतावर देखील स्वारी केली. एकट्या महासिंहाला कदाचित यश मिळणार नाहीं असें समजून जगतसिंहदेखील युद्धाला निघाला.





पठाणांनीं मंजिनीपुर, कोन्हान हीं ठाणीं जिकली होतीं. आणखी कांहीं प्रदेश पण त्यांनीं जिंकले होते. प्रत्येक युद्धांत उस्मानखानालाच यश मिळत चाललें. त्याच्या शत्रूंनीं देखील त्याच्या शौर्याची व पराक्रमाची स्तुति केली. लोकांना वाटूं लागलें कीं ओरिसा प्रांताप्रमाणेंच आतां बंगालपण पठाणांच्या अमलाखालीं येणार.

अयाशाच्या आनंदाला पारावार नव्हता. स्वत: तलवार हातीं घेऊन ती युद्ध करीत नव्हती. परंतु इतर सर्व कामें ती करीत होती. ती पाठीशीं असल्याकारणानें उस्मानखानाला युद्धांत उत्साह वाटत होता. समोरासमोरच्या युद्धांत जगतसिंहाला जिंकणें अशक्य आहे हें ओळखून उस्मानखाननें कपट उपाय करून त्याला ठार करण्याचा बेत केला.

वर्धमान शहर काबीज झालें तर सर्व बंगाल हातांत आल्यासारखें होतें. मंधारणचा किल्ला जिंकला व तेथें छावणी स्थापण करतां आली तर वर्धमान जिंकणें कठीण नाहीं. असा विचार करून उस्मानखानानें थोडें सैन्य मंधारणचा किल्ला सर करण्यासाठीं पाठविलें.

त्या वेळीं जगतसिंह वर्धमान येथें होता व ती गोष्ट उस्मानखानाला माहीत होती. उस्मानखानानें आपल्या सैनिकांना बजावून सांगितलें होतें कीं जगतसिंह आपल्या सासुरवाडच्या लोकांना भेटायला मंधारणच्या किल्ल्यांत कदाचित येईल. तेव्हां त्याला जिवंत कैद करावें.

उस्मानखानाच्या सैन्याची एक तुकडी मंधारणच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं दबा धरून बसून राहिली. परंतु जगतसिंह त्या बाजूला फिरकला नाहीं. तो एक लहानसें सैन्य घेऊन ओरिसाकडे निघाला. उस्माननें त्याचा वध करण्याचा पक्का निश्चय मनाशीं केला असल्या कारणानें तो स्वत: कांहीं सैनिकांना घेऊन त्याची वाट पहात होता.

परंतु जगतसिंहाला उस्मान दबा धरून कोठें बसला आहे हें वेळींच कळलें. तो आपल्या सैन्यासह सुवर्णरेखा नदीच्या काठीं एका जागीं होता. म्हणून जगतसिंह आपल्या सैन्यासह तिकडे जाण्यास निघाला. जगतसिंह येत असलेला पाहून, उस्माननें आपली युद्ध करण्याची इच्छा नाहीं हें दाखविण्यासाठीं एका सैनिकाला एक श्वेतध्वज देऊन त्याच्याकडे पाठविलें. वास्तविक त्याला आपला पराभव होईल ही भीति वाटत होती. तो सैनिक जगतसिंहाला म्हणाला– "आपल्या व आमच्या सैन्यांचें युद्ध झालें तर त्यांत हित कोणाचेंच नाहीं म्हणून आमच्या नबाबसाहेबांनीं सूचना केली आहे कीं आपले त्यांच्याशीं द्वंद्वयुद्ध व्हावें. जगतसिंहानें त्या गोष्टीस आपली संमति दर्शविली. त्याप्रमाणें उस्मानखान सशस्त्र होऊन द्वंद्वयुद्धाला आला.

दोघांचें भयंकर द्वंद्वयुद्ध झालें. दोन्हीकडचे सैनिक तें दुरून पहात होते. दोघे जखमी झाले होते. परंतु एकदां उस्मान-







खानाचा भाला जगतसिंहाच्या हातीं आला. त्यानें उस्मानच्या डोक्याचा नेम धरून भाला फेंकला. तो लागल्यामुळें उस्मानला चक्कर आली. डोळ्यासमोर अंधेरी आली. तो निश्चेष्ट उभा रहाला. त्या वेळीं जगतसिंहानें उस्मानखानाच्या छातींत दुसरा भाला मारला. तो भाला लागला असता तर उस्मान तत्काळ मरण पावला असता. परंतु तेवढ्यांत आयशा मध्यें येऊन उभी राहाली. तिला तो लागला. सर्व मोठ्यानें ओरडले. त्यामुळें उस्मानखानाला शुद्ध आली. तो भाला आयशाच्या पाठींत शिरला होता. तें पाहून जगतसिंहानें कांपऱ्या हातानें आपले. हात वर केले. उस्मानखानानें वार केला नाहीं. कारण दोघांचें द्वंद्वयुद्ध थांबविण्यासाठींच ती मध्यें पडली होती. जगतसिंहानें आपलीं शस्त्रें फेंकून दिल्यानंतर त्याच्यावर शस्त्र उगारण्यासारखें गर्हित कार्य करण्यास त्याचें मन तयार झालें नाहीं.

आयशाचा इलाज करण्यासाठीं वैद्य व हकीम आले, पण त्यांचे सर्व प्रयत्न फुकट गेले. आयशानें उस्मान व जगतसिंह यांचा निरोप घेऊन डोळे मिटले. जगतसिंह खालीं मान करून टिपें गळीत होता. उस्मानच्या डोळ्यांतून पाण्याचा एक थेंब देखील आला नाहीं की तोंडांतून एक शब्द निघाला नाहीं. त्याचा उत्साह, साहस व भवितव्य आयशाबरोबर निघून गेलें. आयशाचें प्रेम जगतसिंहावर होतें. पण तिची कर्तव्य बुद्धि तिला उस्मानच्या बाजूला ओढीत होती. आत्मबलिदान करून तिनें उभयतांना वांचविलें. ओरिसा प्रांत मोगलांनीं पुन्हां काबीज केला. पठाणांचें भारतांतील साम्राज्यपण नष्ट झालें.

संपूर्ण



# कृतघ्न स्त्री

विक्रमादित्यानें हट्ट सोडला नाहीं. झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें मौनपणें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तूं अपरात्रीच्या वेळीं जो इतका कष्ट सहन करीत आहेस तो स्वतःसाठीं नसून आणखी कोणासाठीं तरी करीत असावास असा माझा समज आहे. तुझ्याकडे पाहून मला एका बोधिसत्वाची कथा आठवते. तुला मी त्याची गोष्ट सांगतों, लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

एका जंगलांत एक बोधिसत्व तपश्चर्या करीत रहात असे. रानटी श्वापदें किंवा भुतें त्याला कधींच त्रास देत नसत. उलट तीच प्राणपणानें त्याचें रक्षण करी. एकदां अरण्यांत फिरत असतां त्याला एका मोठ्या



विहिरींतून एका स्त्रीचें रडणें ऐकूं आलें. विहिरींत डोकावून पाहिलें, तेव्हां त्याला विहिरींत ती स्त्री एक सिंह, एक सांप व एक सुवर्णपक्षी दिसला. बोधिसत्वाला ती म्हणाली—"आम्ही चौघं प्राणी ह्या विहिरींत पडलों आहों, आम्हांला बाहेर काढून आमचें रक्षण कर."

"आकाशांत उडणारा पक्षी विहिरींत कसा पडला हें नाहीं कळलें मला ?" बोधिसत्वानें विचारलें.

ती म्हणाली—"शिकाऱ्यानें टाकलेल्या जाळ्यांत पाय अडकले आहेत त्याचे."

बोधिसत्वानें गवताची दोरी वळून विहिरींत सोडली व चारहि जणांना बाहेर काढलें. त्या सर्वांना मनुष्यांच्या भाषेंत बोलतांना पाहून बोधिसत्वाला आश्चर्य वाटलें. त्यानें त्यांना विचारलें—"कोण तुम्ही ? येथें कसे आलांत ? तुमची जन्मकहाणी सांगा."

सिंहानें आपली जन्मकथा या शब्दांत सांगितली—"हिमालय पर्वतांत वैदूर्यशृंग नांवाचें एक नगर आहे. तेथल्या पद्मवेग नांवाच्या एका विद्याधराला वज्रवेग नांवाचा एक मुलगा होता. तो भयंकर गर्विष्ठ होता. अर्थातच त्याचें सर्वांशीं वैर वाढलें. तें पाहून त्याच्या बापाला राग आला व त्यानें त्याला शाप देऊन सिंह करून टाकलें आणि म्हणाला—"तुझ्यावर कोणी उपकार केला व तूं त्या उपकाराची फेड प्रत्युपकार करून केलीस तर तुला शापमुक्ति मिळेल." असें सांगून सिंह पुढें म्हणाला—"महाराज ! संकट समयीं माझी एकदां आठवण केलीत तरी पुरे." असें सांगून सिंह निघून गेला.

त्यानंतर पक्ष्यानें आपली जन्मकथा सांगितली. म्हणाला—"वज्रदंष्ट्र नांवाच्या विद्याधर राजाला पांच मुली झाल्यावर रजतदंष्ट्र नांवाचा एक मुलगा झाला. एकदां त्याची सर्वांत मोठी बहीण पिंजरक नांवाचें वाद्य वाजवीत बसली असतां तो खट्याळपणानें तें वाद्य उचलून घेऊन दूर पळून गेला. तिला राग आला व पक्षी होऊन जा असा तिनें शाप दिला व प्रत्युपकार केल्यास शापमुक्ति मिळेल असें पण सांगितलें. नंतर ती निघून गेली."

त्यानंतर सांपानें आपली जन्मकथा सांगितली. म्हणाला—"कश्यप मुनीच्या आश्रमांत एक मुनिकुमार रहात असे. त्याचा एक मित्र होता. एकदां त्याचा मित्र एका तलावांत स्नान करीत असतां मुनिकुमारानें काठावर एक सांप येत असलेला पाहिला व त्याच्यावर मंत्र टाकून त्यानें त्याला धरलें. स्नान करीत असलेल्या मित्रानें काठावर येऊन एक भयंकर सांप पाहिला व बेशुद्ध होऊन पडला. शुद्धीवर आल्यावर त्यानें मुनिकुमाराला सांप होऊन जा असा शाप दिला आणि तूं प्रत्युपकार केलास तर तुला शापमुक्ति मिळेल असें सांगितलें."

शेवटीं त्या स्त्रीनें आपला जीवन वृत्तांत सांगितला. म्हणाली—"मी एका क्षत्रिय तरुणाची पत्नी आहें. माझ्या आचरणाचा माझ्या पतीला संशय आला. त्यांनीं मला



शिक्षा करण्याचें ठरविलें. ती गोष्ट मला दासी कडून कळली. म्हणून मी रात्रीं काळोख पडल्यावर घराबाहेर पळून जातांना विहिरींत येऊन पडल्यें." असें सांगून ती निघून गेली.

एका परस्त्रीशीं बोलल्यामुळें बोधिसत्वाला कंद, मुळें व फळें त्यादिवशीं मिळालीं नाहींत. त्याला भयंकर भूक लागली. त्यावेळीं त्याला सिंहाची आठवण झाली लगेच सिंहानें येऊन त्याला ताजें मांस आणून दिलें आणि प्रत्युपकार करून शापमुक्ति मिळविली आणि विद्याधर लोकांत निघून गेला.












मांस भक्षण केल्यामुळें बोधिसत्वाला पाप लागलें व त्याची तपश्चर्या भंग झाली. पुढें द्रव्यार्जन करून आपलें पुढील आयुष्य काढावें लागणार असें त्याला वाटलें. तेव्हां त्याला पक्ष्याची आठवण झाली. पक्ष्यानें बोधिसत्वावर आलेल्या संकटाची कल्पना होतांच कोठून तरी रत्नाभरणें भरलेली एक पेटी आणून दिली. प्रत्युपकार केल्याबद्दल शापमुक्ति मिळवून तो पण निघून गेला.

बोधिसत्वानें, ते दागिने विकून टाकावे असा विचार करून गोत्रवर्धन नांवाच्या गांवी गेला. तेव्हां त्याला एका गल्लींत ती स्त्री दिसली. तिनें समोर येऊन त्याला नमस्कार केला व म्हणाली—"मी येथेंच राहातें. राणी सरकारांनीं मला एक सेवाकीण म्हणून ठेवून घेतलें आहे."

बोधिसत्वानें तिच्यावर विश्वास करून सुवर्ण पक्ष्यानें त्याला आणून दिलेल्या रत्नाभरणाची पेटी दाखविली आणि म्हणाली—"मी संकटांत पडलों असतां त्या सुवर्ण पक्ष्यानें माझ्या सहाय्यार्थ मला ही आणून दिली आहे." ती दुराचारिणी स्त्री परत पावलीं घरीं गेली व राणीला जाऊन बोधिसत्वाकडे रत्नाभरणांनीं भरलेली एक पेटी असल्याचें सांगितलें. तीं सर्व रत्नाभरणें खरोखरीं राणीचींच होतीं. म्हणून राणीनें बोधिसत्वाला कैद करविलें.

बोधिसत्वानें येऊन खरें तेंच सांगितलें. राणीनेंपण स्वतःच एका पक्ष्यानें रत्नाभरणाची पेटी उचलून नेल्याचें राजाला सांगितलें होतें. तरी राजानें बोधिसत्वाला कैदेंत टाकलें.

कैदेंत असतां बोधिसत्वाला सांपाची आठवण झाली. लगेच सांप प्रगट झाला. त्याला सर्व परिस्थिति कळली व म्हणाला "ठीक आहे मी राजाच्या गळ्याला विळखा घालून बसतो व तूं येऊन सोड म्हणून सांगे-पर्यंत सोडीत नाहीं. राजा तुला अर्धे राज्य द्यायला तयार होई पर्यंत तूं मला सोड म्हणून सांगूं नकोस." असें सांगून सांप सरळ राजाच्या खास महालांत गेला. राजा त्यावेळीं झोपलेला होता. सांपानें जाऊन त्याच्या गळ्याला विळखा दिला. राजा ओरडला. लोक जमा झाले. राजाला सोडवायला जवळ कोणी येऊं लागला कीं सांप त्याच्या अंगावर फुत्कार सोडी.

राजा अशा प्राणसंकटांत पडला असतां म्हणाला—"मला या संकटांतून जो सोडवील त्याला मी आपलें अर्धें राज्य देईन." ती गोष्ट तुरुंगांत बोधिसत्वाला कळली. त्यानें राजाला कळविलें कीं राजानें परवानगी दिल्यास मी राजाला सोडवूं शकेन." तें ऐकून राजानें बोधिसत्वाला बोलावून आणण्यासाठीं शिपायांना पाठविलें. बोधिसत्व आल्यावर राजा त्याला म्हणाला—"तूं मला या संकटांतून सोडविलेंस तर मी तुला आपलें अर्धें राज्य देईन."

तेव्हां बोधिसत्वानें "राजाला सोड" अशी सांपाजवळ विनंति केली. लगेच सांपानें आपला विळखा काढून घेतला व



       



प्रत्युपकार केल्याबद्दल शापमुक्त होऊन आनंदानें निघून गेला.

राजानें वचन दिल्याप्रमाणें बोधिसत्वाला आपलें अर्धें राज्य दिलें.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें— "राजा! मला एका गोष्टीची शंका वाटते. बोधिसत्वानें ज्या चार प्राण्यांवर उपकार केला त्यांतले तीन पशुकोटींतले होते. तरी त्यांनीं बोधिसत्वावर परोपकार केला. परंतु मनुष्याचा उत्तम जन्म मिळाला असून देखील त्या स्त्रीनें उपकाराची फेड अपकारानें केली. याचें कारण पशूंची जात ही मानव जाती पेक्षां चांगली, असें समजावयाचें का? या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"किती उच्च जन्म मिळाला असला तरी केलेल्या अपराधाबद्दलच त्यांना शाप मिळाला. त्या हीन पशु जातींत त्यांना कष्ट सहन करावा लागला. परंतु त्या स्त्रीला तिच्या दुराचरणाबद्दल मिळालेली शिक्षा तशी भोंवली नाहीं. म्हणून तिचा दुष्ट स्वभाव बदलला नाहीं. या उलट प्रत्युपकार केल्याशिवाय शापमुक्ति नाहीं हें त्या तिघांना माहीत होतें. तसें त्या स्त्रीच्या मनावर कांहींच दडपण नव्हतें. ती सदाचारिणी असती तर उपकाराची फेड प्रत्युपकारानें करावयाची असते ही जाणीव तिला असती."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ अदृश्य झाला व प्रेतासह झाडाला जाऊन लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# शिंप्याचें चातुर्य

एकदां बादशाहबरोबर बोलत असतां बिरबल म्हणाला—"कांहीं धंदेवाईक लोक इतके हुशार असतात कीं आपण किती डोळ्यांत तेल घालून राहालों तरी ते आपल्या डोळ्यांत धूळ फेंकतातच."

"आपण थोडें लक्ष ठेवलें तर कसे काय फसवितील ते?" बादशाहनें विचारलें.

"किती पाहारा ठेवला त्यांच्यावर तरी सोनार एक गुंजभर का होईना सोनें आणि शिंपी सूतभर कापड चोरल्या शिवाय रहात नाहींत." बिरबल म्हणाला.

बादशाहला तें खरें वाटलें नाहीं. म्हणाला—"माझ्याकडे एक उत्तम रेशमी खण आहे. बेगमसाहबांसाठीं त्याची चोळी शिवायला टाकून पाहातों. कशी चोरी करतो, पाहतों. पाहाऱ्याला मी शिपाई नेमतों. तुला एखादा चांगला शिंपी माहीत आहे का?" बादशाहनें विचारलें.

"गुलाब नांवाचा एक शिंपी आहे, बादशाह! शिवणाच्या कामांत त्याचा हात धरणारा दुसरा शिंपी नाहीं." बिरबल म्हणाला.

"ठीक! तर मग त्याला बोलव!" बादशाह म्हणाला.

बिरबलानें त्या शिंप्याला बोलवून बेगम साहबांसाठीं चोळी शिवायला सांगितलें.

शिंप्यानें कापड व नमुन्याची चोळी पाहून शिवून देण्याचें कबूल केलें. एक खोली त्याला शिवणासाठीं देण्यांत आली. तो शिवायला लागणारें सर्व सामान सुई, धागा, कात्री वगैरे घेऊन खोलींत शिवायला बसला. त्याच्यावर नजर



ठेवण्यासाठीं खोलीच्या दारांत दोन शिपाई सतत तलवारी घेऊन उभे करण्यांत आले होते.

शिंप्यानें तीन दिवस काम केलें. तरी चोळी पुरी झाली नाहीं. चौथ्या दिवशीं शिंप्याचा मुलगा बापाला भेटण्यासाठीं आला व म्हणाला—"बाबा! तुम्ही घरीं आला नाहीं. आज चौथा दिवस आहे. आई खूप रागावली आहे."

"पुरे कर रे तुझी बडबड! हें आपलें घर वाटलें होय तुला? बादशाहांचा महाल आहे हा!" शिंपी म्हणाला.

"असेल! पण तुम्ही परत केव्हां येतां हें सांगा!" मुलगा म्हणाला.

"चोळी पुरी झाली कीं आलोंच!"

"दोन तासांत शिवून होणारी चोळी चार दिवसांपासून शिवतो आहेस. काय पण शिंपी?" मुलगा म्हणाला.

"ही तुझ्या आईची चोळी वाटली होय तुला? अरे ही आहे बेगम साहेबांची चोळी! उगीच बडबड केलीस तर दोन लगावीन!"

"मी नाहीं जात! कसा लगावतोस पाहतोंच मी!" असें खोडसाळपणानें म्हणत मुलगा जरा दूर जाऊन उभा राहला.

शिंप्याला राग आला. त्यानें आपला जोडा काढून फेंकला मुलाला मारण्यासाठीं. मुलगा तो उचलून घेऊन घरीं पळाला.

"अहो धरा त्याला!" असें शिंप्यानें तलवारी घेऊन उभे असलेल्या दोघां शिपायांना म्हटलें. पण ते ती सर्व थट्टा समजून हंसले. कोणी तेथून हलला असेल तर शपथ.

त्याच दिवशीं रात्रीं शिंप्यानें चोळी शिवून दिली. बादशाहानें चोळी नेऊन बेगम साहेबांना दिली व म्हणाला—"हा खण आणि ही चोळी जगांत इतरत्र मिळणें शक्य नाहीं. [illegible] शिंप्याच्या कामाची फार वाखाणणी केली.

कांहीं दिवसांनीं बायकांच्या एका मेळाव्यांत बेगम साहेबा गेल्या असतां तेथें एक सामान्य घराण्यांतली बाई अगदीं तशीच चोळी घालून आलेली पाहून त्यांना राग आला. बादशाहांनीं जगांत हा खण व अशा नमुन्याची चोळी नाहीं म्हणून सांगितलें तें खोटें. त्या परत महालांत गेल्या व त्यांनीं बादशाहांवर राग काढून तावडतोब ती कोण बाई व कोणाची बायको वगैरे गोष्टींची चवकशी करण्यास सांगितलें. बादशाहानें बेगम साहेबांची समजूत घालण्याचा किती प्रयत्न करून पाहिला. शेवटीं बेगमसाहेबांची समजूत घालण्याच्या हेतूनें बादशाहांनीं चवकशी करविली तेव्हां कळलें कीं नवी चोळी घालून मेळाव्यांत आलेली बाई दुसरी कोणी नसून शिंप्याचीच बायको होती व तो शिंपी विस्थलच्या गांवचाच राहणारा होता.

बादशाहानें दोघां नवराबायकोंना धरून समोर हजर करण्यास सांगितलें आणि दोघं आल्यावर बादशाहानें शिंप्याला विचारलें—"कायरे! शेवटीं तूं आपल्या जातीवर












गेलास! बेगमसाहबांच्या चोळीसाठीं दिलेल्या कापडांतलें कापड आपल्या बायकोच्या चोळीसाठीं चोरून नेलेंस!"

शिंपी म्हणाला—"खुदावंद! माझी ती चूक नाहीं. इतके अधिकारी पाहाऱ्याला असतां चोरी करणें कसें शक्य होईल? एवढें खरें कीं कापड तेंच आहे. पण मी तें चोरून नेलें नाहीं. घडलेली गोष्ट नीट ऐकून घेऊन मग मी चोरी केली का तें सांगावें. चार दिवस काम करीत होतों. घरून निरोप घेऊन मुलगा आला. चार लोकांसमक्ष मूर्खासारखा कांहींतरी बोलला मला आला राग. मी त्याला मारण्यासाठीं आपला जोडा फेंकला. तो घेऊन तो पळाला. तेव्हां जोड्यांत कापडाचे तुकडे आहेत हें मला आठवलें. म्हणून मी पाहरेकऱ्यांना त्याला धरायला सांगितलें. पण त्यांनीं तें थट्टेवारी सोडून दिलें. नंतर घरीं गेल्यावर पाहिलें तर जोड्यांत कापडाचे तुकडे नाहींसे झालेले. त्याच कापडाची चोळी शिवून माझी बायको आज मेळाव्यांत गेली होती. मी तरी तिनें घातलेली चोळी आजच पाहिली. ती मी आपल्याकडे पोंचती करण्याचें ठरविलें. परंतु विचार केला, बादशहानें वापरलेले कपडे आम्ही गरिबांनीं घालायचे असतात. आम्ही वापरलेले कपडे बादशहाकडे कसे आणून द्यायचे? या संकोचानें घेऊन आलों नाहीं. माझी कांहीं चूक असेल तर शिक्षा करावी.

शिंप्याचें चातुर्य पाहून बादशाह चकित झाला. तो बिरबलच्या गांवचाच आहे हें कळल्यावर त्यानें दाखविलेलें चातुर्य पाहून आनंद पण झाला. बादशहानें दोघां नवराबायकोला बक्षिस देऊन निरोप दिला.





# शक्तिदेव

फार पूर्वी वर्धमानपुर नांवाच्या एका गांवीं परोपकारी नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याला कनकरेखा नांवाची एक रूपवती कन्या होती. लग्नाला योग्य झाल्यावर आपल्या मुलीला योग्य वर कसा मिळणार, ही काळजी वाटूं लागली राजाला. राजा ती गोष्ट एकदां राणीजवळ बोलला. तेव्हां राणी म्हणाली—"तुम्हीं आपल्या मुलीच्या लग्नाची इतकी काळजी करीत आहां. पण ती तर लग्नाला तयारच नाहीं. ती म्हणते आहे कीं तिच्या नशिबीं लग्न लिहिलेलें नाहीं. लग्न झालेंच तर लग्न झाल्याबरोबर तिला मरण येईल.

तें ऐकून राजा आपल्या मुलीकडे गेला व म्हणाला—"बाळ! अग हें काय खूळ डोक्यांत घेऊन बसली आहेस? देवकन्या सुद्धां लग्न व्हावें म्हणून किती धडपड करतात आणि तुला काय हें सुचत आहे!"

कनकरेखा मान खालीं करून म्हणाली—"बाबा! मला आतांच लग्न करावेंसें नाहीं वाटत. माझें लग्न झाल्यानें तुम्हांला तरी काय सुख मिळणार आहे!"

"हें ग काय तुझें बोलणें! मुलीच्या लग्नाची काळजी आईबापाला नाहीं तर कोणाला असणार? कन्यादानासारखें पुण्य दुसरें नाहीं. युक्तवय झाल्यानंतर मुलगी लग्न शिवाय पितृगृहीं राहाली तर आईवडिलांना पाप लागतें." राजा म्हणाला.

"बरें तर मी लग्नाला तयार आहें. परंतु माझ्याशीं लग्नाला जो तयार होईल तो एक तर ब्राह्मण किंवा क्षत्रिय असला पाहिजे व त्यानें कनकपुरी पाहिली असली पाहिजे. या



दोन गोष्टी शिवाय माझी दुसरी कांहीं अट नाहीं." कनकरेखा म्हणाली.

तें ऐकून राजाला परमानंद झाला. या अटी तर अगदींच सामान्य वाटल्या त्याला. कनकपुरी पाहून आलेले ब्राह्मण व क्षत्रिय तरुण असंख्य असणार अशी त्याची समजूत होती. त्यानें दुसऱ्या दिवशीं दरबार बोलावला व मुलगी लग्नाला तयार असल्याचें व तिनें सांगितलेल्या अटी प्रमाणें योग्य वर शोधावा अशी विनंती केली. परंतु कनकपुरी नांवाचें गांव तरी आहे कीं नाहीं याची शंका प्रत्येकाला होती.

अर्थातच राजाला आश्चर्य वाटलें. तरी प्रयत्न करून पहावा या हेतूनें राजानें राजधानी भर दवंडी पिटविली. परंतु ती दवंडी ऐकून एक देखील तरुण पुढें आला नाहीं.

गांवांत बलदेव नांवाच्या एका ब्राह्मणाला शक्तिदेव नांवाचा मुलगा होता. त्याला जुगारीचा नाद होता. त्या नादांत तो बापाची सर्व इस्टेट घालवून बसला होता. त्यानें राजाची ती दवंडी ऐकली व विचार केला कीं कनकपुरी मी पाहिली आहे अशी थाप मारून राजकन्येशीं लग्न करून घेऊं व पुढें होईल तें पाहून घेऊं. त्या प्रमाणें विचार करून त्यानें राजाच्या नोकरांना तसें जाऊन सांगितलें. म्हणाला—"मी ब्राह्मण आहें आणि मी कनकपुरी पाहिलेली आहे." नोकर त्याला राजाकडे घेऊन गेले व राजानें त्याला मुलीकडे पाठवून दिलें.

राजकन्येनें त्याला विचारलें—"तूं कनकपुरी पाहिली आहेस का?"

"होय पाहिली आहे!" शक्तिदेव अडखळल्याशिवाय म्हणाला.

"कनकपुरी कसें काय गांव आहे? केव्हां तूं पाहिलेंस तें? कोणत्या वाटेनें गेलास?" वगैरे प्रश्न तिनें त्याला विचारले.

"विद्याभ्यासासाठीं देशभ्रमण करीत अनेक नगरें पहात मी येथून हरिपुरी गेलों. तेथून बाराणसीस व नंतर पौंड्रवर्धनपुरीस व शेवटीं कनकपुरीस गेलों. तें नगर इंद्रपुरी-सारखें सुंदर नगर आहे. तेथें राहणारे लोक किती भाग्यवान आहेत असें वाटलें मनाला." अशी एक लोणकढी थाप मारली त्यानें.

कनकरेखानें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं. फक्त आपल्या नोकरांना म्हणाली—"या भामट्याला धरून घेऊन जा बाबांकडे आणि सांगा, यानें कनकपुरी पाहालेली नाहीं. याला शिरच्छेदाची शिक्षा द्यावी."

आतां शक्तिदेवाच्या समोर दोनच मार्ग उरले होते. एक राजकन्येनें त्याच्यावर लावलेला, खोटेपणाचा आरोप मुकाट्यानें कबूल करून मृत्युदंड स्वीकारणें आणि दुसरा, सारें जग पालथें घालून कनकपुरी पाहून येऊन आपला खरेंपणा शाबित करणें. त्यानें दुसरा मार्ग स्वीकारला.

अरण्यांतून कित्येक दिवस चालत राहिल्यावर त्याला एक सरोवर दिसलें.



स्फटिकासारखें स्वच्छ पाणी पाहून त्यानें त्यांत स्नान केलें आणि सरोवराच्या उत्तरे-कडील एका आश्रमांत प्रवेश केला. तेथें पिंपळाच्या झाडाखालीं एक वृद्ध ऋषि तपश्चर्या करीत बसलेले दिसले. त्यानें त्यांना नमस्कार केला आणि विचारलें—"मुनिवरेण्य! मी कनकपुरीला निघालों आहें. या अरण्यांत पुढली वाट मला माहीत नाहीं. म्हणून आपणांकडे आलों आहें."

"बाबा रे, मी या अरण्यांत गेलीं आठ शतकें तपश्चर्या करीत आहें. पण मी कधीं त्या गांवाचें नांव ऐकलें नाहीं." मुनि म्हणाले.



"म्हणजे मेल्याशिवाय तें मला मिळणार नाहीं असें दिसतें आहे." शक्तिदेव म्हणाला. त्याच्याकडून त्याच्यावर ओढवलेला सर्व प्रसंग ऐकून मुनि म्हणाले—"येथून तीनशें योजनें दूर कांपिल्यदेश आहे. तेथें उत्तरेकडील पर्वतावर एका आश्रमांत माझे वडील बंधु तपश्चर्या करीत आहेत. त्यांना कदाचित कनकपुरीची माहिती असावी."

शक्तिदेवाला थोडा आधार मिळाला. दुसऱ्या दिवशीं तो पुढें निघाला व पुष्कळ कष्ट सहन करून कांपिल्यदेशांत जाऊन पोंचला. उत्तरेकडील पर्वतावर गेला. तेथील आश्रमांत वृद्ध मुनीच्या वडील बंधूंना नमस्कार करून त्यानें कनकपुरीचा मार्ग विचारला. त्यांना देखील कनकपुरीचें नांव माहीत नव्हतें. पण ते म्हणाले—"अरे, तें द्वीप दूर द्वीपद्वीपांतर पार केल्यास कदाचित सांपडेल. समुद्रांत एका जागीं उत्स्थल नांवाचें एक द्वीप आहे. तेथें सत्यव्रत नांवाचा राजा राज्य करतो. त्यानें द्वीपद्वीपांतराचा प्रवास केला आहे. म्हणून त्याला कनकपुरी जाण्याची वाट कदाचित माहीत असेल. म्हणून तूं प्रथम समुद्रकिनाऱ्याच्या विटंकपुरच्या गांवीं जा. तेथून कोणीतरी व्यापारी तुला आपल्या जहाजांत बसवून घेऊन उत्स्थल द्वीपांत पोंचता करील."

त्याप्रमाणें शक्तिदेव विटंकपुरीस गेला व समुद्रदत्त नांवाच्या एका वैश्य व्यापाऱ्याच्या जहाजांत बसून उत्स्थल द्वीपाच्या प्रवासास निघाला. परंतु दुर्दैवानें एक मोठें तुफान आलें व त्यांत तें जहाज बुडालें. एक फळी धरून समुद्रदत्तानें आपला बचाव केला.

शक्तिदेव जहाजाबरोबर समुद्रांत बुडाला. त्याला एका लहानशा देवमाशानें गिळलें. उत्स्थल द्वीपानजीक एका कोळ्यानें तो मासा धरला आणि आपल्या राजाला नजराणा म्हणून घेऊन गेला. राजानें त्या कोळ्याकरवींच तो मासा समोर कांपविला तेव्हां त्या माशाच्या पोटांतून शक्तिदेव जिवंत बाहेर आला. देवव्रत राजानें चकित होऊन शक्तिदेवाला त्याचा जीवन वृत्तांत विचारला. तो ऐकून राजाला जास्तच आश्चर्य वाटलें व दैवयोगानें तो बरोबर उत्स्थल द्वीपांतच आला असल्याचें त्याला सांगून म्हणाला—"मीच तो सत्यव्रत राजा. मी अनेक द्वीपांतराचा प्रवास केला आहे. परंतु तूं म्हणतोस ती कनकपुरी मात्र मी कधीं पाहिली नाहीं. एका द्वीपांत त्या नगरीचें नांव अवश्य ऐकलें आहे."

तें ऐकून शक्तिदेव थोडा निराश झाला. परंतु आशेचा एक तंतु होता. सत्यव्रतानें त्या नगरीचें नांव ऐकलें आहे. तर मग तें हुडकून काढलेंच पाहिजे. इतक्या संकटांतून देवानें रक्षण केलें आहे तर याहि संकटांतून देव पार लावील व यश हातीं येईल असें त्याला वाटलें. सत्यव्रतानें पण त्याला सर्व यत्न करण्याचें वचन दिलें."

शक्तिदेव रात्रीं एका ब्राह्मणांच्या मठांत राहाला. तेथेंच जेवला व तेथें विष्णुदत्त



नांवाच्या एका ब्राह्मणाशीं त्याची ओळख झाली. त्या ब्राह्मणाला शक्तिदेवाची सर्व कथा कळली. त्यानें आनंदानें उठून त्याला प्रेमालिंगन केलें व म्हणाला—"अरे तूं माझ्या मामाचा मुलगा आहेस रे, म्हणजे मामेभाऊ!" परदेशांत अगदीं अनपेक्षितपणें आपल्या एका नातेवाइकाची भेट म्हणजे देखील दैवयोगच.

सकाळीं सत्यव्रत शक्तिदेवाला भेटण्यासाठीं मठांत आला व म्हणाला—"रत्नकूट नांवाच्या द्वीपांत प्रत्येक आषाढ शुद्ध द्वादशीला देवाचा उत्सव असतो. तेव्हां

मोठी जत्रा भरते. देशोदेशींचे लोक जत्रेला येतात. उत्सव लवकरच आला आहे व तें द्वीप पण जवळच आहे. मी तुला तेथें बरोबर घेऊन जातों. तेथें तुला पाहिजे असलेली सर्व प्रकारची माहिती मिळण्याची शक्यता आहे."

शक्तिदेवानें होकार दिला व विष्णुदत्ताचा निरोप घेऊन सत्यव्रताबरोबर त्याच्या जहाजांत बसून निघाला. समुद्रांत त्यांना दूर एका जागीं पंख असलेला एक पर्वत दिसला, तेव्हां शक्तिदेवानें 'तें काय हो ?' म्हणून विचारलें. सत्यव्रत म्हणाला—"तो एक वटवृक्षदेव आहे. त्याच्याखालीं एक मोठा भोंवरा आहे. तो भोंवरा फार धोक्याचा आहे. आपण थोडें दुरून गेलें पाहिजे."

परंतु तोपर्यंत तें जहाज भोंवऱ्याच्या परिसरांत येऊन सांपडलें होतें आणि तें त्या वटवृक्षाकडे ओढलें जाऊं लागलें. "आपण सांपडलों रे बाबा भोंवऱ्यांत. मला स्वतःची विशेष काळजी नाहीं. परंतु इतका कष्ट करून तुझा यत्न निष्फळ होणार कीं काय या गोष्टीचेंच वाईट वाटत आहे. त्या झाडाजवळ जहाज पोंचतांच जहाजाची फांदी धरून स्वतःला वांचवून घेणें शक्य झाल्यास पहा !"

शक्तिदेवानें उडी मारून झाडाची फांदी धरली आणि वर चढून गेला. त्याच क्षणाला सत्यव्रताबरोबर जहाज भोंवऱ्यांत बुडून तळाला गेलें. कनकपुरी पहावी म्हणून निघालों आणि आपल्यासाठीं प्राणार्पण करणाऱ्या एका कोळ्यांच्या राजाची भेट अशी घडावी ना ! काय हें माझें दुर्दैव !" शक्तिदेवाला या गोष्टीचें फार दुःख झालें.

(पुढल्या अंकांत संपूर्ण)





# परोपकारी गोपाळ

गोपाळचा एक मामा परदेशांत प्रवासाला, किती तरी वर्षें गेला होता. तो स्वदेशीं परत आला तेव्हां त्याला त्याच्या मुलांनीं किंवा सुनांनीं घरांत पाऊल टाकूं दिलें नाहीं म्हणून तो कोठेंतरी दूर डोंगरापलीकडे राहतो आहे व म्हातारपणीं त्याला फार कष्ट सहन करावे लागत आहेत हें ऐकून गोपाळच्या आईचा जीव कळवळला. ती मुलाला म्हणाली—"अरे ! जाऊन पाहून तरी ये दादाला. शोध काढीत हिंडलास तर नक्की दिसेल कोठें तरी आणि त्याला घेऊनच ये आपल्या घरीं."

गोपाळ गाडी घेऊन निघाला मामाच्या शोधार्थ. डोंगरांत एका जागीं गाडी जायला वाट नाहीं हें पाहून त्यानें एका गांवांत एका गांवकऱ्याकडे गाडी ठेवून दिली. बैलांच्या चाऱ्याची व्यवस्था करून दिली आणि पायींच डोंगर चढूं लागला. डोंगरापलीकडच्या प्रदेशांत पाऊस न पडल्यामुळें तेथल्या लोकांना फार त्रासांत दिवस काढावे लागत आहेत हें त्याला वाटेंत कळलें. तरी तो डोंगरापलीकडच्या मैदानांत येऊन पोंचला.

त्याला त्यावेळीं मैदानांत दुरून पुष्कळ लोक डोक्यावर घागरी किंवा मोठमोठीं तांब्यापितळेचीं भांडीं भरून पाणी घेऊन येत असलेले दिसले.

गोपाळनें निघतांना बरोबर भाकऱ्या बांधून घेतल्या होत्या. एका तांब्यांत पाणी घेतलें होतें. परंतु वाटेंत भाकऱ्या संपल्या व पाणी पण संपुष्टांत आलें. म्हणून त्यानें त्या लोकांना विचारलें "जवळपास कोठें एक वेळचें जेवायला मिळेल का हो ?"



“ दहा मैलावर, वरच्या बाजूच्या गांवाला मिळेल! या गांवांत स्वतःच्या पोटापुरतें जेवायला मिळायचीच मारमार!” असें त्याला उत्तर मिळालें.

“ मी स्वतः शिजवून घेईन. शिजवायला जागा सामान मिळालें कीं पुरे!” गोपाळ म्हणाला.

“ कांहीं पाहिजे असेल तें लक्ष्मीचंद शेटजींकडे मिळेल. त्याचे भावमात्र भरमसाट असतात! पण कांहीं लागलें तर त्याच्याच कडे विकत घ्यावें लागतें. प्यायचें पाणी देखील त्याच्याच विहिरीचें आणावें लागतें. आम्हांला!” त्या लोकांनीं गोपाळला सांगितलें. तो प्यायचें पाणी देखील विकतो असेंदेखील कळलें. गोपाळ एक जणाला म्हणाला—“ एवढा तांब्याभरून पाणी दिलेंत तर त्यावर भागेल माझी भूक तहान!”

त्यावर तो मनुष्य म्हणाला—“ चल चल, आला आहे मोठा पाणी मागायला! असें फुकटांत पाणी मिळतें होय? लक्ष्मीचंदाकडे पैसे मोजून दिले आहेत तेव्हां कोठें चौघां जणा पुरेसे एवढें पाणी मिळालें आहे!” पण आणखी एकानें गोपाळकडून चार आणे घेऊन एक तांब्या भरून पाणी दिलें. त्या माणसाची चूक दाखविण्यांत तरी कांहीं अर्थ नव्हता. कारण तो तीन मैल दुरून चार आण्याला एक घागर याप्रमाणें पैसे देऊन पाणी घेऊन आला होता. पाण्याच्या खरीदीविक्रीचें वर्णन ऐकून गोपाळ चकितच झाला.

गोपाळनें त्याला एक प्रश्न विचारलाच—“ का हो! पाण्यासाठीं तुम्हांला एवढा कष्ट सहन करावा लागतो आहे, मग सर्वांनीं मिळून आपल्या गांवांत एक विहीर कां नाहीं खणून घेतलीत?”

“ हें पहा या सर्व प्रदेशाचा गुत्ता आहे लक्ष्मीचंद शेटकडे! त्यानें अनेक जागीं अशा विहिरी खणायचा विचार करून माहीतगार तज्ञ लोकांना विचारलें. तेव्हां त्यांच्याकडून किती खणलें तरी एक थेंबभर देखील पाणी मिळणार नाहीं असें कळलें. ही गोष्ट त्या लक्ष्मीचंदनेंच सांगितली आम्हांला. त्या पुण्यात्म्याच्या कृपेनें पाणी मिळतें आम्हांला. तो पाणी देतो म्हणून आम्ही आजवर जिवंत आहों.” पाणी विकणारा म्हणाला.

थोडें पाणी पिऊन व कंठ थोडा ओला करून गोपाळ पुढें निघाला. तांब्यांत पाणी उरलें तें पुढें उपयोगी पडेल म्हणून त्यानें ओतून टाकलें नाहीं. भूक लागली होती. पण काय करणार पुढेंच जाणें आवश्यक होतें. मागे कांहीं मिळण्याची आशा नव्हतीच. वाकड्या तिकड्या नागमोड्या पायवाटेनें चालत असतां त्याला दुरून कोणीतरी “ पाणी! पा....णी” असें कण्हत असल्याचा आवाज ऐकूं आला. गोपाळचें पाऊल तिकडे वळलें. जवळ जाऊन पाहातो तों, त्याला एक आंधळा म्हातारा जमिनीवर पडलेला दिसला. गोपाळनें त्याला बसवून आपल्या



तांब्यांतलें पाणी त्याला पाजलें व उरलेलें स्वतः पिऊन टाकलें.

त्याच वेळीं तिकडे एक जण रिकामी घागर घेऊन धांवत आला आणि चकित होऊन गोपाळकडे पहात विचारूं लागला—“ कोण रे बाबा तूं? त्या आंधळ्याला तूं पाणी पाजलेंस हें लक्ष्मीचंद शेटजींना कळलें तर विहिरीवर पाऊल टाकूं देणार नाहीं तो. माहीत नाहीं वाटतें तुला? एवढेंच काय त्याचा राग तुझ्यावर आहे हें कळलें तर आसपासच्या गांवचा कोणी गांवकरी तुला दारांत पाऊल टाकूं देणार नाहीं.”



"ह्या म्हाताऱ्यावर एवढा राग यायला ह्यानें त्या लक्ष्मीचंदाचें असें काय घोडें मारलें बुवा ?" गोपाळनें त्याला विचारलें.

"हा एक लुच्चा आहे. हा केव्हां मरेल याची तो व आम्ही वाट पहात आहों." तो म्हणाला.

त्या म्हाताऱ्याकडे गोपाळ जास्त लक्ष-पूर्वक पाहूं लागला. घोटभर पाणी घशाखालीं उतरल्यामुळें त्या बिचाऱ्याला जिवांत जीव आल्यासारखें वाटलें. पण उठून बसण्या इतकी किंवा बोलण्या इतकी शक्ति त्याच्या अंगांत आली नव्हती. थोडें पाणी आणखी पाज म्हणून त्यानें खूण केली. पण गोपाळच्या तांब्यांत पाणी नव्हतें. काय करावें त्याला सुचेना. लक्ष्मीचंदाच्या विहिरी-पर्यंत जाऊन पाणी आणावें तर तोंपर्यंत म्हातारा जिवंत तरी राहील कीं नाहीं, त्याला शंका वाटली.

तितक्यांत जवळच त्याला कोणी तरी बाई ओरडत असलेली ऐकूं आली. गोपाळ त्या बाजूला धांवला. त्याला दोघेजण एका बाईला झोडपून काढण्याची भीती दाखवून तिनें आणलेलें पाणी तिच्या हातांतून हिसकावून घेण्याच्या प्रयत्नांत असल्याचें दिसलें. गोपाळनें सिंहासारखी झडप मारून एकाची मुंडी धरली व त्याच्या हातांतली काठी हिसकावून घेऊन त्याला खूप चोप दिला व दुसऱ्याच्या अंगावर तो धांवणार, त्या आधींच तेथून पाय काढण्यांत शहाणपण समजून दुसरा पळून गेला.

"या पाणचोरामुळें मरण बरें वाटूं लागलें आहे, बाबा! कोण तूं कोणास ठाऊक ! पण देवासारखा पावलास बघ!" ती बाई म्हणाली.

"अहो बाई! तुम्हांला तरी देवानेंच पाठविलें पहा! एका आंधळ्या म्हाताऱ्याचा जीव घोटभर पाण्यासाठीं कासावीस झाला आहे. आपल्या घागरींतलें एवढा तांब्याभर पाणी द्या." गोपाळ म्हणाला.

एक थेंबदेखील बाहेर सांडूं न देतां त्या बाईनें तांब्याभर पाणी दिलें. गोपाळनें धांवत जाऊन म्हाताऱ्याला पाणी पाजलें. ती बाई तें दृश्य भयभीतपणें पहात होती. तेवढ्यांत कोणी पाहिलें तर तिच्यावर व गोपाळवर मोठा प्रसंग ओढवेल अशी भीति वाटत असावी त्या बिचारीला.



गोपाळनें तें ओळखलें व म्हणाला "भिऊं नका बाई! मी महाराजांना भेटून लक्ष्मीचंदाचे सर्व खेळ बंद करतों. या म्हाताऱ्यानें त्या लक्ष्मीचंदाचें असें काय घोडें मारलें, तुम्हांला कांहीं माहीत आहे का ?" त्यानें त्या बाईला विचारलें.

त्या बाईनें ती सर्व कथा सांगितली. म्हणाली—"म्हाताऱ्याला दिव्य दृष्टि आहे. पाणी कोठें आहे हें बरोबर कळतें. त्यानें लक्ष्मीचंदाकडे जाऊन ती गोष्ट सांगितली. म्हणाला—"पाण्याचा सर्व दुष्काळ कायमचा मिटेल." जवळ पास आठ दहा विहिरींना सहज पाणी लागेल. त्यावर लक्ष्मीचंद म्हणाला—"या पंचक्रोशींत कोठें पाणी नाहीं, हें मला माहीत आहे. मी कित्येक लोकां-कडून पाणी असल्याचें कळतांच विहीर खणून पाहिली, पण पाणी लागलें नाहीं." त्यावर म्हातारा म्हणाला होता—"अहो, दहावीस हातावर पाणी लागलें नाहीं तर मी आपलें नांव बदलून देईन." तेव्हां सर्व गांवकऱ्यांनीं विहीर खणून पहायला सांगितलें.

"नंतर लक्ष्मीचंदानें जागा दाखवायला सांगितलें. म्हातारा लक्ष्मीचंदाबरोबर एका जागीं गेला. त्यानें जागा दाखविली. तेथें खूण करून ठेवली. लक्ष्मीचंदानें त्या जागीं



विहीर न खणतां दुसऱ्याच जागीं खणली व पाणी लागलें नाहीं तेव्हां त्याला 'लुच्चा' 'फसव्या' म्हणून सांगून निघून जायला सांगितलें आणि आम्हां गांवकऱ्यांना बजावून सांगितलें कीं या लबाड आंधळ्याला जो कोणी पाणी पाजील किंवा खायला देईल त्याला विहिरीवर पाणी भरायला परवानगी मिळणार नाहीं. एवढेंच नव्हें तर त्याला जागच्या जागीं पुरून टाकीन अशी भीति घालायला देखील त्यानें कमी केलं नाहीं."

तेवढ्यांत म्हातारा म्हणाला—"मी लोकांना किती सांगितलें कीं मी सांगितल्या जागीं लक्ष्मीचंदानें विहीर खणलीच नाहीं. पण माझें, कोण ऐकतो? मी आंधळा झालों तेव्हांपासून देवानें मला ही दिव्य दृष्टि दिली. आज सुद्धां मी दाखवीन त्या जागीं पाणी लागलेंच पाहिजे. मला जमिनीखालीं किती खोल पाण्याचा झरा वहात असला तरी तो छान ऐकूं येतो. एवढेंच कशाला मी पडलों आहे या जागीं दहा हातावर पाणी लागेल. म्हातारा उठून बसला होता. गोपाळनें पाजलेल्या पाण्यामुळें त्याच्या अंगांत थोडा तकवा आला होता.

म्हाताऱ्याच्या बोलण्यावरून व जास्त चवकशी केल्यानंतर तोच आपला मामा आहे ही गोष्ट गोपाळला कळली.

"तूंच कीं रे माझा मामा! आईनें तुला घेऊन यायला मला पाठविलें होतें व तुला शोधत मी येथवर आलों. सर्व जग हिंडून तूं आलास व आज तुला रहायला घर नाहीं हें ऐकून आईला किती वाईट वाटेल!" गोपाळ त्या म्हाताऱ्याला म्हणाला.

तितक्यांत रिकाम्या घागरी घेऊन कांहीं लोक बडबडत येत असलेले दिसले. म्हणे लक्ष्मीचंदच्या विहिरींत कोणीतरी पडून मेला. होती एकच विहीर, ती देखील गेली. गोपाळ त्या म्हाताऱ्याबरोबर बोलत होता तेथेंच सर्व जमा झाले. गोपाळ त्यांना म्हणाला—"निदान आतां तरी नीट डोळे उघडून पहा थोडे. त्या लक्ष्मीचंदानें तुमच्या-कडून पैसे उकळतां यावे म्हणून या प्रांतांत कोठें पाणीच नाहीं म्हणून खोटें सांगितलें होतें. घेऊन या पहारी, फावडीं आणि टोपलीं आपण उभे आहों येथेंच खालीं दहा हातांवर पाणी आहे. त्या लक्ष्मीचंदाची चंदी आजच्या आज बंद करून दाखवा."

गोपाळनें सांगितलें तें सर्वांना पटलें व सर्व भराभर जाऊन आपापल्या पहारी, फावडीं घेऊन आले. सर्वांचा हात लागल्यावर पांच सहा तासांत पाणी लागलें. रात्र पडली तेव्हां काकडे लावून लोकांनीं कामें केलीं. घागरींनीं पाणी बाहेर काढीत होते व खणीत चालले होते. सकाळीं उजाडलें तों-पर्यंत पुरुषभर खोल पाणी विहिरींत होतें. गांवांतल्या बायकांनीं नारळ फोडले. विहि-रीची पूजा केली आणि विहिरीवर पाण्याचा वापर सुरू झाला.

गोपाळच्या मामानें आणखी आठ दहा जागा दाखवल्या. तेथें देखील विहिरी खणल्या. इतकें पाणी लागलें कीं लोकांनीं मोटा लावून शेताचीं कामें सुरू केलीं. ज्या प्रदेशांत कधीं हिरवळ दिसली नव्हती तेथें हिरवीगार शेतें दिसूं लागलीं.

गोपाळनें राजाच्या कानावर लक्ष्मीचंदा-विरुद्ध प्रजेचें गाऱ्हाणें पोंचतें केलें. जमीन-दारानें लक्ष्मीचंदाच्या हातचा गुत्ता काढून घेऊन शेतकऱ्यांस शेतें वांटून दिलीं.

गोपाळ व त्याच्या मामाचे गोडवे त्या गांवचे व जवळ पासच्या गांवचे लोक गाऊं लागले.





# वेड्याची अक्कल

एका डोंगराळ प्रदेशांत एक आदिवासी लोकांच्या राजधानीच्या गांवीं एक हुशार लोहार रहात असे. राज्यांतले सर्व शिकारी त्यांना लागणारीं सर्व लोखंडी पोलादी आयुधें तयार करून घेत.

एक दिवशीं सकाळीं लोहारानें आपली भट्टी पेटविली आणि कामाला लागणार इतक्यांत राजाच्या शिपायांनीं येऊन राजानें बोलाविलें असल्याचें सांगितलें. बिचारा लोहार काय करणार. भट्टी विझविली आणि कपडे बदलून राजाच्या दर्शनाला निघाला.

लोहार आल्याचें कळतांच राजानें त्याला हजर करायला सांगितलें आणि त्याच्या-समोर पोलादाचे तुकडे व जुनीं शस्त्रें आणून टाकलीं आणि म्हणाला—"या पोलादाचा माणसासारखा हाडामांसाचा मनुष्य घडवून आण.." तें ऐकून लोहाराच्या छातींत धस्स झालें. पोलादाचा खरा मनुष्य कसा बुवा घडवायचा ? नाहीं म्हणावें तर राजा मान उडविणार. मनुष्य घडवून आणतों असें सांगून घडवून न आणावा तरी राजा सोडणार नाहीं. काय करावें त्या विचाऱ्याला सुचेना. तो घरीं आला तेव्हां त्याची मित्र मंडळी राजानें, कशाला बोलाविलें होतें हें विचारूं लागले. तो म्हणाला—"माझें कर्म !" आणि सर्व कथा त्यांना सांगितली. सर्वांनीं आपापल्यापरीनें एक न एक युक्ति सांगितली. पण पोलादाचा जिवंत मनुष्य कसा करावयाचा हें कोणी सांगितलें नाहीं व सांगणार तरी कसे ?

शेवटीं लोहार गांव सोडून रानांत जाऊन राहूं लागला. भूक तहान झोप विश्रांति सर्व उडाली. वेड्यासारखा स्वतःशीं बडबड मात्र तो करूं लागला. असाच एकदां रानांत बडबडत फिरत असतां त्याला एक वेडा भेटला. तो त्याला म्हणाला "मित्रा ! फार दिवसांनीं भेटला आहेस. चल माझ्या घरीं. आज तुझी मेजवानी."

लोहारानें जवळ जाऊन पाहिलें तर तो त्याचा एक मित्रच निघाला. कांहीं दिवसांपूर्वी त्याला वेड लागलें व तो भटकत कोठें निघून गेला हें कोणाला कळलें नव्हतें. त्या वेड्याचा देखील हेवा वाटूं लागला लोहाराला. कारण त्याला जगाची काळजी नव्हती कीं स्वतःच्या जिवाची काळजी नव्हती. तो त्या वेड्याबरोबर गेला.



एका झाडाखालीं वेडा जाऊन बसला व लोहाराला बसायला सांगून म्हणाला—"हेंच माझें घर !" नंतर त्यानें समोर जांभळें व मधानें पोळें ठेवलें व म्हणाला—"ही मेजवानी !" लोहाराला भूक लागलीच होती. त्यानें जांभळें खाल्लीं आणि मध प्याला. असेच कांहीं दिवस त्या वेड्याबरोबर राहाल्यावर लोहार स्वतःशीं एकदां बडबडूं लागला—"या वेड्याला सांगावें का कीं पोलादाचा जिवंत मनुष्य कसा करावयाचा तें ? त्यानें कांहीं युक्ति सांगितली तर खात्रीनें उपयोगी पडेल."

वेडा तें सर्व ऐकत होता. कांहीं वेळ विचारांत पडल्यासारखा दिसला व नंतर हंसत हंसत म्हणाला—"मित्रा ! हें कांही कठीण काम नाहीं. पोलाद वितळवायला माणसांच्या केसांची गरज असते. भट्टी पेटवून वितळव पोलाद आणि तें विझवायला मनुष्याच्या डोळ्यांचेंच पाणी लागतें ! बरें का ?"

तो वेडा बडबडला खरा, पण लोहाराच्या डोक्यांत जणुंकांहीं लख्ख प्रकाश पडला.

त्यानें वेड्याची पाठ थोपटली आणि म्हणाला— "मित्रा! तुला वेडा म्हणणाराच वेडा! तुला जी अक्कल आहे ती शहाणे म्हणविणारांना नाहीं!"

तें ऐकून वेडा त्याच्या काना जवळ तोंड नेऊन म्हणाला—"पण हें गुपित आहे. मी दिलेला मंत्र आहे. इतर कोणाला कळतां कामा नये!"

दुसऱ्या दिवशीं लोहार राजाकडे गेला आणि म्हणाला—"महाराज! पोलादाचा जिवंत मनुष्य करून दाखविणें तितकेंसें कठीण नाहीं. पण त्यासाठीं लागणारें सामान माझ्याकडे नाहीं."

राजा म्हणाला—"तूं सांग, काय हवें तें आणून देतों!"

लोहार म्हणाला—"त्यासाठीं शंभर गाडे भरून माणसांचे केस पाहिजेत व शंभर घागरी डोळ्यांचें पाणी पाहिजे. मनुष्याच्या केसानेंच पोलाद वितळलें पाहिजे व डोळ्यांतल्या पाण्यानेंच तें गार केलें पाहिजे तरच पोलादाच्या माणसाच्या देहांत प्राण येईल."

राजानें हुकूम सोडला कीं शंभर गाडे माणसाचे केस व शंभर घागरी डोळ्यांचें पाणी घेऊन यावें. परंतु दुसऱ्या दिवशीं प्रधानानें येऊन सांगितलें कीं महाराज, शंभर तर काय एक गाडीभर तरी माणसाचे केस मिळणें कठीण. तीच गोष्ट डोळ्याच्या पाण्याची. तेव्हां कोठें राजाचे डोळे उघडले व त्यानें लोहाराला निरोप दिला.

लोहारानें आपल्या वेड्या मित्राला जंगलांतून आणून आपल्या घरींच त्याला ठेवून घेतलें.





# बळभीम व महाबळी

एक जंगलाजवळच्या प्रदेशांत एक लाकूडतोड्या रहात असे. त्याच्या अंगांत दहा माणसांचें बळ होतें. त्याचें नांव भीमू असें होतें. त्याच्याहून जास्त बलवान या जगांत दुसरा असणेंच शक्य नाहीं अशी त्याला घमेंड होती. कारण तो सामान्य मनुष्याला उचलून आणतां येईल अशा मोळीच्या दहापट मोठी मोळी करून रानांतून आणीत असे आणि बायकोसमोर फुशारक्या मारीत असे—"हें बघ, मी कलियुगांतला भीम आहे बरें का?"

"जर खरोखरचा भीम समोर उभा राहला तर गाळण उडून जाईल स्वारीची." बायको म्हणाली.

"तूं दाखव तर दुसरा वीर! नांव बदलून टाकीन आपलें!" भीमू म्हणे.

एकदां त्याची बायको दुर्गी एक मोठें मडकें डोक्यावर घेऊन विहिरीवर पाणी आणायला गेली. तिनें विहिरींत पोहरा सोडला व भरल्यावर ओढूं लागली. पण तो इतका जड झाला कीं जागचा हालेचना. शेवटीं कंटाळून पोहरा विहिरींतच सोडून रिकामें मडकें घेऊन घरीं निघाली.

ती पाऊल वाटेनें जात असतां रानांतून येणाऱ्या पाऊल वाटेनें येणारी आणखी एक बाई तिला भेटली. तिच्या कडेवर एक मूल होतें व हातांत रिकामी घागर. ती देखील विहिरीवर पाण्यालाच चालली होती. दुर्गीला रकामें मडकें घेऊन परत घरीं जातांना पाहून तिनें विचारलें—"रिकामें मडकें घेऊन परत कां आलीस? विहीर आटून गेली कीं काय?"



"नाहीं हो बाई! पाण्यांत सोडलेला पोहरा दहा जणांचा हात लागल्याशिवाय बाहेर येईलसें वाटत नाहीं. भुताटकी आहे काय कळत नाहीं." दुर्गी म्हणाली.

"एवढेंच ना? ये माझ्याबरोबर! तुला जेवढें पाहिजे तेवढें पाणी मी काढून देतें." ती स्त्री म्हणाली. तसें जास्त बळपण तिच्या अंगांत असेलसें दिसत नव्हतें.

त्या स्त्रीच्या कडेवरून उतरून मुलानें ती दोरी हातांत घेतली व पोहरा भरून पाणी काढलें. आश्चर्यानें दुर्गी त्या मुलाकडे पाहूं लागली. तिला स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. पण मुलाच्या आईच्या तोंडावर आश्चर्य दिसत नव्हतें.

तो मुलगा थोडादेखील दमला नाहीं. त्यानें पोहऱ्यामागून पोहरे विहिरींतून काढले व आपल्या आईची घागर व दुर्गीचें मडकें भरून दिलें. त्यानें काढून दिलेल्या पाण्यानें दोघींनी आंघोळी केल्या व लुगडी-पण धुवून घेतलीं.

दोघी परत निघाल्या तेव्हां दोघींच्या वाटा बदलण्यापूर्वी दुर्गीनें त्या स्त्रीच्या घरची चवकशी करून घेतली. ती म्हणाली—"या वाटेनें गेलीस तर मिळेल माझें घर. माझ्या नवऱ्याचें नांव बलभीम." असें सांगून ती घरीं निघून गेली.

दुर्गीनें घरीं आल्याबरोबर नवऱ्याला घडलेलें वृत्त सांगितलें—"जवळच्या रानांत एक बलभीम राहातो. तो स्वतःला अपर भीम म्हणवितो." "होऊं दे एकदां माझी त्याच्याशीं भेटा!" भीमूनें फुशारक्या मारायला सुरवात केली.

"तुझ्या पायां पडतें! त्याच्या वाटेला जाऊं नकोस! त्यानें तुझी मानगुटी पिरगळून टाकली तर मी कोठें जायचें? त्याच्या एवढ्याशा पोराच्या अंगांत एवढी शक्ति आहे तर त्याच्या अंगांत किती असेल?" दुर्गी म्हणाली.

तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून भीमू म्हणाला—"उद्यां सकाळीं दाखव त्याच्या घरची वाट! पुढचें मी पाहून घेईन!"

दुसऱ्या दिवशीं तो बायको बरोबर धनुष्य बाण, तलवार वगैरे घेऊन निघाला. परंतु त्या बलभीमाला प्रत्यक्ष भेटण्यापूर्वी विहिरीवरचा तो पोहरा पहायला तो निघाला. त्याच वेळीं बलभीमाची बायको विहिरीवर पाण्याला आली.

भीमूनें पोहरा विहिरींत सोडला व तो बुडाल्यावर म्हणाला—"एवढासा पोहरा बाहेर काढायला दहा जण पाहिजे म्हणे!" नंतर वर ओढूं लागला पण तो हालेच ना! दांत ओठ चावून, आपल्या शक्तीची पराकाष्ठा करून त्यानें पाहिलें. पण सर्व मेहनत फुकट गेली. विहिरींत पडतां पडतां वाचला. कारण बलभीमाच्या मुलानें चटकन पुढें होऊन त्याचा हात धरून त्याला वांचविलें. नंतर त्या मुलानें भरभर पाणी काढून भीमूचें भांडें भरून दिलें.

"आतां तरी कळलें का? गुपचुप घरीं चल बघूं!" दुर्गी नवऱ्याला म्हणाली.





"यांत कांहीं तरी जादूमंत्र असावा, असा मला संशय आहे. त्या बल्भीमाला पाहाल्याशिवाय मी नाहीं येणार परत घरीं." भीमू म्हणाला.

"तुझ्या कपाळीं काय लिहिलें असेल तें माझ्या हातून का बदलणार आहे? पण मी नाहीं येणार बरोबर!" दुर्गी म्हणाली आणि घरीं निघून गेली. बल्भीमाची बायको भीमूला म्हणाली—"माझें ऐक आणि तूं सुद्धां कर्शी जा कसा! तुझ्यावर माझ्या नवऱ्याची नजर पडली तर त्यांत तुझें हित नाहीं." पण भीमू तिच्या पाठोपाठ गेलाच.

"माझा नवरा गेला आहे शिकारीसाठीं. त्याला रोज एक हत्ती लागतो खायला. म्हणून तूं कोठें तरी लपून बस आणि त्याला पहा. समोर दिसलास तर तुला तो जिवंत चावून खाईल." बल्भीमाची बायको म्हणाली.

तिनें भीमूला त्याच्या उंचीइतक्या उंच रांजणांत लपून बसायला सांगितलें.

संध्याकाळच्या सुमारास वावटळ आल्या-सारखें वाटलें. बल्भीम आपल्या घराच्या आवारांत आल्याबरोबर ओरडून म्हणाला—"हत्ती भाजून ठेवला आहेस का?" त्या आवाजानें सर्व घर हादरलें. भीमू बसला होता तो रांजण पण हादरला. भीमूला तर धडकीच बसली. आपल्याहून पुष्कळच जास्त शक्तिवान असला पाहिजे हा बल्भीम या गोष्टीचा त्याला प्रत्यय आला.

"तुझा हत्ती तयार आहे. येऊन बस खायला." त्याची बायको म्हणाली.

"होय पण जरा थांब! कोठून तरी माणसाचा वास येतो आहे. नरमांस खाऊन पुष्कळ दिवस झाले." असें म्हणत बल्भीमानें आपल्या घराच्या चारी बाजूचें जंगल हुडकून पाहिलें.



नवरा दूर निघून गेल्यावर त्याची बायको भीमू लपला होता त्या रांजणाजवळ येऊन म्हणाली—"माझा नवरा येईल व खाऊन पिऊन झोंपेल तेव्हां मी खिडकींत दिवा ठेवीन. पळून जायला ती खूण आहे असें समज. पुन्हां या घराच्या वाऱ्याला देखील येऊं नकोस."

"नाहीं येणार बाई, कान धरतों." भीमू म्हणाला.

एक प्रहर रात्र लोटल्यावर भीमूला खिडकींत दिवा दिसला. तो हळूंच रांज-णांतून बाहेर आला आणि जोरानें पळूं लागला.

तो थोडें अंतर गेला असेल नसेल वावटळ आली व त्याबरोबर 'मनुष्याचा वास!' 'मनुष्याचा वास' असा आवाज ऐकूं आला. तो बल्भीमाचाच आवाज होता, भीमूनें तो छान ओळखला. म्हणून तो जास्तच जोरानें धावूं लागला.

तो किती वेळ तसाच पळत राहला. बल्भीमाचा आवाज व वावटळ जणुंकांहीं पाठलाग करीत येत होते. एक तर तो पळत होता. त्यांत वाऱ्याचा जोर, एकूण तो फारच वेगानें पळत होता. पुष्कळ वेळ पळत राहाला तरी रान जास्त जास्त दाट



होऊं लागलें व मनुष्य वस्तीचें चिन्ह कोठेंच दिसत नव्हतें.

परंतु तितक्यांत त्याला समोर छातींत धडकी बसेल असें एक भयंकर दृश्य दिसलें. आतां आपलें आयुष्य संपुष्टांत आलें असेंच वाटलें त्याला. समोर एक महाबली दिसला त्याला. रानटी जनावरांचा एक ढीग समोर ठेवून तो त्यांना खात होता आणि त्यांचीं हाडें बाजूला फेंकून देत होता.

"कोण रे तूं? तुझ्या आयुष्याची दोरी तोडण्याची इच्छा कोणाच्या मनांत उपजली रे?" त्या महाबलीनें विचारलें.










"एका बलभीमानें!" भीमू म्हणाला.

महाबलीला तें ऐकून भयंकर राग आल्यासारखें दिसलें. म्हणाला—"मी या रानाचा मालक येथें असतां आणखी कोण आला आहे बलभीम? येऊं दे त्याला. जिवंत चिरून खाईन."

तितक्यांत बलभीम पण भीमूचा पाठलाग करीत येऊन पोंचला. त्याच्या बरोबर आलेल्या वावटळींत सांपडून भीमू उडाला आणि एका झाडावर जाऊन पडला. एक फांदी हातीं लागली म्हणून वांचला. नाहीं तर मरणारच होता. वर झाडाच्या पानांच्या आड लपून तो खालचें दृश्य पाहूं लागला. तें भयंकर दृश्य पाहून भयभीत होऊन त्यानें डोळेच मिटले. एक बलभीम तर दुसरा महाबली. त्यांचें द्वंद्वयुद्ध त्याला पहावें लागलें.

दोघे कांहीं वेळ परस्परांकडे पहात उभे राहाले नंतर परस्परांशीं भिडले. लाथाबुक्के मारून त्यांनीं परस्परांना खालीं पाडण्याचा यत्न चालू ठेवला. दगडाला पिळून काढण्याची शक्ति दोघांच्या अंगांत होती. उजाडेपर्यंत दोघांचें द्वंद्व चालू होतें. परस्परांचें बळ दाखवण्यासाठीं एकानें आकाशांत उड्डाण केल्याबरोबर दुसऱ्यानें पण केलें आणि ढगाआड अदृश्य झाले. आकाशांतच अधांत्रीं त्यांचें युद्ध चालू होतें. बराच वेळ दोघांपैकीं कोणीच खालीं आला नाहीं, तेव्हां भीमू हळूच झाडावरून उतरून घरीं पळून गेला.

तेव्हांपासून त्यानें स्वतःच्या शक्तीच्या वल्गना करायचें सोडून दिलें. संध्याकाळ झालीं तरी त्या महा काय राक्षसांचें द्वंद्व युद्ध चालूच होतें. ढग गडगडतात तसा त्यांचा आवाज ऐकूं येत होता.





# उत्तरकांड

लक्ष्मणाच्या तोंडांतून एक शब्ददेखील उमटला नाहीं. त्यानें रडतरडत सीतेला नमस्कार केला व लगेच तोंड फिरवून नावेंत जाऊन बसला.

त्यानें सीतेला पाहिलें. ती रडत होती. त्यानें मनाला आवरण्याचा किती यत्न केला. परंतु वारंवार त्याची दृष्टि तिकडेच वळे. सीतादेखील टक लावून त्याच्याकडे पहात होती. त्या निर्जन स्थानीं तिला आधार द्यायला कोण होतें?

सुदैवानें कांहीं मुनिकन्यांनीं तिला पाहिलें व त्या पळत वाल्मीकि मुनींकडे गेल्या आणि म्हणाल्या—"मुनिवर! गंगा किनाऱ्यावर एक स्त्री रडत आहे. कां कोणास ठाऊक? तिचा कोणी नातेवाईक जवळपास दिसत नाहीं. आपण येऊन एकदां त्या असहाय स्त्रीला पहावें."

वाल्मीकि ऋषि तें ऐकून आपल्या कांहीं शिष्यांसह सीता होती तेथें आले. त्यांनीं तिला ओळखून विचारलें—"दशरथाच्या सुनबाईचें मी स्वागत करतों. तूं येथें कां व कशी काय आलीस हें मला दिव्य ज्ञानानें कळलें. मी असेपर्यंत तुला कोणतेंहि भय नाहीं. माझा आश्रम जवळच आहे. तेथें तपस्विनी आहेत. त्या तुझी सर्व प्रकारें सेवा शुश्रूषा करतील. तूं काळजी करूं



नकोस. आश्रमांत तूं स्वतःच्या घरांत राहतेस तशी रहा."

सीतेनें त्यांना नमस्कार केला व त्यांच्या बरोबर आश्रमांत गेली. वाल्मीकि मुनींनीं तिला मुनिपत्नींच्या स्वाधीन करून सर्व प्रकारें तिची काळजी वाहण्यास सांगितलें.

अयोध्येच्या वाटेवर सुमंत्राला लक्ष्मण म्हणाला- "सीतेचा परित्याग करीत असतांना दादाला किती वाईट वाटलें हें तुम्ही स्वतः पाहिलेंच आहे. आतां निरपराध सीतेला जे कष्ट सहन करावे लागतील तें देखील पाहणें नशिबीं आलें आहे."

सुमंत्र म्हणाला- "लक्ष्मणा! रामाच्या नशिबीं सुखाचा वांटा फार कमी आहे. ऋषीमुनींनीं प्रथमच भविष्य वर्तविलें आहे कीं रामाला आपल्या आप्तेष्टांचा विरह सहन करावा लागेल. त्याच्या मुळाशीं एक रहस्य आहे. तें मी तुला सांगतों. पण तूं तें भरत किंवा शत्रुघ्न यांच्यापैकीं कोणाला सांगूं नकोस." असें सांगून त्यानें ती गोष्ट सांगितली. म्हणाला- "एकदां दशरथ राजा वशिष्ठ मुनींच्या आश्रमांत गेला होता. तेथें अत्रि मुनीचे चिरंजीव दुर्वासा ऋषि आले होते. मुनींचें स्वागत स्वीकारून दशरथ राजानें विचारलें- "मुनिवर्य! आपण माझ्या मुलांचें भविष्य सांगावें. रामाला व इतर मुलांना आयुष्य किती आहे? त्यांना अपत्य काय व त्यांना आयुष्य किती?"

त्याचें उत्तर म्हणून दुर्वासा मुनींनीं एक जुनी गोष्ट सांगितली. म्हणाले- 'देवासुरांच्या युद्धांत राक्षसांचा पराभव झाला तेव्हां ते भृगु मुनींच्या आश्रमांत आले व भृगु मुनींच्या पत्नीजवळ त्यांनीं आश्रय मागा अशी विनंति केली. तिनें ती विनंति मान्य केली व त्यांना अभयदान दिलें. तें पाहून विष्णूला राग आला. त्यानें सुदर्शन चक्रानें भृगुपत्नीचें डोकें उडविलें. भृगु मुनींना त्याचा राग आला व त्यांनीं विष्णूला शाप दिला कीं पृथ्वीवर तुझा जन्म होईल व तुला पत्नी विरह सहन करावा लागेल. त्या शापाचें फळ म्हणून विष्णूला दशरथ पुत्र राम या रूपानें जन्म घेऊन पत्नीविरह सहन करावा लागत आहे. तो अकरा हजार वर्षें राज्य करून अनेक अश्वमेध यज्ञ करून ब्रह्मलोकीं जाईल. त्याला दोन मुलें होतील. पण त्यांचा जन्म अयोध्येला होणार नाहीं. राम त्यांचा राज्याभिषेक करील." दुर्वासा मुनींनीं अशी गोष्ट सांगितली.

संध्याकाळच्या सुमारास लक्ष्मण व सुमंत्र गोमती तीरावर येऊन पोंचले. ती रात्र त्यांना तेथेंच काढावी लागली. दुसऱ्या दिवशीं दोघे अयोध्येला निघाले तेव्हां रामाला जाऊन काय सांगावयाचें याच विचारांत लक्ष्मण गर्क होता.

रथ अयोध्येला पोंचला. रामाच्या महालासमोर लक्ष्मण उतरला. आंत जाऊन त्यानें रामाला नमस्कार केला व म्हणाला- "महाराज! आपल्या आज्ञेप्रमाणें सीतेला गंगाकाठीं वाल्मीकि मुनींच्या आश्रमाजवळ मी सोडून आलों. तशी काळजी करण्याचें





कारण नाहीं. जेथें वृद्धि तेथें क्षय, जेथें उन्नति तेथें पतन, जेथें संभोग, तेथें वियोग हा या जगाचा नियम आहे. जो निरर्थक कलंक आपल्यावर लागला आहे तो लवकरच आपोआप पुसून निघेल."

"लक्ष्मणा! तूं माझ्या आज्ञेचें पालन केलेंस याबद्दल माझ्या मनाचें समाधान झालें आहे. आतां दुःख करण्यासारखें काय उरलें आहे!" राम म्हणाला.

चार दिवस उलटून गेले होते. रामाचें लक्ष प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकण्याकडे नव्हतें. ती चुकच होती. ती गोष्ट सांगून रामानें लक्ष्मणाला नृग राजाची गोष्ट सांगितली. म्हणाला—

"पूर्वी नृग नांवाचा राजा राज्य करीत असे. त्यानें गोदान म्हणून कोट्यावधि गाई दान केल्या. दान केलेल्या गाईंपैकीं एक गाय चुकून महाराजांच्या गाईंत मिसळली. राजाला ती गोष्ट कळली नाहीं. राजानें ती गाय आणखी एका ब्राह्मणाला दान केली. ती गाय कनखल येथें गेली. ज्या ब्राह्मणाला ती दान म्हणून प्रथम मिळाली होती त्यानें तिला एक नांव दिलें होतें. त्यानें आपल्या गाईला ओळखून तिला त्या नांवानेंच हाक मारली. गाईनें पण आपल्या जुन्या मालकाला ओळखलें. दावें तोडून ती त्याच्या पाठोपाठ निघाली. तें पाहून तिच्या दुसऱ्या मालकानें त्या ब्राह्मणाला अडवून विचारलें—"कोठें निघालास घेऊन माझ्या गाईला? मला ही नृग राजाकडून दान मिळालेली गाय आहे."

त्यावर तो म्हणाला—"नृग महाराजांनींच ही मला दान केलेली गाय आहे."

दोघे नृग महाराजांकडे गेले. पण भेट झाली नाहीं. बाहेर त्यांना बरेच दिवस वाट पहात उभे रहावें लागलें. शेवटीं त्यांनीं नृग राजाला 'सरडा होऊन जा!' असा शाप दिला. त्याला कोठें तरी झाडाच्या पोकळींत कोणाची नजर पडणार नाहीं अशा जागीं रहावें लागेल, असा देखील शाप होता. नृग राजानें त्यांना शाप मुक्ति द्यावी अशी विनंति केली. तेव्हां ते म्हणाले—"यदु वंशांत वासुदेवाचा जन्म होईल व तो त्याला शाप मुक्त करील."

त्यानंतर नृग महाराजांनीं आपल्या वसु नांवाच्या मुलाचा राज्याभिषेक केला. सरड्याचें आयुष्य सुखानें जावें यासाठीं जागोजागीं जमिनीला व झाडांना बिळें करूच ठेवलीं. त्या जागीं झाडांची गार सावली पडेल व फुलांचा नेहमीं चांगला वास दरवळेल यासाठीं फुलझाडें लावलीं.

रामानें नृग महाराजांची गोष्ट सांगून निमि महाराजांची गोष्ट सांगितली. म्हणाला—"निमि ईक्ष्वाकु महाराजांचा बारावा मुलगा. त्यानें वैजयंत नांवाचें एक नगर बसवलें. त्यानें आपल्या वडिलांच्या मनाचें समाधान व्हावें म्हणून एक यज्ञ करण्याचें ठरवून वशिष्ठ मुनींजवळ पौरोहित्य करावें अशी विनंति केली. परंतु इंद्राला त्यापूर्वींच पौरोहित्य करण्याचें वचन दिल्याचें सांगून ते निघून गेले. जातांना ते म्हणाले कीं





इंद्राचा यज्ञ पुरा झाल्यानंतर यज्ञ करण्यास मी येत आहे. निमीनें गौतम मुनींकडून यज्ञ पुरा करविला.

इंद्राचा यज्ञ पुरा झाल्यावर वशिष्ठ मुनि आले तेव्हां यज्ञ पुरा झाल्याचें ऐकून त्यांना राग आला. ते राजाच्या भेटीस गेले. त्या वेळीं राजा झोंपलेला होता. बराच वेळ वाट पाहिली तरी राजा न आलेला पाहून राजा आपला अपमान करण्यासाठींच मुद्दाम येत नसावा असें वशिष्ठ मुनींना वाटलें व त्यांनीं त्याला शाप दिला–" राजा ! तूं मला बोलावून नंतर दुसऱ्या कडून यज्ञ पुरा करवून घेतला आहेस तेव्हां तुझें शरीर नष्ट होईल व तूं विदेह होशील."

नंतर राजाची झोंप मोडली. वशिष्ठ मुनींनीं शाप दिल्याची गोष्ट त्याला कळली. " मी झोंपलों होतों तेव्हां तुम्ही मला हा शाप दिला आहे. म्हणून तुमचें शरीर देखील नष्ट होईल व तुम्ही देखील विदेह व्हाल !" वशिष्ठ मुनींना असा त्यानें शाप दिला.

अशा तऱ्हेनें परस्परांना शाप देऊन वशिष्ठ व निमि राजा दोघे विदेह झाले. नंतर वशिष्ठ वायुरूपें आपले वडील ब्रह्मदेव यांच्याकडे गेले आणि म्हणाले–" बाबा ! निमीच्या शापामुळें मी विदेह झालों आहें. देह नसल्यामुळें मला फार कष्ट सहन करावा लागत आहे. म्हणून मला दुसरें शरीर देण्याची कृपा करावी !"

ब्रह्मदेवानें वशिष्ठ मुनींना, मित्र व वरुण यांच्या तेजानें नवीन शरीर धारण करण्यास सूचना केली. अशा तऱ्हेनें वशिष्ठ मुनि दुसरा देह धारण करून ईक्ष्वाकु वंशाचे पुरोहित म्हणून जन्मले.

इकडे निमीच्या देहाचें रक्षण मुनींनीं केलें. तो विदेह झाला होता तरी त्याचा जीव त्याच्या डोळ्यांत उरला होता. त्यांनीं निमीचा देह छान रगडून घुसळून काढला तेव्हां त्यांतून एक मुलगा जन्मला. त्याला पुढें मिथि हें नांव पडलें. त्याच्या नांवावरूनच मिथिला नगर झालें. त्याचें नांव जनक असें पण झालें.

रामानें सांगितलेली ती कथा ऐकून लक्ष्मणानें विचारलें–" दादा ! क्षत्रिय-वंशांत निमीचा जन्म झाला होता तरी त्यानें वशिष्ठासारख्या थोर ऋषींचा आदर करून मन:शांति कां नाहीं राखली ?"

" राग आल्यावर मनुष्य मानसिक शांति घालवून बसतोच. अशा परिस्थितींत स्वत:ला सावरून धरणारा एकटा ययातीच झाला." असें सांगून रामानें ययातीची कथा लक्ष्मणाला सांगितली. म्हणाला–

" ययाति हा नहुष राजाचा मुलगा. त्याला दोन राण्या होत्या. त्यांपैकीं एक वृषपर्ण राजाची मुलगी शर्मिष्ठा होती व दुसरी शुक्राचार्य यांची मुलगी होती. ययातीचें प्रेम शर्मिष्ठेवर जास्त होतें. देवयानीचा मुलगा यदु याच्यापेक्षां शर्मिष्ठेचा मुलगा पुरु हा राजाचा जास्त लाडका होता.

खरें बोलावयाचें म्हणजे पुरु हा तसाच गुणी पण होता. पण राजाचें प्रेम पुरूवर



जास्त आहे ही गोष्ट यदूला पसंत नव्हती. त्यानें आपली आई देवयानी हिच्याकडे बापाविरुद्ध तक्रार केली. म्हणाला–" आई, तूं म्हणतेस कीं तूं गुरु शुक्राचार्यांची मुलगी ! पण पहा, तुझी व माझी मान पदोपदीं खालीं होत आहे. त्यापेक्षां अग्नि प्रवेश करून स्वत:चा अन्त करून घेणें जास्त श्रेयस्कर आहे. तुला हें सर्व सहन होत असेल तर माझी ना नाहीं. पण मला नाहीं हें सहन होत."

मुलाचें तें दु:ख देवयानीला असह्य झालें व तिनें शुक्राचार्यांकडे तक्रार केली. " असलें

जिणें जिण्यापेक्षां अग्नि प्रवेश करून घेणें मला जास्त आवडेल." मुलीची ती केविलवाणी स्थिति शुक्राचार्यांना पाहवली नाहीं व त्यांना राग आला. त्यांनीं ययातीला शाप दिला कीं त्याला तत्काळ वार्धक्य येईल. मुलीची समजूत घालून शुक्राचार्य आपल्या घरीं निघून गेले. शुक्राचार्यांचा शाप ययातीनें सहन केला.

यदूला बोलावून तो म्हणाला—"बाळ! अजून आयुष्याच्या उमेदी पुऱ्या झाल्या नाहींत. म्हणून तूं कांहीं काळ आपलें यौवन देऊन माझें वार्धक्य घेतलेंस तर मी तितका काळ सुखानें राहून आपलें वार्धक्य परत घेईन व तुझें यौवन तुला परत देईन."

"तुमच्या पंक्तीला तर पुरू जेवायला बसतो व आतां वार्धक्य मी कां घ्यावें. त्याला तें घ्यायला सांगावें." यदूनें उत्तर दिलें.

तेव्हां ययातीनें पुरूला बोलावून तेंच सांगितलें. पुरु आपल्या बापाचें वार्धक्य घेऊन त्याच्याबद्दल आपलें यौवन द्यायला तयार झाला. ययातीनें त्याप्रमाणें आपलें वार्धक्य त्याला दिलें व याचें यौवन घेऊन सहस्र वर्षे सुखानें आयुष्य घालविलें. त्यानें सहस्र यज्ञ केले आणि त्यानंतर त्यानें आपलें वार्धक्य पुरूकडून परत घेऊन त्याचें यौवन त्याला परत दिलें. त्यानें त्यालाच आपला युवराज म्हणून नेमून त्याचा राज्याभिषेक केला. देवयानीचा मुलगा त्याचा वारस होणास अयोग्य आहे असें देखील ययातीनें जाहीर केलें.

ययातीनें वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केल्यावर पुरूनें प्रतिष्ठान येथें आपली राजधानी नेली.

ययातीची कथा संपली तेव्हां उजाडण्याची वेळ झाली होती. पूर्वेकडे अरुणोदय झाला होता.





# विधिलिखित

सौवीर देशांत धात नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्याच्या बायकोचें नांव धात्री असें होतें. त्यांना एकुलती एक मुलगी होती. तिचें नांव सुशीला असें होतें. मुलगी मोठी झाल्यावर आईवडिलांना तिच्या लग्नाची काळजी वाटूं लागली. राजाला वाटे कीं आपल्या भाच्याशीं मुलीचें लग्न करून द्यावें व राणीला वाटे कीं तिच्या भावाच्या मुलाशीं करून द्यावें. परंतु त्या विषयावर दोघांचें परस्परांशीं बोलणें कधींच झालें नाहीं व प्रत्येकानें दुसऱ्याला कळूं न देतां आपल्या मताप्रमाणें जोरानें यत्न सुरू केला.

राजानें आपल्या भाच्याकडे निरोप पाठविला. एका जागीं सुमुहूर्तावर लग्न करण्याचें पण त्यानें ठरविलें. परंतु राणीला ती गोष्ट कळली. म्हणून तिनें देखील आपल्या भाच्याकडे निरोप पाठविला व त्याला राजाला न कळेल अशा तऱ्हेनें. तो आल्यावर तिनें त्याला अंतःपुरांत एका जागीं लपवून ठेवलें.

त्याच दिवशीं ब्रह्मा, विष्णु व महेश सौवीर राजधानीच्या वरून आकाश मार्गानें जात होते. तिघे अन्तर्यामी व सर्वज्ञ होते. सौवीरचा राजा व राणी दोघांचें तें नाटक पाहून त्यांना थोडें आश्चर्य वाटलें. विष्णु व शंकर दोघांनीं ब्रह्मदेवाला विचारलें "दोघांपैकीं कोणाशीं सुशीलेचें लग्न होणार?" ब्रह्मदेवच लग्नाची ब्रह्मगांठ बांधतो. म्हणून दोघांनीं त्यालाच तो प्रश्न विचारला होता.

ब्रह्मदेव म्हणाला—"या दोघांपैकीं एकाशीं देखील सुशीलेचें लग्न होणार नाहीं. नंतर



स्मित करून बोटानें राजधानीच्या गल्लींत फिरणाऱ्या भिकाऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला—"त्याच्याशीं लग्न होईल !"

शंकराला व विष्णूला तें उत्तर ऐकून अर्थातच आश्चर्य वाटलें. शंकरानें विष्णूला विचारलें—"हें बरोबर नाही बुवा ? यांत बदल होणें शक्य नाही का ?"

"कां शक्य नाहीं ? ब्रह्मदेवा तूंच अशक्य कामें शक्य करूं शकतोस." विष्णु म्हणाला.

"मी लिहून ठेवलें आहे तें बदलण्याची शक्ति कोणाच्या अंगांत नाहीं." ब्रह्मदेव म्हणाला.

शंकरानें विधि लिखित खोटें करून दाखविण्याचें ठरवून विष्णूच्या साह्यानें एक युक्ति योजली आणि विष्णूला म्हणाला—

"तूं गरुडाला सांगून त्या लंगड्या भिकाऱ्याला सात समुद्रापलीकडे पोंचता कर. पाहूंया त्या ब्रह्मदेवाचें म्हणणें कसें खरें होतें तें." शंकर म्हणाला. विष्णु त्या गोष्टीस कबूल झाला व त्यानें गरुडाला हाक मारून त्या लंगड्याला सात समुद्रापलीकडे पोंचवायला सांगितलें. गरुडानें धन्याच्या आज्ञेचें पालन केलें.

तिकडे सौवीर नगरीं सुशिलेच्या लग्नाचा मुहूर्तजवळ येत चालला होता. राणीनें आपल्या मुलीला लपवून ठेवायचें ठरविलें. सैंपाकघरांत पुष्कळशा मोठमोठ्या टोपलेवजा करंड्या होत्या. त्यांतल्या एका रिकाम्या करंडींत तिनें सुशिलेला बसविलें. तिच्या हातांत वरमाळा देऊन म्हणाली—"बाळ ! याचें झांकण जो कोणी उचलील त्याला ही वरमाळा घाल."

सुशिलानें आईच्या इच्छेप्रमाणें आई सांगेल तसें करण्याचें ठरविलें. राणीनें ती करंडी ठीक मुहूर्तावर आपल्या भावाच्या घरीं पाठविण्याचें ठरविलें.

तिकडे बिचारा लंगडा भिकारी त्या निर्जन बेटांत भुकेनें कासावीस होऊन हिंडूं लागला. त्या बिचाऱ्याचा काय दोष ? पण त्याच्या नशिबीं कष्ट सहन करणें आलें होतें. तो देवाचा धांवा करूं लागला. त्यानें राम नामाचा जप सुरू केला आणि देवाजवळ गाऱ्हाणें करूं लागला कीं देवा ! मी काय पाप केलें ? मला असा उपाशीं कां मारीत आहेस ? त्याचा धांवा ऐकून विष्णूनें विचार केला कीं आपल्या आज्ञेनें गरुडानें त्या बिचाऱ्याला सात समुद्रापलीकडे पोंचतें केलें. तेव्हां त्याच्या उदर निर्वाहाची जबाबदारी पण आपल्यावरच आहे. म्हणून त्यानें गरुडाला आज्ञा केली—"सात समुद्रापलीकडे तूं ज्या भिकाऱ्याला पोंचतें केलें आहेस तो उपाशी आहे. त्याच्या पोटापाण्याची कांहीं तरी व्यवस्था कर."

गरुडाला आज्ञा होतांच गरुड आकाशा-तून पृथ्वीवर खाण्याचा पदार्थ कांहीं आहे का पाहूं लागला. त्याला सौवीरच्या राज-वाड्यांतल्या पाकशाळेंत मोठमोठ्या करंड्या दिसल्या. लगेच त्यानें झडप मारली एक करंडी उचलून उडाला. त्यानें ती करंडी भिकारी तळमळत पडला होता तेथें नेऊन ठेवली.













गरुड उडून निघून गेला. त्याच करंडींत सुशीला होती. विधि लिखित असतें तेंच घडतें.

भिकारी भुकेनें कासावीस होऊन तळमळत बसून होता की देव त्याच्या थाळ्या फेकून खाद्य पदार्थ पाठवील. गरुडानें समोर आणून ठेवलेली करंडी पाहून त्यानें झांकण उघडलें. लगेच सुशीला उठून उभी राहाली व व आईच्या आज्ञेप्रमाणें तिनें वरमाळा त्या लंगड्या भिकाऱ्याच्या गळ्यांत घातली. दोघे परस्परांकडे चकित होऊन पाहूं लागले. एका राजकन्येनें आपल्याला वरमाळा घातलेली पाहून भिकाऱ्याला आनंद झाला. आपल्या भाग्यांत हाच पति लिहिला आहे असें समजून तिनें करंडींत बरोबर आणलेले खाद्य पदार्थ त्याला खायला दिले.

राणी ती करंडी ठीक मुहूर्तावर आपल्या भावाकडे पोंचती करण्यासाठी म्हणून आली. पण तेथें ती करंडी नव्हती. तिला वाटलें की राजाला तिची युक्ति कळली असावी. परंतु राजादेखील मुलीचा शोध काढीत असल्याचें पाहून तिला आश्चर्य वाटलें. हाहाकार उडून गेला.

ब्रह्मवाक्य खरें ठरलें. शंकराला आश्चर्य वाटलें—"मी तुला पहिल्यानेंच नव्हतें का सांगितलें ?" विष्णूनें शंकराला असा प्रश्न करून जणुंकांहीं सर्व जबाबदारी शंकराचीच असें दाखविलें.

नंतर ब्रह्मा, विष्णु व महेश तिथे वरवधू होते तेथें गेले आणि त्यांना आशीर्वाद दिला. लंगड्याचा पाय त्यांनीं ठीक करून दिला व दोघांना सौवीर देशांत पोंचतें केलें. त्या त्रिमूर्तींनीं तें लग्न लावून दिलेलें पाहून राजा व राणी खूप झाले. सुशिलेचा संसार सुखाचा झाला.



# ५३. कप्पडोसिया गोपुर

कप्पडोसिया देशांत (टर्की) लहान मोठीं प्राकृतिक गोपुरें आहेत. त्यांची संख्या सुमारें १०,००० आहे. हें पांच मजली गोपुर आहे. १५०० वर्षांपूर्वी खिस्त साधु मनुष्य वस्तीपासून दूर राहात. या गोपुरांचा गुहेसारखा उपयोग करून निर्विघ्नपणें आपलीं धर्म कार्ये करण्यास त्यांना हीं गोपुरें सोईचीं होत.














# भारताचा इतिहास



शिवाजी फक्त शूर व पराक्रमीच नव्हे, युद्धकलेंत एक कर्तबगार सेनापतीच नव्हे तर राज्यव्यवस्था करण्यांत एक कुशल शासक पण होता. म्हणूनच तो राजकीय दृष्ट्या यशस्वी पण झाला.

राज्याचा सर्वाधिकारी तो स्वतःच होता. त्यानें अष्टप्रधान नेमले होते. पेशवा हा त्याचा पंत प्रधान होता व अर्थव्यवस्था पंत अमात्य पहात. मंत्री राजाच्या दैनंदिन कार्यक्रमाची व्यवस्था पाही व सचिव राजाच्या लेखकाचें व जमाबंदीचें काम करी. सुमंत परराष्ट्र खात्याचा, सेनापती सैन्याचा व न्यायाधीश न्याय खात्याचा मुख्य अधिकारी होता. पंडितराव मुख्य राज्य-पुरोहिताचें काम करी.

त्याच्या राज्यव्यवस्थेंत ३० शाखा होत्या. राज्य अनेक प्रांतांत विभक्त होतें. प्रत्येक प्रांतावर एक राजप्रतिनिधि नेमलेला असे. शिवाजी आपल्या राज्यांत प्रजेकडून कर वसूल करीतच असे शेजारच्या विजापूर इत्यादिक सुलतानांच्या राज्यांतून व पोर्तुगीज अमलाखालच्या प्रांतांतून तो 'चौथ' नांवाचा एक कर वसूल करी.

शिवाजीनें सैन्यव्यवस्थेंत पण पुष्कळ बदल केला व सैन्य वाढविलें त्यांत त्यानें एक आरमार खातें पण काढलें. सैन्यशक्ति वाढविण्यासाठीं त्यानें तोफा व बंदुका मिळविल्या.

शिवाजीकडे अनेक किल्ले होते. प्रत्येक किल्ल्यांत हवालदार, सबनीस व सरनोबत असे तीन अधिकारी असत. त्याच्या सैन्यांत सर्व जातींचे लोक होते. सैन्याची शिस्त फार कडक होती. सैन्याबरोबर स्त्रिया नसत. कोणी सैनिक आपल्या बायकोला बरोबर घेऊन आला तर त्याला शिरच्छेदाची शिक्षा मिळे. ब्राह्मण व गाय यांचा वध त्याच्या राज्यांत निषिद्ध होता. वाहनांसाठीं फक्त बैल धरून नेण्यास परवानगी होती. युद्ध-समयीं सैनिकांकडून शिस्तीनें सर्व कामें करवून घेण्यांत येत.

शिवाजीच्या अश्वसेनेंत प्रत्येक २५ घोडेस्वारांवर एक हवालदार व पांच हवाल-दारांवर एक जुमलेदार असे. दहा जुमले-दारांवर एकहजारी नांवाचा अधिकारी असे. त्यानंतर पंचहजारी, सरनोबत व सर्व सेनापति असे अनुक्रमें अधिकारी होते. पायदळ सैन्यांत प्रत्येक नऊ सैनिकांची तुकडी व तिचा एक नायक असे. पांच नायकांवर एक हवालदार असे. दोघां तिघां हवालदारांवर एक जुमलेदार, दहा जुमले-दारांवर एकहजारी असे.



एक उत्तम पराक्रमी योद्धा व एक उत्तम शासक म्हणून भारताच्या इतिहासांत शिवाजीला अत्यंत गौरवनीय स्थान आहे. त्याच्याशीं बोलणाऱ्याला मंत्रमुग्ध करण्याचें अद्भुत वाक्चातुर्य त्याच्या अंगीं होतें. स्वतःचें शौर्य व साहस दाखवून तो एक सामान्य जहागिरदार असूनहि एक छत्रपती झाला. स्वतःला संस्थानिक व जहागिरदार म्हणवून घेणाऱ्या लहान लहान मराठा सरदारांची विखुरलेली शक्ति एकत्र करून त्यानें स्वतंत्र महाराष्ट्राची स्थापना केली. त्यानें स्थापन केलेली मराठी सत्ता अठराव्या शतकांत भरभराटीच्या कळसाला पोंचली व वाढत्या ब्रिटीश सत्तेला आह्वान करूं शकणारी एकमेवशक्ति म्हणून भारतांत मानली गेली.

राष्ट्रीय पुनर्जीवनास अत्यंत आवश्यक सर्व गुण शिवाजीच्या अंगांत होते. त्यानें रणजितसिंहाप्रमाणें परकीयांच्या मदतीनें

       



राज्यशासन चालविलें नाहीं. त्यानें स्वतःच्या सैन्याला आपल्याच लोकांकडून शिक्षण देवविलें. त्यानें स्थापिलेली राज्य व्यवस्था कित्येक वर्षें टिकून राहाली. एवढेंच नव्हे तर इतर राज्यकर्त्यांनीं त्याचें अनुकरण पण केलें. मुसलमान इतिहासलेखकांनीं त्याची इतर बाबतींत कितीहि निंदा केली असली तरी त्याच्या या गुणाची त्यांनीं वाखाणणीच केली. युद्धांत शत्रूच्या बायका व मुलें कैद झालीं तर शिवाजीनें त्यांचा सर्व प्रकारें मान राखला व आपल्या सैन्या-कडून पण राखविला. या बाबतींत कोणी गैरवर्तन केल्यास त्याला कडक शिक्षा मिळत असे. युद्ध कैद्यांशीं चांगली वागणूक ठेवली.

त्याच्यासमोर एकच एक ध्येय होतें, हिंदू पद्पादशाहीची स्थापना व त्यासाठीं तो नित्य झटत राहाला. ,परंतु तें साध्य होण्यापूर्वींच त्याला इहलोकाची यात्रा संपवावी लागली.

शिवाजीचें व्यक्तिगत आयुष्य पण फार व्यवस्थित होतें. त्याला एकहि व्यसन नव्हतें. बालपणीं मातेच्या तोंडीं व मोठे-पणीं समर्थ गुरु रामदासांच्या तोंडीं त्याला जो उपदेश मिळाला त्याचें तो तंतोतंत पालन करी. महाराष्ट्राच्या उद्धारासाठीं त्यानें धर्माची कास धरली. धर्म ही एक सजीव शक्ति आहे, असें तो मानी. त्याच्या स्वभावांत धर्मांधपणा कधींच शिरला नाहीं. इतर धर्मावलंबियांविषयीं त्याच्या मनांत सहिष्णुता होती. मुस्लिम संतांची भक्ति त्याच्या हृदयांत वसत असे. मशिदीच्या कारभारांत त्यानें कधीं ढवळाढवळ केली नाहीं. उलट मशीदींसाठीं त्यानें जहागिरी लिहून दिल्या होत्या.



# नेहरू चरित्र

[ २३ ]



सन १९२३ मध्यें जवाहरलालजी अलाहा-बाद म्युनिसीपालिटीचे चेअरमन म्हणून निवडून आले. एका वर्षांत त्यांचें मन विटलें. त्यांच्या कामाची वाखाणणी सर्व करीत. सर्वांचा सहकार त्यांना मिळाला. त्यांच्या अमलांत कामें भराभर होत व कांहीं प्रगतिपण झालेली दिसून आली. परंतु त्या पदावर काम करण्याची इच्छा त्यांच्या मनांत थोडीदेखील उरली नाहीं. त्याचें मुख्य कारण म्हणजे सरकार प्रजाहिताचें एकहि काम करूं देण्यास तयार नव्हतें. तसें पाहिलें तर म्युनिसिपालिटीकडे अधिकारच फार कमी होते.

जवाहरलालजी तीन वर्षांसाठीं म्हणून निवडून आले होते. पण एकाच वर्षांत त्यांना त्या कामाचा इतका वीट आला कीं त्यांनीं राजानामा देण्याचें ठरविलें. परंतु त्यांच्या स्नेही मंडळींनीं त्यांना तसें करूं दिलें नाहीं. आणखी एक वर्षभर त्यांनीं कसेंबसें काम केलें. १९२५ सालीं त्यांनीं चेअरमनच्या पदाचा राजीनामा दिला. त्यांच्या पत्नी श्रीमती कमला नेहरू यांचा वाढता आजार हें त्याला मुख्य कारण झालें. कित्येक महिने लखनौच्या इस्पितळांत त्यांची चिकित्सा चालू होती. त्यावर्षीं कानपूर येथें कांग्रेसचें अधिवेशन होतें. तेव्हां कांग्रेसचे मुख्य कार्यवाह जवाहरलालजीच होते.

कमला नेहरूंना स्विजलँड मध्यें नेऊन तेथें त्यांची चिकित्सा करण्यांत यावी असें ठरलें. जवाहरलालजींना दूर कोठें तरी जाण्याची इच्छा होतीच. १९२६ च्या मे महिन्यांत जवाहरलालजी, श्रीमती कमला

होते. ते जातीनिष्ठ होते. सामाजिक व आर्थिक प्रश्नांशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता. संस्थानिकांशीं व मोठमोठ्या जमीनदार व तालुकेदारांशीं त्यांची मैत्री होती. राजकीय दृष्ट्या भारतांत ब्रिटीश सत्ता राहूं नये एवढेंच ध्येय त्यांच्यासमोर होतें. पहिल्या महायुद्धानंतर जगांत ज्या घडामोडी झाल्या त्यांची त्यांना फारच थोडी माहिती होती.

म्हणूनच त्यांनीं स्वराज्य पार्टीहून जास्त प्रतिगामी पक्षाची स्थापना केली व त्या पक्षाचें नेतृत्व स्वीकारलें. यांत जवाहरलालजींना विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. त्यांना आश्चर्य वाटलें तें या गोष्टीचें कीं लाला लाजपतराय यांच्या सारख्या जहाल विचारांचा पुढारी त्यांच्याशीं एक मत कसा काय झाला. निवडणुकीच्या वेळीं लाजपतराय यांनीं कांग्रेस वर जे चगली वार केले त्याबद्दल नेहरूंना थोडें आश्चर्य वाटलें.

परंतु देशांत धर्मांधता वाढत चालली होती. म्हणून अशा तऱ्हेचे पक्ष उभे राहाणें साहजिक होतें. बहुसंख्यक हिंदूंविषयीं अल्पसंख्यक मुसल्मानांच्या मनांत संदेह वसत असे. पंजाबांत मुसलमानांचें बहुमत होतें. तेथें हिंदू व शीख दोघांना मुसलमानांची भीति वाटे.

या धर्मांधपणामुळें स्वराज्य पार्टीला मोठा धक्का पोंचला. त्या पक्षांत जे मुसलमान होते ते आपला संबंध तोडून मुसलमानांच्या संघटणेंत सामील झाले व कांहीं हिंदू नेशनेलिस्ट पक्षांत सामील झाले. लाल लजपतराय यांचे अनुयायी पंजाबांत फार मोठ्या प्रमाणांत होते. त्यांची व मालवीयजींची युती झाल्यामुळें नेशनेलिस्ट पक्षाची प्रतिष्ठा वाढली.





# पाताळ कोट

कुंतल देशाच्या मंत्र्याचा मुलगा शशिकांत एकदां आपले मित्र भद्र व जयंत यांच्याबरोबर शिकारीला रानांत गेला. रानांत त्यांना अनेक रानटी डुकरें व हरणें दिसलीं. परंतु त्यांनीं त्यांच्यापैकीं एकाची देखील शिकार केली नाहीं. ते वाघा सिंहाच्या शोधार्थ खोल रानांत शिरले. दुपारच्या सुमारास त्यांना आपल्या प्रयत्नांत यश मिळणार असें वाटूं लागलें. ते डोंगरी ओढ्याच्या काठाकाठानें जात होते. ओढ्यापलीकडच्या काठावर त्यांना एक सिंह दिसला. सिंह पाणी पिऊन नुकताच रानांत परत फिरला होता.

शशिकांत आपल्या दोघां मित्रांना त्या सिंहाकडे बोट दाखवून म्हणाला—"तो पहा सिंह! पाहतां, तो कसा निसटतो आपल्या हातांतून. आपण आपले घोडे अलीकडच्या काठावर सोडून ओढ्यापलीकडे सिंहाचा पाठलाग करूं या. त्याला आपण चारी बाजूंनीं घेरलें कीं कोणाचा तरी बाण त्याला नक्कीच लागेल." असें सांगून शशिकांत घोड्यावरून उतरून निघाला. पण जयंत त्याला अडवून म्हणाला—"हे पहा, घाईनें कांहीं करूं नकोस. ओढ्यापलीकडे कदंबराज्य आहे व त्याच्याशीं आपल्या देशाचें हाडवैर आहे. म्हणून त्याच्या राज्यांत



पाऊल टाकल्यास आपल्यावर संकट येण्याची शक्यता आहे."

परंतु शशिकांतनें शिकारीच्या धुंदींत मित्राच्या सल्ल्याची पर्वा केली नाहीं व म्हणाला—"हें पहा! मी एकतर स्वतःच भित्रा आहें आणि मला आणखी भेडसावून तूं आणखी भित्रा करूं नकोस बाबा! आपण कदंब राज्य जिंकण्याच्या हेतूनें स्वारी करीत नाहीं आहों! क्रूर हिंस्र श्वापदांची शिकार करीत आहों. तें काम संपल्यावर आपण आपल्या राज्यांत परत येऊं."

"एवढेंच काय, मी तर असें सुचवितों कीं सिंहाला मारून त्याचें मांस आपण कदंब देशाच्या राज्याकडे पाठवूं व त्याचें कातडें भेट म्हणून राजकन्या कांतिसेनेकडे पाठवून देऊं!" भद्र म्हणाला.

तें ऐकून शशिकांत मोठ्यानें हंसला व म्हणाला—"काय पण बोललास! अरे, तुझ्या या एका उक्तीवर आपला जीव ओंवाळून टाकायला तयार आहें मी!" सिंहानें मागें वळून पाहिलें. आपल्याकडे येत असलेले शिकारी त्याला दिसले. त्यानें एकदां डरकाळी फोडली व नंतर शेपूट हालवीत पुढें निघून गेला. त्याच वेळीं शशिकांतनें त्याच्या गळ्याचा नेम धरून तीर सोडला. तो तीर त्याला लागला. बाण लागतांच तो जोरानें एकदां गर्जन करून ओढ्याकडे धांवला.

शशिकांत व त्याच्या मित्रांनीं बाजूला होऊन स्वतःचा बचाव करून घेतला. गुडघाभर पाणी होतें म्हणून ओढ्यापलीकडे गेले आणि तिघांनीं तीन बाजूंनीं सिंहावर बाण सोडले. या खेपेस एक बाण सिंहाच्या पोटाला लागला. तो गर्जन करीत तिघां-पैकीं फक्त शशिकांतकडेच वळला.



आतां बाण काढून धनुष्यावर ठेवायला वेळ उरला नव्हता. म्हणून शशिकांतनें तलवार उपसली. इतक्यांत झाडाच्या आडून कांहीं तरी हालचाल झाली व पाठोपाठ एक भाला झाडींतून येऊन सिंहाच्या डोक्याला लागला.

शशिकांत व त्याचे मित्र चकित होऊन तिकडे पाहूं लागले तेव्हां हे शब्द त्यांच्या कानीं पडले—"शत्रु आपल्या हद्दींत शिरला आहे. त्याला जिवंत परत जाऊं देऊं नका!" त्या शब्दापाठोपाठ त्यांच्यावर बाण वृष्टि होऊं लागली.

शशिकांतला एक मर्मी बाण लागला. तो धाडदिशी जमिनीवर आदळला. तो ओरडला—"भद्रा! जयंता! पळा! गनिमी काव्यानें युद्ध करणाऱ्या शत्रूशीं युद्ध करण्यांत अर्थ नाहीं."

परंतु त्यापूर्वींच जयंताला बाण लागला होता. भद्रनें पळण्यासाठीं पाठ फिरविली. पण तेवढ्यांत त्याच्या पाठीला बाण लागला. पण त्यानें त्याची फिकीर केली नाहीं व पळत राहाला. ओढ्यापलीकडे जाऊन मोठ्या कष्टानें तो घोड्यावर बसला आणि घोडा जोरानें पळूं लागला. त्याच्याबरोबर दुसरे





दोन घोडे पण पळूं लागले. ओढ्या पली-कडून शत्रूच्या सैनिकांनीं त्यांच्यावर बाण सोडले. त्याला जिवंत सोडूं नका. येथें जखमी होऊन जो पडला आहे तो कुंतल देशाच्या मंत्र्याचा मुलगा दिसतो आहे." हे शब्द त्यांच्या कानीं पडले.

भद्र अर्ध बेशुद्धावस्थेंतच घोड्याची आयाळ धरून पडून होता. घोड्याला राजधानीची वाट माहीत असल्यामुळें तो सरळ तिकडेच जात होता. इकडे ओढ्याच्या काठी जखमी व बेशुद्ध स्थितींत पडलेल्या शशिकांत व जयंतच्या चारीबाजूला कांहीं सशस्त्र सैनिक उभे होते. तो सिंह मरून गेला होता. भद्रला धरून आणण्यासाठीं जे सैनिक त्याचा पाठलाग करीत गेले होते ते निराश होऊन ओढ्याच्या काठापर्यंत जाऊन परत आले.

परंतु शशिकांतचा घोडा त्यांच्या हातीं लागला. कारण त्याचा लगाम एका झुडपांत अडकल्यामुळें त्याला पळता येईना.

"महाराज ! क्षमा करावी ! त्या जखमी शत्रूबरोबर त्याचा घोडा व आणखी एक घोडा निसटून गेले. हा घोडा मोठ्या कष्टानें हातीं लागला. हा पंचकल्याणी जातीचा घोडा दिसतो आहे, त्याच्यावर जें मूल्यवान खोगीर पडलें आहे त्यावरून तो कुंतल देशाच्या मंत्र्याच्या मुलाचा असावा असें आम्हांला वाटतें." सैनिक घोड्याला दाखवून म्हणाले.

पण कदंबचा राजा उग्रसेन याच्या मनाचें तेवढ्यावर समाधान झालें नाहीं. तो आपल्या सेनापतीकडे वळून म्हणाला— "याच सैनिकांच्या जोरावर का आपण कुंतल देशावर स्वारी करण्याचा विचार करीत आहों ! शत्रूच्या जखमी झालेल्या एका सामान्य सैनिकाला देखील जे पकडूं शकले नाहींत ते त्याचें राज्य कसे काय जिंकणार !"



सेनापति कांहीं उत्तर देणार होता. पण राजाची क्रुद्ध मुद्रा पाहून त्याच्या तोंडांतून फक्त "महाराज !" एवढा एकच एक शब्द निघाला.

उग्रसेन शशिकांतजवळ आला. त्याला वरपासून खालपर्यंत न्याहाळून पाहिलें व म्हणाला—"हा मंत्र्याचा मुलगा आहे यांत शंका नाहीं. अजून जिवंत आहे. त्याला घेऊन जाऊन कोठेंतरी गुहेंत टाका. त्याला कोणता तरी सिंह खाईल. आणि तो दुसरा जखमी झालेला सैनिक कोण असावा ?"

दोघां सैनिकांनीं पुढें होऊन त्याचे हातपाय धरून हलवून पाहिले व म्हणाले—"हा तर ठार झालेला दिसतो आहे."

"ठीक ! तर मग त्याला सुद्धां गुहेंत नेऊन टाका !" असें सांगून तो आपल्या सेनापतीला म्हणाला—"सेनापति आज आपण शिकारीला निघालों ती वेळ बरोबर नव्हती. कारण मी बाण मारला तेव्हां मला वाटलें कीं कुंतल देशांतला हा कोणी सामान्य सैनिक असावा. पण कुंतल देशाच्या मंत्र्याचा मुलगा आपल्या मित्र-मंडळीबरोबर आला असेल याची मला



कल्पनादेखील नव्हती. तो आपल्याहून पुष्कळच जास्त पराक्रमी आहे. या शिवाय त्याचा मंत्रीपण चाणाक्ष व चतुर म्हणून प्रसिद्ध आहे. राजधानींत जाऊन मी एक पत्र लिहून कळवितों कीं सरहद्दीवरच्या सैनिकांशीं झटापट झाली त्यांत हा प्रकार झाला. असेंच कांहीं तरी करावें लागेल."

"बरोबर आहे महाराज ! आपले महा-मात्य अशीच कांहीं तरी तोड काढतील !"

उग्रसेन कांहींच बोलला नाहीं. तो घोड्यावर बसून निघाला. त्याच्या पाठोपाठ सेनापतीपण निघाला. दहा सैनिकांनीं



मिळून शशिकांत व जयंतला मोठ्या चटाई सारखें खांद्यावर उचलून घेतलेंच एका गुहेकडे घेऊन गेले.

तिकडे तो घोडा भद्रला बेशुद्ध स्थितींतच घेऊन राजधानीचें फाटक बंद होण्यापूर्वी फाटकाजवळ येऊन पोंचला. द्वारपाल मंत्र्याच्या मुलाची वाट पहात होता. पण भद्रला बेशुद्ध स्थितींत परत आलेला पाहून व बरोबर जयंतचा रिकामा घोडा पाहून तो मनांतल्या मनांत चपापला. त्यानें जवळ जाऊन भद्रच्या अंगाला हात लावून पाहिलें. तो जिवंत होता.

द्वाररक्षक भद्रच्या घोड्याचा लगाम धरून राजधानींत गेले. घोड्याच्या पाठीवर एक बाण लागलेला मनुष्य व बरोबर एक रिकामा घोडा आणि द्वार रक्षक मशाली घेऊन वाट दाखवीत पुढें जात होते. नागरिक लोक तें दृश्य पाहून चकित झाले व घोड्याबरोबर चालूं लागले. घोड्यावर मंत्र्याच्या मुलाचा मित्र भद्र बसला आहे, या गोष्टीशिवाय आणखी कांहीं कोणाला माहीत नव्हतें.

घोडा सरळ जाऊन तबेल्यांत उभा राहिला. बातमी मिळतांच शतयानु व मंत्री गंगाधर दोघे आले. नोकरांनीं भद्रला हळूच घोड्यावरून उतरवून खालीं ठेवलें. राजवैद्यानें नाडी पाहून हळूच ओढून बाण काढला. त्यावेळीं भद्र थोडा हलला देखील.

वैद्यानें जखम धुवून काढली आणि म्हणाला—"भिण्याचें कारण नाहीं. नशीब बलवत्तर आहे. भद्र वांचेल."

नोकरांनीं भद्रला एका पलंगावर निजविलें. वैद्यानें बाण स्वच्छ धुवून काढायला एका नोकराला दिला.

"शशिकांत व जयंत कोठें बरें गेले असतील? महामात्य! आपल्या देशांत शत्रुला फितूर झालेले लोक तरी आहेत, नाहींतर शत्रुच आंत शिरून धुमाकूळ घालीत आहे." शतयानु म्हणाला.

"महाराज! माझ्या मतें आपल्या राज्यांत ही गोष्ट घडलेली नाहीं. भद्र शुद्धीवर आल्यावर खरी वस्तुस्थिति काय आहे तें कळेल! शशिकांत व जयंत आतां परत येतील असें नाहीं वाटत मला. भद्रला जो बाण लागला होता त्यावरच्या खुणावरून...."बोलतां बोलतां कंठावरोध झाल्यानें महामात्यांच्या तोंडांतून शब्द उमटला नाहीं. त्यांनीं डोळे पुसले. शतयानूच्या डोळ्याला पण टिपें आलीं. कारण शशिकांत महामात्यांचा एकुलता एक मुलगा होता. त्यांच्या मनाचें सांत्वन काय बोलून करणार?"

बाण धुवून आल्यावर मंत्र्यानें तो लक्षपूर्वक पाहाला. चकित होऊन त्यानें तो शतयानूच्या हातांत देत म्हटलें—"महाराज! हा बाण सोडणारा स्वतः राजा उग्रसेन आहे. बाणाच्या खालीं त्याचें राजचिह्न अस्वल खोदलेलें आहे.

शतयानूनें पण बाण नीट पाहिला व म्हणाला—"म्हणजे महामात्य! कळविल्याशिवाय कांहीं कारण नसतां कदंबच्या



राजानें आपल्या राज्यावर स्वारी केली आहे, म्हणावयाची! आपले हेर काय करीत होते इतके दिवस? आणि सरहद्दीवरचें सैन्य झोंपलें होतें कीं काय?" राजाला राग आला होता.

"महाराज! उघडपणें स्वारी करून युद्ध करण्याची शक्ति कदंबच्या राजाच्या अंगांत नाहीं. तरी आपण सावध राहालें पाहिजे. सेनापतीला सैन्य तयार ठेवण्याची आज्ञा व्हावी आणि देशाच्या रक्षणासाठीं व आंतरिक रक्षणासाठीं सर्व व्यवस्था झाली पाहिजे."

महामात्य म्हणाला.

शतयानूनें सेनापतीकडे निरोप पाठविला. नंतर तो राजवाड्याकडे निघाला. राजवाड्यांत पाऊल टाकणार इतक्यांत एक सैनिक धांवत पळत आला व हात जोडून म्हणाला—"महाराज! कदंब राजाचा दूत आला असून राजधानीच्या फाटका बाहेर उभा आहे. त्याला महाराजांसमोर आणून उभा करूं?"

"उग्रसेनाचा दूत? माझ्याकडे? आश्चर्य आहे!" शतयानु म्हणाला.

"कितीजण आहेत ते? त्यांना पाहून तुम्हांला काय वाटलें? त्यांच्या तोंडावर किंवा वागण्यांत ऐट किंवा गर्व दिसला का?" महामात्यानें विचारलें.

"नाहीं दिसला आम्हांला. सहाजण आहेत ते. त्यांच्यावगैरर आणखी दोघे जण आहेत. त्यांना ते कैद करून घेऊन आले आहेत. सर्वांच्या सर्व घाबरल्यासारखे दिसत आहेत.

सैनिक म्हणाला.

"महामात्य! याच्या पाठी मागें कांहीं तरी राजकीय रहस्य असले पाहिजे!" शतयानु म्हणाला.

"उग्रसेन या सर्व कामांत पटाईत आहे. तरी दूतांच्या हातीं त्यानें काम निरोप पाठविला आहे. हें तर पाहिलें पाहिजे. ते कैदी कोण व त्यांना आमच्याकडे पोंचते करण्यांत त्याचा हेतु काय? या सर्वगोष्टी सावधपणें पाहिल्या पाहिजेत." असें सांगून महामात्यानें कांहीं वेळ विचार करून सैनिकांना आज्ञा केली—"जा त्यांना दरबारांत ताबडतोब हजर करा!"

पुढील गोष्ट पुढील अंकीं.



# मत्सर भोंवला

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला आणि प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! केवळ हेवा वाटून जर कोणी तुला हा त्रास देत असेल तर ताम्रकेतुप्रमाणें शेवटीं त्यांचा नाशच होईल. तू गुणनिधिसारखा सर्व संकटांतून मुक्त होऊन सुखी होशील. तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी त्यांची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

पूर्व किनाऱ्यावरच्या एका राजाला एक मुलगा होता. त्याचें नांव ताम्रकेतु. मंत्र्याला ताम्रकेतूच्या वयाचाच गुणनिधि नांवाचा एक मुलगा होता. दोघे समवयस्क होते. ताम्रकेतु दुष्ट स्वभावाचा होता व गुणनिधि



सुशील व गुणवान होता! गुणनिधीचा स्वभाव. सर्वांना आवडे. म्हणून ताम्रकेतूला त्याचा फार हेवा वाटे. पदोपदीं तो गुणनिधीचा अपमान करी किंवा त्याला त्रास देई.

एकदां गुणनिधि आपल्या गुरुबरोबर रानांत फिरावयास गेला असतां त्याला वाटेंत एक सोन्याचें पीस दिसलें. जमिनीवर तें चकाकत असलेलें त्याला दिसलें, तेव्हां त्यानें तें उचलून घेतलें व गुरूला विचारलें—"मी हें घेऊं का कीं नको!"

"तूं जवळ ठेवून घेतलेंस तरी तुला त्रास होईल. सोडून दिलेंस तरी पण त्रास होईल." गुरु म्हणाला.

"तसें असेल तर ठेवून घेणेंच बरें!" असें म्हणत त्यानें तें पीस उचलून आपल्या फेंट्यांत खोंचून ठेवलें.

गुणनिधि हिंडून घरीं परत आला तेव्हां राजकुमारानें त्याच्या फेट्यांत तुर्‍यांसारखें चमकत असलेलें पीस पाहिलें व त्याला विचारलें—"कोठें रे मिळालें तुला हें!"

"कां? रानांत! तुला हवें असेल तर घे!" गुणनिधि पीस काढून देऊं लागला.

"तूं दिलेली ही भीक नको आहे मला. हें पीस ज्याचें आहे तो सुवर्णपक्षी एका महिन्याच्या आंत आणून दे. नाहीं तर तुझें डोकें उडवीन." राजकुमार म्हणाला.

तो सुवर्णपक्षी आतां कोठून आणायचा बिचार्‍या गुणनिधीला कळेना. परंतु त्याच्या गुरूनेंच त्याला एक उपाय सांगितला. राजाच्या उद्यानांत पक्ष्यांना पाणी प्यायला म्हणून एक टांकीवजा कुंड होतें. गुरूच्या सल्ल्याप्रमाणें मंत्र्याच्या मुलानें त्यांतलें पाणी काढून टाकलें व त्यांत दारू भरून ठेवली.





नंतर तो शेजारीं एका झुडपांत दबा धरून बसून राहाला. उजाडण्याच्या सुमारास पक्ष्यांच्या झुंडीच्या झुंडी पाणी प्यायला तिकडे येऊं लागल्या. एक सुवर्णपक्षी त्या कुंडाच्या काठावर येऊन बसला आणि त्यांतली दारू पिऊं लागला. त्यानें पोटभर पिऊन घेतल्यावर त्याचें अंग व पंख ढिले पडले. मंत्र्याच्या मुलानें चटकन पुढें होऊन त्या पक्ष्याला धरलें आणि राजकुमाराला नेऊन दिलें. राजकुमारानें त्याच्या पायाला एक सांखळी बांधून ठेवली आणि निर्दयपणें ती सांखळी धरून त्या पक्ष्याला गरगर फिरवून गंमत करूं लागला. त्यानें आपल्या चोंचीनें व पंजांनीं राजकुमाराला खूप ओरबाडलें.

"तूं या पक्ष्याला शिकवून पाठविलें होतेंस म्हणून त्यानें माझें सर्व अंग ओरबाडून काढलें आहे. मी ही गोष्ट कधीं विसरणार नाहीं, लक्षांत ठेव." राजकुमार मंत्र्याच्या मुलाला म्हणाला.

पक्ष्यांची राणी म्हणून एक देवी होती. सुवर्ण पक्ष्याला राजकुमारानें जो त्रास दिला होता तो इतर पक्ष्यांच्या तोंडीं तिला कळला. तिला त्यामुळें इतका राग आला कीं रागाच्या भरांत तिनें आपल्या कमरेंतला



सोन्याचा कंबरपट्टा जमिनीवर फेंकला आणि आपल्या महालांत निघून गेली.

त्याच्या दुसर्‍याच दिवशीं गुणनिधि आपल्या गुरूबरोबर त्या बाजूला आला. त्याला तो कंबरपट्टा दिसला. त्यानें तो उचलून पाहिला व म्हणाला—"हा घेतला तर चालेल का कीं नको!"

"तूं ठेवून घेतलास तरी पश्चात्ताप करावा लागेल. नाहीं घेतलास तरी पश्चात्ताप करावा लागेल." गुरु म्हणाला.

"तरमग ठेवूनच घेतों." असें म्हणत त्यानें तो उचलून घेतला.



तो पाहून राजकुमारानें त्याला विचारलें "कायरे बायकांच्या कमरेंतला हा कंबरपट्टा तुला कोठें मिळाला ?"

"शिकारीला गेलो होतो रानांत, तेथें मिळाला." मंत्र्याचा मुलगा म्हणाला.

"या गजा नाहीं चालायच्या माझ्याजवळ. तो कंबरपट्टा ज्या तरुणीचा आहे तिला आणून माझ्या स्वाधीन केलें नाहींस तर तुझें डोकें उडवीन. लक्षांत ठेव." राजकुमार म्हणाला. मंत्र्याच्या मुलानें तें आपल्या वडिलांना जाऊन सांगितलें.

"सोन्याचा दागिना कोठें सांपडला म्हणजे जगाला दाखवत सुटायचें नसतें. आतां सुटका नाहीं." बाप म्हणाला.

मंत्र्याचा मुलगा आपल्या गुरुबरोबर निघाला. योगायोग असा कीं पक्ष्यांची राणी रहात असे त्याच महालांत ते येऊन पोंचले. मंत्र्याच्या मुलानें मागचा पुढचा कांहीं एक विचार न करितां आपलें उपरणें तिच्या अंगावर जाळ्यासारखें टाकलें व तिला धरून घोड्यावर बसला आणि स्वदेशीं आला. पक्ष्यांची राणी ओरडत होती, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. पक्ष्यांनीं येऊन मंत्र्याच्या मुलाला चोंचींनें टोंचून व पंजांनीं ओरबाडून काढण्याचा पुष्कळ यत्न केला. परंतु त्यानें चाबकानें त्या सर्वांचा समाचार घेतला व स्वतःचें रक्षण करून घेतलें.

पक्ष्यांच्या राणीचें सौंदर्य पाहून राजकुमार म्हणाला—"तुझें रूप पाहून तुझ्याशींच लग्न करण्याचें मी ठरविलें आहे."

"माझ्याशीं लग्न करावयाचें असेल तर मला इकडे धरून घेऊन येणाराला प्रथम शिक्षा केली पाहिजे." ती म्हणाली.

"तूं सांगशील ती शिक्षा त्याला मिळेल." राजकुमार म्हणाला.



"त्याला उकळत्या तेलांत टाकलें पाहिजे. राणी म्हणाली.

राजकुमाराला तेंच हवें होतें. त्यानें एका मोठ्या भांड्यांत तेल उकळायला ठेवलें आणि त्यांत मंत्र्याच्या मुलाला टाकलें. परंतु तेल तापलेंच नाहीं. कारण पक्ष्यांच्या राणीनें आपल्या अदृश्य राहणाऱ्या सेवकांकरवीं विस्तवाचा ताप वाढूं दिला नाहीं.

मंत्र्याचा मुलगा मरणार ही आशा धरून राजकुमार हताश झाला. तो पक्ष्यांच्या राणीला म्हणाला—"तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व केलें. आतां आपण लग्न करून घेऊं !"

"माझ्यावर तुझें खरें प्रेम किती आहे हें मला पहायचें आहे." राणी म्हणाली.

"पहा, अवश्य पहा ! तुझ्या शब्दावर मी आपल्या प्राणाहून प्रिय मित्राचा बळी द्यायला तयार झालो होतो." राजकुमार म्हणाला.

"आणखी काय ? तूं सुद्धां उकळत्या तेलांतून बाहेर आलें पाहिजेस." पक्ष्यांची राणी म्हणाली.

राजकुमार घाबरून विचारूं लागला—"या उकळत्या तेलांत ? मी ?"

"कां ? मंत्र्याचा मुलगा त्यांतून बाहेर आला, त्यानें आढेवेढे घेतले नाहींत. हेंच



वाटतें तुझें माझ्यावरचें प्रेम ?" पक्ष्याच्या राणीनें विचारलें.

राजकुमाराला नाइलाजानें कढईंत उतरावें लागलें. त्याचें सर्व अंग पोळून तळून निघालें व त्यांतच तो मरण पावला. कारण या खेपेस पक्ष्यांच्या राणीनें चांगला जाळ करायला आपल्या अदृश्य सेवकांना सांगून ठेवलें होतें.

राजकुमार मरण पावल्यावर पक्ष्याची राणी आपला सुवर्णपक्षी घेऊन आपल्या महालांत निघून गेली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला—"राजा! एका गोष्टीची शंका माझ्या मनांत आहे. पक्ष्यांच्या राणीनें मंत्र्याच्या मुलाच्या बाबतींत कां पक्षपात केला? तोच तर सुवर्णपक्ष्याला आणि पक्ष्यांच्या राणीला तिच्या विरुद्ध धरून घेऊन आला होता. मग राणीनें त्याचें रक्षण कां केलें? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"मंत्र्याच्या मुलाला दंड व्हावा असें पक्ष्यांच्या राणीला कधीं वाटलेंच नाहीं. कारण त्यानें जें कांहीं केलें होतें तें राजकुमाराच्या आज्ञेनें. सुवर्ण-पक्ष्याचें किंवा राणीचें जें अपहरण झालें त्याला मूळकारण राजकुमारच होता. म्हणून त्यालाच दंड मिळावा असें तिला वाटलें. परंतु राजकुमाराला वाटलें कीं तिच्या मनांत मंत्र्याच्या मुलालाच शिक्षा देण्याची इच्छा आहे. म्हणून तिच्या इच्छेप्रमाणें त्यानें तेल मागवून मंत्र्याच्या मुलाला त्यांत सोडलें होतें.

अशातऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतास अदृश्य झाला व पुन्हां झाडाच्या फांदीला लोंबकळूं लागला.





# दत्तक पुत्र

एका राजाला तीन मुलें होतीं. पाडव्याच्या दिवशीं आंघोळी झाल्यावर नवीन वस्त्रें परिधान करून आल्यावर राजानें त्यांना विचारलें. "तुम्हांला रात्रीं काय काय स्वप्नें पडलीं?"

मोठा मुलगा म्हणाला—"मला स्वप्नांत मोठमोठीं नगरें, शेतें, गाई गुरें व मोठ मोठे राजवाडे आणि त्यांत काम करणारे असंख्य दासदासी दिसले. त्या सर्वांचा मालक मीच आहे हें देखील मी पाहिलें."

"सुंदर स्वप्न आहे. तुझें स्वप्न खरें व्हावें म्हणून मी तुझ्या नांवीं जहागीर लिहून देतो!" असें सांगून राजानें खरो-खरीच त्याला जहागीर लिहून दिली.

तें पाहून दुसरा मुलगा म्हणाला—"महाराज! मोठ्या भावाला जसें स्वप्न पडलें, हुबेहूब अगदीं तसेंच स्वप्न मला पडलें. राजानें त्याच्या नांवीं पण एक मोठी जहागीर लिहून दिली.

राजानें आपल्या सर्वांत धाकट्या मुलाला विचारलें. "तुला काय स्वप्न पडलें?" त्याचें नांव मुकुंद होतें.

"मला नाहीं इतकें चांगलें स्वप्न पडलें." मुकुंद म्हणाला.

पण राजा म्हणाला—"काय वाटेल तें स्वप्न पडलें असलें तरी सांग!"

म्हणून मुकुंद म्हणाला—"महाराजा! स्वप्नांत तुम्ही चांदीच्या लोटीनें हात धुवायला माझ्या हातावर पाणी घातलें आणि आईनें पंचाला माझा हात पुसला."

"असें होय! तूं माझ्याकडून आणि तुझ्या आईकडून आपली दासदासीसारखी



सेवा करविलीस होय? जा निघून माझ्या राज्यांतून! उद्यां सकाळच्या आंत राज्याच्या हद्दीपलीकडे गेला नाहींस व कोठें दिसलास तर तुझें डोकेंच उडवीन. लक्षांत ठेव." राजा म्हणाला.

राजा स्वभावानें फार तापट होता व रागाच्या भरांत तो काय करील व काय करणार नाहीं हें कोणाला कळणें शक्य नव्हतें. म्हणून राजा आणखी कांहीं पुढें बोलणार त्या आधींच मुकुंद तेथून निघून गेला. सहा महिने वणवण फिरत राहाल्यावर तो एका किल्ल्यांत शिरला. किल्ल्याला फाटकच नव्हतें. किल्ल्यांत प्रवेश करून तो वाट पहात उभा राहाला कीं किल्ल्याचा मालक येईल व त्याच्या घरीं नोकरी करण्याची संधी मिळेल. परंतु इतक्यांत समोर त्याला एक राक्षस दिसला. त्याच्या हातांत एक मोठी राक्षसी कासंडी होती व तो शंभरावर गाईंना हांकीत येत होता. नंतर एका जागीं गाई थांबल्या. त्यानें एकेक करून गाईंचें दूध काढलें.

परंतु मुकुंदला एका गोष्टीचें आश्चर्य वाटलें, त्या राक्षसाला डोळे नव्हते. त्यानें दूध काढलें व तें सर्व गटगट प्याला. नंतर त्यानें गाईंना त्यांच्या गोठ्यांत पोंचतें केलें आणि गोठ्याचें दार बंद करून आपल्या महालांतल्या पडवींत एका मोठ्या लाकडी बांकावर जाऊन पडून राहाला.

मुकुंद धीर करून पुढें गेला आणि राक्षसाजवळ जाऊन हळूंच म्हणाला—"बाबा!"

"कोण?" राक्षसानें प्रश्न केला.

"तुमचाच मुलगा, बाबा!" मुकुंद म्हणाला.

"माझा मुलगा? मला कोणी मूलबाळ नाहीं!" राक्षस चकित होऊन म्हणाला.

"आतां थोड्या वेळां पूर्वी जन्मलों, बाबा!" मुकुंद म्हणाला.

"ये जवळ, पाहातों." असें म्हणत राक्षसानें हात पुढें केले. मुकुंद मागें सरकला नाहीं. राक्षसानें मुकुंदच्या अंगाखांद्यावर हात फिरवून पाहिले.

"छान, छान! देवानें मला एक मुलगा दिला. आतां मला डोळे नसल्याचा त्रास होणार नाहीं." राक्षस म्हणाला.

"बाबा, मी तुम्हांला काय वाटेल ती मदत करायला तयार आहें." मुकुंद म्हणाला.

"माझें फक्त दुधावर भागतें. तुझें नाहीं भागणार तेवढ्यावर! तुला काय वाटेल तें खा आणि लवकर माझ्यासारखा मोठा हो!" राक्षस म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं राक्षस गाईंना चरायला घेऊन गेला तेव्हां मुकुंदनें केरसुणीनें सर्व घर झाडून काढलें आणि कपड्यानें पुसून स्वच्छ केलें. बत्तीस वर्षांपूर्वी राक्षसाचे डोळे गेले. तेव्हां पासून कोणी किल्ला साफ केला नव्हता.

किल्ला साफ करीत असतां मुकुंदला एका कोंपऱ्यांत एक बांसरी दिसली. खिडकी जवळ बसून तो ती वाजवूं लागला. त्याबरोबर झाडें, आकाशांतले ढग व राक्षसाचा किल्ला त्या सुरावर तालांत नाचूं लागले.




निसर्गाचें तें नृत्य पाहून मुकुंदाच्या मनाला फार आनंद वाटला. तो त्या आनंदांत बराच वेळ बांसरी वाजवीत राहाला. नंतर बांसरी कमरेला खोंचून ठेवली. बांसरी वादन संपतांच निसर्गाचें नृत्यदेखील थांबलें. तें पाहून मुकुंदाला आश्चर्य वाटलें.

संध्याकाळीं राक्षस घरीं परत आला व मुकुंदला म्हणाला—"आज गाईंच्या बरोबर मी देखील खूप नाचलों. माझ्या पायाखालच्या जमिनीचें नृत्यपण चालू होतें."

दुसऱ्या दिवशीं राक्षस गाईंना चरायला घेऊन निघाला तेव्हां मुकुंद म्हणाला—














"बाबा! तुम्ही कशाला एवढे कष्ट करतां? तुम्ही स्वस्थ घरीं बसा. मी जातो घेऊन गाई चरायला."

"ठीक! जा घेऊन. वाटेल तिकडे जा. पण दूर एक टेकडी आहे. त्या टेकडीवर एक पांढरें घर आहे. त्याच्या जवळ पास जाऊं नकोस. कारण त्या घरांत राहणाऱ्या भुतांच्या दुष्टपणामुळेंच माझे डोळे गेले. त्यांच्या पासून आपला बचाव कर, म्हणजे झालें." राक्षसानें त्याला सावध केलें.

"मी त्याची काळजी बाळगीन बाबा!" असें सांगून मुकुंद गाई घेऊन गेला.

किल्ल्याबाहेर थोडें अंतर तो चालून गेला असेल, त्याला ती टेंकडी दिसली. ती टेंकडी एकाद्या उपडया मडक्यासारखी दिसत होती. त्यावर हिरवें गवत उगवलें होतें. दूर एक पांढरें घर दिसत होतें. त्याच्या चारी बाजूला झाडी होती. मुकुंदनें त्याच टेंकडीवर गाई चरायला सोडल्या आणि स्वतः एका झाडावर चढून बसला.

कांहीं वेळानें त्या पांढऱ्या घराच्या खिडकींत एक पिशाचिणी डोकावून पहात असलेली दिसली. तिनें मुकुंदला पाहिलें व म्हणाली—"अग अक्का! तो पाहिलास का? तो पहा, तेजस्वी डोळ्याचा एक जण दिसतो आहे. लवकर ये!"

नंतर दोघी भूतभगिनी मुकुंद बसला होता, त्या झाडाखालीं आल्या. लगेच मुकुंदनें बांसरी वाजवायला सुरवात केली. वृक्षलता, गाई गुरें, एवढेंच नव्हें, तर ती टेंकडीदेखील नाचूं लागली. त्या पिशाचिनी पण नाचूं लागल्या. त्यांतल्या एकीनें नाचतां नाचतां एकदम उंच उडी मारली. मुकुंदनें वरच्या वर तिचे केस धरून ते एका फांदीला बांधून ठेवले व तिला तसेंच लोंबकळत सोडून दिलें. इतक्यांत दुसरीनें उडी मारली. तिलादेखील त्यानें तसेंच बांधून ठेवलें.

"सोड आम्हांला, तूं मागशील तें देऊं आम्ही!" दोघी गयावया करूं लागल्या.

"माझ्या बाबांचे डोळे परत द्या!" मुकुंद म्हणाला.

"तूं आम्हांला सोडलेंस तर आम्ही आणून देऊं." दोघी म्हणाल्या.

"तें नाहीं चालावयाचें. कोठें आहेत माझ्या बाबांचे डोळे, हें अगोदर सांगा! ते त्यांना नेऊन देतों आणि त्यांना दिसूं लागलें म्हणजे मग तुम्हांला सोडतों. तों पर्यंत तुम्हां दोघींना येथेंच लोंबकळत रहावें लागेल." मुकुंद म्हणाला.

"सैंपाक घरांत मोठ्या भट्टीवजा चुली वर कोनाड्यांत एका पेटींत दोन फळें आहेत. चुलीजवळ राक्षसाचीं पोरें आहेत. त्यांना पाहून "भौं" "भौं" करून भुंकूं नकोस, तीं भिऊन पळून जातील. चुचकारून त्यांना जवळ बोलावलेंस आणि त्यांच्या पाठीवर हात फिरवून मागितलीस तर तीं मुलें तीं फळें आणून देतील. तुझ्या बाबांनीं तीं फळें खाल्लीं तर त्यांना पुन्हां छान दिसूं लागेल." पिशाचिनी म्हणाल्या.



मुकुंद त्यांच्या घरीं गेला. सैंपाकघरांत पाऊल टाकतांच त्याला एका कोपऱ्यांत घाबरून लपून बसलेलीं राक्षसाचीं मुलें दिसलीं. पिशाचिनींनीं जें सांगितलें त्यांत कांहीं तरी लबाडी आहे हें ओळखून मुकुंद त्या मुलांच्या जवळ न जातां त्यांच्यावर मोठ्यानें 'भू' 'भू' करून ओरडला. घाबरून तीं मुलें पळूं लागलीं आणि भट्टींत पडून मरून गेलीं.

नंतर मुकुंद एक तिपाई घेऊन आला व वर चढून त्यानें कोनाड्यांतली ती पेटी काढली. त्या पेटींतली दोन हिरवीं फळें



त्यानें उचललीं. पिशाचिनी ओरडत राहाल्या. पण त्यानें त्यांची फिकीर केली नाहीं व गाई घेऊन घरीं परतला.

संध्याकाळीं राक्षस दूध काढूं लागला तेव्हां विचारूं लागला—"बाळ, आज गाईंनीं दुप्पट दूध दिलें आहे. हें कसें काय?"

"बाबा! तुम्हांला डोळे नाहींत म्हणून गवताचें चांगलें कुरण कोठें आहे हें तुम्हांला माहीत नाहीं. आज गाई पोट भरून चरल्या." मुकुंद म्हणाला.

राक्षस त्या दिवशीं दोन मोठ्या कासंड्या भरून दूध प्याला व आपल्या बांकावर जाऊन बसला. मुकुंद पुढें येऊन म्हणाला—"बाबा! तुमच्या साठीं मी दोन फळें आणलीं आहेत. खातां का?"

"मी दुधाशिवाय कांहीं खात पीत नाहीं." राक्षस म्हणाला.

"तें कबूल! पण हीं फळें खाऊन पहा तर खरें. फार चांगलीं आहेत गोड गोड!" असें सांगून त्यानें तीं फळें राक्षसाच्या हातांत दिलीं. राक्षसानें एक फळ खाल्याबरोबर त्याला उजवा डोळा आला. तो चकित होऊन म्हणाला—"मला उजव्या डोळ्यानें छान दिसूं लागलें कीं."

"तर मग दुसरें पण खा!"

दुसरें फळ खाऊन राक्षस म्हणाला—"मला आतां फारच छान दिसूं लागलें आहे. दोन्हीं डोळ्यांनीं!" तो त्या आनंदांत नाचूं लागला. त्यानें मुकुंदला उचलून प्रेमानें कुरवाळलें आणि म्हणाला—"माझ्या मुलानें मला पुन्हां डोळे मिळवून दिले."

राक्षसाचा उत्साह थोडा ओसरल्यावर मुकुंदनें त्या पिशाचीनींची कथा वर्णन करून सांगितली. राक्षसानें दोन मशाली घेतल्या व झाडाला लोंबकळत असलेल्या दोघां पिशाचिनींना जाळून टाकलें. घरीं आल्यावर राक्षसानें आपल्या किल्ल्यांचें जुडगें मुकुंदाच्या स्वाधीन केलें आणि म्हणाला—"या किल्ल्यांतल्या सर्व दालनांच्या किल्ल्या या जुडग्यांत आहेत. त्यांत सोनें, चांदी व रत्नजवाहीर जें कांहीं आहे, तें सर्व आज पासून तुझें. मी मरेपर्यंत वाट पाहण्याची गरज नाहीं. तुला जें वाटेल तें घें आणि त्याचा वाटेल तसा उपयोग कर. मला एक सहस्र वर्षें आयुष्य आहे. म्हणून तूं सर्व दालनें उघडून पहा. त्यांत जें कांहीं मिळेलतें सर्व तूं घे."

मुकुंदनें एका मागून एक एकूण चाळीस दालनें उघडून पाहिलीं. त्यांतला तो अपूर्व ठेवा पाहून त्याचे डोळे अक्षरशः दिपून गेले. सर्व पृथ्वी पालथी घातली असती तरी एवढें धन मिळालें असतें कीं नाहीं, शंकाच वाटली त्याला. तो सर्व खजिना त्याला व्यर्थ व निरुपयोगी वाटला. त्यानें फक्त एक मुकुट, एक हिरा, चांदीच्या दोऱ्यानें मोती ओवून शिवलेला एक सदरा व चांदीचे जोडे घातले. नंतर रत्नखचित मूठ असलेली एक तलवार घेतली. सोन्याच्या मण्यांनीं विणलेला एक अंगरखा काढून घेतला व अंगांत घालून पाहिला तर वजन मुळींच भासलें नाहीं.



कोणत्याहि तलवारीचा वार झाला तरी लागणार असें तें एक दुर्भेद्य कवच होतें.

तें सर्व घालून तो राक्षसाकडे परत येत असतां त्याला चाळीसावें दालन दिसलें. त्याच्या कुलपाला गंज लागला होता. जुडग्यांतली एक देखील किल्ली त्या कुलपाला लागेना. म्हणून तो राक्षसाकडे येऊन म्हणाला—"बाबा! गंज लागलेल्या कुलपाची किल्ली दिसत नाहीं, या जुडग्यांत?"

"त्या कुलपाची किल्ली हरविली आहे. पण त्या दालनांत केरकचऱ्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं." राक्षस म्हणाला.



"खरें सांगा बाबा! मी तें दालन उघडूं नये म्हणून तुम्ही हें म्हणालांत ना?" मुकुंदनें निर्भयपणें विचारलें.

मुकुंदाचा धीटपणा पाहून राक्षस विचारांत पडल्यासारखा दिसला. नंतर म्हणाला— "बाळ! तुला मी त्या खोलींत जाऊं दिलें तर तुझी माझी भेट पुन्हां कधीं होणार नाहीं." असें मला वाटतें.

"माझ्यावर कांहीं संकट येईल काय?" मुकुंदानें विचारलें.

"तुझ्यावर नाहीं. पण माझ्यावर येईल!" राक्षस म्हणाला.

त्याच्या डोळ्यांतून कांचेच्या गोळ्यां-एवढी मोठमोठीं टपोर टिपें गळूं लागलीं.

"तुमच्यावर कोणतेंहि संकट येऊं नये याची जबाबदारी माझ्यावर. विश्वास ठेवा माझ्यावर!" मुकुंद म्हणाला.

राक्षस एक जुनी किल्ली मुकुंदला देत म्हणाला—"बाळ तूं कोठेंहि रहा मला कधीं विसरूं नकोस."

"बाबा! मी कोठें जालच नाहीं. तुम्ही आपलीं टिपें आवरा!" असें सांगून मुकुंदानें किल्ली घेऊन चाळीसाव्या खोलीचें कुलुप काढलें आणि आंत गेला. तो थक्क होऊन टक लावून पाहूं लागला.

खोलींत घोड्यासारखा एक देव होता. त्याच्या पाठीवर सोन्याचें खोगीर होतें. त्याचें शरीर चांदीसारखें चमकत होतें. त्याची आयाळ सोन्यासारखी चकाकत होती. जणुं स्वारीसाठीं कोणी तरी घोडा तयार करून आणून उभा केला आहे.

"आतां आला आहेस राजकुमार! लव-कर गेलें पाहिजे! तुझ्या वडिलांनीं स्वतःच चूक करून स्वतःच संकटाला बोलावणें दिलें आहे. लवकर गेलें पाहिजे." घोडा मुकुंदाला माणसाच्या भाषेंत म्हणाला.



मुकुंद घोड्याला बाहेर घेऊन आला त्याच्यावर बसला. त्याबरोबर घोडा आकाश-मार्गें उडाला आणि त्याच्या वडिलाच्या राज्याजवळ उतरूं लागला. तेव्हां मुकुंदनें त्याला विचारलें—"काय झालें तरी काय हें सांगशील कीं नाहीं?"

"तुझ्या वडिलांनीं तुझ्या बहिणीच्या लग्नासाठीं स्वयंवर रचलें व ही अट लावली कीं जो कोणी घोड्यावर बसून खंदक एका उडींत ओलांडून किल्ल्यांत येईल त्याच्याशीं राजकन्येचें लग्न होईल. त्या अटीप्रमाणें अनेक तरुण राजकुमार आले व खंदक ओलांडण्याच्या प्रयत्नांत स्वतःच्या प्राणाला मुकले. म्हणून त्यांचे आईवडील व नाते-वाईक तुझ्या बाबांवर रागावले आहेत. त्यांनीं सर्वांनीं मिळून तुझ्या बाबांच्या राज्यावर स्वारी केली आहे.

मुकुंदला जें अंतर पार करून जायला सहा महिने लागले होते तें अंतर तो त्या घोड्यावर बसून सहा तासांच्या आंत पार करूं शकला. तो आपल्या राजधानींत आला तेव्हां शत्रुसैन्यानें राजवाड्याला वेढा दिला होता.

मुकुंद त्या घोड्याच्या सहाय्यानें व दुर्भेद्य कवच घालून आणि ती दिव्य तलवार



घेऊन शत्रुसैन्यावर तुटून पडला व शत्रु-सैन्याला त्यानें पिटाळून लावलें. तो शत्रु-सैन्य कापीत पुढें जात होता. पण त्याच्या केसालादेखील धक्का पोंचत नव्हता. शत्रु त्याला कैद करूं शकले नाहींत.

सूर्यास्ताच्या सुमारास युद्ध संपलें. सह-स्त्रावधि शत्रू मरण पावले होते. जे थोडे उरले होते ते घाबरून पळून गेले. किल्ल्याच्या भिंतीवर उभे राहून राजाचे शूर सरदार व सैन्य चकित होऊन तें सर्व दृश्य पहात होते. त्यांनीं जाऊन राजाजवळ निवेदन केलें कीं महाराज, राजधानीवरचें

संकट टळलें. स्वर्गांतून इंद्रासारखा एक शूर व पराक्रमी योद्धा आला व त्यानें एकट्यानें सर्व शत्रुसैन्याला कापून काढलें.

राजाला फार आनंद झाला. तो वाजत गाजत मुकुंद विश्रांति घेत बसला होता तेथें आला व आपलें आतिथ्य स्वीकारण्यास त्यानें आग्रह केला. कारण त्यानें आपल्या तिसऱ्या मुलास ओळखलें नाहीं.

मुकुंद राजवाड्यांत आला तेव्हां एका मोठ्या मेजवानीची तयारी करण्यांत आली होती.

"जेवण झाल्यावर आपण स्वस्थपणें बोलूं!" राजा मुकुंदला म्हणाला.

"मला भूक पण लागली आहे. चला खायला बसूं या." मुकुंद म्हणाला.

राजानें धांवत जाऊन चांदीच्या तांब्यांत पाणी आणलें आणि हातावर घालूं लागला. हात धुवून झाल्यावर राणीनें पुढें होऊन हात पुसायला पंचा दिला.

तेव्हां मुकुंद स्मित करून राजाकडे वळून म्हणाला—"तर मग माझें स्वप्न खरें ठरलें म्हणावयाचें!"

लगेच राजा व राणी दोघांनीं आपल्या मुलाला ओळखलें. राजानें आपल्या मुलाची माफी मागितली. त्यानें मेजवानीच्या वेळीं असें जाहीर केलें कीं माझ्यानंतर माझ्या गादीला वारस माझा तिसरा मुलगा मुकुंदच राहील. दोन्हीं वडील मुलगे राजाला संकटसमयीं मदत करण्यास धांवले नव्हते.

मुकुंद राक्षसाला विसरला नाहीं. तो दर महिन्यांत एक दिवस आपल्या दिव्य अश्वावर बसून राक्षसाच्या भेटीला त्याच्या किल्ल्यांत जाई.





# परोपकारी गोपाळ

एकादां गोपाळला त्याच्या गांवच्या पाटलानें कांहीं वस्तू एका जमीनदाराकडे पोंचविण्यास सांगितलें. कारण तें काम एका विश्वासू माणसाच्या हातूनच होण्यासारखें होतें.

गोपाळ जमीनदाराच्या गांवीं त्याच्या घराकडे वळला असेल एवढ्यांत त्याला एका झोंपडींत कोणी तरी स्त्री रडत बोलत असल्याचा भास झाला. त्यानें जवळ जाऊन ऐकलें तेव्हां त्याच्या कानीं हे शब्द पडले—"त्या ज्योतिषीबुवाचें म्हणणेंच शेवटीं खरें ठरणार म्हणावयाचें. मग मागें माझें व मुलांबाळांचें कसें व्हायचें!"

एका पुरुषाचा खोल आवाज ऐकूं आला—"मी अजून जिवंत आहे ना! मेलों नाहीं ना! सुखानें मरूं तरी द्याल कीं नाहीं!"

तें ऐकून गोपाळ झोंपडींत शिरला. एक स्त्री व तिची चार मुलें एका चटईवर फाटक्या धोंगडीनें स्वतःला गुरफटून झोंपलेल्या माणसाजवळ बसून रडत होतीं.

गोपाळनें जवळ जाऊन विचारलें—"काय, झालें आहे? कोण हे? काय आजार आहे? मी करतों कांहीं तरी उपाय!"

ते थंडीचे दिवस होते. त्यांत तो आजारी माणूस एका फाटक्या चटईवर एक फाटकें कांबळें पांघरून पडून होता. म्हणून गोपाळनें आपली काश्मीरी शाल त्याच्या अंगावर टाकली.

रोग्याच्या बायकोनें अथपासून इतिपर्यंत आपली रडकथा सांगितली. म्हणाली—"हे माझ्या मुलांचे वडील. जमीनदाराच्या घरीं कामाला आहेत. आमचें हें झोंपडें जमीन-

दानी कीं भिकारी] [श्री. मा. गो. मोरे



दाराच्या जमिनीवरच आहे. जमिनदाराच्या घरीं काम करून जी मिळकत होते त्या मिळकतीवर किती दिवस इतकीं पोटें भरणार ? पण जमीनदारानें त्याच्या घरीं काम करणाऱ्यांना फुकट औषध पाण्याची व्यवस्था करून दिली आहे. कोणी नोकरानें स्वतःच्या पैशावर औषध पाणी केलें तर त्यांना त्याचा राग येतो. कांहीं दिवसांपासून या मुलांच्या बाबांची प्रकृति बिघडली. जमीनदार साहेबांनीं आमच्या पंचक्रोशींतील एका सुप्रसिद्ध ज्योतिषी वैद्याला सांगून औषध पाणी सुरू केलें. या वैद्याला ज्योतिष शास्त्राबरोबर वैद्यक शास्त्राची पण माहिती आहे. त्याला कोणी बोलावलें म्हणजे तो प्रथम त्याची जन्मकुंडली पाहून त्याला वय किती लिहिलें आहे हें पाहून औषधोपचार करतो. नाहीतर सांगतो-'हा आजार पुरलेला आहे. बरा होणार नाहीं. तरीपण पाहिजे असेल तर औषध देतो.' कारण आपण औषध देऊन कोणी रोगी बरा झाला नाहीं व त्याला मरण आलें तर आपली अपकीर्ति होईल, ही भीति त्याला नेहमी वाटते. त्यानें जें भवितव्य वर्तवलें तें बरेंचसें खरें पण निघालें म्हणून लोकांचा त्याच्या म्हणण्यावर विश्वास बसला व ज्योतिषी वैद्य म्हणून लोक त्याला ओळखूं लागले. परंतु कांहीं समजूतदार लोक त्याच्या कडून औषधोपचार करवीत नाहीत.

"ह्याच ज्योतिषी वैद्य प्रथम जन्म कुंडली पाहून जमीनदाराला म्हणाला—'बांना औषधाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. कारण मंगळ व राहूची संधी स्पष्ट आहे. ग्रहशांति करून देखील लाभ होईल कीं नाहीं शंकाच. तरीदेखील तुम्हांला पाहिजे तर औषध द्यायला माझी ना नाहीं."

"जर औषधाचा कांहीं उपयोगच नाहीं म्हणतां तर पैसे वाया घालविण्यांत तरी काय अर्थ आहे? ग्रहशांति करूनदेखील फायदा नाहीं म्हणतां आणि शांति करणें या गरिबाला कसें साध्य होणार! म्हणून सोडा त्याला देवाच्या भरंवशावर!" असें सांगून जमीनदारानें ज्योतिषी वैद्याला परत पाठविलें. म्हणून आम्ही पण हताश झालों आहों."

तें ऐकून गोपाळ म्हणाला—"हें सर्व कबूल! पण रोग्याला झोंपायला एक खाट व पांघरायला एखादें कांबळें तरी द्यावें कीं नाहीं जमीनदारानें. या गार जमिनीवर त्याला झोंपविण्यांत काय अर्थ? आणि हें पहा, औषधोपचार झाला पाहिजे व ग्रहशांति पण झाली पाहिजे. मनुष्य मरणार म्हणून त्याला कोणी टाकून का देतो? शेवटच्या घटकेपर्यंत औषधपाणी करावें लागतें. चला, वैद्याला बोलावून घेऊन येऊं या."

रोग्याची बायको गोपाळबरोबर जाऊन जमीनदाराकडून खाट व कांबळें मागून आणायला तयार होईना. औषधोपचार सुरू करा म्हणून सांगायला सुद्धां तिला धीर होईना.

गोपाळ तिला म्हणाला -"बाई! तुम्हांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. मी बोलेन





काय बोलावयाचें तें. मंदिरवील एक जमीनदारच आहे." असें सांगून गोपाळ रोग्याच्या बायकोला बरोबर घेऊन ज्योतिषी वैद्याकडे गेला.

रोगी आल्याचें कळल्यावर वैद्यानें त्याचें नांव, जन्म नक्षत्र, तिथि वगैरे विचारलें.

"या रोग्याची कुंडली तुम्ही पाहिली आहे वैद्यबुवा! औषधोपचार करा. ग्रह-शांतीची पण सर्व व्यवस्था करा. किती खर्च होईल तो सांगा!" गोपाळ म्हणाला.

"होईल पन्नास-साठ रुपये खर्च!" वैद्य म्हणाला. त्यानें रोग्याला औषध दिलें.

"मी येऊन भेटेन आपल्याला आणि इतर गोष्टी बोलेन आपल्याजवळ!" असें सांगून गोपाळनें वैद्याला निरोप दिला आणि स्वतः लवकर परत येण्याचें वचन देऊन जमीनदाराच्या घरीं गेला.

जमीनदाराच्या घराजवळच्या आंब्याच्या झाडावर चढून कैऱ्या काढीत असतां घसरून एक मुलगा खालीं पडला. गोपाळ धांवत जवळ गेला. दहा बारा वर्षांचा मुलगा होता. त्याला चेनाचेंच लागलें होतें. पण मुलगा बेशुद्ध झाला होता.

गोपाळ त्या मुलाला उचलून घेऊन लवकर ज्योतिषीवैद्याच्या घरीं गेला आणि म्हणाला—"हा मुलगा आतांच झाडावरून खालीं पडला. बेशुद्ध आहे. याला औषध देऊन शुद्धीवर आणा."

"हा पडला कव्हां? याचें नांव काय? याचें जन्मनक्षत्र काय?" वगैरे निरर्थक प्रश्न वैद्य करूं लागला.

"तें सर्व मला नाहीं माहीत. त्याचें भवितव्य नंतर पहा सावकाश. प्रथम त्याला औषध द्या." गोपाळ म्हणाला.

वैद्यानें जवळ येऊन मुलाला पाहिलें व म्हणाला—"अहो, हा तर जमीनदार साहे-



बांचा मुलगा आहे. आणा त्याला इकडे. त्याला शुद्धीवर आणून मी औषधोपचार करतों. ग्रहदोष पण असावा अशी शंका आहे. ग्रहशांति पाठीमागून करतां येईल." असें सांगून त्यानें औषधोपचार केला व मुलगा शुद्धीवर आला. गोपाळनें त्याला जमीनदाराच्या घरीं पोचता केला.

गोपाळ मुलाला पोचता करून जमीन-दाराचा निरोप घेऊं लागल्यावर तो म्हणाला—"अहो, असे एकदम निघालांत काय! आपण आमच्यावर इतके उप-कार केले आहेत कीं या उपकाराची फेड आयुष्य भर करणें शक्य नाहीं आम्हांला."

"होय, पण मला थोडें घाईचें काम आहे. म्हणून निरोप द्या!" गोपाळ म्हणाला.

"तें कांहीं झालें तरी मी नुसता जाऊं देणार नाहीं आपल्याला! आपली काय सेवा करूं सांगा!" जमीनदार म्हणाला.

गोपाळनें हो ना करीत जमीनदारानें जास्तच आग्रह केला तेव्हां विचारलें "मला दोन कांबळीं व शंभर रुपये देऊं शकाल का?"



प्रथम कांहीं घ्यायला तयार न होणारा गोपाळ हें सर्व मागूं लागला तेव्हां जमीनदाराला आश्चर्य वाटलें. पण उपकाराच्या ऋणाखालीं तो वांकला होता व स्वतः आग्रह कर करून त्यानें मागायला सांगितलें होतें. म्हणून नकार देणेंदेखील त्याला शक्य नव्हतें. त्यानें गोपाळनें मागितल्याप्रमाणें कांबळी व शंभर रुपये देऊन त्याला निरोप दिला.

गोपाळनें रोग्याच्या घरीं जाऊन रोग्याच्या बायकोला पांच रुपये देऊन प्रथम एक खाट विकत घेऊन यायला सांगितलें. नंतर तो वैद्याकडे गेला व त्याला पन्नास रुपये देऊन ग्रहशांति करायला सांगितली आणि रोग्याच्या झोंपडींत परत आला. बाकी उरलेले पैसे रोग्याच्या बायकोच्या हातांत देऊन पुढील खर्चासाठीं ठेवून घ्यायला सांगितलें व पाटलानें सांगितलेलें काम पुरें करून गांवीं परतला.

पुढें जमीनदाराला सर्व कळलें. एका परगांवच्या जमिनदारानें येऊन आपल्या नोकराला व मुलाला संकट समयीं मदत केलेली ऐकून त्याला त्याची मान खालीं झाल्यासारखें वाटलें. म्हणून तो आपल्या नोकराच्या झोंपडींत गेला व म्हणाला "अरे गृहस्था! तूं माझ्याकडे येऊन कां नाहीं हें सर्व मागून घेतलेंस? मी नसतें का दिलें! परगांवच्या गोपाळच्या मदतीची काय गरज होती!"

नंतर, त्यानें दिलेल्या पैशावरच औषधोपचार झाल्याचें रोग्याला सांगितलें. त्यानेंच गोपाळला पाठविलें असल्याचें सांगण्यासदेखील त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. नंतर त्यानें आपल्या मुलावरोवर आपल्या नोकराची ग्रहशांति करविली.





# हात लावील तें सोनें

एका व्यापाऱ्याला एक मुलगा होता. मुलाची आई मुलाच्या लहानपणींच वारली असल्यामुळें मुलगा थोडा लाडांतच वाढला होता. मुलासाठींच त्यानें पैसा मिळविला व त्याच्याच हौशीखातर पाण्यासारखा खर्च पण केला.

एकदां व्यापारी आजारी पडला व जगण्याची आशा सुटली तेव्हां मुलाला जवळ बोलावून म्हणाला "बाळ! मी मिनिटांचा पाहुणा आहे. मी तुला एक आशीर्वाद देतो. तूं हात लावशील तें सोनें होईल." असें सांगून व्यापाऱ्यानें डोळे मिटले.

व्यापाऱ्याचा मुलगा आपल्या वडिलांच्या मरणानंतर पुष्कळ रडला. शोक ओसरल्यावर तो देखील बापाचा धंदा पाहूं लागला. बापाच्या आशीर्वादानें त्याला व्यापारांत पुष्कळ फायदा मिळूं लागला.

त्याला वाटलें कीं बापाच्या आशीर्वादानेंच त्याला इतकी धनप्राप्ती होत आहे. परंतु आशीर्वाद खरा आहे कीं नाहीं हें देखील पाहालें पाहिजे. म्हणून त्यानें ज्या बाजारांत माल महाग होता त्या बाजारांतून विकत घेऊन ज्या बाजारांत तो स्वस्त होता त्या बाजारांत विकायला न्यायचें ठरविलें. त्यानें एका बाजारांत खजूर महाग होता तेथें विकत घेतला आणि तो इजिप्त देशांत विकण्यासाठी घेऊन गेला. इजिप्त देशांत खजूर फार स्वस्त मिळत असे.

इजिप्तच्या राजाला ती गोष्ट कळली. त्यानें चकित होऊन आपल्या मंत्र्याला

विचारलें–"हा कोण विक्षिप्त व्यापारी आहे बुवा !" मंत्र्यानें एका अधिकाऱ्याला पाठवून राजाज्ञेप्रमाणें त्या तरुण व्यापाऱ्याला घेऊन यायला सांगितलें.

अधिकाऱ्यानें तरुण व्यापाऱ्याला राजासमोर हजर केलें तेव्हां राजानें त्याला विचारलें–"तूं अशातऱ्हेनें मूर्खपणानें स्वतःचा सर्वनाश कां करीत आहेस ?"

"महाराज ! माझ्या वडिलांच्या आशीर्वादानें मी कांहीं जरी केलें तरी सुवर्णवृष्टिच होणार यांत शंका नाहीं. परंतु नशिबाची परीक्षा करण्यासाठींच मी असा उलटा व्यापार सुरू केला आहे." तरुण व्यापारी म्हणाला.

"तुझ्या वडिलांनीं तुला काय आशीर्वाद दिला होता हें कळूं तर दे !" राजानें त्याला विचारलें.

"मी मातीला हात लावला तरी ती सोनें होईल." असें म्हणून तरुण व्यापाऱ्यानें मूठभर माती हातांत घेऊन मूठ उघडली. माती नाहींशी झाली होती. तिच्या जागीं हातांत कांहीं तरी चमकत होतें. ती एक सोन्याची अंगठी होती. राजाच्या वंशांत ती पिढ्यानपिढ्या होती. परंतु एकदां ती हरवली व अशातऱ्हेनें ती त्याला परत मिळाली. राजानें ती शोधून काढण्यासाठीं लक्षावधि रुपये खर्च केले होते. परंतु अचानक अशातऱ्हेनें ती मिळाली.

"खरोखरच तुझ्या बाबांचा आशीर्वाद आहे खरा, सोन्यासारखा अनमोल. दैव जरी आडवा उभा राहाला तरी तो तुझें भाग्य पालटूं शकणार नाहीं. असें सांगून राजानें आपल्या मुलीचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. पुढें हाच तरुण व्यापारी इजिप्त देशाचा राजा झाला.





# शक्तिदेव

[ २ ]

झुंतक्यांत काळोख पडला. मोठमोठे पक्षी दूरदुरून कोठून तरी उडत तिकडे आले. कांहीं वेळ त्या झाडाभोंवती आकाशांत घिरट्या घालीत राहून शेवटीं तेथेंच झोंपी गेले.

एका पक्ष्याच्या पंखाखालीं शिरून झोंपला. सकाळीं उजाडतांच तो पक्षी आकाशांत उडाला. आहाराच्या शोधार्थ कोणत्यातरी बेटाच्या एका उद्यानावर कांहीं वेळ घिरट्या घालीत तो खालीं उतरला. लगेच शक्तिदेव पंखा खालून बाहेर आला.

तो उद्यानांत फिरूं लागला. फुलें तोडायला दोन तरुण स्त्रिया त्या उद्यानांत आल्या. त्यांनीं त्याला पाहिलें व थोड्या घाबरल्या. त्यानें जवळ जाऊन त्यांना विचारलें "या देशाचें नांव काय व तुम्ही कोण ?"

"ही कनकपुरी आहे व हा विद्याधरांचा देश आहे. हें उद्यान राजकन्या चंद्रप्रभा हिचें आहे. आज आम्ही आमच्या मालकिणीसाठींच फुलें वेंचायला आलों आहों." दोघींपैकीं एक म्हणाली. शक्तिदेवनें त्याला त्यांच्या मालकिणीकडे घेऊन जाण्यास विनंति केली.

चंद्रप्रभेच्या महालांत रत्नखचित खांब व सोन्याच्या भिंती होत्या. त्याला दुरून येत असलेला पाहून चंद्रप्रभेनें जवळ येऊन विचारलें–"कोण तुम्ही ? या देशांत मानव जातीला प्रवेश नाहीं. आपण कसे काय आलांत ?"



शक्तिदेवानें कांहीं एक न लपविता खरें तें सर्व सांगून टाकलें. म्हणाला—"कनकरेखा नांवाच्या राजकन्येशीं विवाह करण्याच्या हेतूनें तिनें घातलेली अट पुरी करण्यासाठीं मी कनकपुरीस आलो आहें." नंतर चंद्रप्रभेनें त्याला एकांतांत बोलावून त्याला आपली जीवनकथा सांगितली.

शशिखंड नांवाच्या एका विद्याधर राजाला चार मुली होत्या. चंद्रप्रभा सर्वांत मोठी मुलगी. चंद्ररेखा, शशिरेखा, शशिप्रभा नांवाच्या तिला तिघी बहिणी होत्या. मुली वयांत आल्यावर चंद्रप्रभेच्या तिघी बहिणी मंदाकिनी नदींत स्नानाला गेल्या. तेथें त्यांनी सौंदर्यगर्वानें थट्टेनेंतर एका मुनींच्या अंगावर पाणी उडविलें. मुनीनें रागाच्या भरांत तिघींना मानवजन्म मिळेल असा शाप दिला.

तें कळल्यावर विद्याधर राजा मुनींकडे गेला व त्यानें मुनींचे पाय धरून मुलींच्या वतीनें क्षमा मागितली व प्रार्थना केली कीं तिघींच्या शापाचा अवधी निरनिराळा असावा व त्यांना पूर्वजन्माची कथा आठवेल असा आशीर्वाद द्यावा. मुनीनें तें मान्य करून तसा आशीर्वाद दिला. तिघींना मानवजन्म मिळाला. त्यानंतर विद्याधर राजानें कनकपुरी चंद्रप्रभेला देऊन स्वतः वानप्रस्थाश्रम ग्रहण केला.

एकदां चंद्रप्रभेला स्वप्नांत अंबिकेचें दर्शन झालें. ती म्हणाली—"तुला पण मानवच पति म्हणून लाभेल." त्या स्वप्नावर विश्वास करून तिनें कोणत्याहि विद्याधराशीं लग्न केलें नाहीं. आजपर्यंत अविवाहित राहाली. नंतर म्हणाली "आतां तुम्ही असे अनपेक्षित आलां आहां. हा दैवयोगच म्हणावयाचा. आपल्याशीं विवाह करण्याची माझी इच्छा आहे. चतुर्दशीच्या दिवशीं सर्व प्रमुख विद्याधर वृषभगिरीवर जमतात व शंकराची आराधना करतात. माझे वडील देखील त्यावेळीं हजर राहतील. मी त्यांना भेटून त्यांची परवानगी घेऊन लगेच परत येतें. तोंपर्यंत तुम्ही येथें रहावें."

ती वृषभगिरीवर निघाली तेव्हां ती शक्तिदेवाला म्हणाली "माझ्याबरोबर माझे सर्व दास दासीगण जात आहेत. तुम्हांला एकट्यानें रहावें लागत आहे. वाटेल तिथें हिंडा व फिरा. महालाच्या सर्वांत वरच्या मजल्यावर मात्र जाऊं नका."

शक्तिदेव बेटावर एकटा होता. काय करावें त्याला कळत नव्हतें. सर्व राजवाडा पाहून झाला. पहायला कांहीं उरलें नाहीं तेव्हां सहज त्याच्या मनांत आलें कीं चंद्रप्रभेनें वरच्या मजल्यावर जाऊं नये असें कां बरें सांगितलें असावें? तो जिना चढूं लागला. अगदीं शेवटच्या मजल्यावर त्याला तीन सभा मंडप दिसले. दार उघडून तो आंत गेला. तेथें एक रत्नखचित पलंग होता. त्यावर एक मानव आकृति पडलेली होती. पायापासून तोंडावर पांघरूण होतें. त्यानें पांघरूण उचलून पाहिलें तर ती कनकरेखाच होती. ती झोंपी गेल्या सारखी पडून होती. परंतु निष्प्राण होती.





“जिच्याशीं लग्न करण्यासाठीं मी इतकी खटपट करून येथवर आलों ती इकडे आली कशी व मृतावस्थेंत पडून कां आहे ?” तो मनांतल्या मनांत विचार करूं लागला.

तो दुसऱ्या व तिसऱ्या सभा मंडपांत गेला. तेथें त्याला आणखी दोन स्त्रिया मृतावस्थेंत तशाच पडून राहिलेल्या दिसल्या. तो चकित होऊन भरभर जिना उतरून खालीं गेला. एक बावडी त्याला दिसली. त्या बावडी जवळ एक घोडा सज्ज उभा होता. घोड्यावर चढून थोडें हिंडावें असें त्याच्या मनांत आलें. तो घोड्याजवळ गेला. परंतु घोड्यानें इतक्या जोरानें लाथ मारली कीं शक्तिदेव बावडींत जाऊन पडला. तो पोहून वर आला तेव्हां त्याला हें पाहून आश्चर्य वाटलें कीं तो वर्धमानपुरच्या उद्यानांतल्या विहिरींतून बाहेर आला आहे.

तरमग विद्याधरपुर कोठें गेलें? वर्धमानपुरला तो कसा काय येऊन पोंचला! विचार करीत शक्तिदेव आपल्या घरीं गेला. त्याचे वडील व इतर घरची मंडळी त्याला भेटली. सर्वांना तो सुखरूप घरीं परत आलेला पाहून फार आनंद झाला.

लगेच राजाची घोषणा त्याच्या कानीं पडली. कोणी ब्राह्मण किंवा क्षत्रियकुमार कनकपुरी पाहून आला असेल तर राजा त्याच्याशीं राजकन्येचें लग्न करून देईल व त्याला आपला युवराज म्हणून जाहीर करील.” तें ऐकून शक्तिदेव ती घोषणा करणाऱ्या अधिकाऱ्यांजवळ जाऊन म्हणाला—“मी कनकपुरी पाहून आलों आहें.” ते त्याला राजाकडे बोलावून घेऊन गेले.

राजा त्याला पाहून म्हणाला—“ओहो! एकदां फसवेगिरी केलीस ती पुरली नाहीं वाटतें?”

“मी खोटें बोललो असेन तर आपण घाल ती शिक्षा भोगायला मी तयार आहें.” शक्तिदेव म्हणाला.

पण राजानें राजकन्येलाच बोलाविलें. तिनें त्याला ओळखलें व म्हणाली—“हा पुन्हां खोटें बोलणार असेल!”

“तें पाठीमागून पाहूं. प्रथम हें सांग कीं कनकपुरीच्या महालांत पलंगावर मृतावस्थेंत पडलेली राजकन्या येथें जिवंत होऊन कशी काय आली?” शक्तिदेवानें विचारलें.

लगेच कनकरेखा म्हणाली—“बाबा! हा कनकपुरीला जाऊन आला आहे. मी शापग्रस्त विद्याधर जातीची आहे व शाप मिळाल्याप्रमाणें आपल्या पोटीं मला जन्म मिळाला. पण ही गोष्ट जेव्हां मनुष्य जातींत कोणाला कळेल त्याच वेळीं मला शापमुक्ति मिळेल असा शाप होता. याचाच विवाह माझ्याशीं व माझ्या तिघां बहिणींशीं होईल.” असें सांगून ती भोवळ आल्या-सारखी पडली आणि तिचें प्राणोत्क्रमण झालें.

राजवाड्यांत सर्वत्र शोककळा पसरली. शक्तिदेवाला वाटलें कीं आपला सर्व प्रयत्न निष्फळ ठरला. पण थोड्या वेळानें कनकरेखेनें मरतांना तिच्या सर्व बहिणी त्याच्याशीं





विवाह करतील हें भविष्य वर्तविलें होतें. म्हणून त्यानें पुन्हां कनकपुरी जाण्याचें मनाशीं ठरविलें. त्या प्रमाणें तो प्रथम विटकपुरीच्या बंदरांत गेला. तेथें त्याला समुद्रगुप्त भेटला. जहाज फुटून गेलें तेव्हां दोघे कसे वांचले त्याचें वर्णन दोघांनीं परस्परांना सांगितलें.

शक्तिदेव त्या दिवशीं समुद्रगुप्ताच्याच घरीं राहाला. दुसऱ्या दिवशीं कांहीं व्यापाऱ्यांसह जहाजांत बसून तो उत्स्थल द्वीपाकडे निघाला. तेथें तो विष्णुदत्त याच्याकडे उतरला. तो व्यापाऱ्यांच्या गल्लींतून जात असतां सत्य-व्रताच्या मुलांशीं त्याची भेट झाली. त्यांनीं त्याला ओळखून विचारलें—"काय हो, एकटेच येतां आहां हें कसें? आमचे वडील कोठें आहेत?"

"तुझे वडील एका भोंवऱ्यांत पडून समुद्रांत बुडाले." शक्तिदेव म्हणाला.

"तुम्ही दोघे एकाच नावेंत गेलां होतां मग तूं एकटाच कसा काय वांचलास? तूंच माझ्या वडिलांना ठार केलें आहेस. उद्यां तुला चंडिकेसमोर बळी देऊं." असें सांगून सत्यव्रताच्या मुलानें त्याला बांधून चंडिकेच्या देवळांत नेलें.

आतां आपलें रक्षण करणारा उरला नाहीं हें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां त्यानें चंडि-केलाच नमस्कार करून स्वतःचें रक्षण करण्याची प्रार्थना केली. नंतर तो झोंपीं गेला.

सकाळीं त्याची झोंप मोडली तेव्हां त्याला सत्यव्रताची मुलगी बिंदुमति समोर दिसली. ती त्याला म्हणाली—"मी तुझें रक्षण करीन. तूं माझ्याशीं गांधर्व विवाह करून घे. माझे भाऊ माझ्यासाठीं अनेक वर पाहून आले. परंतु तुला पाहतांच मी तुला मनानें वरलें आहे."

जेव्हां तिच्या भावाला कळलें कीं ज्याला बळी देण्यासाठीं म्हणून त्यानें रात्रीं बांधून ठेवलें आहे त्याच्याशींच लग्न करण्याचा हट्ट त्याच्या बहिणीनें धरला आहे तेव्हां नाइलाजानें तो तिच्याशीं तिचें लग्न करून देण्यास तयार झाला. दोघांचें लग्न झालें व शक्तिदेव श्वशुर गृहींच राहूं लागला.

एके दिवशीं त्याचा मेहुणा धांवत धांवत आला व त्याला म्हणाला—"अहो एक भयंकर डुकर कित्येकांना ठार करीत इकडे येत आहे." तें ऐकून शक्तिदेव एक मंत्रवलेलें अस्त्र घेऊन त्या डुकराच्या समाचा-रास आला. त्यानें त्या डुकरावर तें अस्त्र फेंकलें. पण डुकर त्याचा नेम चुकवून पळून गेलें आणि एका गुहेंत शिरलें. शक्तिदेव त्या डुकराच्या पाठोपाठ गुहेंत शिरला. कांहीं वेळानें एका उद्यानांत त्याला एक अत्यंत रूपवती स्त्री दिसली.

त्याला पाहतांच ती स्त्री घाबरल्या सारखी पळत पळत त्याच्या जवळ आली.

"कोण तूं? काय झालें घ्यायला तुला?" त्यानें तिला विचारलें.

"मी चंडविक्रम राजाची कन्या आहें. माझें नांव बिंदुरेखा. एक दुष्ट राक्षस मला उचलून येथें घेऊन आला आहे. तो डुकराचें रूप घेऊन बाहेर अरण्यांत आहाराच्या शोधार्थ जातो. आज कोणी तरी त्याच्यावर



अस्त्र प्रहार केला असावा. तो पळून येऊन गुहेंत मेला आहे." ती म्हणाली.

"मीच त्याच्यावर अस्त्र फेंकलें होतें." शक्तिदेव म्हणाला.

"खरेंच! कोण तूं?" तिनें विचारलें.

"मी एक ब्राह्मणकुमार आहें." शक्तिदेव म्हणाला.

"होय का! तर मग तूंच माझा होणारा पति आहेस!" ती म्हणाली.

शक्तिदेव तिला घेऊन आपल्या घरीं गेला व आपली पहिली बायको बिंदुमति हिच्या परवानगीनें त्यानें बिंदुरेखेशीं विवाह करून












घेतला. त्यानंतर विंदुरेखा गरोदर होऊन तिला आठवां महिना लागल्यावर बिंदुमति शक्तिदेवाला म्हणाली–"विंदुरेखेचें पोट चिरून तिच्या पोटांतलें मूल मला आणून दे!"

तें ऐकून शक्तिदेवाला संशय आला कीं तिला सवती मत्सर होत असावा. तो विंदुरेखेकडे गेला. त्यानें बिंदुमतीनें जें सांगितलें होतें तें सर्व खरें खरें सांगून टाकलें. त्यावर विंदुरेखा म्हणाली "त्यांत भिण्याचें किंवा दुःख करण्यासारखें कांहीं नाहीं. तिच्या म्हणण्या प्रमाणें कर."

शक्तिदेवनें त्याप्रमाणें विंदुरेखेचें पोट चिरून मूल बाहेर काढलें. लगेच त्याच्या हातांत एक खड्ग आलें व तो स्वतः एक विद्याधर झाला आणि विंदुरेखा अदृश्य झाली.

बिंदुमती पुढें येऊन म्हणाली–"आम्ही तिघी शापग्रस्त विद्याधर कुमारी आहोत. आमची एक बहीण कनकरेखा हिला तूं वर्धमान येथें पाहिलें आहेसच. ती शापमुक्त होऊन कनकपुरी येथें पोंचली आहे. माझी तिसरी बहीण पण शापमुक्त झाली आहे. मी देखील निकडेच जात आहें. आमची सर्वांत मोठी बहीण चंद्रप्रभा तेथेंच आहे. तूं या तलवारीच्या जोरावर कनकपुरी पर्यंत पोंचलास तर आम्हां चौघींचा विवाह तुझ्याशीं होईल." असें सांगून तीपण अदृश्य झाली.

शक्तिदेव व्योम मार्गें कनकपुरीला गेला. तेथें चौघी बहिणी त्याला बरोबर घेऊन त्यांचे वडील शशिखंड याच्याकडे गेल्या त्यानें आपल्या मुलींचें लग्न त्याच्याशीं करून दिलें. त्याचें नांव शक्तिवेग असें ठेवण्यांत आलें. तो आपल्या चारही राण्यांसह विद्याधर राज्याचा अधिपति म्हणून राज्य करूं लागला.





# उत्तरकांड

दुसऱ्या दिवशीं राम दरबारांत बसला असतां बाहेर दरवाज्यांत एका कुत्र्याचें भुंकणें ऐकूं आलें. त्या कुत्र्याला आपलें कांहीं गाऱ्हाणें रामाकडे पोंचतें करावयाचें आहे, हें कळल्यावर लक्ष्मण त्याला आंत दरबारांत घेऊन आला.

कुत्र्याच्या कपाळाला एक जबर जखम झाली होती. राम म्हणाला "तुला जें कांहीं बोलावयाचें असेल खुशाल सांग!".

"सर्वार्थ सिद्धी नांवाच्या एका भिक्षूनें माझें डोकें फोडलें आहे. मी कोणत्याहि प्रकारें त्याच्या वाटेला गेलो नव्हतो." कुत्रा म्हणाला. रामानें लगेच त्या भिक्षूला बोलावून विचारलें–"तूं या कुत्र्याचें कपाळ कां फोडलेंस?"

"राजन! मी भिक्षेसाठीं दारोदारीं फिरत असतां मला कोठें भिक्षा मिळाली नाहीं. त्यावेळीं हा कुत्रा मला आडवा आला. मी त्याला पुष्कळ सांगितलें कीं मला तें खपायचें नाहीं. पण त्यानें ऐकलें नाहीं. मला राग आला व मी त्याचें कपाळ फोडलें. याचा दंड मला तूं तुला योग्य वाटेल तो दे." सर्वार्थ सिद्धी म्हणाला.

रामानें आपल्या दरबारी लोकांचें मत विचारलें. सभेंत अनेक विद्वान पंडित होते. पण कोणीच उत्तर दिलें नाहीं.



तें पाहून कुत्रा म्हणाला—"रामा! मी सांगेन तो दंड दे! कालंभर नांवाच्या जागीं याला कुलपतीच्या पदावर नेमावें." रामानें त्याप्रमाणें त्याला त्या पदावर नेमलें आणि हत्तीवर बसवून त्याला निरोप दिला. भिक्षूपण मोठ्या आनंदानें निघून गेला.

तो निघून गेल्यावर रामानें व मंत्र्यानें त्या कुत्र्याला विचारलें—"तूं त्या भिक्षूला दंड म्हणून तें काम कां देववलेंस?"

"मी मागच्या जन्मीं तेंच काम केलें होतें. तेव्हां मला जेवायला उत्तम जेवण मिळे व दासदासी सेवेला असत. मी एक दयाळु, विनयशील व सच्चरित्र म्हणून प्रसिद्ध होतों. देव व ब्राह्मण यांची नित्य नियमित-पणें मी सेवा करीत असें. परंतु मी त्या पदावर काम केलें म्हणून मला या जन्मीं कुत्र्याच्या नीच जातींत जन्म घ्यावा लागला. त्या महा कोपिष्ट भिक्षुकाला त्या पदावर काम केल्यावर जन्मजन्मांतर नरकवास करावा लागेल." कुत्रा म्हणाला.

कुत्रा निघून गेल्यावर एक बटवाघूळ आणि गिधाड यांचें आपसांत भांडण झालें व दोघे रामाकडे न्याय निवाडा करून घेण्यास आले. त्यांनीं दोघांनीं एक घर पाहिलें व तें घर आपलें आहे असें सांगून दोघे भांडूं लागले. निवाडा करण्यापूर्वी तें घर पाहाण्यासाठीं राम आपल्या मंत्र्यांसह पुष्पक विमानांत बसून आला.

"तूं हें घर केव्हां बांधलेंस?" रामानें गिधाडाला विचारलें.

"या भूमीवर मनुष्य जन्मास आला तेव्हां मी हें घर बांधलें." असें गिधाड म्हणालें.

लगेच बटवाघूळ म्हणालें—"रामा! या पृथ्वीवर झाडें उगविलीं तेव्हांच मी हें घर बांधलें."

तें ऐकून रामाच्या मंत्र्यांनीं निवाडा दिला—"हें घर बटवाघळाचें आहे. कारण पृथ्वीवर पूर्वी झाडेंच उगविली होतीं." रामानें गिधाडाला दंड देण्याचें ठरविलें.

त्याच वेळीं आकाशवाणी झाली—

"रामा! हें गिधाड स्वतःच शापग्रस्त आहे. तूं दंड देऊन त्याला आणखी त्रास कशाला देत आहेस? हें गिधाड पूर्वजन्मीं ब्रह्मदत्त नांवाचा राजा होतें. याच्या घरीं स्वतः गौतम मुनींचा सत्कार झाला होता. गौतम ब्रह्मदत्ताचें आतिथ्य स्वीकारून जेवण करीत असतां जेवणांत चुकून मांसाचा तुकडा निघाला. तो पाहून गौतम मुनींना राग आला व त्यांनीं शाप दिला कीं तूं गिधाड होशील. गौतम शाप देऊन असें देखील म्हणाले कीं त्रेता युगांत ईक्ष्वाकु वंशांत रामाचा जन्म होईल व त्याच्या हाताचा स्पर्श होतांच तुला शापमुक्ति मिळेल."

तें ऐकून रामानें गिधाडाला स्पर्श केला त्याबरोबर खरोखरच त्या गिधाडाला एका दिव्यपुरुषाचें रूप मिळालें. रामाचे आभार मानून तो निघून गेला.

यमुनेच्या काठीं राहणारे शंभरावर ऋषी व मुनि रामाच्या दर्शनार्थ एकदां आले.



रामानें त्यांनीं भेट म्हणून आणलेलीं कंदमुळें स्वीकारलीं व त्यांना बसायला आसन देऊन येण्याचें कारण विचारलें.

मुनींनीं निवेदन केलें कीं लवणासुर नांवाचा एक राक्षस आम्हांला त्रास देत आहे व रामानें त्याचें पारिपत्य करावें.

हा लवणासुर मधु राक्षसाचा मुलगा होता. मधु राक्षसानें अनेक वर्षें तपश्चर्या करून रुद्राला प्रसन्न करून घेतलें. रुद्रानें आपल्या त्रिशूलांतून आणखी एक त्रिशूल निर्मून तें त्याला दिलें व म्हणाला—"हें तुझ्या हातांत असेपर्यंत तूं अजिंक्य



राहशील.'' तें ऐकून मधु शंकराला म्हणाला कीं हें त्रिशूल नेहमीं माझ्याकुळांत जन्मणाराला लाभावें.

शंकर म्हणाला—'' हें त्रिशूल तुझ्यानंतर तुझ्या मुलाला मिळेल. पण त्यानंतर कोणाला मिळणार नाहीं.'' मधु राक्षसानें, रावणाची कुंभीनस नांवाची बहीण होती. तिच्याशीं लग्न केलें. तिच्या पोटीं लवण जन्मला. तो जन्मला तेव्हां पासूनच पापी निघाला. मधु त्याला सन्मार्गावर आणूं शकला नाहीं. मधूनें वरुण लोकीं प्रस्थान करते वेळीं तें त्रिशूल लवणासुराला दिलें. म्हणून तो जास्तच उर्मट होत गेला आणि ऋषींना व मुनींना त्रास देऊं लागला.

राम मुनींनां म्हणाला—'' मी लवणासुराचा वध करतों. आपण निश्चिंत असावें.'' त्यानंतर रामानें आपल्या तिन्ही बंधूंना विचारलें—'' लवणासुराचा वध तुमच्यापैकीं कोण करणार ?''

भरतानें तें काम आपल्या शिरावर घेतलें. पण शत्रुघ्न म्हणाला—'' नाहीं मी तें काम करणार ! '' कारण तो म्हणाला कीं मी जिवंत असेपर्यंत भरतानें कोणतीहि जोखिम स्वतःवर घेतां कामा नये. कारण नंदिग्रामी निवास करीत असतां त्यानें पुष्कळ कष्ट सहन केले होते.

रामानें तें कबूल केलें. लवणासुराच्या वधानंतर त्याची गादी रिकामी पडतां कामा नये म्हणून रामानें शत्रुघ्नाला राजा मधुपुराचा नेमलें. शत्रुघ्नाचा राज्याभिषेक संपतांच रामानें त्याच्या हातांत एक बाण दिला व म्हणाला—'' या बाणानें मधु कैटभाचा वध झाला आहे. रावणाला देखील मी हा बाण मारला नव्हता. लवणासुराचा वध करण्यास तूं याचा उपयोग कर. आणखी एक गोष्ट मी सांगून ठेवतों. लवणासुराजवळ शंकराच्या



त्रिशूलासारखें एक त्रिशूल आहे. त्याच्या हातांत तें त्रिशूल असेपर्यंत त्याचा पराभव करणें अशक्य. लवण आपलें त्रिशूल नेहमीं घरांतच ठेवतो. म्हणून तो नगराबाहेर गेला असेल त्यावेळीं तूं नगराला वेढा दे. तो परत येईल तेव्हां नगराच्या द्वारावरच त्याचें पारिपत्य कर. कोणत्याहि परिस्थितींत त्याला नगरांत प्रवेश मिळतां कामा नये व त्रिशूल त्याच्या हातीं पडतां कामा नये.''

एवढेंच नव्हें, रामानें शत्रुघ्नाला असा सल्ला दिला कीं प्रथम सैन्य पाठवावें व नंतर स्वतः जावें. लवणाला हें कळतां कामा नये कीं कोणी त्याचा वध करण्यासाठीं येत आहे. ग्रीष्म ऋतूंत गंगेपार सैन्य घेऊन जाऊन पडाव टाकावा. शत्रुघ्नानें पावसाळ्याच्या सुरवातीला धनुष्यबाण घेऊन जाऊन लवणासुराचा वध करावा.

त्याप्रमाणें शत्रुघ्नानें प्रथम आपलें सैन्य पाठविलें व एका महिन्यानंतर तो स्वतः निघाला. वाटेंत दोन दिवस तो वाल्मीकि मुनींच्या आश्रमांत उतरला. वाल्मीकि मुनींनीं त्याचा सर्वप्रकारें आतिथ्यसत्कार केला. नंतर ते म्हणाले—'' हा आश्रम पूर्वी



रघुवंशीयांचाच होता.'' त्यांनीं ती कथा अशी सांगितली.

रघुवंशांत सुदासु नांवाचा एक राजा होता. त्याला वीरसह नांवाचा मुलगा होता. लहानपणीच तो शिकारीला गेला असतां त्याला दोन राक्षस दिसले. ते व्याघ्ररूप घेऊन रानांत हिंडत आणि रानटी श्वापदांचा शिकार करून खात.

त्यांनीं सर्व रान पादाक्रांत केलें व रानांत एक देखील प्राणी उरला नाहीं. तें पाहून राजपुत्र वीरसह याला राग आला. त्यानें त्या दोघांपैकीं एका राक्षसाचा वध



केला. तेव्हां दुसरा त्याला म्हणाला—"पापी! तूं माझ्या एका साथीदाराचा वध केला आहेस! पहा, मी तुला यमलोकीं पाठवितों."

कांहीं काळ लोटला. त्या राजानें याच आश्रमांत एक अश्वमेध यज्ञ केला. वशिष्ठ मुनींनीं तो यज्ञ त्याच्याकडून करविला होता. यज्ञ पुरा होण्यापूर्वी तो राक्षस वशिष्ठ मुनींचें रूप घेऊन यज्ञ मंडपांत सूड घेण्यासाठीं म्हणून आला व म्हणाला—"राजन! यज्ञ पुरा झाला आहे, तेव्हां मला उत्तम मांस भोजन वाढावें."

राजानें संतुष्ट होऊन आपल्या सैंपाक्याला बोलाविलें व म्हणाला—"गुरुवर्यांसाठीं या यज्ञांतलें मांस शिजवून आणावें." राक्षसानें त्या सैंपाक्याचें रूप धारण केलें व नरमांस शिजवून व तें राजाला दाखवून म्हणाला—"पहा! यज्ञांतलें मांस किती उत्तम शिजवून आणलें आहे!" राजानें तें नरमांस मंत्र्या करवीं वशिष्ठ मुनींना वाढवलें. वशिष्ठ मुनींना नरमांस वाढल्याचें तावडतोब कळलें व ते रागानें म्हणाले—"तूं नरभक्षक होशील!" त्यांनीं राजाला तो शाप दिला. राजाला पण राग आला. त्यानें देखील वशिष्ठ मुनींना शाप देण्यासाठीं हातांत पाणी घेतलें. परंतु शापवाणी त्याच्या तोंडांतून निघण्यापूर्वी मंत्री म्हणाला—"महाराज गुरु हा देवतुल्य असतो. त्याला शाप देणें बरोबर होणार नाहीं." तेव्हां राजानें हातांत घेतलेलें उदक आपल्याच पायावर सोडलें. त्यामुळें राजाचे पाय कल्मषपूर्ण झाले. तेव्हां पासून त्याचें नांव कल्मषपाद असें पडलें.

त्यानंतर वशिष्ठ ऋषींना खरी गोष्ट कळली. त्यांनीं शापाचा अवधी फक्त बारा वर्षें ठेवला. त्यानंतर राजा बारा वर्षें नरभक्षण करून निर्वाह करूं लागला.



शापाचा अवधी संपल्यावर तो पुन्हां पूर्ववत राज्य करूं लागला.

ती कथा ऐकून शत्रुघ्न त्याच्यासाठीं वाल्मीकि मुनींनीं जें कुटीर ठरविलें होतें त्यांत राहण्यासाठीं निघाला. त्याचवेळीं दुसऱ्या एका कुटीरांत सीतेच्या पोटीं दोन जुळीं मुलें जन्मलीं. मुनिकुमारांकडून ती गोष्ट वाल्मीकि ऋषींना कळली तेव्हां ते तिकडे गेले. चंद्रासारखें त्यांचें सुंदर वदन पाहून वाल्मीकि ऋषींनीं एकाचें नांव लव व एकाचें कुश ठेवलें. हें सर्व मध्य रात्रीच्या सुमारास झालें. शत्रुघ्न सीतेजवळ जाऊन म्हणाला "माते! माझें हें केवढें भाग्य!" त्याला फार आनंद झाला.

दुसऱ्या दिवशीं त्यानें वाल्मीकि ऋषींचा निरोप घेतला व पश्चिमेकडे निघाला. सात दिवसांनीं तो यमुनेच्या तीरावर पोचला. मुनींच्या आश्रमांत रात्र काढली.

दुसऱ्यादिवशीं उजाडल्याबरोबर शत्रुघ्न च्यवन ऋषींकडे गेला व त्यानें लवणासुर व त्याच्या त्रिशूलाविषयीं विचारलें. च्यवन ऋषी म्हणाले—"त्यानें त्रिशूलाच्या सहाय्यानें अनेक अत्याचार केले आहेत." मांधाताची कथा त्यांनीं शत्रुघ्नाला सांगितली.



अयोध्येचा राजा युवनाश्व याला मांधाता नांवाचा एक मुलगा होता. मांधाता एक महाबलिष्ठ राजा होता. त्यानें सर्व पृथ्वी-वरच्या क्षत्रिय राजांना जिंकलें व स्वर्गावर स्वारी करण्याचें ठरविलें. ती गोष्ट इंद्राला कळली. इंद्रासनाची व देवांना आपला दास करून घेण्याची महत्त्वाकांक्षा ठेवणाऱ्या मांधाताला इंद्र म्हणाला "प्रथम तूं सर्व भूलोक जिंकून घे. नंतर मी तुला स्वतःच स्वर्गलोकाचा अधिकार देईन!"

"म्हणजे! मी तर भूलोक जिंकलाच आहे! भूलोकीं माझी बरोबरी करूं शकेल असा एकहि राजा उरला नाहीं." मांधाता म्हणाला.

"मधुवनांत लवणासुर नांवाचा राक्षस राहातो. त्यानें तुझें प्रभुत्व मान्य केलें का?" इंद्रानें विचारलें.

मांधाता तें ऐकून लज्जित झाला. तो पुन्हां भूलोकीं आला. तो लवणासुराचें पारिपत्य करण्यासाठीं सैन्य घेऊन निघाला. आपला दूत पाठवून त्यानें लवणासुराला आपलें प्रभुत्व मान्य करण्यास सांगितलें. पण लवणासुरानें त्या दूताला खाऊन टाकलें.

बराच काळ लोटला तरी दूत परत न आलेला पाहून मांधातानें लवणासुराशीं युद्ध करण्याचें ठरविलें. लवण त्याच्याकडे पाहून हंसला. त्यानें मांधातावर त्रिशूल फेंकलें त्याबरोबर तो व त्याचें सर्व सैन्य भस्म झालें.

च्यवन ऋषींनीं लवणासुराची ही कथा सांगितली व म्हणाले—"त्याच्या हातांत त्रिशूल नसेल अशा वेळींच त्याचा वध केला पाहिजेस."

रात्रभर दोघे बोलत राहाले.





# रतिदेवीची गोष्ट

पूर्वी सूर्याचा आकार आतां पेक्षां फार मोठा होता. सूर्यकिरणें पण फार कडक होतीं. सर्व लोक त्याच्या तापानें भस्म होऊन जात. सूर्यकिरणांचा ताप कमी करण्याचें काम ब्रह्मदेवानें विश्वकर्म्याकडे दिलें. विश्वकर्म्यानें सूर्याला चारी बाजूंनीं तासून काढून त्याचा आकार लहान केला. सूर्यमंडळ तासून काढतांना जे अग्निकण पडले, विश्वकर्म्यानें त्यांचें सुदर्शन चक्र घडवलें व तें विष्णूला दिलें.

विष्णूला विश्वकला नांवाची एक मानस पुत्री होती. विष्णूच्या नाभिकमळांतून ब्रह्मदेव जन्मला तेव्हां विष्णूच्या मानस कमळांतून विश्वकलेचा जन्म झाला. ती सर्व कलांची अधिष्ठात्री देवी झाली. विष्णूनें विश्वकर्मा हा तिला युक्त वर होईल हें पाहून तिचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. विश्वकर्मा व विश्वकला यांचा संसार सुखानें चालू झाला.

नंतर शंकरानें व इंद्रानें त्यांच्यासाठीं एक एक आयुध घडवून देण्यास विश्वकर्म्यास सांगितलें. सूर्याला तासून काढलें त्या वेळचा चुरा अजून तसाच पडून होता. विश्वकर्म्यानें त्या चुऱ्याचें त्रिशूल तयार करून शंकराला दिलें व इंद्रासाठीं वज्रायुध करून देण्यास सुरवात केली.

पतीला नेहमीं आयुधें व शस्त्रनिर्माण करण्यांत लागलेला पाहून विश्वकलेला त्या कामाचा तिटकारा व पतीचा राग आला. शिवाय तिच्या वडिलांना दिलेल्या दिव्य शस्त्रासारखीं शस्त्रें घडवून देण्याचें काम तिच्या पतीनें कां स्वीकारावें हें देखील तिला कळेना.

म्हणून एकदां रागारागांत ती आपल्या माहेरी म्हणजे वैकुंठलोकांत गेली आणि आपल्या वडिलांकडे पतीविरुद्ध गाऱ्हाणें सांगितलें. तिचें म्हणणें ऐकून विष्णूनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त स्मित केलें.

विश्वकला निघून गेल्यावर विश्वकर्मा पत्नी विरहानें दुःखी झाला. त्यानें आपली सर्व खर्ची घालून विश्वकलेची एक प्रतिमा घडविली व तिच्या संगतींत आनंदानें राहूं लागला.

एकदां ब्रह्मदेव विश्वकर्म्याकडे कोणत्या तरी कामासाठीं म्हणून गेला. विश्वकर्म्याला विश्वकलेच्या मूर्तीसमोर गुडघे टेंकून बसलेला पाहून नंतर तिच्या प्रतिमेचेंच आलिंगन करतांना पाहून ब्रह्मदेवाला भयंकर राग आला. तो एकदम उठला. तेव्हां त्याच्या कमंडलांतलें पाणी उडालें आणि तें त्या प्रतिमेवर पडलें. लगेच त्या प्रतिमेंत प्राण प्रतिष्ठा झाली.

विश्वकर्म्यानें डोळे उघडून पाहिलें तर जिवंत विश्वकलाच समोर उभी. त्याला वाटलें कीं विश्वकला माहेरहून परत आली असावी. तो आपल्या प्रेमिकेच्या मूर्तीला प्रेमालिंगन करून तन्मय होऊन डोळे मिटून बसला असतां ब्रह्मदेव येऊन गेला होता. आपण प्रतिमा घडविली होती, ही गोष्ट देखील तो विसरून गेला.

इकडे विश्वकर्म्याचें त्याच्या जिवंत झालेल्या पत्नीवरचें प्रेम दिवसेंदिवस वाढत गेलें, इतकें कीं ती गरोदर राहाली. हळूहळू तिचा प्रसवकाल जवळ येऊं लागला.

कलहप्रिय नारदाला चांगली संधी मिळाली. तो विष्णूकडे गेला व इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर म्हणाला—"आपल्या जांवई यापुंना लवकरच पितृपद मिळणार आहे म्हणे. आतां आपण सकुटुंब सपरिवार जाऊन आपल्या नातवाचे सोहळे केले पाहिजेत."

विश्वकला चकित होऊन पुढें येऊन बसली. तिची व त्याची ओळखच नाहीं असें नारदानें दाखविलें.

म्हणून विश्वकला आपले वडील विष्णू यांच्याकडे पाहूं लागली, जणुंकांहीं विचारीत होती कीं या मुनीचें म्हणणें तरी काय?

विष्णूनें पण दोघांकडे अशातऱ्हेनें पाहिलें कीं जणुंकांहीं तो म्हणत होता—"मला काय त्याच्याशीं करावयाचें आहे?"














नारदानें जें सांगितलें तें ऐकून विश्वकला फणकाऱ्यानें आपल्या पतिगृहीं गेली. ती पोंचली तेव्हां जिवंत प्रतिमा घरासमोरच्या फुलझाडांना पाणी घालीत होती.

"कोण ग तूं? माझ्यासारखीच दिसतेस कीं!" विश्वकला जोरानें ओरडून म्हणाली. तिचा आवाज ओळखून विश्वकर्मा धांवत आला. दोघींना पाहून तो चकित झाला. तो म्हणाला—"खरी विश्वकला राहील व नकली प्रतिमा होऊन जाईल." लगेच जिवंत प्रतिमा दगडाची प्रतिमा होऊन गेली.

तरी विश्वकलेचा राग उतरला नाहीं. ती आंत गेली व एक मोठा हतोडा घेऊन आली. एकामागून एक अनेक वार त्या प्रतिमेवर आघात केल्यावर ती प्रतिमा तुटून गेली आणि प्रतिमेंतून एक रत्नासारखी सुंदर मुलगी रडत बाहेर आली.

लगेच विश्वकलेचा पारा उतरला. तिच्या हृदयांत मातृप्रेम जागलें. तिनें त्या तान्ह्या मुलीला उचलून पोटाशीं धरलें. दोघे मुलीला घेऊन आनंदानें तिचें कोडकौतुक करीत असतां लक्ष्मीनारायण तेथें आपला मुलगा कामदेव याला घेऊन आले. लक्ष्मीनें त्या मुलीला पाहिलें तेव्हां तिला फार आनंद झाला व म्हणाली कीं मी या मुलीचें लग्न आपल्या मुलाशीं करून देईन. विष्णूनें त्या मुलीचें नांव 'रति' असें ठेवलें.

रति मोठी झाली तेव्हां तिच्या इतकी सुंदर मुलगी त्रिलोकांत दुसरी नव्हती. रति व कामदेव यांचें लग्न झाल्यावर त्यांनीं शृंगारसाम्राज्य स्थापन केलें आणि विश्वभरांतल्या देव मानव व राक्षस यांच्या हृदयांत संचार केला.





# ५४. काल्सबाडच्या गुहा

मेक्सिको देशांतील जगाला चकित करून सोडणाऱ्या या गुहांचा शोध सन् १९२४ या वर्षी लागला.

चित्रांतील गुहेची उंची ३०० फूट व लांबी सुमारें ६२५ फुट आहे. ही गुहा ४,००० फुट खोल आहे. यांत खांबासारखे उभे दिसतात ते कित्येक वर्षं जुने चुन्याचे दगड होत.





# भारताचा इतिहास



शिवाजीच्या मागून त्याचा मोठा मुलगा संभाजी गादीवर बसला. तो स्वभावानें थोडा विलासी होता, पण शूर होता. कुवलया नांवाचा एक उत्तरेकडील ब्राम्हण त्याचा सल्लागार होता. संभाजीच्या अमला-खालीं महाराष्ट्राचें राज्य थोडें कमकुवत झालें असलें तरी विस्कळित झालें नाहीं. संभाजीला मोंगलांचा दांत महाराष्ट्रावर आहे याची पूर्ण कल्पना होती.

दक्षिणेकडे औरंगजेब जें सैन्य घेऊन आला होता त्याला संभाजीनें छान तोंड दिलें. परंतु ११ फेब्रुवारी १६८७ मध्यें रत्नागिरी पासून २२ मैल दूर असलेल्या संगमेश्वर नजीक तो मुकर्रबखान याच्या हातीं कैद झाला. त्याच्या बरोबर कुवलया व संभाजीचे पंचवीस मुख्य साथी पण कैद झाले. त्यानंतर मोगलांनीं भराभर मराठ्यांचे अनेक किल्ले सर केले. मराठ्यांची राजधानी रायगडचा किल्ला तो देखील जिंकला.

परंतु संभाजीचा धाकटा भाऊ राजाराम संन्याश्याचा वेष करून मोंगलाच्या हातावर तुरी देऊन रायगडच्या किल्यांतून पळून गेला आणि त्यानें दूर दक्षिणेकडे जिंजी येथें आपली राजधानी स्थापन करून मोंगलांशीं युद्ध चालू ठेवलें.

मोंगलांनीं मराठ्यांची राजधानी जिंकल्या-वर संभाजीचें कुटुंब व त्याचा मुलगा शाहू याला कैद केलें. दुरून पाहणाराला वाटे कीं मराठ्यांचें राज्य लयास गेलें.

परंतु शिवाजीनें मराठा राज्याचा पाया इतका कमकुवत घातलेला नव्हता. मराठे मोंगलासमोर मान तुकवायला तयार झाले नाहींत. त्यांनीं युद्ध चालू ठेवलें. या युद्धांत शेवटीं मोंगलांची शक्ति मोडकळीस येऊन मराठ्यांचाच जय झाला. या युद्धांत मराठ्यांचे पुढारी पण रामचंद्र पंत, परशुराम त्रिंबक वगैरेंनीं केलें.

तें जनतेचें आपल्या स्वातंत्र्य रक्षणासाठीं एक युद्ध होतें. औरंगजेबाचा त्यासमोर किती दिवस निभाव लागणार? मराठा राज्य किंवा मराठा सैन्य यांचा नाश करणें शक्य झालें असतें. पण दोन्ही येथें नव्हतीं. होती फक्त जनता.



जनतेचें नेतृत्व धनाजी जाधव आणि संताजी घोरपडे या शूर व कुशल मराठा पुढाऱ्यांकडे होतें. त्यांनीं मोंगल सैन्यावर व त्यांच्या छावणीवर छापे मारून लूटपाट करून व एकदां औरंगजेबाच्या खास तंबूवर छापा मारून मोगलांना इतके बेजार केलें कीं, त्यांना मुठींत जीव घेऊन पळून जाण्या-शिवाय दुसरा मार्ग उरला नाहीं.

कित्येक मोंगल सरदारांनीं व राज्य-कर्त्यांनीं मराठ्यांना 'चौथ' देऊन स्वतःचें रक्षण करून घेतलें कित्येकांनीं मराठ्यांच्या बाजूनें बादशाहाविरुद्ध छापे मारले. दख्खनचें आकाश संताजी व धनाजी या दोन नांवांची जणूं कांहीं घोषणा करीत होतें. जुल्फिकार-खान यानें लागोपाठ आठ वर्षें जिंजीच्या किल्ल्याला वेढा दिला होता. शेवटीं १६९८ मध्यें तो जिंकला. परंतु राजाराम त्यापूर्वींच सातारा येथें पोंचला होता. त्यानें मराठ्यांचें एक सैन्य उभें केलें आणि दख्खनच्या पठारांतील उत्तरेकडच्या प्रदेशांत औरंग-जेबाच्या सैन्याची वाताहत सुरू केली.

१६९९ च्या डिसेंबर महिन्यांत मोंग-लांनीं साताऱ्याच्या किल्ल्याला वेढा दिला. १२ मार्च १७०० या रोजीं राजाराम मरण पावला. तोपर्यंत मराठ्यांनीं मोगलांशीं युद्ध चालू ठेवलें होतें. त्यांनीं कांहीं अटींवर मोंगलांना तो किल्ला देण्याचें कबूल केलें












त्यानंतर बादशहानें स्वतः मराठ्यांचा किल्ले एकेक करून जिंकायला सुरवात केली. पण त्याचा सर्व यत्न वृथा गेला. कारण इकडून तो किल्ला जिंकून गेला कीं तिकडून मराठे येऊन किल्ला काबीज करीत. अशातऱ्हेनें युद्ध चालूच राहालें.

राजारामाच्या मृत्यूनंतर त्याची बायको ताराबाई हिनें मराठ्यांच्या राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. तिनें आपला मुलगा शिवाजी (तृतीय) याला गादीवर बसवून त्याच्या नांवानें असाधारण बुद्धिमत्ता दाखवून राज्य केलें. राजाराम जिवंत होता तेव्हां पासूनच तिनें राज्यव्यवस्था हातीं घेऊन आपल्या कौशल्याबद्दल कीर्ति संपादन केली होती. तिनें मोंगलांच्या राज्यांतील सिरंज, मंदसोर वगैरे सहा प्रांतांवर लूटपाट करण्यासाठीं स्वाऱ्या करविल्या. मराठ्यांनीं १७०३ मध्यें वऱ्हाड प्रांतावर आणि १७०६ मध्यें गुजराथवर स्वाऱ्या करून बडोदा शहर लुटलें. १७०६ च्या एप्रिल व मे महिन्यांत मराठ्यांच्या एका मोठ्या फौजेनें अहमदनगर येथील बादशहाच्या खास छावणीवर हल्ला चढविला. त्यांना तोंड देणें मोंगलांना अशक्य झालें.

या अवधींत मराठ्यांनीं आपल्या सैन्याची संघटणा जास्त बळकट केली आणि दख्खन व मध्यभारत मधील कांहीं भाग काबीज केला. मोंगलसेनापतींना मराठ्यांची दहशत बसली. युद्धकलेंतदेखील त्यांनीं अधिकाधिक प्राविण्य संपादन केलें. आतां त्यांना मोगलांची भीति म्हणून उरली नाहीं. जय त्यांना अवश्य मिळणारच या आत्म विश्वासानें ते चढाई करीत. त्यांचा बिमोड करण्यासाठीं औरंगजेबानें जितके प्रयत्न केले ते सर्व फोल ठरले.



# नेहरू चरित्र



[ २४ ]

या परिस्थितींत स्वराज्य पार्टीची सर्व जबाबदारी एकट्या मोतीलालजींवर येऊन पडली. निवडणुकींत प्रतिपक्षीयांशीं त्यांची चांगलीच खडाजंगी उडाली. नॅशनॅलिस्ट पक्षाला उल्लेख करण्यायोग्य यश या निवडणुकींत मिळालें. विधान सभेंत उजव्या-गटाची शक्ति वाढली. त्यांत मोठमोठे जमीनदार, श्रीमंत, कारखान्यांचे मालक सामील झाले. त्यांचा राजकारणाशीं वस्तुतः कांहीं एक संबंध नव्हता.

१९२६ च्या शेवटीं स्वामी श्रद्धानंद यांचा एका धर्मांध मुसलमानाच्या हातीं खून झाला. ज्या शूर पुढाऱ्यानें इंग्रजांच्या बंदुकीसमोर निधड्या छातीनें उभें राहून इंग्रजांचें आव्हान स्वीकारलें होतें तो एका खुनी माणसाच्या सुऱ्यानें मारला जावा हा एक दैव दुर्विलासच म्हणावयाचा. आठ वर्षांपूर्वीं दिल्लीच्या जुम्मा मशीदींत हिंदू व मुसलमानांच्या एका संमिलित सभेंत ते बोलले तेव्हां हिंदू मुसलमानांच्या ऐक्याच्या आवाजानें सर्व हिंदुस्तान दुमदुमला होता. अशा महापुरुषाचा शेवट त्याच्याच एका देशबांधवाच्या हातून व्हावा या गोष्टीबद्दल जवाहरलालजींना फार वाईट वाटलें.

१९२७ च्या फेब्रुवारी महिन्यांत ब्रुसेल्स नगरीं गरीब प्रजेचें एक जागतिक सम्मेलन झालें. कोमिंटांगमधील डाव्या गटाच्या लोकांनीं, इतर देशांतील लोकांनीं व अमेरिकेकडून पिडलेल्या दक्षिण अमेरिकेंतील डाव्या गटाच्या मजुरांनीं मिळून हें संमेलन भरविलें होतें. युद्धानंतर जर्मनराष्ट्रांतील साम्राज्यवादाचा शेवट झाला असल्या

       



आणखी एक कारण होतें. त्यांनी तसें केलें नसतें तर कांग्रेसची स्थिति जास्त बिघडण्याची शक्यता होती.

१९२८ मध्यें जवाहरलालजींच्या मतें हिंदुस्तानांत पुष्कळ चैतन्य होतें. मजूर, शेतकरी व पांढरपेशे वर्गांतले लोक सर्वांत चैतन्य दिसून येत होतें. रेलवेच्या मजुरांनीं संप करून आपल्या चैतन्याचा परिचय दिला होता. शेतकरी वर्गांतपण जागरण होतें. बारडोलींत वल्लभभाई पटेल यांच्या नेतृत्वाखालीं शेतकऱ्यांनीं जो सत्याग्रह केला होता त्यांत चांगलें यश मिळालेंच होतें, त्याचबरोबर देशांतल्या शेतकरी वर्गासमोर तें एक उदाहरण पण होतें. देशांत यूथ लीग युवकसंघ, नौजवानसभा वगैरेंची स्थापना होऊं लागली होती. कांहींचा संबंध धार्मिक होता तर कांहींचा उद्देश्य क्रांति होता.

सायमन कमीशनचा बहिष्कार सर्वांत जास्त महत्वाचा होता. या बहिष्कारांत मवाळ पक्षानें पण कांग्रेसशीं सहकार केला होता आणि त्यामुळें यश पण मिळालें. सायमन कमीशन जेथेंजेथें गेलें "सायमन गो बॅक" या घोषणांनीं त्यांचें 'स्वागत' करण्यांत आलें. असंख्य भारतीयांना सायमनच्या नांवाबरोबर इंग्रजीचे दोन शब्द कळूं लागले.

याविषयीं जवाहरलालजींनीं आपल्या आत्मचरित्रांत दोन घटनांचा उल्लेख केला आहे. सायमन कमीशनचे सभासद नव्या दिल्लीच्या वेस्टर्न हॉटेलांत उतरले होते. रात्रीं अंधारांत त्यांना "सायमन गो बॅक"चा घोष ऐकूं आला. रात्रीच्या वेळींच तो घोष ऐकून त्यांना राग आला. चवकशी करतां कळलें कीं ती कोल्हेकुई होती.






# पाताळ कोट

[२]

[कुंतल देशाच्या मंत्र्याचा मुलगा शशिकांत आपल्या दोघां मित्रांसह शिकारीस गेला असतां शत्रूचा बाण लागल्यानें जखमी होऊन शत्रूच्या हातीं कैद झाला. त्याचा मित्र भद्र बेशुद्ध स्थितींतच राजधानींत परत आला. रानांत काय घडलें असावें याविषयीं राजा व मंत्री विचार विनिमय करीत असतां कदंब देशाच्या राजाचे दूत आल्याचें कळलें. पुढें—]

कदंबच्या राजाचे चार दूत दोघां कैद्यांना बरोबर घेऊन दरबारांत आले. शतभानु सिंहासनावर बसलेला होता. मंत्र्यानें गंभीरपणें दूतांकडे व त्यानंतर कैद्यांकडे एकदां पाहिलें आणि कैद्यांचीं बंधनें सोडून त्यांना मोकळें करावें अशी आज्ञा केली. त्याच वेळीं उग्रसेनाचा एक दूत पुढें होऊन नमस्कार करून म्हणाला—"महाराज! हे दोघे कैदी दुष्ट व क्रूर आहेत." असें म्हणत तो एका कैद्याजवळ गेला व त्याला काठीनें टोंचीत म्हणाला—"याचें नांव धूमक! यानें पितृहत्या केली आहे व हा आहे सोमक यानें भ्रातृहत्या केली आहे."

"पण या खुनी कैद्यांना आमच्याकडे तुमच्या महाराजांनीं कां पाठविलें आहे हें नाहीं समजलें आम्हांला?" मंत्र्यानें विचारलें.



त्यावर तिघे दूत समोर येऊन एकदम बोलण्याचा यत्न करूं लागले. परंतु पहिल्या दूतानें त्यांना न बोलण्यास इंगित केलें.

पहिल्या दूतानें दोघां कैद्यांकडे एकदां क्रुद्ध मुद्रेनें पहिलें व राजाला ऐकूं जाईल अशातऱ्हेनें मंत्र्याला म्हणाला—"महाराज आणि महाअमात्य दोघांना एक शोक-समाचार कळविण्यासाठीं आमच्या महा-राजांनीं आम्हांला पाठविलें आहे. कुंतल देशाच्या महामात्यांचे चिरंजीव व त्यांचे एक साथीदार दोघांना या दोघां दुष्ट कैद्यांनीं कांहींतरी कारणावरून ठार केलें आहे. तिघांना ठार करून त्यांचे दागिने व घोडे पळवून नेण्याच्या प्रयत्नांत असतां एक सिंह त्या बाजूला आला. हे दुष्ट खुनी सिंहाला पाहून पळाले. परंतु आमच्या शिपायांनीं यांना धरलें. महामात्यांच्या चिरंजीवांच्या व त्यांच्या दोघा साथी-मित्रांच्या प्रेतांचा शोध लावण्याचा आम्ही पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. अद्याप शोध लागला नाहीं. लागतांच अपणांकडे त्याविषयीं बातमी येईल."

"दूतांचें बोलणें महाराज व मंत्री मौनपणें ऐकत होते. दूत महाराज कांहीं विचारतील या अपेक्षेनें महाराजांकडे पहात होते. इतक्यांत महाराजांनीं हा सर्व निरोप तुमच्या तोंडींच कळविण्यासाठीं तुम्हांला पाठविलें आहे, का कांहीं लिहून कळविलें आहे?" मंत्र्यानें विचारलें.

"महाराजांनीं हा समाचार कळविण्या-साठीं हातांत लेखणी घेतली, परंतु त्यांचा हात थर थर कांपूं लागल्यामुळें त्यांनीं पत्र लिहिलें नाहीं आणि तोंडीच हा निरोप पाठविला आहे." दूत म्हणाला.

मंत्र्यानें तें उत्तर ऐकून मार्मिकपणें महाराजांकडे एकदां पाहिलें. शतभानु राजा इतका वेळ दूत काय बोलत आहे हें शांतपणें ऐकत होता. परंतु दूताच्या तोंडीं वरील वाक्यें ऐकून उठला व म्हणाला—"ठीक! आतां तुम्ही सर्व गेलांत तरी चालेल. या खुनी गुन्हेगारांची चवकशी करून त्यांना योग्य ती शिक्षा देण्याची व्यवस्था करतां."

तें ऐकून उग्रसेनाचे दूत काळजींत पडल्यासारखे दिसले. त्यांनीं अपेक्षिल्या-प्रमाणें घडत नाहीं, त्यांचा बेत फिसकरला, असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. म्हणून या खेपेस तो पहिला दूत बोलला नाहीं. दुसरा दूत पुढें होऊन म्हणाला—"महाराज! क्षमा करावी. पितृहत्या व भ्रातृहत्या करणाऱ्या या दोघां गुन्हेगारांस या पूर्वींच जन्मठेप शिक्षा देण्यांत आली आहे. यांनीं तुरुंगांतून पळून जाऊन हा आणखी एक गुन्हा केला आहे. आमच्या महाराजांची अशी आज्ञा आहे कीं या दोघां गुन्हेगारांना कदंब व कुंतल देशाच्या सरहद्दीवर झाडाला टांगून फांशीची शिक्षा देण्यांत यावी. परत जातांना त्यांना ही शिक्षा द्यावी अशी आमच्या महाराजांची आज्ञा आहे. त्याप्रमाणें आम्ही करूं. आतां महा-राजांचा आम्ही निरोप घेऊं इच्छितों."



उग्रसेनाचे चारहि दूत कैद्यांजवळ गेले व त्यांना दोन छड्या लगावून "चला!" म्हणाले. कैद्यांपैकीं धूमक डोळे वटारून म्हणाला—"दुष्ट! क्रूर!" सोमक कांहीं एक बोलला नाहीं. त्याच्या तोंडावर लागस्याचा किंवा राग आल्याचा लवलेशहि नव्हता.

दूतांपैकीं एकानें कैद्यांजवळ येऊन हळूंच दटावून म्हटलें—"खबरदार! आपल्या बायका पोरांना विसरूं नका!"

दूत सैनिकांबरोबर दरबारांतून बाहेर आले. राजा शतभानु ते ज्या दारांतून











बाहेर गेले होते त्या बाजूला लक्षपूर्वक पहात होता. म्हणाला—"मंत्री! तुम्हांला काय वाटतें, खुनी स्वतः उग्रसेन आहे यांत आतां शंका उरली आहे का? हें सर्व नाटक आहे."

"महाराज! या नाटकामागें मला वाटतें कीं फार मोठें गुपित दडलेलें आहे. एवढेंच नव्हें तर शशिकांत अजून जिवंत आहे याबद्दलपण माझी खात्री आहे." मंत्री गंगाधर म्हणाले.

"शशिकांत सुखरूप घरीं यावा असें मला पण वाटत आहे. आणखी भद्र जिवंत आपल्या राज्यांत परत आल्याची गोष्ट देखील कदाचित उग्रसेनाला माहीत नसेल. या दूतांच्या बोलण्यावरून तिघे ठार झाले असावेत असा त्यांचा समज आहे." शतभानु म्हणाला.

"दूतांना आपल्याकडे येण्यापूर्वी तसेंच वाटत होतें. पण आतां त्यांना नागरिकांच्या तोंडीं भद्र जिवंत परत आल्याचें कळेल. म्हणून खरी गोष्ट लपविली पाहिजे. पाठींतून बाण काढून घेतल्यावर तो मेल्याचें मी जाहीर करीन." गंगाधर मंत्री म्हणाला.

"तसें करण्याचें कारण?" शतभानूनें विचारलें.

"ही बातमी त्याच्या दूतांच्या द्वारें किंवा आणखी कोणत्या तरी रीतीनें उग्रसेनाला कळेल. रानांत काय घडलें हें आम्हांला कळणें शक्य नाहीं हें समजून तो निश्चिंत होईल. ही गोष्ट आपल्या फायद्याची आहे. ज्या कैद्यांना खुनी म्हणून सांगण्यांत आलें आहे त्यांच्याविषयीं मी सर्व चवकशी करवितों. आपण विश्रांती घ्यावी." असें सांगून व महाराजांना नमस्कार करून गंगाधर मंत्री दरबारांतून बाहेर आला. तेथें पाहाऱ्यावर उभे असलेल्या एका सैनिकाला बोलावून तो म्हणाला—"जा, आपल्या नायकाला बोलावून घेऊन ये!"

उग्रसेनाचे दूत राजवाड्याच्या पटांगणांतून राजधानींत आले. एका झाडाखालीं चार घोडे बांधलेले होते. दूत घोड्यावर बसले व कैद्यांना पायीं चालायला सांगून निघाले.

तोपर्यंत बरीच रात्र लोटून गेली होती. रस्त्यावर गस्त देणारे चौकीदार किंवा एकटा दुकटा कोणी नागरिक याशिवाय कोणी दिसत नव्हतें. चहूंकडे सामसूम होती. मधून मधून एखाद्या कुत्रें भुंकल्याचा आवाज येई.

भद्र अजून जिवंत आहे कीं मेला याची माहिती मिळावी म्हणून उग्रसेनाच्या दूतांचा यत्न चालू होता. कदंबच्या राजधानींतून ते निघाले तेव्हां बाण लागल्यानें जखमी झालेला शशिकांतचा साथी, घोड्यावरून पडून गेला असला तरी वाटेंत कोठें तरी पडून मेला असावा या गोष्टीची त्यांना खात्री वाटत होती. परंतु थोडा संशय मनांत होताच. नंतर कुंतल नगरीं आल्यावर तो जिवंत परत आल्याचें व राजवाड्यांत पोंचल्याचें ऐकून त्यांना साहजिकच भीति वाटली. कारण त्यांच्या राजाचें सर्व कारस्थान उघडकीला येण्याची शक्यता होती.



दूत कोटाच्या मुख्य द्वारानजीक येऊन पोंचले. पाहरेकऱ्यांना त्यांनीं परवाना दाखविला. एक जण आपल्या साथी दूताला म्हणाला—"पाठीला बाण लागला असून तो बेशुद्ध स्थितींत येथवर आला म्हणजे एक आश्चर्यच होय!"

"त्याचें नांव भद्र असें होतें. पोलादाचा देह होता त्याचा. पण काय उपयोग? बाण काढल्याबरोबर त्यानें 'राम' म्हटलें." एक पाहरेकरी म्हणाला.

"आमच्या महाराजांनीं कोणत्याहि बाबतींत एकदां पाऊल टाकलें कीं मग

माघार घेण्याचा प्रश्नच नाहीं. त्यांचा बेत काय आहे याचा थांग पत्ता देखील कोणाला लागणें शक्य नाहीं आणि आमचे मंत्री, ते तर गाईच्या दाव्यानें हत्ती बांधतात.” एक दूत म्हणाला.

“अरे, ज्यांना मरायचें होतें ते तर मेले आणि ज्यांनीं हें कारस्थान केलें त्यांचें काम चालूच आहे. त्यांचें काय विचारायचें.... आम्ही किती भाग्यशाली!” आणखी एक दूत म्हणाला.

“आपण ज्या कामावर आलों होतों, तें कसें बिनघोक पार पडलें. या देशाच्या महाराजांना व मंत्र्याला असें बनवलें कीं आयुष्यभर आठवण काढतील आमची! आमचे महाराज आमची ही कामगिरी कधीं विसरणार नाहींत. पहा तर आपल्याला कोणती जहागीर मिळते ती!” असें म्हणत तो दूत मोठ्यानें हंसला.

तो हंसतच होता कीं त्यांना वडाच्या झाडा आडून आणखी कोणी तरी हंसत असल्याचें ऐकूं आलें. तिथे चकित होऊन वळून तिकडे पाहूं लागले. पण त्यांना कोणी दिसलें नाहीं. रानांत निरनिराळ्या प्रकारचे आवाज मात्र ऐकूं येत होते. पण दूत सावध झाले.

“आपण आनंदाच्या भरांत काय काय बरळत होतों. आजूबाजूला पाहिलें देखील नाहीं. या रानांत चोर व लुटेरे राहतात. पिशाच्च व भुतेंपण आहेत. भयंकर जंगल आहे हें. आतां तोंडें बंद करून चला पुढें. धूमक व सोमक घोड्यांबरोबर येत आहेत ना?” असें म्हणत एका दूतानें मागें वळून पाहिलें.

त्याच वेळीं झाडावरून एकाएकीं दूतांवर अग्निवृष्टि सुरू झाली. घोडे बिचकून पळूं लागले. दोघां दूतांचे कपडे जळून गेले. सर्व





ओरडूं लागले. “भुताटकी! भुताटकी!” घोड्यांना थांबविण्याचा यत्न देखील केला कोणीं नाहीं. घोडे वाट फुटेल तिकडे पळत होते. धूमक व सोमक देखील त्यांच्याबरोबर फरपटत ओढले जात होते. त्यांच्या सर्व वल्गना थांबल्या.

कांहीं वेळानें घोडे दमले तेव्हां एका जागीं थांबले. दूतांपैकीं एकानें सोमक व धूमक जवळच असल्याचें पाहून आपलें समाधान व्यक्त केलें. म्हणाला—“नशीब बलवत्तर म्हणून वांचलों. यमपाशांतूनच सुटलों!”

“अरे, पण उपयोग काय? आपण आलों आहों कोठें, कोणास ठाऊक?” दुसरा म्हणाला.

“अरे वाट चुकली म्हणून काय झालें? वांचलों ना? पुढें पाहून घेऊं. हा समोर जो डोंगर दिसत आहे तो खात्रीनें आपल्या राज्यांतलाच आहे!” एक दूत म्हणाला.

“होय, तुमच्या राज्यांतलाच! अस्सं! म्हणजे तुम्ही कदंब राजाचे दूत आहां तर! चला माझ्याबरोबर! मी कुंतल देशाच्या सरहद्दीवरचा पाहारेकरी आहें. कुंतल व कदंब देशाच्या सरहद्दीवरच तो महावृक्ष

आहे. तुम्ही त्याच्याखालीं उभे राहून पाहिलें तर पुढली वाट स्पष्ट दिसेल." सैनिक म्हणाला. सैनिक वाट दाखविण्यासाठीं पुढें निघाला व दूत त्याच्या पाठोपाठ घोड्यावरून निघाले. ते त्या महावृक्षाखालीं येऊन पोंचले. तेथें आणखी एक सैनिक तलवार उपसून तयार उभा होता.

"दूरून स्वच्छ दुधासारखे दिसणारे आणि नागमोडी वळण घेऊन धांवणारे ते डोंगरी ओढे आहेत का?" एका दूतानें विचारलें.

पाहारेकरी त्या प्रश्नाचें उत्तर देणार त्यापूर्वीच झाडावर हालचाल झाल्याचा भास झाला. दूत भयभीत झाले व त्यांच्या सर्व अंगाचा थर कांप उडून गेला. "हे तर अजगर दिसतात!" असें ओरडत त्यांनीं घोड्याला टांचा मारल्या. परंतु त्याच क्षणीं दोन फांस वरून खालीं आले व दोन दूतांचीं डोकीं त्यांत अडकलीं. घोडे पुढें निघून गेले व दूत लोंबकळत राहाले. तलवार उपसून जो सैनिक उभा होता त्यानें धूमक व सोमक यांना बंधनमुक्त केलें. हें सर्व दोन चार मिनटांत घडलें. झाडावरून फांस टाकणारे कोण सोमक व धूमक दोघांना सोडवणारे कोण हें विचार करायला सुद्धा वेळ नव्हता.

उरलेले दोन दूत ओरडत ओढ्याकडे घोड्यावर बसून पळाले.

"त्या भामट्यांना ओढ्यापर्यंत पोंचण्यापूर्वी पकडा." कोणाचा तरी आवाज ऐकूं आला. लगेच झाडाआड लपून बसलेले सैनिक समोर आले व त्यांनीं पळणाऱ्या दूतांवर शरवृष्टि सुरू केली.

सर्व जणुंकाहीं पूर्व योजनेप्रमाणें होत होते. [ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]





# डाव साधला

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमींप्रमाणें मौनपणें स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! वेळ प्रसंग पाहून कसें वागावें हें कळत नसल्यामुळें तुला इतके कष्ट सहन करावे लागत आहेत असें मला वाटतें. गुहचंद्राला तें कळत असल्यामुळें तो आपल्या बायकोला वळणीवर आणूं शकला. तुला कंटाळा येऊं नये म्हणून त्याची गोष्ट सांगतों. लक्ष देऊन ऐक." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

पाटलीपुत्र नगरींत धनगुप्त नांवाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला एक रूपवती कन्या होती. जन्मतांच तिच्या भोंवतीं एक ज्योतिर्वलय दिसूं लागलें.

वेताळाच्या गोष्टी



त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती लगेच बोलूंपण लागली. धनगुप्तानें तो चमत्कार स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिला आणि त्या मुलाला साष्टांग नमस्कार करून विचारूं लागला—"देवी! कोण तूं? माझ्या पोटीं जन्म घेऊन माझ्यावर किती उपकार केलेस?"

"मी कोणी का असेना, मी तुझ्या घरीं राहून तुझें हित व कल्याणच करीन. कधीं कोणाशीं माझें लग्न करून देण्याचा विचार करूं नकोस."

धनगुप्तानें ती गोष्ट कबूल केली. त्यानें असें जाहिर केलें कीं त्याची मुलगी जन्मतांच मरण पावली. तिचें नांव त्यानें सोमप्रभा ठेवलें आणि सर्वांची नजर चुकवून तिला घरांतच वाढूं दिलें. लवकरच ती लहानाची मोठी झाली. अर्थातच वयाबरोबर तिच्या सौंदर्याची सुद्धां वाढ होत गेली.

इतक्यांत वसंतोत्सव आला. सोमप्रभा आपल्या घराच्या गच्चीवर जाऊन वसंतोत्सव पहात उभी राहाली. त्या वेळीं गुहचंद्र नांवाच्या तरुणानें तिचें रूप पाहालें व तो मूर्च्छित होऊन पडला. शुद्धीवर आल्यावर तो तिच्या विरहानें व्याकूळ झाला.

त्याच्या बापाला मुलाच्या आजाराचें कारण समजेना आणि फार काळजींत पडला. तेव्हां गुहचंद्राच्या मित्रांनीं येऊन घडलेलें वृत्त निवेदन केलें.

गुहसेन धनगुप्ताच्या घरीं गेला. तो त्याला म्हणाला—"तुम्ही आपल्या मुलीचें लग्न माझ्या मुलाशीं करून द्यावें."

"तुला वेडबीड तर नाहीं लागलें? अरे! मला मुलगी असेल तर ना?" धनगुप्तानें त्याला उत्तर दिलें.

सरळ मार्गानें धनुगुप्त आपलें म्हणणें ऐकणार नाहीं हें ओळखून गुहसेन राजाच्या भेटीला गेला. त्यानें पूर्वी अनेक वेळीं अनेक प्रकारें राजाला मदत केली होती. म्हणून राजा नक्कीच मदत करील असें त्याला वाटत होतें. त्यानें नजराणा म्हणून एक रत्न राजाला भेट केलें आणि म्हणाला—"महाराज! मी आपल्याकडे मदत मागायला आलों आहें."

गुहसेनानें राजाला त्याचा मुलगा गुहचंद्र धनगुप्ताच्या मुलीचें रूप पाहून वेडा झाला असल्याचें सांगितलें आणि म्हणाला—"मी त्याला आपल्या मुलीचें लग्न माझ्या मुलाशीं करून द्यायला विनंति केली. पण त्यानें, त्याला मुलगीच नाहीं असें सपशेल खोटें सांगितलें."

राजानें गुहसेनाला लहानसें सैन्य बरोबर घेऊन जायला सांगितलें. म्हणाला—"जाऊन धनगुप्ताच्या मुलीला धरून घेऊन ये आणि तिचें लग्न आपल्या मुलीशीं करून दे." गुहसेन तें छोटेखानी सैन्य घेऊन गेला व त्यानें धनगुप्ताच्या घराला गराडा घातला.

वडिलांवर आलेला प्रसंग सोमप्रभेनें ओळखला. ती वडिलांना म्हणाली—"बाबा! तुम्ही माझ्यासाठीं इतक्या मोठ्या संकटांत कां उडी घेतां? त्या वैश्य तरुणाशीं माझें लग्न करून द्यावें. पण त्यांना सांगा कीं














मी त्याच्याबरोबर त्याची बायको म्हणून संसार करायला तयार नाहीं."

गुहसेनानें विचार केला कीं लग्न झाल्यावर पाहून घेऊं. त्यानें ती अट मान्य केली आणि आपल्या मुलाचें लग्न सोमप्रभेशीं करून टाकून मोकळा झाला.

सासरी गेल्यावर सोमप्रभा आपल्या पतीबरोबर रहायलाच तयार होईना. तेव्हां गुहसेन आपल्या मुलाला म्हणाला—" हें बघ जी बायको लग्नाला तयार झाली ती संसार करायला तयार नाहीं का ? दोन लगावल्यास कीं राहील म्हैस सरळ उभी!"

लगेच सोमप्रभेनें नाकावर बोट ठेवून सासऱ्याला दटावलें. तिचें तें दटावणें पाहूनच गुहसेन इतका घाबरला कीं हृदयाचा धक्का बसून तो तत्काळ मरण पावला.

ही मनुष्य जातीची स्त्री नसून कोणीतरी राक्षसीण दिसते आहे. माझें नशीब फुटकें म्हणून ही माझ्या पदरीं पडली, असा विचार करून गुहचंद्रानें बायकोशीं अबोला धरला. बायको असून तो ब्रह्मचारी झाला. त्याला स्वतःच्या आयुयाचा वीट आला. तो ब्रह्मभोज देऊं लागला. सोमप्रभादेखील गुपचुप तें सर्व पहात राहाली व ब्राह्मणांना तांबूलादि देण्याचें काम करूं लागली.

एकदां एक म्हातारा ब्राह्मण गुहचंद्राच्या घरीं जेवण झाल्यावर निरोप घ्यायला आला असतां सोमप्रभा त्याला तांबूल दक्षिणा वगैरे देऊं लागली. तेव्हां तिचें अलौकिक सौंदर्य पाहून तो चकित झाला. त्यानें गुहचंद्राला हळूच कानांत विचारलें—" मुला! कोण रे ही?"

गुहचंद्रानें थोडक्यांत दुःखी मनानें आपल्या लग्नाची गोष्ट सांगितली. ती ऐकून म्हातारा म्हणाला—" अस्सं! तर मग आज संध्याकाळीपण मी तुझ्याच घरीं जेवायला राहातों. रात्रीं माझ्या झोंपण्याची व्यवस्था तुझ्याच घरीं! मी तुला एक विचित्र गोष्ट दाखवीन आणि तुझा प्रश्न नक्की सुटेल." गुहचंद्रनें त्याला होकार दिला.

रात्रीं ठरल्याप्रमाणें ब्राह्मण जेवणखाण आटोपून झोंपीं गेला. सर्व झोंपले असल्याचें पाहून सोमप्रभा घराबाहेर पडली. वृद्ध ब्राह्मणानें गुहचंद्राला जागें केलें आणि म्हणाला—" चल माझ्याबरोबर! त्यानें गुहचंद्राला योगबलानें भ्रमररूप दिलें व स्वतः एक भ्रमर झाला. दोघे सोमप्रभेच्या पाठोपाठ निघाले.

सोमप्रभा दूर एका वडाच्या झाडाखालीं गेली. तेथें गोड व सुंदर संगीत ऐकूं येत होतें. एक देवी,—ती दिसायला सोमप्रभे-सारखीच होती एका उंच जागीं बसलेली होती. सोमप्रभादेखील तिच्या शेजारीं जाऊन बसली. दोघी जेवायला बसल्या. पंचपक्वान्नांचें जेवण होतें. जेवण झाल्यावर उत्तम पेयें पिऊन सोमप्रभा घाई घाईनें उठली व म्हणाली—" अक्का! हें बघ, आज कीं नाहीं आमच्या घरीं एक वृद्ध ब्राह्मण आला आहे जेवायला. त्याला दिव्य शक्ति अवगत आहे. मला त्याचें भय वाटतें.





म्हणून लवकर घरीं जातें." असें सांगून ती उठली आणि घरीं पोंचली.

गुहचंद्रानें भ्रमर रूपें तें सर्व उघड्या डोळ्यांनीं पाहिलें व कानांनीं ऐकलें. सोमप्रभा घरीं निघाल्यावर दोघे तिच्या पाठोपाठ निघाले व ती घरीं पोंचण्यापूर्वींच घरीं जाऊन अंथरुणावर झोंपून राहिले. कांहीं वेळानें सोमप्रभा आली व आपल्या पलंगावर झोंपली.

ब्राह्मण गुहचंद्राला म्हणाला—"पाहिलेंस ना बाळ! तुझी बायको कोणी मानव स्त्री नसून देव जातीची स्त्री दिसते आहे, आणि तिला ही गोष्ट माहीत आहे. शाप मिळाल्यानें तिला हा मानव जन्म घ्यावा लागला आहे. तिचा आपल्या पूर्वजन्मींच्या लोकांशीं संबंध अजून तुटला नसून चालू आहे. अशी स्त्री मानवजातींतल्या पुरुषाबरोबर संसार करायला कशी तयार होणार? मी तुला एक गोष्ट सांगतों, तूं तसें केलेंस तर कदाचित तुझी बायको तुझ्याशीं संसार करायला तयार होईल." असें सांगून एक त्यानें त्याला युक्ति सुचविली आणि निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं काळोख पडल्यावर एक वेश्या गुहचंद्राच्या घरीं खूप सजून आली. गुहचंद्रानें तिला आदरपूर्वक आंत बोलाविलें. व एकांतांत तिच्याशीं प्रेमालाप करूं लागला.

तें सर्व सोमप्रभेनें पाहिलें. तिनें आपल्या नवऱ्याला बोलावून विचारलें—"कोण ही स्त्री?"

"आहे एक वेश्या! तिचें माझ्यावर प्रेम आहे. मी तिच्याकडेच रहावें असा तिचा आग्रह आहे. मी जाण्याचा विचार करीत आहें." गुहचंद्र म्हणाला.

"मी एवढी घरांत असतां ही कोण आली आहे तुम्हांला बोलावून घेऊन जायला? मी जाऊं देणार नाहीं. केस धरून ओढून काढतें बाहेर तिला. म्हणे, आली आहे प्रेम करायला?" सोमप्रभा म्हणाली.

त्यानंतर गुहचंद्राचा संसार सुखाचा झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! आतां तूं मला हें सांग, ही देवजातीची एक स्त्री आणि मानव जातीच्या बायकांसारखा हिचा मत्सराग्नी असा कां पेटावा? त्या म्हाताऱ्यानें हें ओळखून कीं ती एक मानव स्त्री नसून देव स्त्री आहे अशी युक्ति कां सुचवावी? आणि ती बिचारी कशी काय या कुचक्रांत फंसली? या सर्व शंकांचें उत्तर तूं माहीत असून दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"देवजातीची स्त्री मानव जातीच्या पुरुषांवर प्रेम करणें शक्य नाहीं असें मुळींच नाहीं. तिचें गुहचंद्रावर प्रेम नव्हतें म्हणून ती त्याच्याबरोबर संसार करायला तयार नव्हती. देवजातीची स्त्री होती म्हणून नव्हे. आतां मत्सराग्नी विचारतोस, तर त्याचें असें आहे कीं जेथें प्रेमाचा अभाव असतो तेथें अधिकाराचा पण अभाव असतो असें थोडेंच आहे? सोमप्रभेचें गुहचंद्रावर प्रेम नव्हतें, पण त्याच्यावर आपला अधिकार आहे असें तिला नक्कीच वाटत होतें. तो अधिकार कोणी हिसकावून घेणार या गोष्टीची जाणीव होतांच तिचा मत्सराग्नि पेटला. स्त्रीस्वभावाचें हें गुपित त्या म्हाताऱ्याला माहीत होतें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला.





# घटस्फोट

ब्रम्हदेवानें सृष्टीचा आरंभ केल्यावर कांहीं काळ लोटला. तसा तो सृष्टीचा सुरवातीचाच काळ होता, अरणी नांवाचे एक ऋषि एका तपोवनांत रहात. त्यांच्या मनांत सहज आलें, देवानें इतक्या जातीचे प्राणी कां बरें निर्मिले? फक्त एक मनुष्य प्राणीच कां नाहीं निर्मिला? त्यानें ब्रम्हदेवालाच तो प्रश्न करण्याचें ठरवून त्याचा साक्षात्कार व्हावा म्हणून तपश्चर्येला सुरवात केली. ब्रम्हदेव प्रसन्न झाला व त्यानें इतर प्राण्यास मनुष्य रूप देण्यास अरणीला वर दिला.

दुसऱ्यादिवशीं अरणी रानांत फिरत असतां त्याला एक सिंह हरणाचा पाठलाग करीत असलेला दिसला. अरणीनें सिंहाला पुरुष व हरिणाला स्त्री करून टाकलें. दोघांनीं परस्परांस पाहतांच परस्परांचें परस्परांवर प्रेम जडलें.

तें पाहून अरणीच्या मनाचें समाधान झालें. त्यानें दोघांचें विधिपूर्वक लग्न करून दिलें. दोघं एक लहानसें घर बांधून रानांत राहूं लागलीं. पति रानांत जाऊन शिकार करी. पण बायकोला तें आवडत नसे. ती मांस खात नसे. ती कंदमुळें व फळें खाई व त्यावर तिचा उदर निर्वाह भागत असे. परंतु पतीला तें आवडत नसे. बायकोला पशुहत्या पसंत नव्हती. ती पशुपक्ष्यांना खायला दाना व चारा घाली.

दोघांच्या स्वभावांतील फरक वाढतच गेला. बायकोनें पाळलेली हरणें वगैरे प्राणी ठार करून नवरा त्यांचें मांस खाऊं लागला. ती नवऱ्याला सांगे, अशी पशुहत्या व्यर्थ कां करतां? माझ्यासारखीं कंदमुळें व फळें खाऊन कां रहात नाहीं? पण नवरा तिला उलट विचारी—"तूं कां नाहीं खात माझ्यासारखें मांस?"

दोघांमध्यें समेट होण्याचें दूरच, वैषम्य इतकें वाढत गेलें कीं दोघं परस्परांचा द्वेष करूं लागलीं. तरी प्रकृति नियमाप्रमाणें त्यांना पुष्कळ मुलेंबाळें होत गेलीं. कांहीं मुलांत आईचे तर कांहींत बापाचे गुण येत गेले.

नवरा बायकोला मारीत असे व अनेक प्रकारें नको जीव करून सोडीत असे. एकदां त्याला इतका राग आला कीं जनावरांसारखे मारून तिला ठार करायला तो तयार झाला. बायको कशी तरी आपली सुटका करून घेऊन पळून गेली व सरळ अरणी ऋषींच्या आश्रमांत येऊन पोंचली, तेथें तिचा नवरा पाठलाग करीत येऊन पोहचला.

अरणीनें दोघांना बोलावून शांत केलें व म्हणाला—"तुमचें परस्परांवर प्रेम नाहीं, उलट दोघं परस्परांचा द्वेष करतां? तुमचा संसार चालायचा कसा? कां नाहीं निरनिराळे रहात?"

असें सांगून त्यानें दोघांच्या हातांत एक एक ताजें हिरवें पान दिलें आणि म्हणाला—"एकानें पूर्वेला जावें व दुसऱ्यानें पश्चिमेला. हीं पानें वाळूं लागलीं कीं तुम्हांला मुक्ति मिळेल."

पतिपत्नी तें पान घेऊन अरणीनें सांगितल्याप्रमाणें विरुद्ध दिशेला निघालीं. पानें वाळून गेल्यावर पुरुषाला सिंहाचें व बायकोला हरणाचें रूप मिळालें. त्यांच्या मुलांत मात्र त्यांच्या आईवडिलांचे गुण पूर्ववत तसेच राहून गेले.





# अग्निदिव्य

एकदां केरळच्या राजानें अकबर बादशाह-कडे निरोप पाठविला कीं अकबरानें दोन व्यक्ति व दोन प्राणी पाठवावे. एक उत्तमकुळांत जन्मलेली नीच व्यक्ति, दुसरी नीचकुळांत जन्मलेली उत्तम व्यक्ति. एक रस्त्यावरचे तुकडे चाटणारा कुत्रा व एक सिंहासनावर बसणारें गाढव. निरोपाप्रमाणें पाठविले नाहींत तर युद्धास तयार रहावें.

बादशहाला त्या निरोपाचा अर्थ न कळेना. तेव्हां त्यानें बिरबलाला बोलाविलें आणि केरळ राजाचा निरोप आला असल्याचें सांगून त्याचा अर्थ विचारला.

कांहीं वेळ विचार करून बिरबल म्हणाला "हें कांहीं कठीण नाहीं. पण याचें उत्तर द्यायला थोडा वेळ लागेल. निदान एक वर्षाचा अवधी. तसें उत्तर केरळच्या राजाला लिहून कळवावें."

त्याप्रमाणें बादशहानें उत्तर लिहून पाठविलें, आणि बिरबलाला म्हणाला—"हें पहा, याचें उत्तर पण तूंच काय तें सांगितलें पाहिजेस!"

"जसा आपला हुकूम असेल तसें करायला तयार आहें. या कामासाठीं एक लक्ष रुपये लागतील तेवढे द्यावेत!" बिरबल म्हणाला.

बादशहानें तसा हुकुम लिहून दिल्यावर बिरबलानें खजिन्यांत जाऊन एक लाख रुपये काढून घेतले आणि एका सावकाराचा वेष करून एका उत्तम घोड्यावर बसून केरळ राज्यांत जाण्यासाठीं निघाला.

त्यानें केरळच्या राजधानींत मुख्य रस्त्यावर कोतवालाच्या कचेरीसमोर एक मोठा वाडा भाड्यानें घेतला आणि सावकारीचा धंदा सुरू केला. लवकरच त्याची कोतवालाशीं चांगली मैत्री जमली. बिरबल कोतवालाला नेहमीं या ना त्या कारणानें आपल्या घरीं बोलावून मेजवान्या देऊं लागला. कोतवालाची त्याच्यावर इतकी मर्जी झाली कीं त्याच्याकडून बिरबल जें पाहिजे तें काम करवून घेऊं लागला. राजधानींत कोणी उत्तम गवई किंवा व्यापारी आला कीं कोतवाल त्याला बिरबलाकडे घेऊन येई व त्यांची ओळख करून देई. बिरबलपण पाण्यासारखा पैसा खर्च करून त्यांचा सत्कार करी.

एकदां कोतवालानें गांवांतल्या रंभा नांवाच्या एका प्रसिद्ध नर्तकीची बिरबलाशीं ओळख करून दिली. तिचें नृत्य पाहून बिरबल व पाहुणे मंडळी खूष झालीं. बिरबलानें तिला एक हजार रुपये देऊन तिला निरोप दिला. बिरबलाचें तें औदार्य पाहून ती सुंदर नर्तकी बिरबलाला म्हणाली—"महाराज! पोटासाठीं मनुष्याला हा नीच धंदा करावा लागतो. आपल्या सारख्या थोरा मोठ्यांचा आश्रय मिळाला तर हा नरकवास सुटेल."



बिरबलानें तिला तिच्या स्वतःच्या वाड्यांतच रहायला सांगितलें आणि म्हणाला—"कोणी विचारलें तर सांग, मी ठेवून घेतलें आहे!"

त्यानंतर बिरबल तिच्या घरीं नित्य नियमितपणें जाऊं येऊं लागला. तिचें बिरबलावर पतिव्रता स्त्रीसारखें प्रेम होतें. बिरबल निघाला कीं तिचे डोळे भरून येत व बिरबल येण्याची वेळ झाली कीं ती त्याची वाट पहात तासन तास उभी राही. एक दिवशीं कोतवालानें बिरबलाला विचारलें—"तिच्याशीं लग्न कां करून घेत नाहींस?"












“उत्तम कुळांत जन्मलेली कोणी असेल तर तिच्याशीं लग्न करून घेण्यास मला हरकत नाहीं.” बिरबल म्हणाला.

त्याप्रमाणें कोतवालानें एक चांगला संबंध जुळवून आणला. मुलगी कुलीन घराण्यांत जन्मलेली होती. बिरबल तिच्याशीं लग्न करून घेण्यास तयार झाला. त्या मुलीचें नांव मनोरमा होतें. दोघांचें लग्न झालें.

बिरबलानें बायकोच्या प्रेमाची परीक्षा घेण्यासाठीं तिला नाना प्रकारें कष्ट द्यायला सुरवात केली. ती सर्व सहन करीत गेली. एकदां त्यानें एक कोहाळा फोडून त्यांत गुलाल भरला व तें एका चादरींत गुंडाळून घरीं आला आणि एका पेटींत त्यानें तो ठेवून दिला. बायकोनें तें पाहून विचारलें—“हें काय ठेवलें आहे तुम्ही?”

बिरबल तिला हळूच कानांत म्हणाला—“हें पहा उगीच बोभाटा करूं नकोस. राजकुमाराचें मुंडकें आहे. कोणाजवळ बोललीस तर तुझें डोकें कापून त्याच्याबरोबर पेटींत ठेवून देईन.”

कांहीं वेळानें बिरबल बाहेर गेल्यावर ती मोठमोठ्यानें ओरडूं लागली—“वांचवा, हो वांचवा!”

कोतवालाला ती बातमी लागतांच तो धांवत आला आणि “काय भानगड आहे?” विचारूं लागला.

“काय असणार? तुम्ही एका लबाडाशीं माझें लग्न करून दिलेंत! तो इतके दिवस नुसता छळत आला आणि आतां जीव घेण्याची धमकी देऊन गेला आहे. अहो, त्यानें राजकुमाराचें मुंडकें घरांत आणून ठेवलें आहे व बजावून सांगून गेला आहे कीं ही गोष्ट या कानाची त्या कानावर गेली तर माझें मुंडकें पण त्याच्या शेजारीं जाऊन पडेल.” मनोरमानें सर्व सांगून टाकलें.

तें ऐकून कोतवालानें बिरबलाला धरून घेऊन यायला शिपाई पाठविले. शिपायांनीं बिरबलाला धरून कोतवालासमोर उभें केलें.

“हें सर्व कशासाठीं? मी काय अपराध केला?” बिरबलानें विचारलें.

“तोंड बंद कर, मूर्खा! तूं इतका नीच असशील असें नव्हतें मला वाटलें. फांशीची शिक्षा मिळेल तेव्हां कळेल सर्व!” असें सांगून कोतवाल त्याला घेऊन राजाकडे गेला व म्हणाला—“महाराज! हा खुनी आहे! यानें राजकुमाराचा खून केला आहे व त्याचें मुंडकें आपल्या घरांत पेटींत बंद करून ठेवलें आहे. त्यानें आपल्या बायकोला धमकी दिली आहे कीं तिनें ही गोष्ट कोणाला सांगितली तर तिची गत पण तीच होईल.” कोतवाल म्हणाला.

राजानें चवकशी बिलकुल केली नाहीं व हुकुम सोडला कीं त्या दुष्टाला ताबडतोब फांशी देण्यांत यावी.

कोतवालानें बिरबलाला वध्यस्थानीं नेण्यास शिपायांना हुकुम दिला.

वाटेंत बिरबलाला त्याचा एक नोकर भेटला. त्याला बिरबल म्हणाला—“घरीं जाऊन तूं आपल्या मालकिणीला सांग कीं



मला फांशी द्यायला घेऊन चालले आहेत. ती काय म्हणते तें मला लवकर येऊन सांग!”

नोकरानें मालकिणीला जाऊन सांगितलें. मनोरमा म्हणाली—“मला काय त्याच्याशीं करावयाचें आहे? करावें तसें भरावें!”

नोकरानें, मालकीण जें कांहीं म्हणाली तें जसेंच्या तसें मालकाला येऊन सांगितलें. तेव्हां बिरबलानें पुन्हां तोच निरोप रंभा नर्तकीला जाऊन सांगायला सांगितलें. तो निघून गेल्यावर बिरबलानें कोतवालाला रंभा नर्तकीच्या घरावरून घेऊन जायला विनंति केली. कोतवाल त्याला कबूल झाला. तो



बिरबल व शिपाई रंभा नर्तकीच्या घराजवळ पोंचले तेव्हां ती दरवाज्यांत वाट पहात उभी होती. तिनें कोतवालाकडून बिरबलावर काय आरोप आहे हें विचारून घेतलें. कोतवालाच्या हातांत दोनशें रुपये देऊन ती म्हणाली—"आपण एक तासभर या झाडाखालीं थांबावें. एका तासानंतर मी आलें नाहीं तर राजाज्ञेप्रमाणें करावें."

कोतवाल त्या गोष्टीस कबूल झाला.

रंभा उत्तमोत्तम वस्त्रें धारण करून राजाच्या दर्शनास गेली. राजा तिचें सौंदर्य पाहून चकित झाला. त्यानें विचारलें-"काय पाहिजे तुला? बोल, तूं मागशील तें द्यायला तयार आहें."

रंभा म्हणाली—"दया करून सावकाराला दिलेली शिक्षा माफ करण्यांत यावी." राजाला बिरबल कोण? त्यानें कोणता अपराध केला होता व त्याला कोणती शिक्षा करण्यांत आली होती हें कांहींच आठवलें नाहीं. त्यानें क्षमा करून तसा हुकुम लिहून दिला. तो हुकुम पाहून कोतवालानें बिरबलाला सोडलें.

रंभा बिरबलाला घेऊन आपल्या घरीं गेली. घरीं गेल्यावर तो रंभेला म्हणाला—"तूं इतकी कशाला घाबरलीस? तें सर्व एक नाटक होतें. आतां मी स्वदेशीं परत जातों. लवकर परत येऊन मग तुला बरोबर घेऊन जाईन."

प्रथम ती घाबरली व सर्व प्रसंग कळल्यावर तिनें बिरबलाला परत जायला परवानगी दिली. दिल्लीला जाऊन त्यानें बादशहाच्या दरबारांत निवेदन केलें कीं केरळच्या राजानें जें मागितलें तें सर्व केरळमध्येंच आहे."

"काय तें! ऐकूं तर दे!" अकबरानें विचारलें.

"केरळ राजधानींत सर्व आहे. आपण मला अधिकारपत्र लिहून द्यावें. मी केरळच्या राजधानींत जाऊन राजाला त्याला हवें असलेलें दाखवितों." बिरबल म्हणाला. त्याप्रमाणें अकबरानें अधिकारपत्र लिहून दिलें. बिरबल थाटामाटानें सर्व तयारी करून केरळच्या राजाकडे आला आणि बादशहाचें अधिकारपत्र त्याला दिलें. तेव्हां केरळच्या राजानें त्याला विचारलें—"कोठें आहेत?"

"आतां आणून दाखवितों." असें सांगून बिरबलानें रंभा नर्तकीला बोलावून घेऊन यायला सांगितलें. ती आल्यावर बिरबल म्हणाला—"या कोतवालाच्या कचेरीसमोर एक सावकार रहात असे. दोघांची परस्परांशीं चांगली मैत्री होती. त्यानेंच मनोरमेचें सावकाराशीं लग्न करून दिलें. ती उत्तम कुळांत जन्मली होती. तिच्या पातिव्रत्याची परीक्षा घेण्यासाठीं सावकारानें एक कोहळा फोडून त्यांत गुलाल भरला व तें राजकुमाराचें मुंडकें असें सांगून एका पेटींत हिच्या समोर ठेवलें. परंतु हिनें नवऱ्याला वांचविणें तर दूरच. कोतवालाला बोलावून त्या सावकाराला फांशीची शिक्षा देवविली. शिक्षा होण्यापूर्वी भेटण्यासाठीं सावकारानें हिला बोलाविलें पण ही आली नाहीं. अशी ही उच्च कुळांत जन्मलेली नीच स्त्री आहे." राजाला ती गोष्ट मानावी लागली.



नंतर रंभा नर्तकीकडे बोट दाखवून बिरबल म्हणाला—"आतां या रंभा नर्तकीची गोष्ट ऐका. नृत्य गान करून हिचा उदर निर्वाह चालतो. परंतु हिचें त्या सावकारावर खरें प्रेम होतें. सावकाराला फांशीची शिक्षा झाली असल्याचें कळल्यावर ही आपल्याकडे आली व शिक्षा माफ करवून घेऊन तिनें सावकाराला वांचविलें. ही नीच कुळांतली उत्तम स्त्री!"

राजाला ती गोष्ट मान्य झाली.

       

"तिसरा कुत्रा! हा आहे, आपल्या समोर उभा!" असें सांगून बिरबलानें कोतवालाकडे बोट दाखविलें.

कोतवाल तें ऐकून बिरबलाला मारायला धांवला. "थांब! मी हें सिद्ध करून दाखवूं शकेन! कुत्रें खायला घालणाऱ्यासमोर लांगूल चालन करतें. हा देखील सावकारा-कडून पैसे मिळत होते तों पर्यंत त्याच्या समोर लांगूलचालन करीत राहाला. मनोरमे-कडून राजपुत्राच्या मुंडक्याची गोष्ट कळतांच यानें राजाकडून इनाम मिळेल या आशेनें सावकाराला धरून आपल्यासमोर आपराधी म्हणून हजर केलें. गल्लींत उष्टीं हाडें चघळ-णाऱ्या कुत्र्यांचीं कामें हीं नव्हेत काय?"

राजानें त्या गोष्टीसहि मान्यता दिली.

"सिंहासनावर बसणारें गाढव तुम्हांला पाहिजे आहे. राजकुमाराच्या मुंडक्याची गोष्ट ऐकतांच खून झाला आहे कीं नाहीं या गोष्टीची चवकशी केल्याशिवायच कोणी राजानें अपराध्याला फांशीची शिक्षा सांगितली तर शिक्षा देणाऱ्याला सिंहासनावर बसणारें गाढव नाहीं म्हणावयाचें तर काय म्हणावयाचें?" बिरबलानें राजाला विचारलें.

राजा निरुत्तर झाला. बिरबल म्हणाला— "तो सावकार हा आहे आपल्या समोर उभा, आज अकबर बादशहाचा दूत म्हणून."

राजानें त्यानंतर बिरबलाच्या चातुर्याची प्रशंसा केली व निरोप देतांना त्याला अनेक वस्तु उपहार म्हणून दिल्या.

बिरबल रंभा व मनोरमा यांना बरोबर घेऊन दिल्लीला गेला. अकबरानें बिरबलाची पाठ थोपटली व त्याला एक जहागीर बक्षिस म्हणून दिली. कारण तो एका अग्निदिव्यांतून सुटून आला होता.





# परोपकारी गोपाळ

गोपाळच्या गांवीं व्यंकटेश नांवाचा एक गृहस्थ रहात असे. गोपाळच्या कर्तृत्वशक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. कोणी गोपाळची निंदा केलेली त्याला मुळींच खपत नसे. त्याच गांवीं कृष्णाजी नांवाचा दुसरा एक गृहस्थ रहात असे. व्यंकटेश व कृष्णाजी बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा करीत बसले असतां व्यंकटेशनें गोपाळच्या कर्तृत्वशक्तीच्या अनेक गोष्टी सांगितल्या. तेव्हां कृष्णाजी म्हणाला— "हें पहा, तुझा गोपाळ असेल पटाईत याना त्या कामांत; पण मी सांगतों तें काम त्याच्या हातून होणें शक्य नाहीं. तूं कबूल करायला तयार नसलास तर आपली पैज! मी हारलों तर पन्नास रुपये देईन. तूं हारलास तर तूं दिले पाहिजेस."

"हें बघ तूं किंवा इतर कोणी जें काम करूं शकेल, तें गोपाळ नक्कीच करूं शकेल व जास्त सफाईनें करूं शकेल. तूं ही गोष्ट खोटी करून दाखविलीस तर तूं म्हणतोस तसे पन्नास रुपये द्यायला मी तयार आहें." व्यंकटेश म्हणाला.

"मी विचारतों, तुझ्या गोपाळला चोरी करतां येईल का?" कृष्णाजीनें विचारलें व व्यंकटेश काय उत्तर देतो याची वाट पाहूं लागला.

तें ऐकून व्यंकटेश थक्कच झाला. त्याला काय उत्तर द्यावें हेंच सुचेना. कृष्णाजीकडून पैज जिंकायची तर गोपाळ चोरी करण्यांत पटाईत आहे, हें सांगावें लागेल. नाहीं म्हणावें तर पैज घालवून पन्नास रुपये द्यावे लागणार. तो मोठ्याच पेंचांत पडला.












परंतु शेवटीं पन्नास रुपये द्यावे लागले तरी देऊन मोकळें व्हायचें असें त्यानें ठरविलें. तो घरांत गेला व त्यानें पेटींतून पन्नास रुपये काढून कृष्णाजीला देऊन टाकले.

व्यंकटेश जवळ तेवढेच काय ते सांठवलेले पैसे होते. त्याच्या बायकोच्या धाकट्या बहिणीचें लग्न जवळ आलें होतें व नवीन कुड्या करण्यासाठीं त्याच्या बायकोनें तेवढे पैसे जमा करून ठेवले होते. आणखी फक्त दहा रुपयेच काय ते कमी पडत होते. परंतु पैज हारल्यामुळें ते पन्नास रुपये गेले. त्यानें बायकोला ती गोष्ट सांगितली नव्हती. दुसऱ्यादिवशीं बायकोनें दहा रुपये आणून दिले व म्हणाली–"झाले पुरे साठ रुपये, आतां कुड्या घेऊन या जाऊन सोनाराकडून !"

व्यंकटेशला आदल्या दिवशीं पैजेंत हारलेल्या पन्नास रुपयांची गोष्ट सांगावी लागली. बायकोला भयंकर राग आला त्या मूर्खपणाचा व तोंडाला आलें तें ती बोलली. बायकोची आई म्हणजे व्यंकटेशची सासू मुलीकडे कांहीं दिवस रहायला म्हणून आली होती. तिनें तें सर्व ऐकलें आणि म्हणूं लागली हा आहे कोण मेला गोपाळ ? आग लागो त्याच्या मोठेपणाला. त्याच्या नांवावर घर लुटलें गेलें आमचें आणि मोठेपणा त्याला ?"

व्यंकटेशची आई म्हणाली–"आई ! तूं नको कांहीं बोलूंस त्या थोर पुरुषाला. अहो तो आहे एक महात्मा !" महात्मा व्हायला निघाले आहेत त्यांना काय म्हणायचें ?

"म्हणे महात्मा ! पण त्याच्यामुळेंच नाहीं का सर्व रुपये गेले. पन्नास रुपये फुकटांत येतात का ?" व्यंकटेशच्या सासूनें रागाच्या भरांत जांवयावर खूप तोंडसुख घेतलें.

व्यंकटेशच्या शेजारणीची मुलगी त्यावेळीं व्यंकटेशच्या घरीं होती. तिनें सर्व जाऊन सांगितलें गोपाळच्या बायकोला. मीनाक्षीला तें ऐकून फार वाईट वाटलें. तिनें नवऱ्याला सर्व जाऊन सांगितलें आणि म्हणाली–"पहा. लोक तुमच्या या उपकारांची फेड कशी करीत आहेत ती ! तुमच्यासाठीं म्हणून व्यंकटेशला ही पन्नास रुपयांची खोट कां बसावी ?"

गोपाळ म्हणाला–"मला तरी कोठें माहीत आहे, काय झालें तें ? चवकशी करतों जाऊन ! गेले कित्येक दिवस मी त्याला भेटलो देखील नाहीं."

"व्यंकटेशची बायको व सासू दोघींनीं गांवभर ओरडा केला आहे. जाऊन विचारून तर या एकदां !" मीनाक्षी म्हणाली.

गोपाळ लगेच व्यंकटेशच्या घरीं गेला. तो एका कोपऱ्यांत दुःखी मनानें बसला होता. गोपाळनें त्याला सर्व विचारून घेतलें आणि म्हणाला–"जें झालें तें झालें, तुझ्या बायकोला कुड्या मिळाल्या कीं झालें !"

पण व्यंकटेश म्हणाला–"हें पहा, मी तुझें दानबीन घ्यायला तयार नाहीं बरं का !"





“अरे तें तूं सांगायला हवें का? होणार नाहीं. बरें तर येतों, पुन्हां भेटेन उद्यां परवां!” असें सांगून गोपाळ निघून गेला.

गोपाळला कृष्णाजीचें घर माहीत होतें. रात्रीं एक काळें कांबळें पांघरून व डोक्याला एक काळें फडकें बांधून गोपाळ कृष्णाजीच्या घरीं गेला. त्यानें एक सुरा बरोबर घेतला होता.

अपरात्रीच्या वेळीं दारावर थाप ऐकून कृष्णाजीनें “कोण?” म्हणून विचारीत दार उघडलें. गोपाळनें लगेच त्याला सुरा दाखविला आणि आवाज बदलून म्हणाला—“बोललास तर सुरा भोसकीन!”

कृष्णाजीच्या सर्व अंगाला भीतीनें घाम सुटला व त्याची बोबडीच वळली. गोपाळनें प्रथम आंतून कडी लावून घेतली आणि कृष्णाजीला म्हणाला—“दाखव, तुझी पैशांची पेटी!”

कृष्णाजीनें कांपऱ्या हातांनीं पेटी आणून दिली. “बरें मी येतों. ओरडा झाला तर तुझें प्रेत चवाठ्यावर टांगून ठेवीन!” असें सांगून गोपाळ दार उघडून व पेटी घेऊन निघून गेला.

कृष्णाजीनें आपल्या बायकोला जागी करून घडलेल्या चोरीचें वर्णन करून सांगितलें.

ती म्हणाली—“पापाचा पैसा पचतो का? गोपाळचाच कोणी मित्र चोर असेल. त्यानें तुझ्या पैजेची गोष्ट ऐकून तुझी खोड मोडण्यासाठीं केली असेल ही चोरी. दोनशें रुपये होते पेटींत! त्याशिवाय सर्व दागिने! उपाशी मरण्याची वेळ येऊन पडली आहे!”

दुसऱ्या दिवशीं गोपाळ कृष्णाजीच्या घरून आणलेली पेटी एका पंच्यांत बांधून घेऊन व्यंकटेशच्या घरीं गेला आणि म्हणाला—“चल, जरा कृष्णाजीच्या घरीं जाऊन येऊं. त्यानें पैज जिंकली म्हणून तूं पैसे दिलेस म्हणतोस. पण त्यानें नव्हे तूं पैज जिंकली आहेस मी हें सिद्ध करून दाखवणार आहें.”

व्यंकटेशला तें सर्व कांहीं कळलें नाहीं. तो गोपाळच्याबरोबर मुकाट्यानें कृष्णाजीच्या घरीं गेला.

कृष्णाजीचें तोंड उतरलेलें होतें. गोपाळनें वरकरणी सहानुभूतीच्या स्वरांत त्याला विचारलें—“काय रे बाबा, असा कां बसला आहेस? काय झालें तरी काय?”

“अहो गोपाळराव, आतां काय सांगूं? अहो, रात्रीं एक चोर दार ठोठावून घरांत शिरला व सुरा दाखवून आमची दागिन्यांची व पैशाची पेटी घेऊन गेला!” कृष्णाजी दीर्घश्वास सोडून म्हणाला.

“मेहनतीची कमाई असेल तर कोठें जाईल? मी पकडून देईन चोराला. तूं बेफिकीर रहा. पण मी आज आतां आलों आहे दुसऱ्याच एका कामासाठीं. काल तूं व व्यंकटेश दोघांनी ऐक पैज लावली होती म्हणें. तूं पैज जिंकलीस व व्यंकटेश-कडून पन्नास रुपये घेतलेस. खरें आहे












ना हें ? तुझें अभिनंदन करायला आलों होतों " गोपाळ म्हणाला.

"होय, सर्व खरें आहे. पण अभिनंदन कसलें करतो आहेस ? आपला तो शहाणपणाच मला भोंवला आहे. पन्नास रुपये मिळविले आणि घालवून बसलों आहें, सहाशें !"

गोपाळनें पेटी काढून दाखविली आणि विचारलें—"हीच पेटी का ?"

कृष्णाजी चकित होऊन गोपाळकडे पाहूं लागला. म्हणाला—"होय, हीच पेटी ! पण तुम्हाला कशी काय ही मिळाली ?"

"रात्रीं मीच नाहीं का घेऊन गेलों ? म्हणजे पैज तूं नाहीं जिकलीस, व्यंकटेशनें जिंकली, हें दाखवायचें होतें मला. म्हणून तूं त्याच्याकडून जे पन्नास रुपये पैजेचे जिंकले होतेस ते प्रथम परत दे आणि त्यानें पैज जिंकली म्हणून पैजेचें म्हणून आणखी पन्नास रुपये दे, म्हणजे एकूण शंभर रुपये काढून दे बघूं मुकाट्यानें. उघड पेटी. पेटींत तेवढे रुपये खात्रीनें असतील, माझ्याजवळ किल्ली नाहीं."

कृष्णाजीनें आपल्या किल्लीनें कुलप उघडून पाहिलें. पेटींतल्या सर्व वस्तु जशाच्या तशा होत्या. त्यानें शंभर रुपये काढून व्यंकटेशला दिले.

व्यंकटेश म्हणाला—"मित्रा ! आपण एका फुकटच्या पैजेखातर रुपये घालवून बसलों होतों. तुझे पैसे घेऊन मी काय करूं ? माझे पैसे दिलेस कीं झालें माझें काम !" व्यंकटेश म्हणाला.

कृष्णाजी खजील झाला. कारण त्यानें व्यंकटेशला फसवून त्याचे पैसे घेतले होते. त्यानें दोघांची माफी मागितली.





# तोंडावरचें पीक

एका गांवीं शंभू नांवाचा एक गरीब मजूर रहात असे. एकदां आठवडाभर दाढी केली नसल्यामुळें त्याचे चार आणे पैसे बांचले. त्यानें विचार केला असेच वर्षभर दाढीचे केस वाढवले तर दहा बारा रुपयांची बचत होईल. बायकोला एक लुगडें विकत घेतां येईल.

त्याची बायको गरोदर होती व माहेरी बाळंतपणाला गेली होती. बाळंत झाल्यावर ती घरीं परत आली व नवऱ्याची वाढलेली दाढी पाहून तिनें थोडेसे डोळे वटारून विचारलें—"हें हो काय ?"

त्यानें सरळ उत्तर देण्याचें बराच वेळ टाळलें. पण बायको हट्टालाच पेटली तेव्हां तो म्हणाला—"कोणतेंहि काम कोणी फुकट करतो का ? कांहीं तरी लाभ होईल म्हणून मी करीत आहें."

"दाढी वाढवल्यानें कसला आला आहे फायदा ?" बायकोनें विचारलें.

तो म्हणाला—"अग !" तुला नाहीं तें कळावयाचें ! अग हें तोंडावरचें पीक आहे. हें पीक विकलें तर पैसे मिळणार नाहींत का ?

"केव्हाला विकणार आहां हें पीक ?" बायकोनें विचारलें.

"आणखी कोणी घेतलें नाहीं तर राजा तरी घेईलच. तुला किती दि[illegible]पासून एक लुगडें घ्यावें म्हणतो आहे. ह्या पिकाची किंमत एक साडी घ्यायला पुरेल एवढी मिळाली तरी काम भागेल !" शंभू म्हणाला.

दोघां नवराबायकोचें तें बोलणें राजा व मंत्री आड उभे राहून ऐकत होते. ते दोघे



वेष पालटून प्रजेच्या गरजांची माहिती मिळावी म्हणून संवयीप्रमाणें त्या दिवशीं राजधानींत फिरत होते.

राजानें दुसऱ्या दिवशीं शंभूला बोलावून आणण्यासाठीं एका शिपायाला पाठविलें. त्या वाढलेल्या दाढीनें कसें जायचें, शंभूला हा विचार पडला. पण काय करणार राजाचा हुकुम, त्याला जावें लागलें.

दरबारांत फक्त राजा व मंत्रीच होते. शंभूनें दोघांना नमस्कार केला. मंत्र्यानें त्याला विचारलें—"कायरे! हें तोंडावरचें पीक विकणार का?" तें ऐकून शंभू चपापला. त्याला या गोष्टीचें आश्चर्य वाटलें कीं थट्टेथट्टेंत आपण बायकोला जें म्हटलें, अगदीं तेंच मंत्री विचारतो आहे हें कसें झालें? धीर करून म्हणाला—"महाराज! मी बायकोच्या मनाचें समाधान करून देण्यासाठीं तें बोललों होतों. आपण ती चूक माफ करावी." असें म्हणत त्यानें राजाचे पाय धरले.

"घाबरूं नकोस मी तुझी चूक दाखविण्यासाठीं तें विचारलें नाहीं. खरोखरींच तुझ्या तोंडावरचें पीक मला विकत घ्यावयाचें आहे." मंत्री म्हणाला.

शंभूला तरीदेखील तें खरें वाटलें नाहीं. तो खरें सांगण्यासाठीं म्हणाला—"दाढीचे पैसे वांचले तर ते बायकोला एका साडीला पुरतील म्हणून मी दाढी वाढविली होती. तोंडावरचें पीक हें मी निव्वळ थट्टा म्हणून म्हटलें होतें. महाराज! माफ करा, गरिबाला!"

"कांहीं असो तूं दाढी वाढविलीस पैशासाठीं. बोल, किती पैसे पाहिजेत तुला या दाढीची किंमत म्हणून?" मंत्र्यानें विचारलें.

दंड करण्याचा हेतू नाहीं हें शंभूला कळलें होतें तरी दाढीची किंमत सांगायला त्याचें मन धजत नव्हतें. शेवटीं हिंमत करून तो म्हणाला—"दहा रुपये!"

मंत्र्यानें ताबडतोब दहा रुपये काढून दिले आणि त्याला न्हाव्याकडे जायला सांगितलें. केस कापून दाढी करून आल्यावर मंत्र्यानें त्याला धोतरउपरणें व त्याच्या बायकोला साडी व चोळी साठीं खण देऊन निरोप दिला.

तो आनंदानें घरीं परत गेला. त्यानें पैसे व कपडे बायकोला दिले.

"तुमच्या या दाढीची किंमत राजानें एवढी दिली?" त्याच्या बायकोला त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसेना.

"दाढी म्हणूं नकोस! तोंडावरचें पीक म्हण. तुला थट्टा वाटली होती. पण पहा हें पीक विकत घ्यायला स्वतः राजानें मला बोलविलें होतें. त्यानें किंमत विचारली व मी दहा रुपये मागितले. शंभर किंवा हजार मागितले असते तरी खात्रीनें मिळाले असते." शंभू म्हणाला.

"होय ना, मग तूं दहाच कां मागितलेस? शंभर किंवा हजार मागितले असतेस तर





आयुष्यभर सुखांत राहतां आलें असतें." बायको म्हणाली.

या गोष्टीवर नवराबायकोचें भांडण झालें. शेजारच्या एका श्रीमंत गृहस्थाच्या बायकोनें तें ऐकलें व आपल्या नवऱ्याला जाऊन तें सर्व सांगितलें.

त्या श्रीमंताची दाढी व केस शिखांसारखे लांब सटक वाढलेले होते. म्हणून त्याला लोक वर्धकेश या नांवानें हांक मारीत. त्याला बायको म्हणाली—" ऐकलें का, शंभू आपली दाढी विकून राजाकडून दहा रुपये घेऊन आला आहे. राजा शंभर किंवा हजारपण द्यायला तयार होता. पण हा मूर्ख दहा रुपयांवर खूष होऊन आला आहे. यावर दोघां नवराबायकोंचें भांडण झालें. त्याच्या एवढ्याशा दाढीला तोंडावरचें पीक हें नांव दिलें राजानें. मग तुमच्या दाढीला राजा काय नांव देईल कोणास ठाऊक! माझ्या मतें तुम्ही जाऊन हें तोंडावरचें पीक राजाला विकून टाकावें. चांगली किंमत मिळेल."

वर्धकेशाला बायकोचा सल्ला पसंत पडला. तरी एकदां मनाची खातरी करून घेण्यासाठीं तो शंभूला जाऊन भेटला आणि सर्व विचारून घेतलें. नंतर त्यानें घरीं येऊन दाढीला छान तेल लावून फणीनें विंचरून खूप सजवलें. नंतर छान कपडे घालून दरबारांत गेला.

राजा दरबारांतच होता. मंत्र्यानें वर्धकेशाला विचारलें—" काय हो, कसे काय आलांत?"

" तसें विशेष कांहीं नाहीं तोंडावरचें पीक विकायला आलों आहें." असें सांगून वर्धकेश आपल्या दाढीवर हात फिरवूं लागला.

राजानें व मंत्र्यानें परस्परांकडे सार्थक स्मित करून एकदां पाहिलें. राजा मंत्र्याला म्हणाला—" तर मग ठरवा सौदा!"



" काय किंमत तुमच्या या पिकाची?" मंत्र्यानें वर्धकेशाला विचारलें.

" तेल लावून विंचरून मोठ्या प्रेमानें मी हें पीक वाढविलें आहे. याची किंमत फार नाहीं, दहा हजार रुपये आहे." वर्धकेश म्हणाला.

" तुम्ही या तोंडावरच्या पिकाचा व्यापार बरेच दिवसांपासून करतां आहां असें दिसतें. चांगला अनुभव आहे आपल्याला. नाहीं तर काल एक मूर्ख आला होता. फक्त दहा रुपयेच मागितले त्यानें. पण एक गोष्ट माझ्या लक्षांत आली नाहीं. काय हो! तुम्ही इतके दिवस हा व्यापार करतां आहां, आणि राज्याच्या अधिकाऱ्यांना तें कळलें कसें नाहीं. या व्यापारांत तुम्हांला इतका फायदा होत गेला आणि तुमच्यावर कर बीर कसा काय लागला नाहीं. तुम्ही आजवर जो कर चुकवीत आलांत त्याबद्दल तुम्हांला एक हजार रुपयांचा दंड करण्यांत येत आहे."

वर्धकेश हात जोडून उभा राहाला व म्हणाला—" महाराज! माफ करा! मी व्यापार केला नाहीं. काल शेजारच्या माणसाकडून तोंडावरच्या पिकाची गोष्ट कळली म्हणून द्रव्यलोभानें मी हें तोंडावरचें पीक विकायला आलों होतों."

तें ऐकून दरबारी हंसूं लागले.

" कोणाला मदत करायला म्हणून राजा कांहीं ना कांहीं कारण काढीत असतो. तुमच्या सारखे मूर्ख लोभी या जगांत आहेत हे महाराजांना माहीत आहे. या खेपेस तुम्हांला माफ केलें. पण पुढें पैशाच्या लोभानें तुम्ही असें कांहीं केलेंत तर दंड भोगावा लागेल." मंत्र्यानें वर्धकेशाला हें सांगून निरोप दिला.





# तीन उपदेश

श्री. रा. म. सोनार

एका गांवीं राजू नांवाचा एक गरीब शेतकरी रहात असे. एक दिवशीं तो आपल्या बायकोला म्हणाला—“या गांवांत राहून दोन्ही पोटें भरतीलसें वाटत नाहीं. म्हणून मी परदेशी जाऊन नोकरी करण्याचा विचार करीत आहें. घरांत तुझ्या पोटापुरतें आहेच. थोडें शेत पण आहे. जें पीक येईल त्यावर भागव.” असें सांगून तो दुसऱ्या दिवशीं निघून गेला.

तो राजधानीच्या गांवीं जाऊन एका श्रीमंत माणसाच्या घरीं नोकरी करूं लागला. मालकानें त्याला अन्नवस्त्र देण्याचें कबूल केलें होतें. मालकीणपण स्वभावानें चांगली होती. म्हणून त्याला कोणत्याहि वस्तूची तूट किंवा कमतरता भासली नाहीं. महिना-अखेर मालक पगार देईल असें त्याला वाटलें होतें. पण महिना गेला, वर्ष संपलें व वर्षामागून वर्षें लोटलीं. वीस वर्षें झालीं तरी मालकानें पगाराचें नांव काढलें नाहीं किंवा यानें तोंड उघडून कधीं विचारलें नाहीं. एक दिवशीं तो आपल्या मालकाला जाऊन भेटला व म्हणाला—“मालक! आपल्या पदरीं इतके दिवस नोकरी केली आतां घरीं जाऊन यावें म्हणतो. हिशोब करून पगाराचे पैसे द्यावे.”

मालक म्हणाला—“पगार ठरलाच नव्हता! तरी वाटखर्चाला म्हणून मी तुला तीन वराह देतो. आणि त्याहून जास्त किमतीचे तीन उपदेश देतो. तूं तें गांठीला बांधून ठेव. तुला आयुष्यभर त्यांचा उपयोग होईल.”

राजू काय बोलणार? निराश व निरुत्तर झाला. स्वतःची चूक त्याच्या लक्षांत आली. नोकरीवर लागला तेव्हांच पगाराची गोष्ट बोलून टाकली असती तर बरें झालें असतें असें त्याला वाटलें. आतां भांडण्यांत काय अर्थ असा विचार करून मालकानें सांगितलेले तीन उपदेश काय ते तरी ऐकून घ्यावे असा विचार करून व मालकानें दिलेले तीन वराह घेऊन म्हणाला—“मालक! आपले तीन उपदेश काय ते सांगावेत.”

“नीट लक्ष देऊन ऐक हं!” असें सांगून मालक म्हणाला—“पहिला उपदेश हा कीं ज्या गोष्टीशीं तुझा संबंध नसेल त्याची चवकशीदेखील करूं नकोस. वाट चालत असतां मध्येंच दुसरी वाट लागली कीं तिकडे वळूं नकोस, हा दुसरा उपदेश व तिसरा उपदेश सर्वांत जास्त महत्वाचा आहे. रात्रीं तुला कोणत्याहि गोष्टीबद्दल राग आला तर सकाळपर्यंत राग आवर. रात्रींच रागाच्या भरांत कांहीं करूं नकोस.”

राजूनें मालकाचा निरोप घेतला आणि आपल्या गांवीं निघाला. राजधानीबाहेर दोन मैल चालून गेल्यावर त्याला एका वाळक्या झाडाखालीं दहावीस उंट उभे दिसले. त्यांच्या पाठीवर मोहरांच्या पिशव्या होत्या. एक मनुष्य झाडावर चढून एकेक



मोहर काढून त्या वाळक्या झाडाला पानासारखी चिकटवीत होता. तें पाहून राजूच्या मनांत त्याला त्याचें कारण विचारावेंसें आलें. परंतु तेवढ्यांत त्याला मालकाचा पहिला उपदेश आठवला व तो कांहीं बोलल्याशिवाय पुढें निघून गेला. परंतु थोड्या वेळानें तो चार पावलें चालून गेला असेल, झाडावरच्या त्या माणसानें त्याला बोलाविलें आणि म्हणाला—“गेलीं कित्येक वर्षें मी हें वेड्यासारखें काम करीत आलों. पण आजपावेतों जो कोणी इकडून गेला त्या प्रत्येकानें मला हें काय असें विचारलें.



तूंच एक न विचारणारा दिसलास. प्रत्येक विचारणाऱ्याचा मी शिरच्छेद केला. त्यांचीं मुंडकीं हीं पहा, पलीकडे पडली आहेत. मला जो कोणी विचारणार नाहीं त्याला या उंटावरचें सर्व धन देऊन मोकळें होण्याचें मी ठरविलें होतें. आज तूंच तसा एक भेटलास. आज पासून हें सर्व धन तुझें." असें सांगून त्यानें राजूला सर्व उंट हांकून न्यायला सांगितले.

राजू आनंदानें उंट घेऊन निघाला. त्याचें भाग्य उदयाला आलें. सतत वीस वर्षें मेहनत करूनदेखील त्याला कांहीं मिळालें नव्हतें. आणि एका दिवसांत एवढें मोठें धन! तो आपल्याबरोबर वीस उंट हांकून घेऊन चालला. त्याला वाटेंत तिघे जण भेटले. ते सोन्याच्या मोहरा चाळीस उंटांवर लादून कोठें तरी चालले होते. त्यानें त्यांना विचारलें—"कोठें चाललां आहां हो?"

"आम्ही चाललों आहों एका मोठ्या बंदराकडे!" ते म्हणाले.

राजू त्यांच्याबरोबर पुढें निघाला. एका जागीं ती वाट दुसऱ्याच दिशेला फुटलेली दिसली. एक जण राजूला म्हणाला "या वाटेनें जाऊं या! प्यायलां शिंदी मिळेल!" पण त्याच वेळीं राजूला त्याच्या मालकानें दिलेला दुसरा उपदेश आठवला—"कोठें जात असतां आपली वाट सोडून दुसऱ्या मार्गावर पाऊल टाकूं नये!" पहिला उपदेश फायद्याचा झालाच होता. म्हणून दुसऱ्या उपदेशाप्रमाणें वागायचें त्यानें ठरविलें.

तो गेला नाहीं तेव्हां ते लोक म्हणाले—"तर मग आम्ही जाऊन येतों. तुम्ही उंटावर थोडें लक्ष ठेवा!" असें सांगून ते निघून गेले.

ते शिंदी पीत असतां कोणत्या तरी कारणावरून कांहीं लोकांनीं त्यांच्यावर मारहाण केली आणि त्यांच्या जवळ जें कांहीं होतें तें लुटून घेऊन निघून गेले. कांहीं वेळानें दुसऱ्या दारू पिणाऱ्यांनीं शिंदीच्या दुकानावरून येऊन राजूला सांगितलें कीं तुमचे मित्र ठार झाले.

राजू आपल्या उंटांबरोबर त्यांचे ते चाळीस उंट देखील घेऊन निघाला. त्यानें उंटांना चरायला सोडलें आणि घरीं गेला. त्यानें दार ठोठावून पाहिलें. बायकोनें येऊन दार उघडलें, पण तिनें नवऱ्याला ओळखलें नाहीं. तिनें विचारलें—"कोण तुम्ही? काय पाहिजे तुम्हांला?"



राजूनें पण स्वतःची खरी ओळख दिली नाहीं व म्हणाला—"मी एक परदेशी आहें. आजची रात्र येथें काढून मग जाईन पुढल्या गांवीं." बायकोची गंमत करण्याची इच्छा होती त्याच्या मनांत.

"माझे धनी घरांत नाहींत. मी एकटी आहें घरीं. म्हणून घरांत नाहीं झोंपतां यायचें आपल्याला. गोठ्यांत जाऊन झोंपा. जेवायचें आहे का तुम्हांला?" राजूच्या बायकोनें विचारलें.

राजूनें होकार दिल्यावर त्याच्या बायकोनें साधी भीठ भाकर खायला दिली. बायकोची ती वागणूक पाहून त्याच्या मनाचें समाधान झालें. त्यानें सकाळी ओळख देऊन तिला चकित करून सोडण्याचें ठरविलें होतें. तो गोठ्यांत जाऊन झोंपण्याचा प्रयत्न करूं लागला. पण त्याला झोंप येईना. त्याची नजर सारखी घराकडे होती.

काळोख पडल्यावर राजूला कोणीतरी पुरुष त्याच्या घरीं आल्याचा भास झाला. त्यानें दारावर थाप दिल्याबरोबर राजूच्या बायकोनें पुढें येऊन दार उघडलें. तो पुरुष आंत गेला व त्यानें दाराला आंतून कडी लावून घेतली. आतांपर्यंत पत्नीच्या

आचरणाविषयीं त्याच्या मनांत मुळीच शंका नव्हता. पण तो त्रयस्थ मनुष्य घरांत शिरलेला पाहून त्याला भयंकर राग आला व तो बायकोला ठार करण्याच्या विचारानें उठला. त्याला वाटलें कीं त्याच्या बायकोनें दुसरें लग्न करून घेतलें असावें. नाहीं तर तिनें मला बाहेर गोठ्यांत झोपायला कां बरें सांगितलें असावें? दोघांचा शेवट केल्या-शिवाय मनाला चैन पडायचें नाहीं. परंतु लगेच त्याला मालकानें दिलेला तिसरा उपदेश आठवला—रात्रीं कोणत्याहि गोष्टीबद्दल राग आला असेल तर त्याबद्दल जें करावयाचें तें दुसऱ्या दिवशीं करावें." म्हणून तो पुन्हां झोपीं गेला.

सकाळीं उजाडल्यावर राजूची बायको एका तरुण मुलाबरोबर आली. तो तिला म्हणाला—"आई! सैंपाकाच्या भानगडींत पडूं नकोस. मी शेतावरून येतांना शेंगा घेऊन येतों. आपण थोड्या खाऊं व थोड्या त्या परदेश्याला देऊं." तो त्याचाच मुलगा होता. राजू परदेशांत गेला तेव्हां त्याची बायको गरोदर होती ही गोष्ट राजूला आठवली.

राजूला ही गोष्ट कळली तेव्हां मालकानें दिलेल्या तिसऱ्या उपदेशाचें महत्व त्याला कळलें. तो धांवत धांवत पुढें आला व त्यानें आपल्या मुलाला पोटाशीं धरलें व म्हणाला—"अरे वेड्या! शेंगा खाऊन किती दिवस जगणार? ईश्वर कृपेनें आयुष्यभर पुरेल एवढें धन लाभलें आहे."

राजूच्या बायकोनें नवऱ्याला ओळखलें त्या पुन्हां भेट झाल्याबद्दल व तो उंटांवर धन लादून घेऊन आला असल्याचें समजल्या-वर तिला जो आनंद झाला तो काय वर्णावा? त्यानंतर त्यांचें पुढील आयुष्य सुखाचें गेलें.





# उत्तरकांड

दुसऱ्या दिवशीं सकाळीं लवण आहाराच्या शोधार्थ मधुपुराबाहेर गेला. त्यावेळीं शत्रुघ्न यमुना नदी ओलांडून मधुपुराच्या मुख्य द्वारावर येऊन थडकला.

दुपारीं लवण शिकार करून आणलेल्या जनावरांना घेऊन तेथें आला. तेथें शत्रुघ्नाला पाहून तो जोरानें हंसला व म्हणाला—"अरे माणसा! तूं स्वत: होऊन माझ्या आहारासाठीं चालून आला आहेस का? छान, छान! तरमग आज चांगलीच मेजवानी आहे!"

शत्रुघ्न म्हणाला—"लवणा! मी तुझा वध करण्यासाठीं आलों आहें. मी दशरथ महाराजांचा सर्वांत धाकटा मुलगा व मी रामचंद्राचा सर्वांत धाकटा भाऊ आहें. माझें नांव शत्रुघ्न. आज माझ्या हातीं तुला मरण आहे."

लवण हंसून म्हणाला—"माझे मामा रावण यांचा जेव्हां तुझ्या भावानें वध केला तेव्हांच मी त्याची पर्वा केली नाहीं. मोठमोठ्यांना मी लोळविलें आहें. तुझ्या-सारख्यांना तर किड्यामुंगीसारखें चिरडून टाकीन. तूं माझ्याशीं युद्धाला आला आहेस नाहीं का? तर मग माझा पराक्रम पहा. मी आपलीं शस्त्रें घेऊन तुझ्या समा-चारास येतों."



"म्हणजे एक थाप मारून समोरून निसटून जाणार आहेस म्हणतोस? पण मी तुला असा स्वस्तांत नाहीं सोडणार." शत्रुघ्न म्हणाला.

लवण दांत ओठ चावून झाडें मुळासकट उपटून शत्रुघ्नावर धांवला. शत्रुघ्नानें एका मागून एक सर्व वृक्ष तोडून टाकले. परंतु एक वृक्ष शत्रुघ्नाच्या डोक्यावर आदळला व तो बेशुद्ध होऊन पडला. तें पाहून लवणाला वाटलें कीं शत्रुघ्न गेला. म्हणून तो आपलें त्रिशूळ आणण्यासाठीं प्रथम आंत गेला नाहीं आणि जनावरें खांद्यावर टाकून आंत जाण्याच्या प्रयत्नांत होता. परंतु तेवढ्यांत शत्रुघ्न शुद्धीवर आला व त्याची वाट अडवून आडवा उभा राहाला. त्यानें, रामानें दिलेला बाण धनुष्यावर चढवून लवणावर सोडला. त्या बाणांतून अग्निवृष्टि होत होती. तो बाण लवणाच्या छातींत मर्मस्थानीं लागला व लवण तत्काळ मरण पावला. शंकराचें त्रिशूळ शंकराकडे परत जाऊन पोंचलें.

नंतर शत्रुघ्नानें मधुपुर नगरींत सैन्यानिशी प्रवेश केला आणि त्यावर राज्य करूं लागला. बारा वर्षे निर्विघ्नपणें राज्य केल्यावर रामाच्या दर्शनाचा विचार त्याच्या मनांत आला व तो लहानसें सैन्य घेऊन अयोध्येला निघाला. त्यानें वाटेंत वाल्मीकि मुनींच्या आश्रमांत मुक्काम केला.

वाल्मीकि मुनींनीं शत्रुघ्नाचा सर्व प्रकारें आदर सत्कार केला. सैन्याच्या आतिथ्याची पण उत्तम व्यवस्था केली. जेवणें झाल्या-वर त्यांनीं वाल्मीकि रचित रामायणाचें श्रवण केलें. ती रामायण कथा चित्र-पटासारखी शत्रुघ्नाच्या डोळ्यासमोर उभी राहाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शत्रुघ्न वाल्मीकि मुनींचा निरोप घेऊन अयोध्येला निघाला. रामाचें दर्शन करून तो रामाला म्हणाला— "रामा! तुझ्या आज्ञेप्रमाणें मी लवण राक्षसाचा वध करून त्याच्या राज्यावर राज्य केलें. परंतु तुझें दर्शन होऊन बारा वर्षें लोटलीं. म्हणून तुझ्या दर्शनासाठीं आलों आहें."

राम प्रेमालिंगन करून म्हणाला— "शत्रुघ्ना! राजाला राज्य करावेंच लागतें. तुला भेटीला यावेंसें वाटेल तेव्हां येऊन खुशाल भेटत जा!" असें सांगून रामानें त्याला निरोप दिला. लक्ष्मण व भरत त्याला पोंचविण्यासाठीं त्याच्याबरोबर दूरवर गेले.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं एक गरीब ब्राह्मण आपल्या पांच वर्षें वयाच्या मुलाचें प्रेत घेऊन राजवाड्याच्या सिंहद्वारासमोर आला व रडूं लागला. आपल्या एकुलत्या एका मुलाचें अकालीं मरण झाल्याचें सांगून तो म्हणाला—"इक्ष्वाकु वंशाचें राज्य चालू असतां व रामासारखा राजा राज्य करीत असतां. ही गोष्ट घडावी याचें मला आश्चर्य वाटत होतें."

रामाला पण, ती गोष्ट कशी घडली हें कळेना. त्यानें वशिष्ठादिक मुनींना बोलावून कारण विचारलें. तेव्हां नारद म्हणाला—





“मला वाटतें कीं कोणी तरी शूद्र कोठें तरी तपश्चर्या करीत असावा. हें धर्मविरुद्ध आचरण आहे. म्हणून ब्राह्मणबालक अकालीं मरण पावला.”

राम लक्ष्मणाला म्हणाला—“तूं त्या ब्राह्मणाचें सांत्वन करून त्या बालकाचें प्रेत तेलांत बुडवून ठेव.” नंतर राम स्वतः पुष्पक विमानांत बसून अनुक्रमें पूर्व, पश्चिम व दक्षिण दिशांकडे गेला. दक्षिणेकडच्या एका सरोवराच्या काठीं एक मनुष्य शीर्षासन करून तपश्चर्या करीत असल्याचें रामाला आढळलें. तें दृश्य थोडें विचित्र होतें. राम विमानांतून उतरून त्या तपस्वी मनुष्याजवळ येऊन म्हणाला—“माझें नांव रामचंद्र. दशरथ महाराजांचा मी मुलगा. तुम्ही कोण व ही तपश्चर्या कोणत्या हेतूनें करीत आहां हें कृपाकरून सांगावें.”

तो तपस्वी म्हणाला—“राजन्! मी एक शूद्र आहें. माझें नांव शंबूक असें आहे. सदेह मुक्ति मिळावी म्हणून मी तपश्चर्या करीत आहें.”

त्याचें बोलणें पुरें होण्यापूर्वींचे रामानें तलवार उपसून त्याचा शिरच्छेद केला. देवांनी पुष्पवृष्टि करून रामाचें अभिनंदन केलें आणि प्रगट होऊन म्हणाले—“तूं त्या शूद्राला स्वर्गप्राप्ति होऊं दिली नाहींस याबद्दल आम्ही तुझे आभारी आहों. माग, तुला पाहिजे तो वर!”

“अकाल मृत्यु आल्यानें मरण पावलेला ब्राह्मण बालक पुन्हां जिवंत व्हावा!” राम म्हणाला.

“शंबूक वध झाल्याबरोबर तो बालक जिवंत झाला आहे!” असें सांगून देव निघून गेले.

तेथून राम अगस्त्यमुनींच्या आश्रमांत गेला. मुनींनीं रामाचें आदरातिथ्य करून एक आभूषण रामाला भेट म्हणून दिलें. राम तें घेऊन म्हणाला—“मुनिवरेण्य! हें एक दिव्य आभूषण दिसतें आहे. हें आपणांकडे कसें काय आलें?” त्या प्रश्नाचें उत्तर म्हणून अगस्त्य मुनींनीं रामाला श्वेत याची कथा सांगितली:

“एक रान होतें. त्याचें क्षेत्रफळ शत सहस्र योजन होतें. त्यांत एक सहस्रयोजन विस्तीर्ण असें एक सरोवर होतें. त्या रानांत पशुपक्षी नव्हते. तलावानजीक एक आश्रम होता. त्या आश्रमांत मी गेलों. एक दिवसभर आश्रमांत राहून सकाळीं मी सरोवरावर गेलों. तेथें मला एक हृष्टपुष्ट माणसाचें प्रेत दिसलें. तें अगदीं चांगल्या-स्थितींत होतें. तें प्रेत तेथें कसें काय आलें या विचारांत मी कांहीं वेळ उभा होतों. इतक्यांत आकाशांतून एक विमान खालीं उतरलें. त्यांत एक दिव्य पुरुष व त्याच्या सेवेका अनेक दिव्य स्त्री-पुरुष मला दिसले. त्यांचें नृत्य, गायन वादनादि चालू होतें. तो दिव्यपुरुष विमानांतून उतरला. त्यानें तें प्रेत खाऊन टाकलें व तोंड धुवून पुन्हां विमानांत जाऊन बसायला निघाला. माझ्या अंगावर अक्षरशः शहारे उभे राहाले.



तेव्हां मी पुढें होऊन त्याला विचारलें—“कोण तूं? असें अखाद्य कां खात आहेस! क्षुद्र प्राणी देखील हें खाद्य खात नाहींत.”

त्या दिव्य पुरुषानें आपल्या पूर्वजन्माची कथा अशी सांगितली—

सुदेव नांवाच्या विदर्भ राजाच्या मुलाचें नांव श्वेत असें होतें. सुदेवाला दोन बायका होत्या. प्रत्येकीला एकेक मुलगा होता. मोठ्याचें नांव श्वेत व धाकट्याचें सुरथ असें होतें. वडील वारल्यावर श्वेत गादीवर बसला. त्यानें कित्येक वर्षें राज्य केलें. शेवटीं त्यानें



सुरथचा राज्याभिषेक करून दिला आणि स्वतः तपश्चर्या करण्यासाठीं रानांत निघून गेला. अनेक वर्षें तपश्चर्या करून त्यानें देह त्याग केला आणि ब्रह्मलोकीं गेला. ब्रह्मलोकीं त्याला पोटभर खायला मिळेना. तेव्हां तो ब्रह्मदेवाकडे गेला. त्यानें ब्रह्मदेवाला विचारलें कीं देवा! मी असें कोणतें पाप केलें आहे कीं ब्रह्मलोकीं देखील माझी उपासमार होत आहे.

तेव्हां ब्रह्मदेव व म्हणाला—"तूं ज्या रानांत तपश्चर्या केलीस त्या रानांत एकहि प्राणी नव्हता. तूं तपश्चर्या करण्यांत इतका गुंग होऊन गेला होतास कीं आतिथ्यसत्कार तुझ्या हातून चुकून देखील कधीं घडला नाहीं. म्हणून तुझी भूक मिटत नाहीं व तहान भागत नाहीं. रानांत जें प्रेत दिसेल तें तूं खात जा. कांहीं दिवसांनीं अगस्त्य मुनि येतील व त्यांच्या कृपेनें तुझी भूक व तहान भागेल."

"मीच अगस्त्य आहें हें कळतांच तो दिव्य पुरुष मला नमस्कार करून म्हणाला—"मुनिवर! मला या कष्टांतून वांचवावें. प्रत्युपकार म्हणून मी हें आभूषण आपणांस देईन. याच्या सहाय्यानें आपणांस सुवर्ण, धन, वस्त्र आभूषण व आहार वगैरे पदार्थ मिळतील."

"मी तें आभूषण स्वीकारलें आणि प्रेत अदृश्य झालें. तो दिव्य पुरुष पण स्वर्ग-लोकीं निघून गेला."

ती कथा ऐकून रामानें अगस्त्य मुनींना विचारलें—"मुनिवरेण्य! श्वेतनें ज्या वनांत तपश्चर्या केली होती त्या वनांत पशुपक्षी कां नव्हते?"

तेव्हां अगस्त्य मुनींनी ही कथा सांगितली—"त्रेतायुगांत चक्रवर्ति मनूचें राज्य होतें. त्यानें आपला मुलगा ईक्ष्वाकु

याचा राज्याभिषेक करवून व राजनीतीचा उपदेश करून ब्रह्मलोकीं प्रस्थान केलें. ईक्ष्वाकूला शंभर मुलगे होते. सर्वांत धाकट्या मुलाचें नांव दंड असें होतें. ईक्ष्वाकूनें त्याला शैवल प्रांताचें राज्य दिलें. दंडनें तेथें मधुमंत नांवाचें एक सुंदर नगर वसविलें आणि शुक्राचार्यांना आपला गुरू मानून राज्य करूं लागला.

शुक्राचार्यांना अरजा नांवाची एक सुंदर मुलगी होती. एकदां दंड एकटा रानांत हिंडत असतां अरजा त्याच्या नजरेस पडली व तिच्याशीं विवाह करण्याची इच्छा त्यानें व्यक्त केली. तिनें ती शुक्राचार्यांची मुलगी असल्याचें सांगून जर कांहीं पापकर्म घडलें तर शुक्राचार्य शाप देतील असें सांगितलें. परंतु दंडनें तिचें कांहीं एक ऐकलें नाहीं व तिच्यावर बलात्कार केला.

दंड मधुमंतला परत गेला तेव्हां शुक्राचार्यांना त्याच्या त्या दुष्कृत्याची वार्ता कळली. तेव्हां त्यांनीं असा शाप दिला कीं मधुमंत नगरीवर धुळीची वृष्टि होईल व मधुमंत नगर व त्याच्या चारीबाजूचा सात योजन प्रदेश धुळीखालीं गडप होऊन जाईल. तो शाप ऐकून नगरांत राहणारे नागरिक ज्याला ज्याला शक्य झालें ते पळून गेले.

शुक्राचार्यांच्या शापाप्रमाणें सात दिवस धुळीची वृष्टि होत राहली व मधुमंत नगर बुडून गेलें.

अशातऱ्हेनें अगस्त्य मुनींच्या आश्रमांत अशाच जुन्या कथा ऐकत राम अनेक दिवस राहाला व त्यानंतर चांगला दिवस पाहून आणि मुनींच्या निरोप व आशीर्वाद घेऊन अयोध्येला परत आला.





# अरण्यपुराण

सिओनीच्या डोंगराळ प्रदेशांतल्या एका गुहेंत एक लांडगा सकुटुंब रहात असे. त्याच्या कुटुंबांत त्याची बायको व चार लहान पिलें होती.

संध्याकाळची वेळ होती सात वाजण्याचा सुमार असेल. चंद्र गुहेंत डोकावत होता. लांडग्यानें एकदां चारी पाय ताठ करून अंगडाई घेतली व उठून उभा राहाला. शिकारी साठीं तो बाहेर निघाला. डोंगरावरून खालीं उतरून जाण्याच्या विचारांत तो होता. तेव्हां त्याला गुहेच्या दारावर सांवली दिसली. "आशीर्वाद लांडगेदादा! तुझ्या मुलांना मोठमोठे सुळे येवोत व धर्माची वृद्धि होवो!" कोल्ह्यानें आशिर्वाद दिला.

कोल्ह्याला पाहतांच लांडग्याच्या कपाळाला आंठ्या पडत. कारण चहाडी सांगण्याची त्याला फार वाईट संवय होती. स्वत: शिकार करायची नाहीं. दुसऱ्याच्या उष्ट्यावर जगणारा तो. तरी लांडग्याला कोल्ह्याची मनांतल्या मनांत थोडी भीति पण वाटे. कारण मधूनमधून त्याचें डोकें फिरे आणि वेड लागलेल्या कोल्ह्याची भीति वाघाला देखील वाटे. कारण वेड लागलेला कोल्हा चावला कीं जें मरण येई तें देखील भयंकरच होतें.

"पहा आंत येऊन पाहिजे तर, आज खायला आंत कांहीं नाहीं." लांडगा कोल्ह्याला म्हणाला.

"तुम्हांला पुरण्या इतकें नसेल हो! पण आमचें पोट भरायला एक वाळकें हाड असलें तरी तें पुरे!" असें म्हणत कोल्हा गुहेंतल्या एका हाडाला लागलेलें



मांस तोडून खाऊं लागला आणि हाड चघळूं लागला मधून मधून बोलत होता— "काय पण छान आहे मांस! तुमचीं पिलें किती गोजिरवाणीं आहेत! मोठ-मोठे टपोर डोळे! अरे हो, विसरलोंच कीं....आहे ना माहीत आपले महाराज वाघोबाची त्यां स्वारी या बाजूला कांहीं दिवसांपासून आली आहे. मला ते म्हणाले, आपण याच प्रदेशांत पुढें शिकार करणार!"

वाघोबा वीस मैलावरच्या वेणगंगेच्या काठच्या रानांत रहात होते.

"हें नाहीं बरोबर! वर्दी दिल्या शिवाय वाघोबांनीं आपला शिकार करण्याचा प्रदेश बदलला तर कसें चालेल? आपल्या जंगलाच्या कायद्याविरुद्ध आहे. या पंचकोशींतल्या जनावरांची त्रेधा उडून जाईल. आणखी मला तर लांडगीणीच्या वतीनें सुद्धां गेले कांहीं दिवस शिकार करावी लागत आहे!" लांडगा म्हणाला.

लांडगीण म्हणाली—"लहानपणा पासूनच तो थोडा चक्रम आहे असें त्याची आई म्हणत असे. वेणगंगेच्या कांठीं त्यानें जसा धुमाकूळ माजविला तसाच येथेंहि माजविणार तो. तो इकडे आला कीं सुखाची झोप मिळणें कठीण आपल्याला."

इतक्यांत एका दरींतून वाघाची डरकाळी ऐकूं आली. लांडगा सकुटुंब दचकला. कोल्ह्यानें हळूच पाय काढला.

"काय पण मूर्ख आहे, अजून चांगला काळोख देखील पडला नाहीं. फुकट आहे गरजणें येथें. इकडच्या रानांतपण रानटी रेडे व हरणें मिळतील शिकारीला!" लांडगा म्हणाला.

"त्याला हरणाची किंवा रेड्याची शिकार नाहीं करायची!" लांडगीण म्हणाली.



"म्हणजे माणसाची शिकार? त्यापेक्षां मांसे व बेडूक मारून खावे त्यानें. कारण शूर जनावरें भितऱ्या माणसाची शिकार नाहीं करीत. हें जंगलाच्या कायद्यविरुद्ध आहे. आणखी एक कारण आहे. माणसाची शिकार करायला जर वाघ निघाला तर मनुष्य हत्तीवर बसून बंदुकीनें त्या वाघाला ठार केल्याशिवाय रहात नाहींत. रानांत आग लावून ढोलकीं वाजवून ते वाघाला घेरून ठार करतात. त्यामुळें रान जळून जातें. वाघ जिवानिशी जातो व आपल्या-सारख्या लहान प्राण्यांना लपायला सुद्धां झाडें झुडपें मिळत नाहींत. आणि हें पहा, जो मनुष्याचें मांस खातो, तो प्राणी मग वाघ असो कीं आणखी कोणी, त्याचें अंग असें सुटतें कीं नंतर शिकार करण्यास अंगांत चपळता उरतच नाहीं. पण हें सर्व त्याला सांगून काय उपयोग?"

तिकडे वाघाचें गरजणें एकदम थांबलें आणि कण्हण्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. "कां बरें असें झालें?" लांडगीणीनें विचारलें. लांडग्यानें बाहेर डोकावून पाहिलें. वाघोबा एका झुडपाआड जमिनीवर कण्हत लोळत होते.

"अगदीं डोकें फिरलें होतें स्वारीचें. लाकडी कोळसे करणारांनीं आग पेटविली त्यांत स्वारीचा पाय पडून भाजला." लांडगा म्हणाला.

तेवढ्यांत लांडगीण म्हणाली—"खबरदार! पुढें जाऊं नकोस! कोणीतरी डोंगरावरून उतरत आहे. लांडगा दबा धरून एकदम उडी मारायला टपून बसला होता. पण तो ढुणदिशी उडी मारून जागच्या जागीं बसला. ओरडला— "अरे! हा तर मनुष्य! मनुष्याचें पिलूं!"

लांडगीण म्हणाली—"पहा, पहा तर, किती गोड व नाजुक आहे तो आणि किती









बहाद्दर! घेऊन ये त्याला. मी कधीं पाहिलें नव्हतें माणसाचें पिलूं!"

लांडगा अलगद उचलून घेऊन आला मुलाला. मुलगा मुळींच रडला नाहीं. कारण त्याला मुळीं लागलेंच नव्हतें. तें मूल लांडग्याच्या पिलांत हिंडूं खेळूं लागलें. त्यांच्या सारखेंच खाऊं पिऊं लागलें. पूर्वी कधीं लांडग्यांनीं मनुष्याच्या मुलाला पाळल्याचें ऐकलें आहे का?" लांडगीणीनें विचारलें.

"ऐकलें होतें बुवा पूर्वीं कधीं पाळलें होतें म्हणून. पण तें आपल्या जन्मापूर्वीं!" लांडगा म्हणाला.

लांडगीण म्हणाली—"एक केस नाहीं त्याच्या अंगावर. त्याचें अंग मी हळूंच खाजवूं लागलें तर ओरबडल्यासारखें रक्त येईल. पण त्याला भीति म्हणून नाहीं.

गुहेच्या दारांत छान चांदणें पडलें होतें. तेथें वाघोबांचें डोकें व पुढले पाय दिसले. "मालक! महाराज! तो याच बिळांत गेला आहे!" एका लहान जनावराचा तो आवाज होता,—कोल्ह्याचा असावा.

"मनुष्याचें पिलूं, माझी शिकार! दे मला! त्याचे आईबाप गेले आहेत कोठें!" वाघोबाबाहेरून गुरगुरले. पाय भाजल्यानें एकतर त्याला राग आला होता. त्यांत तोंडांतली शिकार निसटली होती. परंतु लांडग्याच्या बिळांत शिरणें त्याला अशक्य होतें. तरी वाघ आपलें डोकें खुपसण्याचा यत्न करीत होता. पण फुकट!

"लांडगा स्वतंत्र असतो. तो आपल्या सरदाराव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाचा हुकूम मानत नाहीं. माणसाचें पिलूं आमचें आहे!" लांडगा म्हणाला. (पुढें चालू)



## ५५. नेपालियनची समाधि

वॉटर्लूच्या लढाईत पराभव झाल्यानंतर नेपालियनला सेंट हेलेना येथें कैद करून ठेवण्यांत आलें. तेथेंच त्याला मरण आलें. १८४० मध्यें त्याचा मृत देह पॅरीस येथें या समाधींत पुरण्यांत आला.





# भारताचा इतिहास



३ मार्च १७०७ या रोजीं औरंगजेब मरण पावला. त्याच दिवसापासून मोगल साम्राज्याचा ह्रास सुरू झाला. त्याचे तिघे मुलगे गादी करतां भांडूं लागले. मोठा मुलगा मुअज्जम काबुलचा, दुसरा आजम गुजरातचा व तिसरा कामबक्ष विजापुराचा गव्हर्नर होता. त्यांची गादी करितां आपसांत भांडणें होणार हें ओळखून औरंगजेबानें मरते वेळीं आपलें साम्राज्य त्यांना वांटून दिलें. पित्याच्या इच्छेप्रमाणें मुअज्जम वांटण्या करून घ्यायला तयार होता. पण आजमला तें कबूल नव्हतें. दोघे आग्ऱ्यानजीक जाजौ येथें युद्धाच्या तयारीनें आले. या युद्धांत आजमचा पराभव झाला व तो त्या युद्धांत ठार झाला. नंतर हैदराबादनजीक त्याचें कामबक्ष याच्याशीं युद्ध झालें. त्या युद्धांत पण त्यालाच यश मिळालें. कामबक्ष जखमी झाला व १७०८ मध्यें मरण पावला.

मुअज्जम बहादुरशाह ही पदवी घेऊन गादीवर बसला. तोंपर्यंत त्याला बरेंच वार्धक्य आलें होतें. त्यामुळें मोगल साम्राज्याचा होत चाललेला ह्रास तो थोपवूं शकला नाहीं. २७ फेब्रुवरी १७१२ या रोजीं तो मरण पावला तेव्हां त्याच्या चौघां मुलांत भाऊबंदकी सुरू झाली. तिघां भावांना ठार करून मोठा मुलगा बहादुरशाह हा जुल्फिकारखानाच्या मदतीनें गादीवर बसला. जुल्फिकारखान त्याचा मंत्री झाला.

परंतु बहादुरशाह लालकुमारी नांवाच्या स्त्रीच्या मोहपाशांत पडून तिच्या हातचें बाहुलें झाला. त्यानें नृत्यगान करणाऱ्यांना सर्व सवलती दिल्या. शेवटीं त्याचा पुतण्या फर्रुखसिअर यानें दिल्लीच्या किल्ल्यांत त्याचा गळा दाबून त्याला ठार केलें. १७१३ मध्यें तो गादीवर बसला. त्यानें जुल्फिकारखानाला फांशीची शिक्षा दिली.

फर्रुखसियर याला गादी मिळवून देण्याच्या कामीं हुसेन अली व अब्दुला या दोघां सैयद बंधूंनीं पुष्कळ मदत केली होती. अर्थातच राज्यसूत्रें त्यांच्या हातांत आलीं. फर्रुखसियर अयोग्य व भित्रा होता. मीर जुम्ला इत्यादिकांनीं सैयद बंधूंविरुद्ध त्याचे कान भरले. सैयद बंधूंचे उपकार मानायचे सोडून त्यानें त्यांच्या विरुद्ध कारवाया सुरू केल्याचें सैयद बंधूना कळलें. म्हणून त्यांनीं त्याचे डोळे काढून टाकून त्याचा वध केला.

नंतर सैयद बंधूंनीं नांवापुरता कोणाला तरी गादीवर बसवून त्याच्यावतीनें राज्यकारभार चालू ठेवला. त्यांच्यावतीनें जो कोणी गादीवर बसला त्यांच्यापैकीं बहादुरशाह याचा चवथा मुलगा रोशन यानें सैयद बंधूंचा विरोध केला. महंमद शाह म्हणून तो गादीवर बसला आणि त्यानें दक्खनचा नबाब निजामुल मुल्क याच्या मदतीनें सैयद बंधूंचा वध करविला.

महंमदशाह पुष्कळ दिवस गादीवर होता. पण मोगल साम्राज्याचा ह्रास तो



देखील थांबवूं शकला नाहीं. दख्खन, अवध, बंगाल वगैरे प्रांत स्वतंत्र झाले. मराठे, आग्रा प्रदेशांतील कांहीं जातीचे लोक व पंजाबांतले शीख स्वत:ला स्वतंत्र मानूं लागले. याच सुमारास नादिरशाहानें दिल्लीवर स्वारी केली. औरंगजेबानंतर तीस वर्षांनीं त्याचें साम्राज्य मोडलें.

नादिरशाह इराण देशांतून भारतावर स्वारी करीत आला होता. काबुल, पंजाब वगैरे मुलखांतील गव्हर्नरांनीं त्याला अडविण्याचा यत्न करून पाहिला. मदतीसाठीं त्यांनीं दिल्लीला खलीते पाठविले. पण









दिल्लींत गादीकरतां डावपेच चालू होते व येणाऱ्या संकटाकडे कोणाचें लक्षच नव्हतें.

नादिरशाह खरोखरी चोरांचाच एक सरदार होता. कष्ट सहन करून शौर्य दाखवून त्यानें अफगाणांपासून इराण देशाचें रक्षण केलें. त्यानंतर तो स्वतः त्या देशाचा बादशाह झाला. १७३८ मध्यें तो भारताकडे वळला. १७३९ पर्यंत त्यानें गझनी, काबूल, लाहोर इत्यादि शहरें जिंकलीं. तथापि दिल्लीच्या दरबाराचे डोळे उघडले नाहींत. नादिरशाहचें सैन्य दिल्लीच्या फाटकावर येऊन थडक तेव्हां त्यांचे डोळे उघडले. १७३८ मध्यें मोंगल सैन्य आणि इराणचें सैन्य यांचें मोठें युद्ध झालें. त्यांत बादशाहाचा पराभव झाला व तहाची बोलणीं सुरू करणें त्याला भाग पडलें.

प्रथम दिल्ली शांत होती. परंतु कोणी अफवा उडविली कीं नादिरशाह मेला. झालें, दिल्लीच्या नागरिकांनीं फारसच्या लोकांवर मारहाण करण्यास सुरवात केली. तें ऐकून नादिरशाहाला राग आला. त्यानें दिल्लीच्या नागरिकांची कत्तल करण्याचा हुकूम सोडला. सकाळीं आठ वाजल्यापासून तीन वाजेपर्यंत कत्तल चालू होती. स्त्रियांना गुलाम करून घेण्यांत आलें. घरांना आग लावली. मेले-ल्यांना हिंदू असो कीं मुसलमान पुरून टाकण्यांत आलें. दिल्लीच्या प्रजेकडून तीन कोटी रुपये वसूल करण्यांत आले.

नादिरशाह कोहिनूर हिरा व मयूर सिंहासन घेऊन आणि बादशाहाचा खजिना रिकामा करून निघून गेला. सिंधू नदीच्या आसपासचा प्रदेश फारस देशाचा स्वाधीन झाला.



# नेहरू चरित्र

## [ २५ ]

अखिल भारतीय अधिवेशनांत घटनेचा मसविदा सहजीं तयार झाला. कारण पार्लियामेंट पद्धतीची घटना व लोकशाहीचे मूलभूत सिद्धांत यांची माहिती सर्वांना होतीच.



परंतु धार्मिक गट व अल्पमतवाल्यांचे प्रश्न उद्भवले. त्यांची गुंतागुंत मात्र वाढत गेली. ते प्रश्न सुटत नाहींत हें पाहून मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमेटी नेमण्यांत आली. त्यांत तेज बहादुर सप्रू पण होते. त्या कमेटीला नेहरू कमेटी व कमेटीच्या रिपोर्टला, नेहरू रिपोर्ट ही संज्ञा मिळाली.

जवाहरलालजी तसे स्वतः या कमेटीचे सभासद नव्हते. परंतु कांग्रेसचे कार्यवाह या नात्यानें त्यांना बरोबर रहावें लागे. जवाहरलाल नेहरूंना वाटे कीं स्वातंत्र्याचा प्रश्नच मुख्य असल्यावर कायद्यांच्या जाळ्यांत अडकून राहाणें फुकट आहे. परंतु नेहरू कमेटींत निरनिराळ्या प्रकारचे व विचारांचे लोक होते. त्यांना डोमि-नियन स्टेटसपेक्षां जास्त अधिक कांहीं नको होतें.

नेहरू रिपोर्ट तयार झाल्यावर त्यावर चर्चेसाठीं लखनौ येथें सर्व पक्षांचें एक संमेलन झालें. पूर्ण स्वातंत्र्याहून कमी कांहीं नको असें म्हणणारे जवाहरलालजींसारखे लोक विचारांत पडले. कारण रिपोर्टींत पूर्ण स्वातंत्र्याविरुद्ध कांहीं गोष्टी होत्या. त्यांचें खंडन करावें तर हिंदूमुस्लिम ऐक्यासाठीं जे यत्न चालू होते त्यांना व्याघात येण्याची शक्यता होती.








रस्त्यावर चिटपांखरूं नव्हतें. जवाहरलालजींची तुकडी फक्त एक फर्लांगच गेली असेल, चाळीस पन्नास पोलीस शिपाई त्यांच्या पाठीमागून आले. त्यांच्या लाठीहल्ल्यामुळें तुकडीची वाताहत झाली. स्वयंसेवक रस्त्याच्या दोन्ही बाजूला निघून गेले. कांहीं दुकानांत शिरले. पोलीसांनीं बराच वेळ त्यांच्यावर मारहाण केली.

जवाहरलालजींनीं स्वतःचा बचाव करण्याचा यत्न केला. परंतु ते जेथें उभे होते तेथून हललेमात्र नाहींत. पोलीस त्यांच्या साथी स्वयंसेवकांवर लाठीहल्ला करूं लागल्याचें त्यांना दिसलें. तेव्हां रस्त्याच्या बाजूला जावें असें त्यांना वाटलें. पण त्यांनीं स्वतःला आवरलें आणि ते जेथल्या तेथें उभे राहाले.

त्याच वेळीं एक पोलीस शिपाई लाठी उगारून त्यांच्याकडे येत असलेला त्यांना दिसला. 'जें व्हायचें असेल तें होईल' असा विचारकरून व तोंड फिरवून ते जागच्या जागीं उभे राहाले. पोलीसानें दोनदां त्यांच्यावर लाठीप्रहार केला. ते स्वस्थ बसून होते. सर्व अंग एकदां हादरून गेलें. तथापि उभें राहण्याची शक्ति अंगांत आहे हें पाहून त्यांना बरें वाटलें.

नंतर पोलीस शिपाई रस्ता अडवून उभे राहाले. स्वयंसेवकदेखील एका जागीं जमा झाले व रस्त्यावर धरण देऊन बसले. कित्येकांना डोक्याला लागलें होतें व सर्व अंग रक्तानें माखलेलें होतें. काळोख पडला. शेवटीं अधिकाऱ्यांनीं त्यांना जिकडे जावयाचें होतें तिकडे जाऊं दिलें नाहींच, उलट ते स्वतः पुढें निघाले व त्यांना पण बरोबर घेऊन निघाले.





# पाताळ कोट

[ २ ]

[कदंब राजाचे चार दूत दोघां कैद्यांना पकडून घेऊन कुंतलदेशाच्या राजाकडे आले व निवेदन केलें की त्या कैद्यांनीच मंत्र्याच्या मुलाचा व त्याच्या दोघां मित्रांचा वध केला. ते स्वदेशीं परत जात असतां कुंतलदेशाच्या सैनिकांनी दोघांच्या गळ्यांत फांस टाकून त्यांना ठार केलें व कैद्यांना सोडविलें. पुढें---]

कदंब राजाचे दोघे दूत आपल्या घोड्यावर बसून ओढ्यापलीकडील आपल्या देशाच्या सरहद्दींत पोंचले. कुंतल देशाच्या सैनिकांनीं मारलेला बाण एकदेखील त्यांना लागला नाहीं. अर्धी रात्र लोटली होती. थोडें चांदणें पडलें होतें व चारी बाजूला जंगल. म्हणून नेम धरून बाण सोडणें पण शक्य नव्हतें.

"ओढा पार करून त्या दूतांचा पाठलाग करण्यांत धोका आहे. कदंब राज्याच्या सरहद्दीवरचे पाहरेकरी येतील धांवून त्यांच्या मदतीला. तें कांहीं झालें तरी त्या दुष्टांना जिवंत सोडून देणें देखील बरोबर नाहीं. बोला, तुमच्यापैकीं कोण जाऊन त्यांचा पाठलाग करायला तयार आहे? त्यांना ठार करून येणाराला मंत्री मुनसुराद बक्षिस देतील!" कुंतल देशाचा सरदार सैनिकांना म्हणाला.

तें ऐकून धूमक पुढें होऊन म्हणाला "मी व सोमक हें काम करायला तयार



आहों. आम्हांला बक्षिसाबिक्षिसाची गरज नाहीं. या दूतांनाच नव्हे तर कदंब देशाच्या मंत्र्याचा वध केल्याशिवाय आमच्या मनाचें समाधान होणार नाहीं. या दुष्टांनीं आमच्या-वर आरोप लावला तसे आम्ही पितृहंतक किंवा भ्रातृहंतक मुळींच नाहीं. आम्ही खेडूत आहों. उग्रसेनानें आमच्यावर मनांत आले ते कर आम्हां खेडुतांवर लावायला सुरवात केली तेव्हां आम्ही त्याविरुद्ध चळ-वळ सुरू केली."

"आमच्या मंत्र्याला पण तेंच वाटलें. तुम्ही खुनी नाहीं, या गोष्टीची त्यांना खात्री होती. म्हणूनच त्यांनीं तुम्हां दोघांना मुक्त करा म्हणून आज्ञा केली होती. आतां बोलण्यांत वेळ फुकट घालविण्यांत अर्थ नाहीं. हे घोडे घ्या आणि या तलवारी घ्या. जा त्यांचा पाठलाग करा. बक्षिसें हवीं असतील तर त्या दुष्टांची डोकीं मंत्र्यासमोर आणून ठेवावी लागतील." सरदार म्हणाला.

धूमक व सोमक घोड्यावर बसून व तलवारी घेऊन लगेच त्या दोघां दूतांचा पाठलाग करीत निघाले. दूत ओढा ओलांडून गेले होते त्याच जागीं ते पण ओढा ओलांडून गेले. पाठलाग करीत ते कदंब नगराकडे निघाले.

तो डोंगराळ प्रदेश होता. मोठमोठे वृक्ष होते वाटेंत. फिरं दाट झाडी होती व काळोख. त्यांना तिकडे जाणें योग्य वाटलें नाहीं. कारण रानटी श्वापदें पाणी प्यायला तिकडे येत. एका पायवाटेनें ते जाऊं लागले. फार सावधपणें दोघे पुढें जात होते. परंतु बराच वेळ चालल्यावर देखील त्यांना त्या दूतांचा मागमूस लागला नाहीं.

"सोम! या काळोखांत त्या दुष्टांना पकडणें सोपें नाहीं. पहिल्यानें आपण आपल्या गांवीं जाऊन तिकडील हालहवाल



काय आहे हें पाहून येऊं. आपल्या मुला-बाळांना राज्याच्या हद्दी बाहेर कुंतल राज्यांत पोंचतें करूं." धूमक म्हणाला.

सोमक नकारार्थी मान हलवीत म्हणाला-"उग्रसेन राजाचा मुडदा पाडल्याशिवाय माझ्या मनाला चैन पडणार नाहीं! मी नाहीं येत घरीं. कर दिला नाहीं म्हणून भ्रातृ-हंतक होण्याचा खोटा आरोप!"

"सोम! तूं आपला हट्ट सोड! तुला काय वाटतें कीं राजा असा सहजीं आपल्या हातीं येईल. त्याचे अंगरक्षक डोळ्यांत तेल घालून सतत त्याच्या जवळ असतात. फक्त तुझ्यावरच अत्याचार त्यानें केला आहे, असें नाहीं. मी पण नाहीं का कष्ट सोसले. हे पळून गेलेले दूत जाऊन आपल्या विरुद्ध तक्रार सांगणार कीं त्या दोघां दूतांच्या वधाला कारण पण आपणच! मग आपल्या मुलांबाळांवर जो प्रसंग ओढवेल त्याचा थोडा विचार कर." धूमक म्हणाला.

तें ऐकून सोमक थोडा शांत झाला. प्रथम मुलाबाळांना सुरक्षित कोठेंतरी पोंचतें करणें आवश्यक आहे हें त्याला पटलें. म्हणाला-"ठीक! तूं म्हणतोस तसें करूं या!" असें सांगून सोमकनें घोडा वळवला.



धूमकदेखील घोडा वळवणार इतक्यांत राजधानीच्या बाजूनें त्यांना उजेड दिसला. दोघांनीं चकित होऊन तिकडे पाहिलें. किल्ल्याच्या तटावरून मशालवजा बाण जंगलाच्या बाजूनें येऊन पडूं लागले. नगारे, ढोल वगैरे रणवाद्यें वाजूं लागलीं.

"राजधानीला आपल्या लोकांनीं वेढा दिला असावा. राजा ठार झाला! चल, आपण तिकडेच जाऊं!" म्हणत सोमक तिकडे निघाला.

धूमक त्याला अडवून म्हणाला-"घाई नको करूंस! कदंब नगराला वेढा देण्याची



शक्ति आम्हां गरीब खेडुतांच्या अंगात कोठून येणार? आपण अविचारानें राजधानीच्या बाजूनें गेलों तर स्वतःच कैद होऊन जाऊं. पायवाटेवरून जरा बाजूला येऊन आडीतून पाहूंया काय भानगड आहे ती आणि बाण कोठून कोणावर येत आहेत, हेंदेखील कळेल."

सोमकला वाटत होतें तसें तें गांवकऱ्यांचें बंड नव्हतें. तो ओरडा दुसराच होता. मध्यरात्रीच्या सुमारास एक बलवान महाकाय किल्ल्याचा खंदक पार करून नगराच्या मुख्यद्वारावर गेला आणि त्यानें दार ठोठावलें.

"कोण तो? मूर्ख! उजाडेपर्यंत फाटक नाहीं उघडत, माहीत नाहीं वाटतें?" त्याला द्वाररक्षक म्हणाले.

"मी कोण? राजाधिराज आहे मी!" म्हणत त्या महाबलीनें जोरानें दारावर एक मुक्का मारला आणि तुकडे तुकडे होऊन दार कोसळलें. कांहीं द्वाररक्षक त्याच्या खालीं चेंगरून मेले. बाकींनीं बाहेरून येणाऱ्या एका पर्वतासारख्या महाकाय राक्षसाला पाहिलें तेव्हां बेशुद्ध होऊन खालीं पडले.

"तुम्ही मेल्याचें सोंग करीत आहां, करा! जिवंत असतील त्यांनीं तोंडांतून ब्र काढला तर त्यांच्या माना देठासारख्या खुडून टाकून देईन." महाकाय राक्षस म्हणाला.

तें पाहून कांहीं द्वाररक्षकांनीं भयभीत मुद्रेनें एकदां त्याच्याकडे पाहिलें. त्या राक्षसाच्या अंगावर वाघाची व इतर रानटी श्वापदांचीं कातडीं होतीं. डोळ्यांतून जणूं कांहीं ठिणग्या पडत होत्या. डोक्याला शिंगें होतीं आणि हातांत एक लोखंडी कांटे असलेली गदा होती.

"राक्षस प्रभो! तूं कोणत्या लोकांतून आला आहेस हें नाहीं आम्हांला माहीत. गांवांत वाटेल त्याला तूं खा. पण मुख्यरस्त्यावर डाव्या बाजूला तांबड्या रेघा असलेल्या घरांतल्या लोकांच्या वाटेस जाऊं नकोस. त्या घरांत माझीं मुलें बाळें आहेत." एक द्वाररक्षक म्हणाला.

राक्षस जोरानें हंसला व म्हणाला—"मूर्खा! मी मनुष्यांना खाण्यासाठीं दुसऱ्या कोणत्यातरी लोकांतून आलों आहे असें नको समजूस. मी दंडकारण्यांत राहणारा राक्षस आहे. आमच्या राजाची इच्छा मानवजातींतल्या राजकन्येशीं लग्न करण्याची आहे. तुमच्या राजकन्येच्या सौंदर्याची प्रसिद्धी ऐकली आहे. म्हणून आलों आहें."

महालाच्या सिंहद्वारावर दोन पाहारेकरी पाहारा देत होते. चार पाहारेकरी आणखी एका जागीं बसून गप्पा मारीत होते. राक्षस त्यांच्या समोरच्या रस्त्यावरील झाडांच्या आड काळोखांत कांहीं वेळ उभा राहाला. तो दरवाज्यापर्यंत गेला आणि एकाएकीं थांबला. कांहीं अंतर पुन्हां झाडांच्या खालून लपत छपत राजवाड्याच्या तटाजवळ आला. त्यावर चढून आंत उडी मारीत असतां त्याचा एक पाय तटाला



लागला व तटाचा तो भाग खालीं कोसळला. मोठा आवाज झाला.

राजवाड्यांत खळबळ उडून गेली. 'शत्रु-सैन्य' 'शत्रु सैन्य' असा ओरडा झाला. आणखी एका बाजूनें 'भूकंप!' राजवाड्यांतले लोक धांवत बाहेर आले. तट कोसळलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

राजकुमारी कांतिसेनेची झोंप मोडली. ती देखील खोलींतून बाहेर निघून आली. काय भानगड आहे पाहूं लागली. तिच्या दोघी दासी तिच्याबरोबर होत्या. "किती ओरडा केला लोकांनीं? म्हणे भूकंप झाला!"

घाबरल्यासारखे डोळे मोठे करून तिनें कोसळलेल्या तटाकडे बोट दाखविलें.

राक्षस बोलल्याशिवाय जिना चढून वर गेला. तेथें राजकन्या होती. वाटेंत कोणी नोकर चाकर भेटला नाहीं. सर्व मशाली घेऊन त्या पडक्या भिंतीजवळ गेले होते.

तो वर पोंचला तेव्हां त्याच्या डोक्याची सांवली राजकुमारी उभी होती तेथें जाऊन पडली. ती पाहून तिच्या दासी घाबरून गेल्या. आकाशांतून कोणाची तरी सांवली पडली असावी असें वाटून त्यांनीं आकाशाकडे पाहिलें. पण तोंपर्यंत राक्षस वर आलेला होता. तो हळूच म्हणाला—"मी तुमच्या वाटेला जाणार नाहीं. तरी कोणी बेशुद्ध होणार असेल तर होऊं दे. पण जर का कोणी ओरडून लोकांना बोलाविलें तर गळा घोटून जीव घेईन."

राजकुमारी त्याला पाहतांच बेशुद्ध होऊन पडली. सर्वांनीं तिला जमिनीवर पडूं न देतां अलगद वरच्या वर धरलें. राक्षस जवळ आला व त्यानें कांतिसेनेला हळूच उचललें आणि खांद्यावर टाकलें. तो तिच्या दासींना म्हणाला—"तुम्ही राजकुमारीहून कमी सुंदर दिसत नाहीं. येतां का माझ्याबरोबर? शूर, साहसी अशा आमच्या जातींतल्या तरुणांशीं तुम्ही लग्न करून घ्या. त्यांच्या सौंदर्याविषयीं चवकशी करण्याची सुद्धां गरज नाही. मी आहेच तुमच्यासमोर उभा! यावरून येईल तुम्हांला थोडी कल्पना."

तें ऐकून सर्व दासी तेथल्या तेथें बेशुद्ध होऊन पडल्या. कांतिसेनेला बाहुलीसारखी उचलून घेऊन राक्षस झपाझप पायऱ्या उतरून निघून गेला. किल्ल्याच्या तटापलीकडे कसें जावें या विचारांत तो थोडा थबकला. त्याच वेळीं एक नोकर त्या











बाजूला आला. राक्षसाला पाहून तो ओरडला—"राक्षस! राक्षस! राजकन्येला उचलून घेऊन जातो आहे."

राक्षस धांवत बागेकडे गेला आणि झाडांच्या खालीं काळोखांत जाऊन उभा राहिला. राजाच्या नोकरांना विनाकारण ठार करणें त्याला आवडलें नाहीं. म्हणून तो मशाली, तलवारी व इतर शस्त्रास्त्रें घेऊन येणाऱ्यांवर धांवला नाहीं. त्यानें तटाच्या भिंतीवरून खालीं उडी मारली व किल्ल्याच्या फाटकाकडे धांवला.

तोंपर्यंत उग्रसेन राजा व मंत्री उठून राजवाड्याच्या गच्चीवर आले होते. उग्रसेनाला पळत जाणाऱ्या राक्षसाच्या खांद्यावर राजकन्या कांतिसेना दिसली. कांहीं सैनिकांनीं त्याच्यावर बाण सोडले. त्यांपैकीं कांहीं त्याला लागले. पण त्याला त्याची फिकीर नव्हती. तो राजधानीच्या मुख्य द्वारांतून बाहेर जाऊन जंगलांत शिरला व पळूं लागला.

"किल्ल्याच्या बुरजावरून अग्निबाण सोडून त्यांच्या उजेडांत राक्षस कोठें पळत आहे तें पहा. इकडे घोडेस्वारांना सज्ज व्हायला सांगा. त्यांना पाठवा त्याचा पाठलाग करायला. राक्षसाला मारण्यासाठीं मी स्वतः पाठीमागून येत आहें." उग्रसेन ओरडून हुकूम सोडीत होता. लगेच सैनिकांनीं बाणांना मशालीसारखी फडकीं गुंडाळून व त्यांवर तेल ओतून व पेटवून राक्षस गेला होता त्या दिशेला सोडायला सुरवात केली. त्या मशालींच्या उजेडांत घोडेस्वार व इतर लोक नगराच्या द्वारा बाहेर जंगलांत राक्षसाचा पाठलाग करीत निघाले.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# आत्मघातक मंत्र विद्या

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें व गुपचूप स्मशानाच्या दिशेनें चालूं लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझी सहनशक्ति खरोखरच विचित्र आहे. कदाचित तूं सिद्धि किंवा मंत्रबल प्राप्तीसाठीं प्रयत्न करीत असशील. तर मला असें सांगावयाचें आहे कीं तुझा तो प्रयत्न त्या ब्राह्मण कुमारांसारखा व्यर्थ आहे ज्यांनीं मंत्रबल व दैवीशक्ती यांचा लाभ करून घेतला होता तरी त्यांचा सर्वनाशच झाला. त्यांची गोष्ट मी तुला सांगतों. ऐक." असें सांगून तो गोष्ट सांगूं लागला.

कुसुमपूर नांवाच्या राज्यांत ब्राह्मणवाडा नांवाचें एक गांव होतें. त्या गांवीं विष्णु-

## वेताळाच्या गोष्टी

स्वामी नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला चार मुलगे होते. मौंजीबंधन झाल्यानंतर ते वेदाध्ययन करूं लागले. पुढें एका एकीं आजारी पडून त्यांचे आईवडील वारले, मुलें पोरकीं झालीं. मुलें आजोळीं जाऊन राहूं लागलीं. आजोळ यज्ञस्थल नांवाच्या गांवीं होतें. परंतु त्या मुलांच्या भाग्यानेंच पाठ फिरविली व त्यांच्या मामाच्या घरीं गरीबी आली.

अशा स्थितींत मोठा भाऊ एकदां स्मशानांत गेला. तेथें त्याला एक प्रेत दिसलें. हें प्रेत देखील जास्त भाग्यशाली आहे, असें त्याला वाटलें. त्यानें दोरीचें एक टोक झाडाच्या फांदीला बांधून दुसरें गळ्याला घट्ट बांधून घेतलें व झाडावरून खालीं उडी मारली. पण दोरी तुटली व तो जमिनीवर बेशुद्ध स्थितींत आदळला.

तो शुद्धीवर आला तेव्हां एक वयस्क गृहस्थ त्याच्या तोंडावर पाणी शिंपडून व आपल्या पंचानें वारा घालून त्याला शुद्धीवर आणण्याचा यत्न करीत असल्याचें त्याला दिसलें. तो म्हणाला—"बाळ! तूं तर शिकला सवरलेला दिसतो आहेस. पापाचीं फळें प्रत्येकालाच भोगावी लागतात. पुण्य कार्य केल्यानें पापापासून मुक्ति मिळते, हत्या करून घेतल्यानें." असें सांगून तो निघून गेला.

मोठा भाऊ परत घरीं गेला आणि त्यानें स्मशानांत घडलेलें वृत्त आपल्या भावंडांना वर्णन करून सांगितलें म्हणाला—"मी रानांत जाऊन आतां तपश्चर्या करणार. निदान पुढल्या जन्मीं तरी गरिबी नशिबीं येऊं नये."

तें ऐकून त्याचे भाऊ म्हणाले—"दादा! धनाभावीं दुःख व कष्ट सहन करावेच लागतात. लक्ष्मी चंचल आहे. आज आहे उद्यां नाहीं पण यत्न करणें हें प्राप्त आहे. काहीं मंत्र विद्या संपादन करतां आली तर पाहूं." त्याप्रमाणें चौघेजण चार दिशेला निघाले. एका निश्चित वेळीं पुन्हां भेटण्याचें पण ठरलें.

ठरल्याप्रमाणें चौघे भेटले आणि कोणी कोणती विद्या शिकून घेतली आहे याची परस्परांकडे चवकशी करूं लागले.

एक भाऊ म्हणाला "कोणत्याहि प्राण्याचें हाड मिळालें तर मी मंत्रविद्येनें त्यावर मांस चढवूं शकेन."

"मी त्याच्या त्वचेवर रोम-उगवूं शकेन." दुसरा म्हणाला.





"सर्व शरीर बनवून देण्याची विद्या मला अवगत आहे." तिसरा म्हणाला.

"शरिरांत प्राण प्रतिष्ठा करण्याची विद्या मला अवगत आहे." चौथा म्हणाला.

आपल्या विद्येचा प्रताप दाखविण्यासाठीं ते हाडांच्या शोधार्थ निघाले, रानांत एका जागीं त्यांना एक हाड मिळालें. तें एक सिंहाचें हाड होतें. हाडावर मांस चढविण्याची विद्या अवगत असलेल्या भावानें त्यावर मांस चढवलें. दुसऱ्यानें त्यावर त्वचा व रोम चढविले. तिसऱ्यानें सर्व शरीर निर्माण केलें. तें एक सिंहाचें शरीर होतें. चौथ्यानें भीतभीतच त्या शरिरांत प्राणप्रतिष्ठा केली. त्याबरोबर त्या सिंहानें चौघांना खाऊन टाकलें.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"त्या चौघांपैकीं कोणाच्या अपराधामुळें चौघांचा जीव गेला? या प्रश्नाचें उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"सिंहाच्या देहांत प्राणप्रतिष्ठा करणाऱ्या भावालाच सर्व पाप लागणार! त्यानें सिंहाची सृष्टी केली नाहीं असें कोणी म्हणेल. परंतु सृष्टी होण्यापूर्वीं तिघांना कोणत्या प्राण्याची सृष्टी होत आहे या गोष्टीची कल्पना देखील नव्हती. प्रत्येकानें आपापल्या विद्येच्या प्रतापाचें प्रदर्शन केलें होतें. परंतु चौथ्यानें सर्व माहीत असून सुद्धां डोळे मिटून काम केलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# मनांतलें ओळखलें

एका गांवीं एका गरीब बाईला तीन मुलें होतीं. तिला तिसरा मुलगा झाला तेव्हां तिच्या पतीला मरण आलें. कांहीं दिवसांनीं ती स्वतः आजारी पडली तेव्हां तिनें आपल्या दोघां मोठ्या मुलांना जवळ बोलावून त्यांना समजावून सांगितलें कीं त्यांचा धाकटा भाऊ चिदंबर अजून लहान आहे. त्याला कोणत्याहि प्रकारें त्रास होता कामा नये. त्याला त्रास झाला तर तिच्या आत्म्याला शांति मिळणार नाहीं. दोघां मुलांनीं आईनें त्यांच्यावर टाकलेलें काम पुरें करावयाचें कबूल केल्यावर त्या गरीब बाईनें डोळे मिटले.

चिदंबरचे दोघे भाऊ शेती करीत व आपल्या लहान भावाचें प्रेमानें भरणपोषण करीत. अगदीं राजकुमारासारखा तो लहानाचा मोठा झाला. आपल्या मोठ्या भावांनीं चिखलांत उभे राहून शेतकीचीं केलेली कामें पाहून त्याला कमीपणा वाटूं लागला. कारण तो इस्तरी केलेले उत्तमोत्तम कपडे घालून हिंडे फिरे. पण त्याचे भाऊ गांवंढळासारखे रहात. त्याला वाटे कीं आपण पालखींत किंवा अंबारींत हिंडावें.

धाकट्या भावाचा उडाणटप्पूपणा वाढतच गेला. पण त्याच्या दोघां भावांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. कारण त्यांनीं आईला वचन दिले होतें.

कांहीं दिवसांनीं दोघां मोठ्या भावांचीं लग्नें झालीं. चिदंबर घरांत लाडोबासारखा वाढलेला, त्याच्या भावजयींना आवडला नाहीं. त्यांनीं आपापल्या पतीला सांगितलें.



ते म्हणाले—" हें पहा, आम्ही आईला वचन दिलें होतें, त्याला कांहीं कष्ट किंवा त्रास होऊं देणार नाहीं."

" कष्ट कोण घायला सांगत आहे? त्याला लहानपणीं जेवणाखाणाचा त्रास होऊं नये एवढाच त्याचा अर्थ होता. त्याला आयुष्यभर पोळासारख्या पोसण्याचें वचन नव्हतें दिलें. याशिवाय त्याचें लग्न होणार. त्यानें स्वतःच्या पायावर नको का उभे रहायला?" त्यांनीं आपापल्या परीनें आपल्या आपल्या नवऱ्याची समजूत घातली. दोघां भावांना ती गोष्ट पटली. दोघांनीं वांटण्या करून घेऊन आपापला संसार निरनिराळा थाटला. चिदंबरला वांटा म्हणून मिळाला वडिलोपार्जित घर आणि घरांतल्या सर्व वस्तु.

चिदंबर आतां एकटा पडला. त्याला स्वतःच्या उदर निर्वाहाची काळजी वाटूं लागली. स्वतःच सैंपाकदेखील करावा लागे. एक दिवशीं तो उपाशीच पडून राहाला आणि झोंपीं गेला.

त्याला एक स्त्री स्वप्नांत दिसली. ती त्याला म्हणाली—" बाळ! मी तुझी आई! तुझ्या मनांत निरनिराळ्या महत्वाकांक्षा आहेत. पण ईश्वरकृपेशिवाय त्या पुऱ्या होणें शक्य नाहीं. दुसऱ्याच्या मनांतली गोष्ट ओळखण्याची दिव्य शक्ति मी तुला देतें. त्या शक्तीचा सदुपयोग करून तूं आयुष्यभर सुखी रहा. खेडेगांवांत राहाणें ज्यांना कठीण वाटतें त्यांना शहरांत जाऊन रहावें लागतें. तूं राजधानींत जाऊन रहा आणि राजाश्रय संपादन कर.

सकाळीं झोंप मोडली तेव्हां " खेडेगांवांत राहणें कठीण झालें कीं शहरांत जाऊन रहावें!" हा प्रतिध्वनी त्याच्या कानांत घुमूं लागला. तो कोणाला कांहीं सांगि-तल्याशिवाय राजधानीच्या गांवीं गेला व राजवाड्यांत जाऊन तेथील अधिकाऱ्याजवळ कांहीं तरी काम देण्यास विनंती केली. चिदंबर अंगापिंडानें धडधाकट आहे हें पाहून अधिकाऱ्यानें त्याला दारावर पाहारा देण्यासाठीं नेमलें.

एकदां राजाकडे एक सामंत राजा आला. तो आंत जात असतां चिदंबरनें त्याला लक्षपूर्वक पाहिलें व धांवत जाऊन नोकरीवर नेमणाऱ्या अधिकाऱ्याला म्हणाला—" आतां आंत गेलेला मनुष्य दुष्ट आहे. तो आपल्या महाराजांचा वध करण्याच्या हेतूनें आला आहे. विष लावलेला सुरा त्यानें लपवून ठेवलेला आहे."

त्या अधिकाऱ्यानें प्रथम चिदंबरच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें. पण त्यानें जास्तच आग्रह केला व तो जवळ जवळ पाठीसच लागला तेव्हां त्यानें त्याला मंत्र्याकडे नेलें. मंत्र्यानें त्याला विचारलें—" तूं ज्यांच्यावर असा संशय करीत आहेस ते कोण आहेत हें माहीत आहे का तुला? ते महाराजांचे एक मित्र आहेत. तूं मित्रद्रोह केल्यासारखे होईल. तुझें डोकें उडविलें पाहिजे."





"प्रथम त्या दुष्टाची झडती घ्या. माझें म्हणणें चूक ठरलें तर आपण द्याल ती शिक्षा भोगायला मी तयार आहें." चिदंबर म्हणाला.

मंत्री राजाकडे गेला तेव्हां तो सामंत राजा महाराजांना म्हणत होता—"महाराज! आपणांजवळ मला एकांतांत कांहीं बोलावयाचें आहे." असें सांगून राजानें त्याला आपल्या खास महालांत पाठविलें व आपल्या पाहरेकऱ्याला म्हणाला—"मी सांगेपर्यंत कोणी आंत येऊं नये. याची काळजी राख!" असें सांगून राजा स्वतः आंत निघाला तेव्हां मंत्र्यानें चिदंबरनें सांगितलेली गोष्ट कळविली. राजाला आश्चर्य वाटलें व त्यानें झडती घ्यायला परवानगी दिली.

मंत्री कांहीं सैनिकांबरोबर आंत गेला व सामंत राजाला म्हणाला—"क्षमा करा! आमच्या नियमाप्रमाणें महाराजांच्या भेटीस येणाऱ्या प्रत्येकाची आम्हांला झडती घ्यावी लागते. तें ऐकून त्याचा चेहरा खाड्कन खालीं उतरला. झडती घेत असतां विषांत बुडवलेला सुरा सांपडला. त्यावर शत्रूराजाची मुद्रापण होती.

सामंत राजाला शिरच्छेदाची शिक्षा देण्यांत आली व चिदंबरला राजाचा खास अंगरक्षक म्हणून नेमण्यांत आलें. आतां तो राजवाड्यांतच रात्रंदिवस राहूं लागला. राणी वारल्याला अनेक वर्षें लोटली होतीं. राजाला एक मुलगी व दोन मुलगे होते. दासदासी त्यांच्या सेवेला नेहमीं हजर असत.

एकदां एक दासी राजाचें ताट घेऊन येत असतां चिदंबरनें तिच्याकडे लक्षपूर्वक पाहिलें. ती निघून गेल्यावर तो राजाला म्हणाला—"महाराज! या जेवणाला आपण हात लावूं नये. यांत विष कालविलें आहे. या दासीला शत्रू राजानें लांच दिली आहे. ती एका चिठ्ठींत आपल्याला विष दिल्याची गोष्ट लिहून खिडकींतून बाहेर टाकील."

राजानें आपल्या अन्नांतले दोन घास मांजराला घातले. खाल्ल्याबरोबर मांजर जमिनीवर तडफडून मरून गेलें. त्या दिवशीं रात्रीं दासीच्या खिडकीजवळ एक मनुष्य आला. त्याला तिनें एक चिठ्ठी दिली. जवळच लपून बसलेल्या राजाच्या हेरांनीं त्याला पकडलें व त्याच्या हातांतून तें पत्र काढून घेतलें. पत्रांत राजाला विष दिल्याचें लिहिलें होतें.

दुसऱ्याच्या मनांत काय आहे हें ओळखण्याची अद्भुत शक्ति पाहून राजा चकित झाला. चिदंबरनें राजाला त्याच्या आईनें स्वप्नांत येऊन ती शक्ति दिली असल्याचें सांगितलें.

"तरमग माझ्या अधिकाऱ्यांत विश्वासपात्र कोण नाहीं हें सांग." राजानें विचारलें.

राजानें सर्वांकडे न्याहाळून पाहालें व म्हणाला—"सर्व विश्वास पात्र आहेत." त्याच्यासारख्या दैवीशक्ति प्राप्त असलेल्या एका अधिकाऱ्याला नेमणें हितावहच ठरल्याबद्दल राजाच्या मनाचें समाधान झालें.

एके दिवशीं राजा म्हणाला—"चिदंबर! मी एक गोष्ट विचारावी म्हणून बरेच दिवसां-



       



पासून विचार करीत आहें. माझी मुलगी आतां लग्नाला योग्य झाली आहे. तिच्यासाठीं योग्य वर म्हणून अनेक राजकुमार सांगून आले. पण राजकुमारांचें नांव काढलें कीं ती म्हणते—"मला मुळीं लग्नच करावयाचें नाहीं." तिच्या मनांत काय आहे तें. तूं ओळखून सांगशील तर फार मोठे उपकार होतील."

चिदंबरनें राजकन्येकडे ध्यानपूर्वक एकदां पाहिलें व म्हणाला—"राजकुमारीला आपण पाहिलेला एकहि वर पसंत नाहीं. तिला जो पसंत आहे तो आपल्याला पसंत पडणार नाहीं म्हणून ती खरें उत्तर देण्याचें टाळीत आली आहे."

"तिचें प्रेम कोणावर आहे, हें सांगशील का?" राजानें विचारलें.

"तिचें माझ्यावर प्रेम आहे." चिदंबर म्हणाला. राजानें चकित होऊन मुलीकडे पाहिलें व तिचा लाजलेला चेहरा पाहून व ती गालांतल्या गालांत हंसत तेथून निघून गेलेली पाहून चिदंबर म्हणाला तें खरें असल्याची साक्ष राजाला पटली.

राजा विचारांत पडला. चिदंबर हंसूं लागला. राजानें त्याला विचारलें—"माझ्या मनांत काय आहे, हें कळलें वाटतें तुला?"

"होय! माझ्यासारख्या गरिबाशीं राजकन्येचें लग्न आपल्याला आवडलें नाहीं. हा अपराध मुलीचा आहे म्हणून मला दंड करण्यास आपलें मन तयार नाहीं. होय ना?" चिदंबरनें विचारलें.

राजानें चिदंबरशीं मुलीचें लग्न करून देण्याचें ठरलें असल्याची घोषणा केली. दोघांचें थाटामाटानें लग्न झालें. त्याला पालखींत व अंबारींत बसायला मिळालें.





# परोपकारी गोपाळ

गोपाळ ज्या प्रांतांत रहात असे त्या प्रांताधिकाऱ्याच्या मुलाचा वाढदिवस आला. पाटील, कुळकर्णी व इतर अधिकाऱ्यांना निमंत्रणें आलीं. गोपाळच्या गांवचा पाटील आजारी असल्या कारणानें जाऊं शकला नाहीं. त्यानें गोपाळच्या हातीं शंभर रुपये किंमतीचा एक हार गांवकऱ्यांतर्फे भेट म्हणून आणि आशीर्वादाचें एक पत्र लिहून देऊन गोपाळला गांवचा प्रतिनिधि म्हणून पाठविलें.

गोपाळ सकाळीं उजाडतांच निघाला. बारा मैल चालून गेल्यावर तो प्रांताच्या मुख्य गांवीं पोचला. धुळीनें माखलेले कपडे काढून ठेवून धुतलेले कपडे अंगांत घातले. प्रांताधिकाऱ्याचें घर सुमारें एका मैलावर होतें. छान इस्तरी केलेले नवे कोरे कपडे घालून थाटामाटानें जाणारे लोक गोपाळला भेटले. एक गरीब फाटके कपडे घालून एका जागीं उभा होता. त्याच्याबरोबर त्याची चार मुलें अर्धनग्न स्थितींत उभी होतीं. तो गरीब येणारा जाणारांकडे भीक मागत होता. पण त्याच्याकडे कोणाचें लक्षच नव्हतें. गोपाळ जवळ येतांच तो गरीब माणूस केंविलवाण्या आवाजांत म्हणाला—"गरिबावर दया करा. एकादें जुनें धोतर असल्यास द्या. या फाटक्या कपड्यांनीं गेलों तर जेवायला कोणी आंत देखील सोडणार नाहीं."

"माझ्याजवळ कपडे आहेत ते हे आहेत. मी बाहेर गांवाहून आलों आहें." असें सांगून गोपाळनें आपली पिशवी दाखविली.

नोकराचें प्रेम]













"या, तेच!" आनंदानें तो गरीब मनुष्य म्हणाला. गोपाळनें कपडे दिल्यावर "चला, तुमच्या आईला बोलावून घेऊन जाऊं या." असें म्हणत तो आपल्या झोंपडीकडे निघाला.

आणखी थोडें अंतर चालून गेल्यावर गोपाळला आणखी एक करुण दृश्य दिसलें. एक घोड्याची गाडी रस्त्यावरून बाजूच्या शेतांत जाऊन चिखलांत रुतली होती. त्या गाडींत एक श्रीमंत सुखवस्तू गृहस्थ बसले होते. त्यांच्याबरोबर सुंदर उंची कपड्यांचे गाठोडें व चांदीचें सामान होतें. गाडीवाला खालीं उतरून घोड्याला चिखलांतून गाडी बाहेर काढण्यासाठीं ओढूं लागला. गाडींत बसलेला मनुष्य म्हणाला–"बोलाव कीं कुणाला तरी!"

गाडीवाला रस्त्यावरून येणारा जाणाराला चाकाला जरा हात लावा म्हणून विनंति करीत होता. परंतु चिखलांत कोण उतरणार? कोणी तयार होईना. प्रांताधिकाऱ्याच्या घरीं घाणेरड्या कपड्यांनीं का जायचें?

त्याच वेळीं गोपाळ जवळ आला. गाडीवाल्यानें त्याच्याजवळ हात जोडून विनंती केली–"गाडी रस्त्यावर आणून द्यायला जरा हात लावतां का? दया होईल गरिबावर सांड समोर आलेला पाहून घोडा बिचकला आणि शेतांत शिरला."

"अरे कोणी फुकटांत हात लावील का? बोल ना, देईन चवली किंवा पावली म्हणून!" गाडींत बसलेला तो तरुण मनुष्य आळ्यतेनें म्हणाला.

गोपाळनें आपल्या हातांतली पिशवी बाजूला ठेवली. धोतर जरा वर बांधून घेतलें व गाडीच्या चाकाला हात घातला. गाडीवाल्यानें घोड्याला पुचकारून जरा प्रोत्साहन दिल्याबरोबर गाडी हलली व रस्त्यावर जाऊन उभी राहाली. गोपाळ आपली पिशवी घेण्यासाठीं मागें वळला तेव्हां त्या श्रीमंत मनुष्यानें एक चवली त्याच्याकडे फेंकली व म्हणाला–"हें घे बक्षिस!" आणि गाडीवाल्याला गाडी हांकायला सांगून निघून गेला. चवकशी करणें तर दूरच त्यानें वळून गोपाळकडे एकदां कृतज्ञतापूर्वक पाहिलें देखील नाहीं.

गोपाळ ती चवली व पिशवी उचलून घेऊन शेजारच्या कालव्यावर गेला व चिखलांत घाण झालेले हात पाय स्वच्छ धुवून घेतले. तो परत रस्त्यावर आला तेव्हां त्याला एक लहानशी डबी दिसली. त्यांत एक हिऱ्याची अंगठी होती. ती त्या गाडींत बसलेल्या माणसाचीच असणार व त्याच्याकडे ती पोंचती केली पाहिजे असें त्याला वाटलें. पण त्यानें त्या माणसाचें तोंड देखील पाहिलें नव्हतें. गाडीवाल्यालाच तो ओळखत होता. गाडींत बसलेल्या माणसाच्या लांब लांब मिशा मात्र त्याच्या लक्षांत होत्या. त्याच्या डोक्याला एक मोठें पागोटें होतें हें देखील गोपाळला आठवलें. त्यानें तो मनुष्य भेटला तर त्याला ती




डबी द्यायचें ठरवून डबी उचलून पिशवींत ठेवून घेतली.

प्रांताधिकाऱ्याचें नांव होतें शंभु नाईक. त्याच्या दरबानानें गोपाळच्या कपड्यावर चिखलाचे डाग पाहून व त्याचा तो गांवठी पोशाख पाहून त्याला आंत जाऊं दिलें नाहीं. एका अधिकाऱ्यानें त्याला विचारलें–"कोण रे बाबा तूं? बरें, जा तिकडे! जेवणावळ चालली आहे तिकडे."

गोपाळनें आपल्या गांवच्या पाटलाचें नांव सांगितलें व म्हणाला–"मी त्यांच्या वतीनें आशीर्वाद म्हणून भेट घेऊन आलों आहें."




"पाटील आजारी आहेत तर, त्यांना दुसरा नाहीं का कोणी भेटला? तुलाच कां बरें पाठविलें त्यांनीं? काय पण अवतार आहे! म्हणे, प्रांताधिकाऱ्याच्या भेटीस आली आहे स्वारी!" असें सांगून तो अधिकारी इतर पाहुण्यांच्या सेवेस हजर झाला.

"ठीक आहे, एवढी भेट पोंचती केलीत तर पुरे!" असें म्हणत गोपाळनें आपली पिशवी पुढें केली.

"तूं तरी चकमच दिसतो आहेस! सरकार स्वारीस कळलें कीं भेट देणारा स्वतः आला नसून फक्त भेट पाठविली आहे तर राग येईल त्यांना. जा, परत जा!" तो अधिकारी म्हणाला.

गोपाळ तेथून बाजूला गेला आणि वऱ्हांड्यांत जाऊन बसला. ज्या कामाकरितां आलों होतों तें काम पुरें न झाल्याबद्दल त्याला वाईट वाटलें. नवे कपडे विकत घेऊन घालून जायला वेळ पुरेसा नव्हता. याच विचारांत बसला असतां एक मोठें पागोटें घातलेला एक श्रीमंत मनुष्य विचारांत तिकडे येत असलेला दिसला.

जी गाडी चिखलांत रुतली होती त्या गाडींत बसलेलाच तो मनुष्य होता. प्रांताधिकाऱ्याचा तो वैयक्तिक सचिव होता. पाहुण्यांना देण्यासाठीं कांहीं कापड? वस्त्र व मुलासाठीं अंगठी वगैरे कांहीं पदार्थ घेऊन येण्यास त्याला प्रांताधिकाऱ्यानें बाजारांत पाठविलें होतें. तें काम पुरें करून परत येत असतां गाडी चिखलांत रुतली व त्यानंतर बाकी सर्व प्रकार घडला. घोडा बिचकून शेतांत शिरला तेव्हांच अंगठीची डबी खालीं रस्त्यावर पडली होती. घरीं आल्यावर त्यानें पुष्कळ शोध केला पण ती डबी सांपडली नाहीं.

शंभुनाईकाला अंगठी हरवल्याची गोष्ट कळल्यावर मनस्वी राग आला व त्यानें आपल्या सचिवाला समोरून निघून जायला सांगितलें. अशा तऱ्हेनें मान खालीं झाल्यानें तो बाहेर आला तेव्हांच त्याला समोर गोपाळ दिसला. आपण चवली फेंकली होती ती याच माणसाकडे असें अंदाजानें त्याला वाटलें व त्यानें निःसंकोच गोपाळ जवळ येऊन विचारलें "माझी गाडी शेतांतून बाहेर काढायला हात लावला तोतूंच का?"

"होय, तो मीच! कां कांहीं विशेष काम आहे का?" गोपाळनें चकित होऊन त्याला विचारलें.

"नाहीं, एक अंगठी ठेवलेली डबी दिसत नाहीं. गाडींतून पडली असावी. दिसली का तुला?" त्यानें गोपाळला विचारलें.

"ती आपली डबी होती का? पण आपण कोण हें नाहीं मला माहीत. मी नाहीं पाहिलें आपल्याला पूर्वी कधीं. तुमचीच होती हें कळायला मार्ग?" गोपाळनें विचारलें.

"जास्त बटबट करूं नकोस. मुकाट्यानें डबी दे इकडे!" ऐटींत दटावीत तो गोपाळला म्हणाला.



"हें पहा ही डबी उचलतांना आपण मला पाहिलें असेल व आपलीच डबी म्हणून मागत नसाल कशा वरून? म्हणून तुम्हांला ओळखणारा कोणी असेल तर सांगा. त्या गाडीवाल्यानें येऊन आपलीच डबी असल्याचें सांगितलें तरी पुरे!" गोपाळ म्हणाला.

आपण एवढे मोठे अधिकारी आणि एक यःकश्चित मनुष्य असा आपला अपमान करतो म्हणजे काय? गाडीवाला माझी ओळख देणार होय? असा विचार करून गोपाळला मारायला त्यानें हात उगारला.










गोपाळ तसा लेचापेचा नव्हताच त्यानें त्याचे दोन्ही हात धरून ठेवले.

या गडबडींत तेथें लोकांची गर्दी जमली. सर्व गोपाळच्या बाजूनें बोलत होते. म्हणाले—"हा मनुष्य म्हणत आहे त्यांत गैर काय आहे? एवढा किमती माल ओळख पटल्याशिवाय कसा काय मिळेल हो? गाडीवाल्यानें ओळख दिली म्हणजे तुम्हांला कमीपणा येईल वाटतें?"

तेव्हां त्या अधिकाऱ्यानें गाडीवाल्याला गाडी घेऊन बोलावून आणण्यासाठीं एका नोकराला पाठविलें. गाडीवाल्यानें येऊन साक्ष दिल्यावर गोपाळ अंगठी द्यायला कबूल झाला.

तिकडे शंभू नाईकाच्या कानावर अंगठी सांपडली असल्याची बातमी पोंचली. तो बाहेर आला तेव्हां गोपाळच्या तोंडीं त्याला सर्व वर्तमान कळलें. त्याचे मळके कपडे पाहून नोकरांनीं गोपाळला आंत येऊं न दिल्याबद्दल प्रांताधिकारी दिलगिरी व्यक्त करून त्याला आदरपूर्वक आंत बोलावून घेऊन गेला. म्हणाला—"तुमच्या औदार्याचें वर्णन मी फार ऐकलें आहे. पण भेटीचा योग आज प्रथमच आणि अशा तऱ्हेनें येत आहे." प्रांताधिकाऱ्यानें गोपाळचा आतिथ्य सत्कार करून त्याला त्या दिवसाची आठवण म्हणून धोतर पागोटें दिलें. त्याच्याबरोबर पाटलांकडे एक धोतर पागोटें पाठविलें.

आपल्या मालकानें ज्याचा इतका सत्कार केला त्याच्या करवीं आपण आपली गाडी चिखलांतून बाहेर कादविली आणि मजुरी म्हणून त्याला चवली देऊं केली होती, याबद्दल प्रांताधिकाऱ्याचा सचिव खजील झाला.





# लोहजंघ याची गोष्ट

फार पूर्वी मदुरा नगरींत मकरदंष्ट्रा नांवाच्या एका वृद्ध देवदासीला रूपणिका नांवाची मुलगी होती. तिच्या रूपाला साजेल असेंच तिचें नांव पण होतें. एकदां पूजेच्यावेळीं देवळांत गेली तेव्हां तिला एक सुंदर तरुण पुरुष दिसला. त्याच्या रूपावर ती इतकी भाळली कीं तिनें घरीं गेल्यावर एका दासीला पाठवून त्याला आपल्या घरीं बोलाविलें.

त्याला बोलावण्यास दासी कां आली आहे हें त्याला कळायला वेळ लागला नाहीं. तो दासीला म्हणाला—"माझें नांव लोहजंघ आहे. मी एक गरीब ब्राह्मण आहें. माझ्या-जवळ एक फ़ुटकी कवडीदेखील नाहीं तुझ्या मालकिणीची सेवा करायला. माझा नाद सोड, म्हणावें!"

"माझ्या मालकिणीला आपल्या पैशाची गरज नाहीं." दासी म्हणाली. तें ऐकून लोहजंघ दासीबरोबर जाण्यास तयार झाला. लोहजंघ आलेला पाहून रूपणिकेला फार आनंद झाला. परंतु मकरदंष्ट्रेला राग आला. तिला वाटलें कीं हा कोण भिकारडा आला आहे या रूपनगरींत? या उलट तो आल्यानें रूपणिकेला मात्र आपला जन्म सार्थक झाल्यासारखें वाटलें. तिनें त्याला आग्रह करून आपल्या घरीं ठेवून घेतलें. तिला स्वर्ग 'दशांगुळें उरला' असें वाटूं लागलें.

तें पाहून रूपणिकेची आई म्हणाली—"या भिकारड्याला घरांत पोसून काय मिळणार तुला? आपल्या देवदासीच्या जातीला पुरुषाचें रूप पाहून काय करायचें आहे? त्याचा पैसा पहावयाचा असतो, वेडे मुली!"

सौ. सारजाबाई भोईर



"आई! पण मला हा प्राणाहून जास्त प्रिय वाटतो. मला पैशाचा तोटा आहे का? पुन्हां असें कांहीं बोलूं नकोस!" रूपणिका म्हणाली.

मुलीचें तें बोलणें ऐकून मकरदंष्ट्रेला राग आला. मुलीच्या इच्छेविरुद्ध व तिच्या नकळत लोहजंघला घरांतून कसें हाकलून लावावें याचा ती विचार करूं लागली.

एकदां रूपणिका देवळांत गेली असतां लोहजंघदेखील कोठें तरी घराबाहेर गेला होता. तेव्हां एक क्षत्रिय राजकुमार कांहीं सैनिकांना बरोबर घेऊन रस्त्यावरून जात असतां मकरदंष्ट्रेला दिसला. तिनें दासीला पाठवून त्याला घरांत बोलाविलें व म्हणाली— "एक भिकारडा माझ्या घरीं येऊन धरण देऊन बसला आहे. तूं त्याला घराबाहेर काढलास तर माझी मुलगी तुझ्याबरोबर राहील."

त्या क्षत्रिय राजकुमाराला त्यांत नकार देण्यासारखें कांहींच नव्हतें. कांहीं वेळानें लोहजंघ परत आल्याबरोबर राजकुमाराच्या सैनिकांनीं त्याला ठोकून काढलें आणि त्याला बेशुद्ध स्थितींतच दूर रस्त्यावर नेऊन फेंकून दिलें. कांहीं वेळानें रूपणिका आली तेव्हां तिच्या पाठीमागें घडलेलें कांड तिला कळलें. ती खूप रडली. तें पाहून तो क्षत्रिय राजकुमार निघून गेला.

लोहजंघचा एक तर अपमान झाला होता. याशिवाय त्याला प्रेमिकेचा विरह सहन करावा लागला. मकरदंष्ट्रेवर सूड घ्यायची इच्छा त्याच्या मनांत आली. परंतु लगेच त्याचें मन पालटलें व त्याला स्वतःच्या जीविताचा वीट आला. तो तीर्थयात्रेला निघाला.

तो एका वाळवंटांतून जात असतां ऊन वाढल्यानें तहानेनें त्याचा जीव कासावीस



होऊं लागला. सावली नांवाला सुद्धां कोठें नव्हती. त्याला एका जागीं मेलेला हत्ती दिसला. गिधाडांनीं त्याचें सर्व मांस तोडून खालें होतें व हत्तीचें पोट सर्व रिकामें गुहेसारखें झालें होतें. लोहजंघ हत्तीच्या पोटांत जाऊन बसला. तेथें त्याला बरें वाटलें व झोंप पण लागली.

झोंप मोडली तेव्हां मुसळधार पाऊस पडत होता. हत्तीचें शरीर पाण्यांत तरंगत नदींत गेलें व तें समुद्रांत जाऊन पोंचलें. समुद्रांत हत्तीचें तें शरीर तरंगत असलेलें पाहून आकाशांतून एक मोठा गरुडपक्षी उडत खालीं आला व हत्तीचा तो भव्य देह उचलून उडत दूर दक्षिणेकडे लंकाद्वीपांत गेला तेथें त्यानें त्या हत्तीला नेऊन टाकलें. गरुडपक्षी हत्तीचें कातडें चोंचीनें ओढूं लागला तेव्हां एक मोठें भोंग पडलें व आंतून लोहजंघ बाहेर आला. मनुष्याला पाहतांच पक्षी घाबरून पळून गेला. बाहेर येऊन तो पाहूं लागला तेव्हां त्याला आपण स्वप्न तर पहात नाहीं ना, असें वाटूं लागलें.

तेथें त्याला दोन राक्षस दिसले. त्यांना पाहून त्याला अर्थातच भीति वाटली. ते देखील त्याला पाहून घाबरले. कारण रामानें



समुद्र पार करून जेव्हां लंकेचें राज्य जिंकलें तेव्हां राक्षसांची जी त्रेधा उडाली होती ती त्यांना आठवली. नंतर त्यांनीं आपसांत सल्ला मसलत केली व दोघांपैकीं एक जण बिभीषणाकडे गेला आणि एक मनुष्य समुद्र पार करून आल्याची वार्ता त्यानें दिली. बिभीषणालादेखील थोडी भीतीच वाटली. त्यानें लोहजंघला आदरपूर्वक बोलावून आणायला सांगितलें. दोघे राक्षस त्याला बोलावून बिभीषणाच्या दरबारांत गेले. लोहजंघनें मोठें पणाचा आव आणून बिभीषणाला आशीर्वाद दिला.












बिभीषणानें त्याला परिचय विचारून, या द्वीपांत कसें काय येणें झालें, असें नम्रपणें विचारलें.

तेव्हां लोहजंघनें ही कपोलकल्पित गोष्ट त्याला सांगितली–

"मी मदुरेचा राहणारा एक गरीब ब्राम्हण आहे. माझें नांव लोहजंघ. गरिबी असह्य झाली म्हणून मी नारायणाचें नामस्मरण करून खडतर तपश्चर्या केली. तेव्हां मला स्वप्नांत साक्षात्कार झाला. देवानें मला आज्ञा केली कीं तूं बिभीषणाच्या दरबारीं जा. तो माझा भक्त आहे. तो तुला मनमुराद दक्षिणा देईल. पण मी विचारलें– "नारायणा ! कोठें मी व कोठें लंकेचा राजा बिभीषण ! तेथवर पोचायचें कसें ?" "होय आजच भेट होईल !" देव म्हणाला आणि अंतर्धान पावला. सकाळीं माझी झोंप मोडली तेव्हां मी समुद्रपार लंकेला येऊन पोचलो होतों. हें कसें घडलें हें तो देवच जाणें !"

बिभीषणाला तें सर्व खरें वाटलें. कारण ईश्वराच्या कृपेविना कोणी मनुष्य लंकेला येऊन पोंचणें शक्यच नव्हतें. त्यानें आपल्या राक्षस सैनिकांना पाठवून स्वर्णमाला पर्वतांतल्या एका गरुड पक्ष्याला आणविलें व म्हणाला–" तूं मदुरानगरीं जाऊन नारायणाला हा रत्नहार अर्पण कर." असें सांगून त्यानें लोहजंघाला शंख, चक्र वगैरे आभूषणं देऊन निरोप दिला.

लोहजंघ बिभीषणाचा अतिथि म्हणून लंकेंत राहाला. तेथील आश्चर्यें त्यानें पाहिलीं. बिभीषणानें दिलेलीं वस्त्राभूषणें घेऊन व गरुड पक्ष्याच्या पाठीवर बसून लोहजंघ मदुरेला परत आला. तो नगराबाहेर एका निर्जन जागीं उतरला. पक्ष्याला एका जागीं बांधून ठेवलें. रत्नाभूषणें कोठें तरी ठेवून दिलीं. गांवांत जाऊन खाऊन पिऊन घेतलें व पक्ष्याला खायला घातलें. संध्याकाळीं विष्णूसारखीं वस्त्रें, रत्नाभूषणें आणि शंख, चक्र, गदा आदि धारण करून प्रत्यक्ष विष्णूचेंच रूप घेऊन व गरुडावर बसून आकाशांत घिरट्या घालीत कांहीं वेळ फिरून जोरानें शंखनाद केला आणि आल्याची घोषणा केली.

शंखनाद ऐकून रूपणिका बाहेर आली. स्वतः विष्णु आपल्या घरीं आलेला पाहून तिला आनंद झाला. लोहजंघनें पक्ष्याला एका बाजूला बांधून ठेवलें व म्हणाला– "मी विष्णु आहें व तुझ्या भेटी साठीं आलो आहें."

रूपणिकानें त्याला नमस्कार करून म्हणाली–" देवा ! दया केलीस या गरिबावर !" ती त्याला आंत बोलावून घेऊन गेली. लोहजंघ कांहीं वेळ तिच्याबरोबर राहून पुन्हां पक्ष्याच्या पाठीवर बसून निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर रूपणिकेला वाटलें कीं मी आतां स्वतः विष्णूची पत्नी झालें आहे. आतां सामान्य मनुष्यप्राण्याशीं बोलण्याची मला काय गरज ?"





मुलीच्या वागण्यांत फरक आलेला पाहून मकरदंष्ट्रेनें विचारलें—"मुली ! काय ग झालें आहे तुला ? अशी काय वागतेस ?"

पण रूपणिकेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तेव्हां तिच्या आईनें अनेक वेळां तिला पुन्हां पुन्हां विचारलें. आतां बोलणें भाग आहे हें पाहून रूपणिकेनें पडद्याआड उभी राहून तिचें प्रत्यक्ष विष्णूशीं कसें प्रेम जडलें व तो तिला कसा येऊन भेटून गेला, हें सांगितलें.

प्रथम म्हातारीचा त्या सर्वांवर विश्वासच बसेना. परंतु तिनें स्वतःच्या डोळ्यांनीं लोहजंघला गरुडावर बसून रात्रीं येतांना पाहिलें. दुसऱ्या दिवशीं पडद्याआडूनच ती मुलीला म्हणाली—"मुली ! खरेंच तूं स्वर्ग-लोकांतल्या देवींत सामील झाली आहेस. मी जशी आहें, तुला माहीतच आहे. आतां तूं मला सदेह मुक्ति मिळेल असें कांहीं तरी कर. त्यासाठीं काय करावें लागेल, हें आपल्या पतीला विचारून सांग."

रात्रीं लोहजंघ आल्यावर रूपणिकेनें आपल्या आईनें जी इच्छा व्यक्त केली होती त्या विषयीं विचारलें तेव्हां तो म्हणाला—"तुझी आई आहे पापीण ! म्हणून तिला स्वर्गांत प्रवेश मिळणें अशक्य. पण तिनें कपटवेष केल्यास तें देखील शक्य होईल. वैकुंठ एकादशीच्या दिवशीं विकुंठद्वार उघडतें. तेव्हां तुझ्या आईनें शंकरादि देवांच्या घोळक्यांत देव रूप घेऊन प्रवेश करावा. शंकराच्या प्रमथांना मुंडण करावें लागतें. तोंडाच्या एका बाजूला काजळ फांसावें व दुसऱ्या बाजूला कुंकूं फांसून घ्यावें."

दुसऱ्या दिवशीं तो आला तेव्हां मकर-दंष्ट्र त्याप्रमाणें वेष पालटून तयार बसली होती. लोहजंघ तिला पक्ष्यावर बसवून



देवळाजवळ आला. देवळासमोर एक विशाल ध्वजस्तम्भ होता व त्यावर एक गोल दगड होता. लोहजंघनें म्हातारीला त्या दगडावर ठेवलें आणि "मी आलोंच तुझ्या मुलीला भेटून !" असें सांगून निघून गेला.

एकादशीच्या दिवशीं रात्रीं लोक जागरण करीत होते. लोहजंघ त्यांच्याकडे गेला व आकाशांतूनच म्हणाला—"आज अपस्मार सर्व गांवावर येणार आहे. तुम्ही सर्व हरीच्या आश्रयाला जा !"

नंतर स्वतःचा वेष काढून ठेवून तो सामान्य वेष करून आला. येणाऱ्या संक-टाला तोंड देण्यासाठीं लोक तयार होऊन वाट पहात होते.

त्यानें मकरदंष्ट्रकडे पाहून 'अपस्मार अपस्मार !' असा घोष केल्याबरोबर लोक ओरडूं लागले—"माते ! खालीं पडूं नकोस !" मकरदंष्ट्र तें ऐकत स्वतःला संभाळून स्तंभावर बसली होती. सकाळीं राजाला ती बातमी कळली. लोकांनीं त्या विकृत रूपांत मकरदंष्ट्रला ओळखलें व सर्व हंसूं लागले.

रूपणिकेला तें कळलें तेव्हां तिनें आपल्या आईला खालीं उतरविलें व घडलेलें वृत्त सर्वांना सांगितलें. तेव्हां राजा म्हणाला—"या मकरदंष्ट्रेनें कित्येकांना आजपर्यंत अनेक प्रकारें ठकविलें आहे. तिला ठकविणारा कोण आहे हें मला कळलें तर मी त्याला आपलें राज्य देईन."

तें ऐकून लोहजंघ पुढें आला व त्यानें मकरदंष्ट्रवर सूड उगविण्याच्या हेतूनें काय काय केलें हें वर्णन करून सांगितलें. बिभीषणानें दिलेले शंख चक्रादि दाखविले. राजानें त्याला गादीवर बसवून रूपणिकेशीं त्याचें लग्न करून दिलें.





# लग्नांचें नांव नको!

सहस्रावधि वर्षें लोटली असतील. काश्मीर राज्यांतल्या डोंगराळ प्रदेशांत एका पर्वत शिखरावर महाल बांधून एक राक्षस रहात असे. त्यानें लूटपाट करून प्रजेला त्रास देऊन सोनें व हिरे माणिक्यें यांनें एक भांड भरून ठेवलें होतें. तरी नागरिक त्याच्याविरुद्ध कधीं बोलले नाहींत. परंतु एके दिवशीं अचानक येऊन तो कोणाला विचारी कीं तूं आपल्या मुलीशीं माझें लग्न करून दे, तेव्हां मात्र लोक घाबरून जात. अगदीं नाइलाजानें कोणी आपल्या मुलीचें त्याच्याशीं लग्न लावून दिलें कीं मुलगी फार दिवस जिवंत रहात नसे. राक्षस आणखी एका मुलीशीं लग्न करून या म्हणून येई. मुलींची तर त्रेधा उडून जाई.

अशा तऱ्हेनें चोवीस मुलींचा जीव घेतल्या-वर राक्षस पंचवीसाव्या मुलीशीं लग्न करण्यास गांवाकडे निघाला. एक गरीब शेतकरी शेतांत काम करीत होता. त्या राक्षसानें त्याला आपल्या मुलीशीं लग्न करून देण्यास सांगितलें. शेतकरी घाबरला. त्याला मल्लिका नांवाची एक मुलगी होती. नुकतीच ती वयांत आली होती. गरिबींत गांजल्यामुळें मुलीचें लग्न कसें होईल ही एक चिंता नेहमीं त्याला वाटत असे.

"मी परवां येईन तुझ्या घरीं जेवायला. तेव्हां लग्नाविषयीं बोलूं." राक्षस त्याला म्हणाला.

शेतकऱ्यानें घरीं गेल्यावर ती गोष्ट मुलीला सांगितली. पण ती मुळींच भ्याली नाहीं.

श्री. का. म. सार्दळ

"मी सांगेन तें करा, आणि सांगेन तेंच बोला बाबा! राक्षस आपल्या वाटेस फिरक-णार नाहीं व आपली गरिबी कायमची निघून जाईल." मुलगी म्हणाली.

मल्लिकेनें सांगितल्याप्रमाणें तिच्या बापानें त्याच्याकडे होते नव्हते ते सर्व पैसे खर्च-करून सशाचें मांस शिजवून तयार ठेवलें आणि वर एक पिंप भरून द्राक्षाची दारू पण तयार करून ठेवली. मल्लिकेनें शेजार पाजारच्या घरून शेंकडा कोरे सुती कपडे मागून आणून खुंटीला टांगून ठेवले. राक्षस जेवायला आला तेव्हां एक मोठें पातेलें भरून सशाचें मांस व पिंप भरून अंगूरी दारू त्याच्यासमोर ठेवली.

"मला मेजवानी देण्यासाठीं तूं बराच खर्च केलेला दिसतो आहेस. माझें जेवण तसें मोठें आहे आणि चवदार पदार्थ मला आवडतात पण फार!" राक्षस म्हणाला.

"त्यांत कसला खर्च? उंदीर असल्यावर कसला आला आहे खर्च? आणि उंदीर कमी झाले तर मसाला बिसाला घालून उंदराचा रस्सा काय छान तयार होतो." मल्लिका म्हणाली.

"म्हणजे हा उंदरांचा रस्सा आहे म्हणतेस? आहे खराच छान झालेला.



मी आजपर्यंत कितीजणींशीं लग्नें केली असतील. पण हा रस्सा नाहीं कधीं मिळाला खायला!" राक्षस म्हणाला. नंतर खुंटीवर आणि कोनाड्यांत घडी करून ठेवलेलें कापड पाहून त्यानें विचारलें—"म्हणजे तुला विण-काम उत्तम येतें म्हणावयाचें?"

मल्लिका जवळचें एक कापड हातांत घेऊन म्हणाली—"हें मी गेल्याच महिन्यांत विणलें. नंतर कपड्यांची एक रास होती तिकडे तिचा हात गेल्यावर राक्षसाला वाटलें कीं तिनेंच हें सर्व कापड विणून शिवायला कापून ठेवलेलें दिसतें आहे. त्याच्या

नजरेंत मल्लिकेचा गौरव जास्तच वाढला. मांसावर ताव मारून त्यानें दारूची एक बरणी रिकामी केली. म्हणाला—" काय पण दारू आहे? पुष्कळ खर्च झाला असेल नाहीं, तुमचा या सर्वाला?"

" खर्च कसला आला आहे? कुजकीं फळें टाकून देण्यापेक्षां गाळली दारू त्यांची. हें सर्व कसब माझ्या मल्लिकेचें बरें का?" शेतकरी म्हणाला.

" कुजक्या द्राक्षांची इतकी उत्तम दारू तयार होते तर? आम्ही डुकरांना खायला घालतों. मल्लिका आली म्हणजे होईल त्यांचा सदुपयोग! पण मल्लिकेबरोबर हुंडा काय देणार?" राक्षसानें विचारलें.

" मल्लिकाच नाहीं का एक हुंडा? निराळा हुंडा आणखी काय देणार? ती सासरी गेली म्हणजे माझी प्राप्ती कमी होईल त्याची काय वाट? उलट तिच्याशीं ज्याचें लग्न होईल त्यानेंच मला हुंडा दिला पाहिजे! आमच्या गांवच्या सावकाराची बायको नुकतीच वारली. तो पुन्हां लग्न करायचें म्हणतो आहे. त्यानें माझ्या मुलीशीं लग्नाची गोष्ट काढली होती. मी त्याच्याशीं मुलीचें लग्न करून दिलें तर मला चांगले पैसे मिळतील." शेतकरी म्हणाला.



राक्षसाला राग आला. रागाच्या भरांत त्यानें विचारलें—" तूं कोणाजवळ बोलत आहेस, हें लक्षांत आहे ना तुझ्या? मी तुझ्या मुलीशीं तुझ्या किंवा तिच्या मनाविरुद्ध लग्न करायचें ठरविलें तर तूं काय करणार आहेस रे?"

" म्हणजे तुम्हांला मल्लिकेविषयीं अजून पुरी माहिती कळलेली दिसत नाहीं. ती हट्टी आहे हट्टी. एकदां तिनें हट्ट धरला कीं तिचा गळा कापला तरी ती कामाला हात लावणार नाहीं. तिचें मन वळवून तिच्याकडून पाहिजे तें व पाहिजे तितकें काम करवून घ्यावें." शेतकरी म्हणाला.

राक्षसाचा पारा थोडा उतरला. तो म्हणाला—" बरें, बरें!" आणि हुंडा म्हणून एक मोठी रक्कम देऊं लागला. पण शेतकऱ्यानें मानेनें प्रथम नकार दिला व म्हणाला—" दुप्पट तरी दिलीस तर प्रयत्न करीन तिचें मन वळविण्याचा."

राक्षसानें विचार केला कीं मल्लिकेकडून मिळालेली दारू व उंदराचा जो रस्सा मिळाला त्याची किंमत म्हणून जरी तेवढी












रकम दिली तरी विशेष नुकसान नाहीं. दाम दुप्पट होईल वसूल लग्न झाल्यावर. असा विचार करून शेतकऱ्यानें मागितली तेवढी रकम द्यायला राक्षस कबूल झाला. शेतकऱ्याचें सर्व आयुष्य सुखानें जाईल एवढी ती रकम होती.

"ठीक तेवढी रकम आणून दे मल्लिकेला उद्यां. आणि तिच्याशींच बोल कायतें आतां ती झोंपलेली आहे." शेतकरी म्हणाला.

दुसऱ्यादिवशीं राक्षसानें रकम आणून मल्लिकेसमोरच शेतकऱ्याच्या हातांत दिली. मल्लिका राक्षसाला म्हणाली—"माझ्याशीं लग्न करण्यापूर्वी माझ्या दोन अटी कबूल कराव्या लागतील. संसार काटकसरीनें चालावा म्हणून माझ्यासाठीं एक निराळा महाल बांधून दे. तो मी सांगेन तसा झाला पाहिजे. ही पहिली अट. आणि दुसरी अट म्हाताऱ्या बदकांच्या पिसांची गादी पाहिजे मला झोंपायला. कारण खूप झोंपल्याशिवाय माझ्या हातून कामदेखील होत नाहीं."

"नशीब, तूं दागिन्यांची यादी नाहीं सांगितलीस करून द्यायला!" राक्षस म्हणाला.

मजूर लावून काम करविलें तर मजुरीचे पैसे फुकट जातील असा विचार करून मल्लिकेनें सांगितल्याप्रमाणें राक्षसानें स्वतः मेहनत करून घर बांधून दिलें.

इतक्यांत हिंवाळा आला. मल्लिकेनें गादी व उशांसाठीं अभ्रे शिवून तयार केले आणि बरफ पडूं लागण्याची वाट पाहूं लागली. बरफ पडूं लागलें कीं काश्मीरचे लोक म्हणतात, "म्हाताऱ्या बदकी आपले पंख ओढूं लागल्या वाटतें?"

बरफ पडूं लागलें. "बदकाचे पंख झडूं लागले. कर सुरु काम पंख जमा करण्याचें!" असा निरोप मल्लिकेनें राक्षसाकडे पाठविला.



राक्षसानें बरफ पडत असलेलें पाहिलें आणि म्हणाला—"हें कसें बुवा जमा करायचें?"

"मूर्खराज! फावडें घेऊन ये आणि उपसून भर!" मल्लिका म्हणाली.

मल्लिकेनें सांगितल्याप्रमाणें राक्षस शिवून ठेवलेल्या खोळींत फावड्यानें कापसासारखा बरफ भरायला सुरवात केली. अर्धे अधिक बरफ वितळून वाहून गेलें. संध्याकाळपर्यंत कशीतरी खोळ भरली. मल्लिकेनें ती शिवून बिछान्यासारखी गादी घातली व त्यावर एक चादर टाकून म्हणाली "रात्रीं यावर झोंपून तर पहा. लग्न झाल्यावर आपण यावर झोंपायचें बरें का? उद्यांसकाळीं तूं उठल्या-वर लग्न!"

राक्षस दमून गेला होताच. तो त्या बर्फाच्या बिछान्यावर झोंपला. बिछाना थंडगार. ऊब कोठून येणार? तरी तसाच झोंपला. सकाळीं उठला तेव्हां सर्व अंग मोडून आलें होतें. सांधे ठणकत होते. अर्धा बिछाना विरघळून रिकामा झाला होता आणि राक्षसाला हलवत नव्हतें.

"फुकट! मल्लिका आहे हुशार. पण तिच्या हट्टानें मी असल्या बिछान्यावर











पुन्हां झोपलों तर पुन्हां उठण्याची गरजच उरणार नाहीं." असा विचार करून त्या नव्या महालांतून उठून राक्षस आपल्या घरीं निघून गेला. त्याला भीति वाटत होती कीं मलिकेनें लग्नाची गोष्ट काढली तर !

राक्षस निघून गेल्याचें कळल्यावर मलिकेनें बापाला राक्षसाकडे पाठविलें. शेतकरी राक्षसाच्या नोकराला म्हणाला—"वधू वाट पहात आहे !"

"माझी तब्येत बरी नाहीं. सांग, मला नाहीं लग्न करायचें !" राक्षसानें आपल्या नोकराच्या हातीं शेतकऱ्याकडे उत्तर पाठविलें. शेतकऱ्यानें त्याच्याच हातीं उलट निरोप पाठवून विचारलें—"नुकसान भरपाई काय देणार ?"

"पहिल्यानें हुंडा दिला. महाल बांधून दिला आणि बदकांच्या पंखांची गादी करून दिली. आणखी आतां काय द्यायचें ?" राक्षसानें परत निरोप पाठविला.

"तूं गादीवर झोंपून गादीचा पापड करून टाकला आहेस. पंख घालून पुन्हां भरून दे." असा शेतकऱ्याचा निरोप नोकरानें राक्षसाला येऊन सांगितला.

"आमच्याकडे आहेत तीं सर्व बदकें घेऊन जा म्हणावें. आणखी जास्त बटबट केलीस तर तुला व तुझ्या मुलीला उभा चिरून खाऊन टाकीन." राक्षस नोकराला म्हणाला.

तें ऐकून शेतकरी बदकें घेऊन निघून गेला.

राक्षसाला अद्दल घडली. त्यानें पुन्हां कोणाकडे लग्नाची गोष्ट काढली नाहीं.

इकडे मलिका राक्षसाकडून मिळालेल्या पैशावर श्रीमंत झाली. तिनें एका तरुणाशीं लग्न करून घेतलें. शेतकरी पण सुखी झाला.





# दिलबर

एकदां कां कोणास ठाऊक अकबर बादशहाला आपल्या एका बेगमेवर कोप झाला आणि बादशहानें बेगमेला तावडतोब माहेरी निघून जायला सांगितलें.

त्या बेगमेनें बिरबलला बोलावून घडलेली गोष्ट सांगितली. बिरबल एक उपाय सांगून निघून गेला.

बेगमेनें आपलें सर्व सामान सुमान बांधून जाण्याची तयारी केली आणि निरोप घेण्यासाठीं बादशहाला भेटण्याची इच्छा असल्याचें कळविलें.

"माझा हुकूम झाला तो झाला. हुकमाची अंमल बजावणी झालीच पाहिजे. पण महालांत तुझ्या आवडीची जी वस्तु असेल ती न्यायला परवानगी आहे." अकबर म्हणाला.

"आपल्या मर्जीविरुद्ध कांहीं करण्याची इच्छा नाहीं. परंतु माझी एक विनंती आहे. पुन्हां आपल्या सेवेचा योग कधीं लाभेल कीं नाहीं तें त्या अल्लालाच माहीत. मी सरबत तयार करून आपणासाठीं ठेवलें आहे. तेवढें घेण्याची कृपा करावी." बेगम म्हणाली.

बादशहानें होकार दिला. बेगमनें एका पेल्यांत सरबत आणून दिलें. बादशहानें तें पिऊन टाकलें. सरबतांत झोंपेचें औषध होतें. बादशह तावडतोब झोंपला देखील.

बेगम आपल्या दासींच्या मदतीनें बादशहाला एका पालखींत झोपवून स्वतः दुसऱ्या पालखींत बसली आणि माहेरी निघून गेली. पहाटेच्या सुमारास पालख्या

बेगमच्या माहेरी पोंचल्या. बेगमनें आपल्या वडिलांच्या महालांत एक विशाल शयनगृहांत बादशाहांना पलंगावर नेऊन ठेवविलें. अकबर छान झोंपलेला होता.

कांहीं वेळानें बादशाहाची झोंप मोडली. डोळे उघडून पाहातात तर एक नवीन जागा. इतक्यांत बेगम तेथें आली. बादशाहानें चकित होऊन विचारलें–"आहें कोठें मी? जागा आहें की झोंपलेला?"

"छान जागे आहां! उठा, नमाज प्रार्थना करून घ्या!" बेगम म्हणाली.

"पण, हा महाल कोणाचा? आपला नाहीं दिसत?" बादशाहानें विचारलें.

"आपला कसा असेल? माझ्या वडिलांचा आहे. विसरलांत वाटतें की आपण मला माहेरी निघून जायचा हुकूम केला होता!"

"तें कबूल. पण मी येथें कसा?

तर मग आणखी एक गोष्ट आपण विसरलांत असें दिसतें आहे. आपण माझ्या अत्यंत आवडीची वस्तु बरोबर न्यायला स्वतः होऊन परवानगी दिली होती. जास्तहून प्रिय पती वस्तु या जगांत नाहीं."

तें उत्तर ऐकून बादशाहाचा राग पार नाहींसा झाला. तिच्या चातुर्यावर तो इतका खूष झाला कीं तो बेगमेला लगेच बरोबर आग्र्याला चलायला आग्रह करूं लागला. परंतु सासऱ्याच्या आग्रहास्तव बादशाहाला सासुरवाडी चार दिवस रहावें लागलें. दिल्लीला पोंचल्यावर कांहीं दिवसांनीं संधी पाहून बेगमेनें ती युक्ति तिला बिरबलानें सांगितल्याचें सांगितलें. म्हणून बादशाहानें बिरबलाचा सार्वजनिक सत्कार केला.





# उत्तरकांड

राम जंबूक वध करून अयोध्येला परत झाला. आल्याबरोबर त्यानें भरताला व लक्ष्मणाला बोलवून आणावयास द्वारपालकाला पाठविलें. त्याप्रमाणें दोघे आले.

त्यांना राम म्हणाला–"मी एक राजसूय यज्ञ करावा म्हणत आहें. म्हणजे सर्व पापांचें क्षालन होईल. मित्र व चंद्र दोघांनीं राजसूय यज्ञ करूनच नाहीं का अजरामर कीर्ति संपादन केली? काय वाटतें तुम्हांला?"

भरत म्हणाला–"तूं धर्माचरण करून कीर्ति संपादन केली आहेस. आतां राजसूय यज्ञ करून काय जास्त मिळणार आहे? याशिवाय अनेक निरुद्रवी राजांचा वध करावा लागेल! म्हणून या व्यर्थ यज्ञाचा विचार सोडून दे."

भरत जें म्हणाला तें रामाला रुचलें. त्यानें इतका उत्तम सल्ला दिल्याबद्दल रामानें त्याची तोंड भरून स्तुति केली. म्हणाला–"भरता तूं आपल्या स्वभावाला अनुरूप व आपल्या कुळाला शोभेल असाच मला दिला आहेस."

तेव्हां लक्ष्मण म्हणाला–"दादा! सर्व पापांतून मुक्ती देणारा यज्ञ अश्वमेध यज्ञ आहे. असें थोरामोठ्यांचें सांगणें आहे. पूर्वी कित्येकांनीं कीर्ति संपादन











करण्यासाठीं नव्हे तर पाप क्षालनासाठीं हा यज्ञ केला होता. उदाहरणार्थ इंद्रानें पापें केलीं तेव्हां त्यानें बृहस्पतीच्या सल्ल्यानें व त्याच्या मदतीनें अश्वमेध यज्ञ केला होता आणि त्याला पापांपासून मुक्ति पण मिळाली होती."

लक्ष्मणानें ती कथा पण सांगितली. म्हणाला—

"वृत्रासुर नांवाचा एक महा पराक्रमी राक्षस होता. तो धर्मपरायण व ज्ञानी होता. त्रिलोकांचा तो आदर करी. तो राज्य करीत असतां पृथ्वी त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करी. शेतें नांगरल्याशिवायच उत्तम पीक येई. पृथ्वी धनधान्यपूर्ण होती व पृथ्वीभर सर्वत्र सुबत्ता होती.

परंतु वृत्रासुराच्या मनाचें समाधान तेवढ्यानें झालें नाहीं. त्याला ऐहिक सुख अपुरें वाटलें. म्हणून त्यानें तपश्चर्या करण्याचा विचार केला. तो आपल्या मोठ्या मुलाला गादीवर बसवून तपश्चर्या करण्यासाठीं रानांत निघून गेला. त्याची तपश्चर्या पाहून इंद्र घाबरला. तो विष्णूकडे जाऊन म्हणाला—"वृत्रासुरानें त्रिलोक जिंकलाच आहे. आतां तो तपश्चर्या करूं लागला आहे. त्याची तपश्चर्या पुरी झाली तर मी त्याला कधींच जिंकूं शकणार नाहीं. म्हणून तूं त्याचा शेवट करून टाक. नाहीं तर मला किंवा इतर कोणत्याहि देवाला कोणी विचारणार सुद्धां नाहीं."

देवांच्या वतीनें इंद्रानें अशाप्रकारें विष्णूशीं विनवण्या केल्यानंतर विष्णु म्हणाला—"वृत्रासुर एक धर्मात्मा आहे. त्याच्यावर शस्त्र उगारण्यास मी नाहीं तयार. परंतु तुझ्या विनंतीला पण मान दिला पाहिजे. म्हणून वृत्रासुराच्या वधासाठीं मी तुला एक उपाय सांगतो. मी आपल्या



शक्तीचे तीन भाग सारखेसारखे करून एक तुला, एक तुझ्या वज्राला व तिसरा पृथ्वीला देतो, म्हणजे तुला वृत्रासुराचा वध करतां येईल."

तें ऐकून इंद्र व देव खूष झाले. ते सर्व वृत्रासुर तपश्चर्या करीत होता त्या वनांत गेले. वृत्रासुराचें तेज पाहून त्यांना वाटलें कीं या तेजानें त्रिलोक भस्म होईल. देव त्याला पाहून घाबरून गेले. इंद्रानें दोन्ही हातांनीं आपलें वज्र उचलून वृत्रासुराचा शिरच्छेद केला.

वृत्रासु ब्राह्मण होता. अर्थातच इंद्राला ब्रह्महत्येचें पाप लागलें. त्याला वाईट वाटलें. तेव्हां देव पुन्हां विष्णूकडे गेले आणि म्हणाले "देवाधिदेवा! वृत्रासुराचा वध तूं केलास आणि त्याचें पाप मात्र इंद्राला लागलें. आतां त्याला मुक्ति कशी काय मिळणार?"

"एक उपाय आहे. इंद्रानें अश्वमेध केला तर ब्रह्महत्येच्या पापाचें क्षालन होईल आणि इंद्र पूर्वीसारखाच पापमुक्त होईल. विष्णु देवांना म्हणाला.

तो सल्ला ऐकून देव बृहस्पतिआदि ऋषीमुनींना बरोबर घेऊन इंद्राकडे गेले.



इंद्र निश्चेष्ट स्थितींत भ्रांत मनानें भयभीत होऊन पडून होता. इंद्राला बरोबर घेऊन त्यांनीं अश्वमेध यज्ञ केला तेव्हां ब्रह्महत्येच्या पापांतून त्याला मुक्ति मिळाली.

लक्ष्मणानें गोष्ट सांगितल्यावर त्याला आठवलेली रामानें अश्वमेध यज्ञाचा महिमा वर्णन करून आणखी एक गोष्ट सांगितली. राम म्हणाला—

"पूर्वी कर्दम नांवाच्या प्रजापतीचा मुलगा इल बाल्हिक देशांत राज्य करीत असे. देव, राक्षस, नाग, यक्ष, गंधर्व सर्व त्याचा फार आदर करीत.



चैत्र महिन्यांत एकदां राजा हल आपल्या अनुयायांसह जंगलांत शिकारीला गेला असतां त्यानें अनेक जनावरांची शिकार केली. परंतु शिकारीची धुंद उतरली नाहीं. शिकार करीत तो कुमारस्वामी (षण्मुख)चा जन्म ज्या जागीं झाला होता त्या जागीं येऊन पोंचला. तेथें शिव पार्वती परिवारसमेत हजर होते. तेथील पर्वताचें विशेष असें कीं तेथें सर्व पशुपक्षी व वृक्ष स्त्री जातीचे होते. तेथें पोंचतांच राजा हल आणि त्याचे नोकरचाकर सर्वांना स्त्री रूप मिळालें.

आपल्या शरिरांत झालेला तो बदल पाहून राजा हल घाबरला. त्यानें शंकराच्या पायांवर लोटांगण घालून रक्षण करावें अशी विनंती केली.

"स्त्री रूप नाहींसें होण्याची गोष्ट सोडून आणखी काय वाटेल तें मागून घे" असें शंकर म्हणाला.

हलनें शंकराकडून कांहीं वर मागण्याचा विचार सोडून पार्वतीजवळ प्रार्थना केली. जगमंगला पार्वतीला दया आली. तिनें वर दिला कीं त्याला एक महिना झाल्या-वर पुरुष रूप मिळेल व पुन्हां एक महिन्यानें स्त्री रूप मिळेल. असेंच पुढें चालू राहील. मात्र स्त्री रूप मिळाल्यावर पुरुष रूपांतल्या व पुरुषरूप मिळाल्यावर स्त्री रूपांतल्या गोष्टी आठवणार नाहींत. अशा तऱ्हेनें हल हला झाला. त्याच्या सर्व नोकरांना पण स्त्री रूप मिळालें. ते त्या रानांत आनंदानें विहार करीत फिरूं लागले.

त्या पर्वतानजीकच एक सरोवर होतें. तेथें चंद्राचा मुलगा बुध आश्रम बांधून तपश्चर्या करीत असे. तो ऐनतरुणांत होता व सुंदर पण होता.



हला आपल्याबरोबरच्या स्त्रियांबरोबर जलविहार करीत असतां बुधानें त्यांना पाहिलें. तो हलावर मुग्ध होऊन गेला. शापाप्रमाणें हलाला पुरुषरूपाचा विसर पडला. त्याला पण वाटलें कीं त्याच्या-सारखा सुंदर पुरुष त्रिभुवनांत दुसरा असणें शक्य नाहीं.

हलाच्या बरोबरच्या स्त्रियांना बुधनें आपल्या आश्रमांत बोलवून ती कोण वगैरे चवकशी केली. त्या म्हणाल्या "ती आमच्यांत प्रमुख आहे. तिला कोणी पति नाहीं. ती आम्हांला बरोबर घेऊन वनविहार करीत आहे."

"तुम्ही सर्व माझ्या आश्रमांत सुखानें रहा. येथें कंदमुळें व फळें खायला आहेत व येथील किंपुरुष तुमचे पति होतील." बुध त्यांना म्हणाला. त्या सर्व निघून गेल्या.

नंतर बुध हलाला म्हणाला—"मी चंद्राचा मुलगा. माझें नांव बुध. पत्नी मानून मी तुला प्रेमानें वागवीन. तूं येथेंच माझ्या-जवळ रहा."

"तुझी इच्छा!" हला म्हणाली.

दोघें आनंदानें परस्परांच्या सहवासांत पति पत्नी म्हणून एक महिनाभर राहालीं.



एक दिवशीं सकाळीं हला हल महाराजांचें रूप आल्यावर अंथरुणावरून उठली. पण तिला आपल्या स्त्री रूपांतल्या जीवनाची आठवण राहाली नाहीं.

त्यावेळीं बुध सरोवरावर तपश्चर्या करीत बसला होता. हलनें त्याला जवळ जाऊन विचारलें—"मी आपल्या सैनिकांबरोबर इकडे आलों होतों. पण ते कोठें निघून गेले, नाहीं कळत!"

बुध म्हणाला—"एक तुफान आलें व त्यांत तुझ्याबरोबर आलेले सर्व मरून गेले. तूं स्वतः आश्रमांत आश्रयास म्हणून आला



होतास. दुःखी होण्याचें कारण नाहीं. येथेंच रहा सुखानें."

हल आपल्या सैनिकांच्या मरणाची गोष्ट ऐकून फार दुःखी झाला. तो म्हणाला— "आतां मला राज्य तरी कशाला ? तुम्ही परवानगी दिल्यास मी आपला मोठा मुलगा शशिबिंदु याचा राज्याभिषेक करून देऊन परत येईन."

"हल महाराज ! अरे असा निराश कां होतोस ? तूं एक वर्षभर येथेंच रहा. मी तुझ्या हिताचें तेंच करीन." बुध त्याला म्हणाला.

हल त्याप्रमाणें बुधकडे राहूं लागला. एक महिना स्त्रीरूप व एक महिना पुरुष रूप त्याला मिळत राहालें व तशांतच त्याला स्त्रीरूप असतांना बुधचा म्हणून एक मुलगा झाला.

नंतर बुधनें संवर्त, च्यवन, प्रमोद, दुर्वासा वगैरे ऋषींना बोलाविलें. हलाची त्यांच्याशीं ओळख करून दिली व त्याला पापमुक्ति करून देण्यास उपाय विचारला. त्याच वेळीं हलचा मुलगा कर्दभ व इतर मुनि आले. ज्यांना ज्यांना जें सुचलें तें त्यांनीं सुचविलें. पण कर्दभ म्हणाला— "अश्वमेध यज्ञ हा एकच उपाय आहे." त्याप्रमाणें अश्वमेधयज्ञ केला आणि हल राजाला पाप मोचन मिळालें. यज्ञ पूर्ण झाला त्यावेळीं स्वतः शंकरानें प्रकट होऊन हल राजाला शापमुक्त केलें.

परंतु हल बल्हिक देशांत परत गेला नाहीं. तो मगध देशांतच प्रतिष्ठान येथें राज्य करूं लागला. बुधाकडून त्याला जो पुरुरवा नांवाचा मुलगा झाला तोच हलराजानंतर या नव्या गादीवर बसला.

रामानें ती कथा आपल्या बंधूंना सांगितली. लक्ष्मणाला पाठवून त्यांनीं आपले पुरोहित

वशिष्ठ, जाबाली इत्यादिकांस बोलाविलें आणि अश्वमेध यज्ञ करण्याची इच्छा असल्याचें सांगितलें. त्याप्रमाणें यज्ञासाठीं सर्व तयारी सुरू झाली.

लक्ष्मणानें दूतांकरवीं किष्किंधेहून सुग्रीवाला व लंकेहून बिभीषणाला सपरिवार येऊन यज्ञ समारंभात भाग घेण्यासाठीं निमंत्रणें पाठविलीं. रामाच्या इतर मित्र राजांकडे पण निमंत्रणें पाठविण्यांत आलीं. दूरदूरचे ब्राह्मण, ऋषी, गायक, नट व नर्तक यज्ञसमारंभासाठीं आले.

गोमती तीरावर नैमिशारण्यांत यज्ञशाला सजविण्यांत आली. सहस्रावधि गाड्या भरून धान्य, मीठ, चंदन वगैरे आणण्यांत आलें. सैपाकी आले. कारागीर आले. रामाच्या तिघी माता आल्या व सीतेची एक सोन्याची प्रतिमा घडविण्यांत आली.

इकडे यज्ञाची सर्व तयारी झाली व तिकडे रामानें यज्ञाचा घोडा सोडला.

जे राजे यज्ञसमारंभाला आले होते त्यांनीं रामाला देण्यासाठीं भेट म्हणून अनेक वस्तू आणल्या होत्या. त्यांचा आतिथ्य सत्कार भरत व शत्रुघ्न करीत होते. ब्राह्मणांच्या सत्काराला सुग्रीवादिक वानर व ऋषी मुनींच्या सत्काराला बिभीषण व त्याचे राक्षस अनुचर हजर होते.

यज्ञ मोठ्या थाटानें झाला. कोणत्याहि वस्तूची कोणाला उणीव म्हणून भासली नाहीं. सोनें, चांदी, धन, रत्नें, गाई जें ज्यानें मागितलें तें त्यांना मिळालें. लोक म्हणूं लागले कीं पूर्वी दंड यानें, कुबेरानें किंवा यमानें जो यज्ञ केला होते ते देखील याच्या बरोबरीचे नव्हते. वर्षभर यज्ञसमारंभ चालू होता.





# अरण्यपुराण

[ २ ]

व्याघ्रराजानें एक डरकाळी फोडून विचारलें—“ माझ्या स्वतःच्या वस्तू-साठीं मी कुत्र्याच्या घरासमोर उभा राहूं म्हणतेस ? व्याघ्रराज कोण आहे माहीत आहेच तुला ? ”

लांडगीण दोन पावलें पुढें येऊन म्हणाली—“ तुला माहीत आहे ना कीं मला ‘ राक्षसीण ’ ही पदवी मिळाली आहे ती. हें माणसाचें पिलूं माझें आहे. होय, माझें ! तें कळपाबरोबर राहणार, त्याच्याबरोबर पळणार आणि शिकार करणार ? आणि शेवटीं तुझी पण शिकार करणार ! आतां जा आपल्या आईकडे लंगडत लंगडत ! ”

लांडगा चकितच झाला. तिनें तोंड उघडलें नव्हतें तोंपर्यंत तो त्याची बायको राक्षसीण म्हणून कळपांत ओळखली जाते ही गोष्ट विसरून गेला होता.

व्याघ्रराजानें विचार केला कीं लांडग्याला वठणीवर आणणें शक्य आहे. पण लांडगीणी-समोर आपली डाळ शिजणें शक्य नाहीं. तिच्या अंगांत त्याच्या इतकीच शक्ति व पराक्रम आहे हें ओळखून त्यानें आपलें तोंड बिळांतून बाहेर ओढलें. थोडा गुरगुरला व म्हणाला—“ कुत्रा आपल्या घरांत किती भुंकला म्हणून काय त्याचें ! मी देखील पाहून घेईन. या मनुष्याच्या मुलाला संभाळण्याची जबाबदारी घ्यायला कळप तयार आहे का ? त्याच्यावर माझा अधिकार आहे आणि तो माझ्याच दाढेखालीं येणार ! लक्षांत ठेव ! ”

शेवटीचें मलपृष्ठ

" व्याघ्रराजानें एक गोष्ट खरी सांगितली. कळपाची परवानगी घ्यावी लागणार!" लांडगा म्हणाला.

" कळपासमोर उभा करीन त्याला. रात्रीं उपाशीं उघडानागडा आला होता. भीति कसली! तो लंगडा त्याला खाऊन पळून गेला असता आणि गांववाले आपल्यावर सूड उगवायला धांवले असते. ठेवीन, ठेवीन! तीनदां सांगतें. हलं, नकोस रे मुला!! याचें नांव आज पासून मौवली. मौवली तूं मोठा झालास म्हणजे त्या व्याघ्र-राजाची शिकार कर. तुझी शिकार करायला आला होता ना तो." लांडगीण म्हणाली.

" बरें तर पाहूंया कळप काय म्हणतो तें." लांडगा म्हणाला.

वनाच्या नियमाप्रमाणें विवाहित लांडगा आपल्या कळपाबाहेर निराळें घर थाटूं शकतो. परंतु मुलें मोठीं झालीं म्हणजे त्यांना कळपांत आणून पोंचतें करावें लागतें. दर पौर्णिमेला कळपाची बैठक होत असे. त्या दिवशीं सर्व लांडगे एकत्र होऊन परस्परांची ओळख करून देत व घेत. हा 'संस्कार' संपल्यानंतर मुलांना हिंडा फिरायला स्वातंत्र्य मिळे. कळपांतल्या एकाद्या मोठ्या लांडग्यानें त्यांना कधीं दुखापत केली व तो पकडला गेला तर त्याला मृत्युदंड दिला जाई.

पिलें हिंडूं फिरूं लागल्यावर लांडगा आपल्या बायकोबरोबर पिलांना व मौवलीला घेऊन पौर्णिमेच्यादिवशीं रात्रीं रूपा पर्वतावर आला. त्याच्या टोंकाला असंख्य मोठमोठे दगड होते. त्यांच्या मागें शेंकडो लांडगे लपून बसणें शक्य होतें.

लांडग्यांच्या या कळपाचा एकू नांवाचा पुढारी होता. त्याच्या अंगांत वाघाची शक्ति होती. तो हुशार पण तसाच होता. तो डोंगराच्या शिखरावर पडून होता. खालीं चाळीस लांडगे बसले होते. त्यांत कांहीं एकट्यानें जाऊन हरण धरून आण-णारे लहान लहान लांडगेपण होते. एकू गेलें एक वर्ष या कळपाचा नायक होता. तरुण वयांत तो दोनदां पकडला गेला. एकदां त्याला चांगलाच मार बसला होता. त्याला माणसाच्या स्वभावाची चांगली ओळख होती.

सभेंत व्याख्यानें नव्हती होत. आईबाप मंडलाकार येऊन बसले. मुलें मधें उड्या मारीत व खेळूं बागडूं लागलीं. एक





म्हातारा लांडगा हळूंच उठून मुलाला जवळून नीट पाहून आला. प्रत्येकदां एकेक लांडगीण आपल्या मुलाला उचलून सर्वांची नजर त्यावर पडेल व सर्वांना तो दिसेल अशा उंच जागीं त्याला ठेवून येई. शिखरावरून ऐकूं म्हणे—"लांडगे हो! नीट पहा! तुम्हांला कायदा माहीतच आहे."

शेवटीं मौवलीची ओळख करून धायची वेळ आली. लांडगिणीच्या मानेवरचे केस उभे राहाले. लांडग्यानें मौवलीला आंत ढकललें. मौवलीचें सर्व अंग लकाकत होतें. चांदण्यांत लकाकणाऱ्या दगडाबरोबर तो खेळूं लागला.

एकूनें आपल्या पायांवरचें डोकेंवर उचलल्याशिवाय म्हटलें—"पहा, नीट पाहून घ्या!"

दगडाआडून डरकाळी ऐकूं आली. "तो मुलगा माझा आहे. मला द्या तो. स्वतंत्र आहां तुम्ही. मनुष्याचीं पिलें घेऊन काय करणार?

एकूनें कान नें ऐकून हललेदेखील नाहीत. तो म्हणाला—"लांडगे हो! नीट पहा घ्या! स्वतंत्र लोकांना स्वतःची आज्ञा मान्य असते. त्यांना हुकुमाची काय फिकिर?"

कित्येक लांडगे एकदम गुरगुरले. एका लांडग्यानें व्याघ्रराजाचा प्रश्न पुन्हां म्हणून दाखविला—"स्वतंत्र लोकांना मनुष्याच्या मुलाशीं काय काम?"

रानांत आणखी एक नियम आहे. कळपांत कोणत्याहि पिलाला सामील करीत असतां मतभेद झाला तर कळपांतल्या दोघां सभासदांना त्याची शिफारस करतां येते. पण आईबापांना तो अधिकार नसतो.

"या मुलाची शिफारस कोण करतो आहे?" एकूनें विचारलें. (पुढें चालू)





# ५६. स्टोन हेन्ज

इंग्लंडच्या साल्सबरी मैदानांतील हे शिलाखंड इसवी सनापूर्वी १७०० वर्षे निर्मिलेले आहेत. 'स्टोन हेन्ज' याचा अर्थ लोंबणारे शिलाखंड. सूर्योदयाचा जो कोन असतो त्याच्या आधारें ऋतु निर्णय करण्यासाठी हे शिलाखंड निर्मिले गेले. जे शिलाखंड आडवे आहेत ते उभ्या शिलाखंडांवर उतरविता येतील असेच घडवलेले आहेत. प्रत्येक शिलाखंड ३० फुट उंचीचा आहे व त्याचें वजन ५० टनावर आहे. यांपैकीं जास्त शिलाखंड वेल्समधून १६० मैलावरून आणण्यांत आले. इतर शिलाखंड त्याच प्रांतांतील आहेत. घोड्याच्या नालाच्या आकृतीचे शिलाखंड घडवून दोन रांगेत बसविले व त्यांच्या मधील शिलाखंडाला "देवाचें पीठ" ही संज्ञा देण्यांत आली. स्टोन हेन्जचे निर्माणकर्ते भूमध्य सागर प्रदेशांतले लोक होते व ते अग्निपूजक होते, असें सांगतात.












# भारताचा इतिहास



१७४७ मध्यें नादिरशाहाचा वध करण्यांत आला. त्याच्या सेनापतींपैकीं अहंमदशाह अब्दाली हा अफगाणिस्तानाचा एक स्वतंत्र शासक झाला. तो नादिरशाह बरोबर भारतांत आला होता. त्यानें स्वतः डोळ्यांनीं मोगल साम्राज्याची झालेली वाताहत पाहिली होती. अफगाणिस्तानाच्या गादीवर बसल्यानंतर स्थिरस्थावर झाल्यावर त्यानें भारतावर स्वारी केली. १७४८ ते १७६७ च्या दरम्यान त्यानें अनेक स्वाऱ्या केल्या.

या स्वाऱ्यांचा मूळ उद्देश्य फक्त लूटमार करणें हा नसून मोंगलांच्या सत्तेचा शेवट करून अफगाणांची सत्ता पुन्हां कायम करणें हा होता.

भारताच्या इतिहासांत या स्वाऱ्यांना फार महत्व आहे. या स्वाऱ्यांच्या मुळांन आणखी एक उद्देश्य होता. परदेशांत मिळविलेला जय हा स्वतःच्या देशांत त्याची प्रतिष्ठा वाढविण्यास उपयोगी होता. लुटीचा माल घेऊन आपल्या सैन्याला पगार व सेनापतींना इनाम वांटणें त्याला शक्य झालें.

१७४८ मध्यें अहंमदशाहनें पंजाबावर स्वारी केली तींत त्याला यश मिळालें नाहीं. कारण पंजाबच्या सुबेदारानें त्याचा पराभव केला. परंतु दोन वर्षांनीं अहंमद शाहनें पुन्हां स्वारी केली आणि या खेपेस त्याच्या पदरीं यश आलें. पंजाबच्या सुबेदाराला दिल्लीहून कोणत्याहि प्रकारची मदत मिळाली नाहीं. १७५१ च्या अखेरीस अहंमद शाहनें भारतावर आणखी एक स्वारी केली आणि काश्मीर जिंकलें. सरहिंद पर्यंतचा मोगल साम्राज्यांतला भाग त्यानें मोगलांकडून हस्तगत करून घेतला.

१७५६ मध्यें पंजाबांत सर्वत्र अराजकता होती व तो प्रांत मोंगल प्रधानमंत्री इमदुलमुल्क यानें बळकावला. अहंमदशाह अब्दालीनें नोव्हेंबर महिन्यांत चवथी स्वारी केली. २३ जानेवारी १७५७ या रोजीं तो थेट दिल्लीपर्यंत येऊन थडकला. त्यानें दिल्ली शहर लुटलें. मोंगल बादशाह आलमगीर द्वितीय यानें त्याला काश्मीर, सिंध, पंजाब व सरहिंदचे इलाखे देऊन त्याच्याशीं संधी करून घेतली. सन् १७५७ च्या एप्रिल मध्यें अब्दाली अनेक कैदी व पुष्कळ धन घेऊन स्वदेश परतला.

१७५७ च्या मे महिन्या पासून १७५८ च्या मे महिन्यापर्यंत अब्दालीचा मुलगा तैमूरशाह लाहोरचा वजीर म्हणून होता. त्याच्या शासनकाळांत अराजकता जास्तच पसरली. एका शीख सरदारावर अत्याचार झाला म्हणून सर्व शीख समाजानेंच बंड केलें. जालंधरचा सुबेदार आदीनबेग खान यानें अफगाण सत्तेविरुद्ध बंड पुकारलें आणि मराठ्यांची मदत मागितली. रघुनाथराव उर्फ राघोबा भरारी याच्या नेतृत्वाखालीं एका मोठ्या सैन्यानिशी १७५८ मध्यें पंजाबावर स्वारी करण्यांत आली. लाहोर काबीज



       



करून अफगाणांना तेथून पिटाळून लावण्यांत आलें. परंतु लाहोर शहर मराठ्यांच्या हातांत अवघे सहा महिनेच राहिलें. १७५९ च्या आक्टोबर महिन्यांत अब्दालीनें भारतावर पांचवी स्वारी केली, आणि पुन्हां पंजाबवर आपला अधिकार कायम केला.

भारतावर अधिकार प्राप्त करण्यासाठीं अफगाण व मराठे यांच्यांत चढाओढ सुरू झाली. १४ जानेवारी १७६१ या रोजीं पानीपतच्या मैदानांत दोघांचें युद्ध झालें. १७६२ मध्यें अब्दाली परत निघून गेला. पुन्हां शिखांनीं लाहोरच्या सुबेदाराला ठार केलें. १७६४ च्या मार्च महिन्यांत अब्दाली पुन्हां लाहोरला आला. तेथें तो दोन आठवडे राहाला आणि त्याच्या देशांत बंडाळी झाली असल्याचें ऐकून परत निघून गेला. १७६७ मध्यें तो शिखांच्या बंडाळीला आळा घालण्यासाठीं पुन्हां आला. पण त्याला त्या कामीं यश मिळालें नाहीं. पंजाबांत लाहोर व इतर अनेक जिल्हे शिखांच्या ताब्यांत आले.

भारताच्या इतिहासांत अब्दालीच्या स्वाऱ्यांचें काय महत्व आहे? त्यांच्यामुळें मोगल सत्तेचा ह्रास झपाट्यानें होऊं लागला. त्यामुळें मराठ्यांचा साम्राज्य विस्तार थांबला. त्यामुळें शिखांची शक्ति वाढायला परोक्ष रूपानें सहाय्य झालें. अफगाणांच्या स्वाऱ्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीला दहशत बसली. अब्दालीच्या मृत्युनंतर देखील त्याची दहशत लोकांना भासत होती.

दिल्लीचें राज्य कमकुवत होत गेलें तसतसे प्रांताधिकारी म्हणजे नबाब व सुबेदार स्वतंत्र होऊं लागले. तसे ते स्वतःला दिल्लीचा मांडलिकच म्हणवीत. अशा तऱ्हेनें कांहीं नवीन मुसलमान राज्यें उत्पन्न झालीं.



# नेहरू चरित्र

[ २६ ]



दुसऱ्या दिवशीं सायमन कमिशन येणार होतें त्या दिवशीं एक मोठा हरताळ होण्याचें ठरलें होतें. लाठी हल्ला झाल्याची बातमी वर्तमानपत्रांत वाचून वडील कदाचित काळजींत पडतील हा विचार करून जवाहरलालजींनीं घरीं टेलीफोन केला आणि कळविलें कीं काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु मोतीलालजींना काळजी वाटतच होती. म्हणून ते रात्रींच्या रात्रीं १४६ मैल लांब मोटारीनें प्रवास करून ५ तासांत लखनौ येथें येऊन पोंचले.

मोतीलालजी पोंचले तेव्हां जवाहरलालजी वगैरे रेल्वे स्टेशनावर जाण्याच्या तयारींत होते. आदल्या दिवशीं घडलेल्या गोष्टीमुळें नागरिकांचीं मनें उत्तेजित झालीं होतीं व लोकांचे थवे गल्लो गल्लीं दिसत होते. चहूबाजूंनीं लोकांच्या मिरवणुकी निघाल्या. कांग्रेसच्या कचेरींतून एक मोठी मिरवणूक निघाली. त्या मिरवणुकींत चार चार जणांच्या रांगा करून हजारों लोक सामील झाले. त्यांत जवाहरलालजी पण होते.

रेल्वे स्टेशनासमोर अर्धा मैल लांब रुंद असें एक मैदान होतें. पोलीसांनीं मिरवणुकीला अडविलें. लोकांना एका बाजूला उभें केलें. मैदान पोलीसांनीं व घोडेस्वारांनीं भरलेलें होतें. कित्येक लोक, जे ही सर्व गंमत पाहण्यासाठीं आले होते त्यांच्यामुळें मोठी गर्दी जमली.

घोडे स्वारांनीं समोर दिसेल त्याला डोळे मिटून मारहाण करण्यास सुरवात केली. ते लोकांना पायांखालीं तुडवीत घोड्यांना घेऊन

धुमसत होता. एवढें खरें कीं परम्परांविषयीं वैरभाव नव्हता. त्यावेळीं कांग्रेस स्वयंसेवकांच्या मनांत कोणती तरी अदृश्य शक्ति शिरून त्यांना सत्प्रेरणा देत असावीशी वाटे.

"हें सर्व काय व कशासाठीं आणि याचा शेवट कसा होणार ?" हे प्रश्न तेव्हां त्यांच्या मनांत उठले नाहींत. नंतर उठले.

सन १९२८ सालीं वर्षभर नेहरू देशभर दौरा काढीत फिरले. त्यांनीं पूर्ण स्वातंत्र्याची मागणी केली. साम्यवादी विचार त्यांनीं लोकांसमोर ठेवले आणि म्हणाले कीं पूर्ण स्वातंत्र्याशिवाय सामाजिक सुधार अशक्य आहे. कांग्रेसवाद्यांतच ह्या विचारांचा प्रचार जास्त आवश्यक आहे असे जवाहरलालजींना वाटे. राष्ट्रीय चळवळीचा मेरुदंड असे जे कार्यकर्ते त्यांच्या मनावर कोत्या राष्ट्रवादाचा पगडा होता असें जवाहरलालजींचें म्हणणें होतें म्हणूनच त्यांची (कार्यकर्त्यांची) दृष्टी मागें वळे. पराधीनता आल्यामुळेंच भारतीय संस्कृतीचें पतन झालें म्हणून जवाहरलालजींना वाटे कीं राष्ट्रीय चळवळ चालवणाऱ्या कार्यकर्त्यांच्या भविष्याकडेच प्रथम लक्ष पुरविलें पाहिजे.

जवाहरलालजींच्या पूर्वी देशांत समाजवादाचे विचार आले नव्हते असें मुळींच नाहीं परंतु सोव्हिएट राज्यक्रांतीमुळें रशियांत जी पंचवार्षिक योजना सुरू झाली. आणि त्याचें प्रत्यक्ष फळ म्हणून राष्ट्रीय उन्नति झाली, त्यामुळें यूरोपांत व अमेरिकेंतल्या प्रजेच्या मनावर देखील परिणाम झाला आणि आपल्या देशांतहि झाल्याशिवाय राहला नाहीं. जवाहरलालजींना एक सोशॅलिस्ट म्हणून जें अधिक महत्व मिळालें त्याचें कारण कांग्रेसच्या पुढाऱ्यांत ते मुख्य होते हें होय.





# पाताळ कोट

[४]

[रात्रीच्या वेळीं एक राक्षस कदंबच्या राजधानींत शिरून राजकन्या कांतिसेनेला उचलून घेऊन पळाला. पाहारेकरी त्याच्यावर बाणवृष्टि करूं लागले. उग्रसेन राजाच्या आज्ञेनें कांहीं घोडेस्वार त्याचा पाठलाग करण्यास निघाले आणि कांहीं अग्निबाण सोडूं लागले—पुढें]

राजवाड्यांत झालेला ओरडा आरडा ऐकून राजधानीभर खळबळ उडून गेली. लोकांना वाटलें कीं शत्रूनें स्वारी केली असावी. म्हणून कांहीं लोक नगराच्या मुख्यद्वाराकडे धावूं लागले.

मध्यंतरी रानाच्या दिशेनें म्हणून सोडलेले बाण इतके दूर पोहचूं न शकल्यामुळें मध्येंच राजधानींतल्या घरांवर पडले व कांहीं घरांना आग लागली. लोक घाबरून गेले आणि आपापल्या घराच्या रक्षणार्थ धांवपळ करूं लागले.

राजवाड्याच्या गच्चीवर उभा राहून राजा उग्रसेन तें सर्व पहात होता. तो मंत्र्याकडे वळून रागानें म्हणाला—"पाहिलेंत, ही आपली प्रजा! ही यांची राजभक्ति! संकट आलें आहे आणि प्रत्येकाला आपलाच स्वार्थ सुचतो आहे. आमच्या मदतीला एकजण तरी धांवतो आहे का? खरोखरच



शत्रूनें स्वारी केली तर कितीजण पुढें येतील कोणास ठाऊक मदतीला ?"

"महाराज ! राज्याच्या रक्षणासाठीं आपण पगार देऊन सैन्य नाहीं का उभें केलेलें ? या भित्र्यांच्या हातून का राज्याचें रक्षण होणार ? मरूं द्या त्यांना !" असें सांगून मंत्र्यानें अग्निबाण सोडणाऱ्या सैनिकांकडे बोट दाखविलें व पुढें म्हणाला— "पण, हे सैनिक जे अग्निबाण व भाले राक्षसावर म्हणून सोडीत आहेत ते राजकन्येला लागण्याची शक्यता पण आहे. म्हणून त्यांना नको का तें सांगायला ?"

उग्रसेन म्हणाला—"खरेंच कीं." आणि घाईघाईनें जिना उतरून खालीं गेला. जातांना म्हणाला—"मंत्री ! मी येईपर्यंत राजधानीच्या रक्षणाची जबाबदारी तुमच्यावर ! कारण शत्रु ही संधी साधून स्वारी करायला कमी करणार नाहीं. आपण त्याच्याकडे जे दूत पाठविले होते, ते आले नाहींत. काय झालें कोणास ठाऊक ?"

एका सैनिकानें राजाचा घोडा आणून उभा केल्याबरोबर राजा त्यावर बसून निघाला. त्याच्याबरोबर आणखी कांहीं घोडेस्वार पण निघाले. ते सर्व मुख्यद्वार पार करून रानांत शिरले. मंत्री कांहीं वेळ त्यांच्याकडे पहात होता. नंतर तो किल्ल्याच्या एका बुरुजावर चढून पाहण्यासाठीं निघाला. त्यावेळीं सहज त्याला वाटलें, हा राजा आपलें राज्य किती दिवस सांभाळणार ?

कदंब नगराच्या पूर्वेकडील जंगलांत मशाली घेऊन हिंडत असलेले अनेक सैनिक दिसूं लागले. कोण कोठें आहे हें मशालींच्या उजेडांत राक्षस राक्षसाला सहजीं ओळखतां नाहीं का येणार ? असें सहज मंत्र्याच्या मनांत आलें.



जंगलांत धूमक व सोमक हाच विचार करीत होते. कदंब राजाच्या मूर्खपणाबद्दल त्यांना हंसूं आलें. ते उभे होते त्या बाजूला सैनिक येत आहेत हें पाहून त्यांनीं घोड्यांना झुडुपाआड एका जागीं बांधून ठेवलें व स्वतः झाडावर चढून खालीं काय होत आहे हें पाहूं लागले. कांहीं सैनिक बरोबर त्याच झाडाखालीं येऊन बोलत उभे राहिले. त्यांच्या बोलण्यावरून राजकन्या कांतिसेनेला राक्षसानें पळवून नेल्याचें व तिच्या शोधार्थ स्वतः उग्रसेन जंगलांत आल्याचें दोघांना कळलें.

"त्या दुष्टाचा शेवट करायला ही संधी छान आहे, माझ्या मतें !" सोमक म्हणाला.

"अशी घाई करूं नकोस सोमक ! अरे आपण सैनिकांच्या गणवेषांत असतो तर तें शक्य झालें असतें. परंतु आपण आहों या कपड्यांत. जर आपल्याला त्यांनीं पाहिलें तर खात्रीनें ते आपल्याला ठार केल्याशिवाय राहणार नाहींत." धूमक म्हणाला. कांहीं वेळानें कदंब राजाचे सैनिक त्या झाडाखालून पुढें निघून गेले.

"सोमक ! उजाडण्यापूर्वी काळोखांतच आपण आपल्या गांवीं पोचलें पाहिजे. आपण आपापल्या लोकांना राज्याबाहेर पोचते करीपर्यंत आपल्याला कांहीं करतां पण येणार नाहीं." धूमक म्हणाला. सोमक कांहींच बोलला नाहीं. दोघे झाडावरून खालीं उतरूं लागले. इतक्यांत जवळच्या झाडाखालून एक भयंकर काळी आकृति जात असलेली व एका गुहेकडे वळलेली त्यांना दिसली. त्या आकृतीच्या खांद्यावर बेशुद्ध राजकुमारी होती.

धूमकनें सोमकला त्याचा खांदा धरून थांबायला खूण केली आणि गुहेकडे जात असलेली ती भयंकर आकृति दाखविली.



म्हणाला—"तो पहा राक्षस! त्याच्या खांद्यावर आहे राजकुमारी! तिच्या अंगावरच्या दागिन्यांतले हिरे पहा कसे चकाकत आहेत ते." सोमकला पण तें दृश्य पाहून आश्चर्य व भय वाटलें.

राक्षस गुहेच्या तोंडाजवळ पोंचला. त्याच वेळीं अनपेक्षित तऱ्हेनें गुहेंतून त्याला "कोण तो, परत फीर!" असा गंभीर आवाज ऐकूं आला.

"अरे वेड्या! कशाला व्यर्थ ओरडतो आहेस? आज रात्रीं कोणाला न खाण्याची शपथ मी खाल्ली आहे. मुकाट्यानें गुहेंतून बाहेर ये आणि पाय काढ!" राक्षस म्हणाला.

"तूं कोणी तरी राक्षस दिसतो आहेस. तर ऐक! मी आतांच एका महाकाय राक्षसाला औषध देऊन शुद्धीवर आणलें आहे. बडबड बंद कर आणि मुकाट्यानें चालता हो!" गुहेंतून उत्तर आलें.

तें उत्तर ऐकून राक्षसाला राग झाला. "अरे माणसा! तूं मला ओळखलें नाहींस वाटतें? मी राक्षस आहें कुंभीर!" त्या आवाजामुळें सारी गुहा दुमदुमली.

"मी मांत्रिक आहें कालशंबर! लक्षांत ठेव!" गुहेंतून आवाज आला. त्याच्या पाठोपाठ शंबरचा मंत्रदंड सापासारखा फूत्कार सोडीत बाहेर आला आणि कुंभीरच्या डोक्याला लागला.

कुंभीर एक महाकाय राक्षस, परंतु तो देखील मंत्रदंड लागतांच खालीं पडला. परंतु कांतिसेनेला कांहीं लागूं नये, या गोष्टीची त्यानें काळजी घेतली. त्या धक्यानें राजकन्या झोंपेंतून जागी झाल्यासारखी शुद्धीवर आली. तिनें चारी बाजूला न्याहाळून पाहिलें. गवताच्या गालिच्या सारख्या हिरव्या मैदानांत ती पडलेली होती.



जवळच राक्षस डोकें धरून कण्हत उभा होता. दांत ओठ चावून तो कांहींतरी पुटपुटत होता. त्याच्या डोक्याच्या दोन शिंगांपैकीं एक मंत्रदंडाच्या आघातानें तुटलें होतें. त्याजागीं एक मोठी जखम पण झाली होती आणि रक्त वहात होतें.

त्या भयंकर राक्षसाला त्या स्थितींत कण्हत असलेला पाहून कांतिसेनेला स्वतःचें दुःख विसरून गेलें व त्याची दया आली. ती उठून म्हणाली—"राक्षसा! मला खायचेंच होतें तर इतकें दूर कशाला आणलेंस? तुला कोणी मारलें आणि एवढी जखम कशी काय झाली? माझ्या वडिलांनीं मारलें का? तसे ते पराक्रमी व शूर आहेत. त्यांच्याकडे कोणी शरण मागायला आलें कीं ते त्याला दंड करीत नाहींत. तरी मी त्यांना सांगून तुला क्षमा करा म्हणून सांगीन."

राजकुमारीचें तें बोलणें ऐकून व तिचा तो निष्कपटपणा पाहून असह्य वेदना होत असूनहि त्या स्थितींत त्याला हंसूं आलें. तिच्या बोलण्या-वागण्याचा त्याच्या मनावर चांगला परिणाम झाला.

कुंभीर तेथून उठून झाडींत शिरला व एका झाडाचा पाला काढून तो जखमेवर चोळला आणि पुन्हां कांतिसेनेजवळ येऊन उभा राहिला. तेव्हां कांतिसेना गुहेकडे पहात होती. ती भयंकर गुहा पाहून भीतीनें तिचें सर्व अंग थर थर कांपत होतें.

"या गुहेंत कोण आहे? कोण बोलत होता तो? तो देखील राक्षसच आहे का? तो तुझा नोकर आहे का?" कांतिसेनेनें राक्षसाला विचारलें.

कुंभीरनें रागानें एकदां गुहेकडे पाहिलें. त्यांत माझा कोणी नोकर नाहीं. शत्रू आहे. त्यानेंच मला मारलें म्हणून ही जखम झाली. तो कोणीतरी मांत्रिक दिसतो आहे. आतां मी त्याचा समाचार घ्यायला गेलों तर माझ्या आतांच्या कामांत विघ्न येईल. म्हणून मी तूर्त त्याला सोडीत आहें."

"कोणतें काम आहे तुला? चोरासारखा मला उचलून घेऊन आलास आणि स्वतःला शूर म्हणवितोस!" राजकन्या म्हणाली. कुंभीर तें ऐकून एक क्षणभर गप्प बसला. त्याच्या डोळ्यांतून दोन टिपें गळलीं व मान खालीं करून पश्चात्तापाच्या आवाजांत तो म्हणाला—"कांतिसेने! माझ्यावर अशी रागावूं नकोस! मी स्वतंत्र नसून एका क्रूर व अति शक्तिशाली राक्षसाचा एक सेवक मात्र आहें. त्यानेंच तुला धरून घेऊन येण्यासाठीं मला पाठविलें होतें. तें काम मी केलें नसतें तर माझ्याहून क्रूर राक्षसाला तें दिलें गेलें असतें. त्याच्या आज्ञेविरुद्ध कांहीं करणें अशक्य आहे. परंतु मी तुला कधी न कधीं तरी तुझ्या घरीं सुखरूप पोंचती करीन. तें करीत असतां माझ्या जिवाला धोका असला तरी मी त्याची पर्वा करणार नाहीं."

"मग तें आतांच कां नाहीं करीत?" कांतिसेनेनें विचारलें.



"नाहीं! तें मी केलें तर तुझा व माझा दोघांचा जीव धोक्यांत पडण्याची शक्यता आहे. माझ्या मालकानें जेथें आणून तुला पोंचविण्यास सांगितलें आहे तेथें तुला पोंचतें करावेंच लागणार. तूं भिऊं नकोस! मी तुला त्याच्या हातांतून वांचवीन आणि तुला ज्याच्याशीं लग्न करावेंसें वाटेल त्याच्याशीं लग्न करून देईन." कुंभीर म्हणाला.

कांतिसेना कांहींच बोलली नाहीं. कुंभीरच्या बोलण्यावर तिचा विश्वास बसला. पण तो जें कांहीं बोलत होता तें कांहीं











तिला कळलें नाहीं. "आतां मी पळून जाणें अशक्य आहे. राक्षसाच्या डोळ्यांत धूळ फेंकणें अशक्य आहे. मदतीकरितां ओरडलें तर कोण येणार मदतीला? कुंभीरनें गळा दाबून ठार केलें तर कोणाला कळणार आहे! म्हणून गोड बोलूनच आपला बचाव करून घेतला पाहिजे." मनांतल्या मनांत तिनें विचार केला.

कांतिसेना या विचारांत असतां तिला गुहेसमोर एक मशाल दिसली. एक विचित्र आकृति तिला दिसली. त्या माणसाला लांब केस होते. एक भगवी कफनी त्याच्या अंगांत होती व हातांत एक मंत्र दंड होता.

"अधम राक्षसा! तूं अजून येथेंच उभा आहेस तर! काय ओरडा आरडा चालविला आहेस? तूं स्वतःशींच बोलत आहेस कीं आहे कोणी दुसरा बरोबर?" मांत्रिकानें विचारलें.

कुंभीर कांतिसेनेला एका बाजूला लपवून समोर उभा राहाला. दांत ओंठ चावीत तो म्हणाला. "अरे माणसाच्या पिल्ला! आज कोणाला न खाण्याची मी शपथ घेतली होती. पण तुला जिवंत मात्र सोडणार नाहीं."

मांत्रिक मोठ्यानें हंसला व मंत्रदंड उचलून म्हणाला—"अरे किड्या! तुला इतका राग कां?" तो मंत्रदंड फेंकणार कीं तेवढ्यांत त्याच्या उजव्या हाताला बाण लागला. झाडा आडून ओरडत पुष्कळसे लोक येत असल्यामुळें सर्व जंगल हादरून गेलें. मांत्रिकानें मशाल खालीं फेंकली आणि गुहेंत शिरला. कुंभीर राजकन्येला उचलून घेऊन आणखी एका गुहेंत शिरला आणि त्या जागीं बाणवृष्टी सुरू झाली.

[ पुढील गोष्ट पुढील अंकीं ]



# लक्ष्मीचा अनुग्रह

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतलें आणि स्मशानाच्या दिशेनें चालू लागला. तेव्हां प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! कार्यसिद्धी होण्यास फक्त मेहनत पुरत नाहीं, नशीब देखील लागतें. तुझें नशीब पाठमोरें आहे. म्हणून लक्षपुराच्या मेहनती भिल्लासारखेंच तुला आपल्या कामांत यश मिळत नाहीं. तुला मी त्याची गोष्ट सांगतों." असें सांगून वेताळ गोष्ट सांगूं लागला.

लक्षपुराचा राजा लक्षदत्त महादानी होता. तो, त्याच्याकडे कोणी याचक आला कीं एक लक्ष रुपयांहून कमी दान कधीं करत नसे. म्हणून त्याला लक्षदत्त हें नांव पडलें. त्याची कोणावर कृपा झाली म्हणजे

वेताळाच्या गोष्टी



त्या माणसाला कोणत्याहि गोष्टीची कधीं उणीव म्हणून भासत नसे.

राजवाड्याच्या सिंहद्वारावर लब्धदत्त नांवाचा एक भिल्ल रात्रंदिवस ऊन, थंडी व वारा किंवा पाऊस यांची पर्वा केल्याशिवाय बसून असलेला दिसे. त्या बिचाऱ्याची ती अवस्था पाहूनदेखील राजानें कधीं त्याची चवकशी केली नाहीं.

एकदां राजा आपल्या कांहीं अनुयायां-सह शिकारीला निघाला. राजाच्या पाठो-पाठ तो भिल्ल आपली काठी घेऊन निघाला. राजा घोड्यावर बसून हातांत धनुष्य बाण व इतर शस्त्रें घेऊन शिकार करीत होता. तेव्हां त्या भिल्लानें आपल्या काठीनेंच अनेक रानडुकरें व हरणें ठार केलीं.

"हा भिल्ल किती मोठा शिकारी आहे! पण फुटक्या नशिबाचा!" राजा चकित होऊन मनांत म्हणाला. परंतु राजानें त्याला मदत केली नाहीं.

एकदां लक्षदत्तनें आपल्या शेजारच्या राज्यावर स्वारी केली तेव्हां तो भिल्लपण त्याच्याबरोबर होता. त्यानें आपल्या काठीनेंच कित्येकांना ठार केलें. राजा त्याचा तो पराक्रम पाहून चकित झाला. तरी देखील त्यानें त्याला कोणत्याहि प्रकारें मदत केली नाहीं.

अशींच पांच वर्षें लोटलीं. सहाव्या वर्षी राजाला एक गोष्ट सुचली. लागोपाठ सहा वर्षें हा आपल्या पदरीं नोकरी करीत आहे आणि कष्टानें आयुष्य कंठीत आहे. त्यानें पूर्वजन्मीं कांहीं तरी पाप केलें असावें. म्हणून त्याचीं फळें या जन्मीं भोगावी लागत असावीत. पाहूं तर या कीं त्याचा तो भोग संपला किंवा नाहीं."

असा विचार करून राजा आपल्या खजिन्यांत गेला. कांहीं निवडक रत्नमाणिक्यें एका बेलफळांत ठेवून दुसऱ्यादिवशीं दरबा-रांत त्यानें त्या भिल्लाला बोलाविलें.

राजानें त्याला एक सुभाषित म्हणून दाखविण्यास सांगितलें. "ज्या प्रमाणें नद्या तुडुंब भरलेल्या समुद्रांतच पाणी ओततात त्याच प्रमाणें धनी लोकांकडेच धन धावतें." या अर्थाचा एक श्लोक त्या भिल्लानें म्हटला. राजाला फार आनंद झाला व त्यानें रत्नमाणिक्यें भरून ठेवलेलें तें बेलफळ त्या भिल्लाला दिलें. तें पाहून दरबारी चकित झाले. कारण राजा जेव्हां कोणावर खूष होई तेव्हां सुवर्णवृष्टीसारखें दान करी. पण त्यानें भिल्लाला एक बिल्व-फळच दिलें. पाहणाऱ्यांना तें सर्व चकित करून सोडण्यासारखेंच होतें.

तें बेलफळ मिळाल्यानें त्या भिल्लाच्या मनाचें पण समाधान झालें नाहीं. तो तें बिल्वफळ घेऊन जात असतां त्याला वाटेंत राजबंदी नांवाचा एक बौद्धभिक्षु भेटला. त्याला त्या भिल्लानें तें बिल्वफळ दान केलें. भिक्षूनें त्याला आपल्या अंगावरचें एक पीतवस्त्र (उपरणें) काढून दिलें. भिल्लानें तें विकून जे पैसे मिळाले त्यावर कांहीं दिवस उदर निर्वाह केला.





त्यानंतर भिक्षु राजाच्या दर्शनास गेला व त्यानें तें बिल्वफळ राजाला दिलें. राजानें तें ओळखून भिक्षूला तें कसें मिळालें हें विचारलें. भिक्षूनें भिक्षाकडून मिळाल्याचें सांगितलें. त्याचा भोग अद्याप संपला नाहीं असें राजाला वाटलें.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां दरबार भरला. राजानें भिक्षाला आपल्या जवळ बसविलें. पहिल्या दिवशीं राजानें जो श्लोक ऐकला होता तो पुन्हां म्हणावयास त्याला सांगितलें. राजानें त्याची प्रशंसा करून तेंच बेलफळ त्याच्या हातांत दिलें. भिक्षु तें बेलफळ घेऊन बाहेर गेला. त्याला एक अधिकारी भेटला. त्याला त्यानें तें बेलफळ देऊन टाकलें आणि त्याच्याकडून एक धोतरजोडी घेऊन निघून गेला.

त्या अधिकाऱ्यानें तें बेलफळ राजाला आणून दिलें. राजानें विचारल्यावर तें बेलफळ त्याला भिक्षाकडून मिळाल्याचें त्या अधिकाऱ्यानें सांगितलें. म्हणजे अजून त्याचा भोग संपलेला नाहीं तर! राजा मनांतल्या मनांत म्हणाला.

तिसऱ्या दिवशीं पुन्हां दरबार भरला असतां राजानें भिक्षाला पुन्हां बोलाविलें व त्याच्या तोंडीं तो श्लोक ऐकून तेंच बेलफळ बक्षिस म्हणून त्याला दिलें. भिक्षानें तें बेलफळ विलासिनी नांवाच्या एका राज-नर्तकीस दिलें. तिनें त्याबद्दल त्याला एक सुवर्णमुद्रा दिली.

राजनर्तकीनें तें बेलफळ नेऊन राजाला भेट म्हणून दिलें. 'लक्ष्मीचा अनुग्रह अजून झाला नाहीं म्हणावयाचा त्या बिचाऱ्यावर!' राजाला त्या भिक्षाची दया आली.

चवथ्या दिवशीं राजानें भिक्षाला पुन्हां दरबारांत बोलाविलें आणि श्लोक ऐकून तें बेलफळ बक्षिस म्हणून त्याला देऊं लागला. पण भिक्षाच्या हातांत येण्यापूर्वींच तें चुकून जमिनीवर पडलें व फुटलें. त्यांतलीं लकाकणारीं रत्न-माणिक्यें पाहून सर्व चकित होऊन राजाकडे व त्या भिक्षाकडे पाहूं लागले.

तेव्हां राजा दरबाऱ्यांना सर्व वृत्तांत वर्णन करून म्हणाला-"या भिक्षाच्या पूर्वजन्मीच्या पापाचा भोग केव्हां संपतो हें मी पहात होतों. आज तो संपला. आज लक्ष्मीचा अनुग्रह झाला आहे." असें सांगून राजानें त्या भिक्षाला बेलफळांतून खालीं जमिनीवर पडलेलीं सर्व रत्नमणिक्यें दिलीं व एक जहागीर पण लिहून दिली आणि त्याला आपला सामंत म्हणून नेमलें.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला- "राजा, मला हें नाहीं कळत कीं त्या भिक्षानें असें कोणतें पाप केलें होतें कीं पांच वर्षेपर्यंत त्याला दान करण्याचें लक्षदत्त राजाला सुचलें देखील नाहीं आणि सुचल्या-नंतर लागोपाठ तीन दिवस लक्ष्मीचा अनुग्रह झाला नाहीं व चवथ्या दिवशींच तो झाला. असें कां? या शंकेचें समाधानकारक उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या



डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळूं लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"त्या भिल्लाचें सर्वांत मोठें पाप म्हणजे तो याचक होऊन राजाकडे गेला नाहीं. कारण लक्षदत्त कोणी याचना केल्याशिवाय दान करीत नसे. भिल्ल स्वतःच्या मनगटाच्या बळावर अवलंबून होता. तो पांच वर्षेंपर्यंत राजाची कृपा होईल ही आशा धरून वाट पहात होता. त्यानंतर त्यानें एकदां शिकारीला गेला असतां व दुसऱ्या वेळीं युद्धांत आपला पराक्रम गाजवून राजाचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें होतें. राजाच्या दृष्टींत तो दोन्ही वेळीं याचक म्हणून नव्हता. राजाचा अंतरात्मा तळमळूं लागला कीं पांच वर्षें आपल्या दरवाज्यावर तो उभा आहे, पण त्याला आपण कांहीं दिलें नाहीं. तेव्हां त्यानें दान करण्याचें मनाशीं ठरविलें. पण मागितल्याशिवाय दान कसें द्यावयाचें? म्हणून त्यानें गुप्तदान करून त्याची परीक्षा करून पाहिली. पाप केल्यामुळें त्याला बेलफळांतील रत्नमाणिक्यें नाहीं मिळालीं तर ज्याला ज्याला त्यानें तें बेलफळ दिलें त्यांना तरी तीं कोठें लाभलीं. याचा अर्थ असा कीं त्यांनीं देखील पूर्वजन्मीं पाप केलें होतें. शेवटीं लक्ष्मीचा अनुग्रह होण्यास राजानेंच एक युक्ति केली. त्यानेंच तें फळ जमिनीवर समजून उमजून पाडलें.

तात्पर्य हें कीं सुरवातीपासून चूक लक्षदत्ताचीच होती. भिल्लाचें पूर्वजन्मीचें पाप त्याच्या आड कधींच आलें नाहीं किंवा लक्ष्मीचा अनुग्रह पण खोटाच होता."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळूं लागला. (कल्पित)





# राजकुमार व मंत्रीकुमार

पुष्करावतीचा राजा गूढसेन याला एकच एक मुलगा होता. बालपणापासून मंत्र्याच्या मुलाशीं त्याची फार मैत्री होती. दोघांचें वय एक, रूपरंगपण एकच. एक क्षणभरदेखील दोघे परस्परांना सोडून रहात नसत.

कांहीं दिवसांनीं राजकुमाराचें अहिच्छत्रच्या राजकन्येशीं लग्न ठरलें. राजकुमार आपल्या मित्रांबरोबर अंबारींत बसून निघाला. लव्याजम्यासह वऱ्हाड अहिच्छत्र नगरीस निघालें. संध्याकाळच्या सुमारास इक्षुमति नदीच्या काठीं पडाव टाकण्यांत आला. जेवण झाल्यावर राजकुमारानें आपल्या आजीला गोष्ट सांगायला सांगितलें आणि गोष्ट ऐकत असतांच दिवसभरच्या प्रवासानें थकून गेल्यामुळें राजकुमाराला झोंप लागली. नंतर आजीपण झोंपी गेली.

पण मंत्र्याच्या मुलाला झोंप लागली नाहीं. त्याला आकाशांत कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला. कोणीतरी दोघीतिघी देवी कोणाशीं तरी बोलत होत्या. त्यांपैकीं एक म्हणाली—"हा पापी गोष्ट पुरी होण्यापूर्वींच झोंपला. म्हणून त्याला मी शाप देतें आणि हा हार खालीं फेंकतें. सकाळीं तो हातांत घेतल्यावरोबर तत्काळ त्याला मरण येईल."

"तसा तो मेला नाहीं तर झाडावरचा आंबा काढायला जाईल व तो काढल्याबरोबर मरेल." दुसरी म्हणाली.

"तरी तो मेला नाहीं तर लग्नमंडपांत पाऊल टाकतांच घर कोसळून त्याच्या

अंगावर कोसळेल व त्याला मरण येईल." तिसरी म्हणाली.

"आणि समज, त्यांतूनहि तो वांचलाच तर झोंपयच्या खोलींत प्रवेश केल्यावर त्याला शंभरावर शिंका येतील आणि प्रत्येक वेळीं कोणी 'चिरंजीवी भव' असा आशीर्वाद दिला नाहीं तर तो खात्रीनेंच मरेल." चौथी म्हणाली.

"हें सर्व जें आपण बोलत आहों तें ऐकून त्याला कोणी सावध केलें तर सावध करणारा पण मरेल." पांचवी म्हणाली.

त्यानंतर त्या पांचहि जणी आकाश-मार्गानें कोठें तरी निघून गेल्या.

मंत्र्याच्या मुलाला डोक्यावर एकाएकी वीज पडल्यासारखें पोटांत धस्स झालें. कारण राजकुमाराचा मृत्यू झाला तर आपलें जीवित तरी काय मोलाचें? आपण हें सर्व सांगून फार तर स्वतःचा जीव घालवून बसणार. पण मित्र वांचेल. असा विचार करून मंत्र्याच्या मुलानें आपल्या मित्राला कांहीं सांगितल्या शिवायच त्याचें रक्षण करण्याचें ठरविलें. त्याला झोंप आली नाहीं.

सकाळीं उठून सर्व निघण्याच्या तयारींत होते. राजकुमाराला जमिनीवर एक हार पडलेला दिसला. तो उचलण्यासाठीं राज-कुमार वांकणार तेवढ्यांत मंत्र्याच्या मुलानें त्याला म्हणाला—"त्याला हात लावूं नकोस. तो मंत्रवलेला हार दिसतो आहे. तसें नसतें तर आपल्या सैनिकांपैकीं तो कोणाला दिसला नसता का? दिसला असता तर कोणी तो उचलून घेतला नसता का?" राजकुमारानें आपल्या मित्राच्या सल्ल्या-प्रमाणें हार घेतला नाहीं.

कांहीं अंतर चालून गेल्यावर त्यांना एक उद्यान लागलें. एक आंब्याचें झाड फळांच्या वजनानें वांकलेलें दिसलें. राजकुमार आंबे तोडायला पुढें सरसावला. पण मंत्र्याच्या मुलानें त्याला अडविलें व म्हणाला- "मित्रा! तीं खाण्यासारखीं फळें असतीं तर झाडावर टिकलीं असतीं का? माकडांनीं व वानरांनीं तोडून नसतीं का खाल्लीं!" मित्राच्या सल्ल्याप्रमाणें राजकुमारानें फळें तोडलीं नाहींत. इतकीं सुंदर फळें सोडून जातांना त्याला वाईट वाटलें.

नंतर तो अहिच्छत्र येथें विवाह मंडपांत प्रवेश करणार इतक्यांत त्याच्या मित्रानें त्याला मागें ओढलें आणि त्याच वेळीं घराचा पुढील भाग कोसळून खालीं पडला.















विवाह समारंभ संपला. राजकुमारानें शयनगृहांत प्रवेश केला. मंत्र्याचा मुलगा त्याच्या आधींच शयन गृहांत शिरून लपून बसला होता. राजकुमार बिछान्यावर बसला मात्र शिंका येऊं लागल्या. शंभरदां तो शिंकला. प्रत्येक वेळीं मंत्र्याचा मुलगा "चिरंजीव भव!" म्हणत गेला. शंभर वेळ "चिरंजीव भव!" म्हटल्यानंतर मंत्र्याच्या मुलाला आनंद झाला. तो लपून बसला होता तेथून उठून राजकुमाराशीं कांहीं बोलल्या-शिवाय खोलींतून बाहेर निघून गेला. राज-कुमाराला तें आवडलें नाहीं. आपल्या शयन गृहांत शिरण्याचा विचार याच्या मनांत कां बरें आला असावा? द्वारपालकाला बोलावून तो म्हणाला—"माझ्या झोंपायाच्या खोलींतून आतां जो मनुष्य पळून गेला त्याला धरून उजाडण्याच्या आंत त्याला फांशी दे."

शिपायांनीं मंत्र्याच्या मुलाला कैद करून अंधार कोठडींत टाकलें आणि उजाडण्यापूर्वी त्याला धरून वध्यभूमीकडे निघाले. तेव्हां मंत्र्याचा मुलगा म्हणाला—"माझी एक शेवटची इच्छा आहे. आपल्या मित्राचा शेवटचा निरोप घ्यावा असें वाटत आहे. त्यानंतर तुम्ही द्याल ती शिक्षा मला कबूल आहे."

शिपायांनीं राजकुमाराला मंत्र्याच्या मुलाचा निरोप कळविला. मंत्र्याच्यासल्ल्या-प्रमाणें राजकुमार भेटायला तयार झाला. मंत्र्याच्या मुलानें येऊन घडलेला वृत्तांत सांगितला. त्यानें घर पडलेलें स्वतःच्या डोळ्यादेखत पाहिलें होतें. म्हणून मित्राच्या बोलण्यावर त्याचा विश्वास बसला. तेव्हां आपली चूक त्याच्या लक्षांत आली व दोघांच्या मैत्रींत पुढें कधीं खंड पडला नाहीं.





# परोपकारी गोपाळ

गोपाळच्या गांवीं दंभाराम नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला जुगारीचा नाद होता व तो व्यर्थ खर्च फार करी. अशा तऱ्हेनें तो स्वतःजवळ जें कांहीं होतें तें सर्व घालवून बसला आणि पुष्कळसें कर्ज करून ठेवलें.

एका कडून त्यानें दोन हजार रुपयांचें कर्ज घेतलें होतें. बरेच दिवस झाले. त्यानें व्यांज दिलें नाहीं कीं मूळ फेडलें नाहीं. तेव्हां कर्ज देणाऱ्यानें त्याला घर ताब्यांत घेतों अशी धमकी दिली. तोंपर्यंत दंभा-रामच्या बायकोला नवऱ्यानें कर्ज काढलें असल्याची गोष्ट माहीत नव्हती. ती दंभारामाला म्हणाली—"काय वाटेल तें झालें तरी चालेल, घर वांचविलें पाहिजे. हें दागिने नेऊन कोणाकडे तरी गहाण ठेवून पैसे आणा व घर सोडवा. मुलीच्या लग्नापूर्वी तें कर्ज फेडून दागिने सोडवून आणा."

दंभारामाची बायको माहेरचे मिळालेले दागिने वापरीत नसे. तिनें ते दागिने आपल्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं तिला देण्यासाठीं काढून ठेवले होते. ते दागिने बायको गहाण ठेवायला किंवा विकायला कधीं तयार होणार नाहीं हें दंभारामाला माहीत होतें. नाहींतर त्यानें ते केव्हांच तिच्याकडून मागून गहाण टाकले असते किंवा विकून टाकून मोकळा झाला असता. एकदां तो जुगारींत सर्व घालवून बसला व डोक्यावर कर्ज चढलें., तेव्हां त्यानें ते दागिने चोरून नेऊन विकून टाकले आणि कर्ज फेडून टाकलें. नंतर सोनाराकडे गेला व त्याच्याकडून खोट्या सोन्याचे तसेच












दागिने करून आणून घरांत बायकोच्या पेटींत आणून ठेवून दिले होते. म्हणून बायकोनें ते दागिने गहाण ठेवण्याची गोष्ट काढली तेव्हां दंभाराम म्हणाला—"बरें तर तसें करूं!" तो पेटी घेऊन निघून गेला.

खोटे दागिने ठेवून घेऊन कर्ज देणारा कोण भेटणार या विचारांत दंभाराम पडला. तेव्हां त्याला गोपाळची आठवण झाली. तो पेटी घेऊन गोपाळचा घरीं आला व म्हणाला—"गोपाळ! मी तुझ्याकडून तीनशें रुपये घेतले होते तें मला आठवतें. तुला नसेल आठवत. आतां जिवावरचें संकट आलें आहे. तूंच वांचविलेंस तर वांचणार! माझ्या मुलीसाठीं एक चांगलें स्थळ आलें

आहे. तूंच वांचविलेंस तर वांचणार! माझ्या मुलीसाठीं एक चांगलें स्थळ आलें

आहे. तीन हजार रुपये पुढें केले पाहिजेत. मुलगी तुझीच आहे. कन्यादानाचें पुण्य तुझ्याच पदरीं पडेल. हे आहेत बायकोचे दागिने. पाहिजे तर ठेवून घे. "अरे हो.....पण.....किल्ली घरींच विसरून आलों वाटतें." असें कांहीं बोलतो आहे तें सर्व खरें आहे, असें त्यानें सोंग केलें.

"अरे, तूं म्हणालास तें पुरे आहे. दागिने पाहून काय करायचें आहे? असूं दे किल्ली. पेटी मागाहून वाटेल तेव्हां घेऊन घेऊन जा. तुला पाहिजे आहेत ते पैसे देतों. मुलीचें लग्न उरकून घे." असें सांगून गोपाळनें त्याला तीन हजार रुपये काढून दिले व पेटी घरांत नेऊन ठेवून दिली.

दंभारामानें कर्ज फेडलें आणि घर वांचविलें. दंभारामाच्या बायकोला पण हावसें वाटलें कीं नवऱ्यानें तिचे दागिने कोणा लबाड सावकाराकडे, गहाण टाकले नाहींत.

बरेच दिवस लोटले. दंभारामाची बायको कर्ज फेडून दागिने सोडवून आणण्याचा आग्रह करूं लागली. "आहेत कोठें पैसे कर्ज फेडायला? मग कसे आणूं दागिने सोडवून?" दंभाराम म्हणाला. तो गोपाळची गांठ पडूं नये याची काळजी बाळगी. एकदां गांठ पडलीच तेव्हां गोपाळनें विचारलें—"कायरे! झालें का मुलीचें लग्न?" तेव्हां तो म्हणाला "तें स्थळ गेलें हातचें, दुसरें पाहातों आहें."

अशा तऱ्हेनें दोन वर्षें लोटलीं व खरो-खरच एक चांगलें स्थळ मुलीला सांगून आलें. पत्रिका जुळल्या. परंतु वर पक्षाचें म्हणणें होतें कीं सालकृता कन्यादान झालें पाहिजे. कन्येच्या बापानें यथाशक्ति दागिने घालावे करतां असें वचन दिलें, पण वरमाई व वर-पिता त्याला कबूल होईनात.

एक चांगलें स्थळ हातचें जाणार कीं काय याची काळजी आईबापांना वाटूं लागली. वधू तर रडूंच लागली. बायको म्हणाली—"घेऊन कां नाहीं येत दागिने सोडवून?" दंभारामानें उलट बायकोवरच तोंडसुख घेतलें व म्हणाला—"हें स्थळ नाहीं तर नाहीं. याहून चांगली शंभर स्थळें मिळतील!"



गोपाळच्या कृपेवर मुलीचें भाग्य अवलं-बून आहे हें ओळखून दंभारामाची बायको मुलीला घेऊन गोपाळच्या घरीं गेली. गोपाळ त्यावेळीं घरीं नव्हता. एकटी लक्ष्मी होती घरांत. दंभारामाच्या बायकोनें तिचे पाय धरले व म्हणाली—"बाईचें काळीज बाईलाच कळतें. हा पोटचा गोळा उकीरड्यावर का फेकून देऊं. चांगलें स्थळ आलें आहे. तुम्हीच हें लग्न करवून द्या."

"बरोबर आहे तुमचें म्हणणें. कर्ज आहे म्हणून मुलीला वाटेल त्याच्या गळ्यांत का कोणी बांधून देतो? येऊं दे त्यांना. मी














तुमची पेटी घ्या म्हणून सांगते. पैसे घ्या मागाहून. पण हें स्थळ नका हातचें जाऊं देऊं." गोपाळची बायको म्हणाली.

दंभारामाची बायको पेटी घेऊन घरीं जातांना म्हणाली- "उद्यांचा मुहूर्त आहे. लग्नाला आलें पाहिजे बरं का? पुरुषांचें बोलावणें करायला येतीलच. पण आले नाहींत म्हणून रागावूं नका. सर्वजण या."

घरीं आल्यावर तिनें वरपक्षाला दागिने पाहून जावें, म्हणून निरोप पाठविला आणि नवऱ्यासमोर लक्ष्मीचे पुष्कळ गोडवे गाइले. म्हणाली—"अगदीं नवऱ्याला शोभेल अशी गुणी बाई आहे!" दंभाराम मनांतल्या मनांत म्हणाला, जें झालें तें ठीकच झालें.

दुसऱ्या दिवशीं गोपाळ आला. वरपिता भटजींना बरोबर घेऊन आला. दंभारामानें दागिन्यांची पेटी समोर ठेवली व म्हणाला—"हे माझ्या बायकोचे दागिने आहेत. इतके दिवस यांच्याकडे गहाण टाकावे लागले होते. परंतु यांनीं कृपा करून आज ते परत दिले. म्हणाले—"कर्ज सावकाश फेडा. मुलीचें लग्न उरकून घ्या!"

"अहो, हें सर्व बोलायचें असतें का? उघडा पेटी!" गोपाळ म्हणाला.

दंभारामानें किल्ली आणून वरपित्याच्या हातांत दिली. गोपाळकडे पेटीची किल्ली नव्हती हें पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. वरपित्यानें कुलूप काढून पेटी उघडली आणि हातांत दागिने घेऊन म्हणाला—"हे दागिने तर खोट्या सोन्याचे आहेत! सर्व मिळून शंभर रुपयाचे तरी असतील कीं नाहीं, शंकाच!" असें म्हणत तो डोळे वटारून दंभारामाकडे पाहूं लागला.

दंभाराम त्याहून जास्त डोळे वटारून गोपाळकडे पाहूं लागला. म्हणाला—"असा विश्वासघात! खरे दागिने उचलून खोटे ठेवलेस आणि वर आमच्यावरच उपकारांचें ओझें टाकतो आहेस! तुझ्यासारख्याला जिवंत चिरला तरी पाप लागणार नाहीं!" तो जोरानें गोपाळला शिव्या देऊन मारायला धांवला.

"पण किल्ली तर तुमच्याजवळच होती नाहीं का!" वर विचारूं लागला.

दंभारामाच्या बायकोला नवऱ्याचें सर्व कारस्थान कळायला वेळ लागला नाहीं. "माझ्या मुलीच्या मानेवर सुरी फिरविली आपल्या हातानें! माझेंच नशीब फुटकें! देवा! हें काय रे केलेंस?" असें म्हणून ती रडूं लागली."

गोपाळ दंभारामाच्या बायकोला बाजूला बोलावून घेऊन जाऊन म्हणाला—"हें पहा, माझी निंदा लोकांसमोर झाली तरी हरकत नाहीं. परंतु हें कोणाचें कारस्थान आहे हें तुला कळलें असलें किंवा माहीत असलें तरी तोंडांतून 'ब्र' देखील काढूं नकोस! हें लग्न होणार! तूं सर्व पहात रहा! घाबरण्याचें कारण नाहीं."

तो वरपित्याला म्हणाला—"मी अर्ध्या तासाच्या आंत परत येतों. माफ करा! तुमचा खोळंबा होत आहे."



असें सांगून तो घरीं गेला आणि बायकोला म्हणाला—"एका मुलीचें सर्व जीवित वांचविण्याची संधी मिळाली आहे तुला. तुझे सर्व दागिने काढून दे पाहूं."

लक्ष्मी आपली पेटी घेऊन गोपाळबरोबर लग्नघरीं आली.

गोपाळच्या गैरहजेरींत दंभाराम गोपाळाविरुद्ध तोंडाला आलें तो बोलला. म्हणाला—"यानेंच फिरविली सुरी माझ्या मुलीच्या मानेवर! दानी म्हणवितो स्वतःला आणि असली कृष्ण कारस्थानें करीत असतो." परंतु कोणाला त्याचें बोलणें खरें

वाटेना. गोपाळ सांगून गेला होता म्हणून वरपक्षांतील लोक त्याच्या शब्दाला मान देऊन वाट पहात बसले होते.

इतक्यांत गोपाळ आला. त्यानें लक्ष्मीला पेटी उघडायला सांगितलें. वरपक्षासमोर दागिने ठेवून म्हणाला—"हे घ्या दागिने! हें लग्न झालेंच पाहिजे!"

मध्यंतरी वर नकली दागिने पहात होता. त्यावर त्याला व्यंकटशेट सोनार हें लिहिलेलें दिसलें व तसें तो म्हणाला देखील.

तें ऐकून दंभारामाचा चेहरा खाडकन उतरला. गोपाळनें ते दागिने पेटींत ठेवून दिले व पेटी बंद करीत म्हणाला—"आतां हें सर्व कशाला? दंभारामानें ते माझ्याकडे गहाण ठेवले होते. ते माझ्याकडेच राहतील."

गोपाळचें औदार्य सर्वांना कळलें. वरपिता दागिन्यांशिवायच मुलाचें लग्न करून घ्यायला तयार झाला. ती बातमी गांवभर पसरली. एक म्हातारा मनुष्य दंभारामाच्या घरीं आला व म्हणाला—"हे आहेत या मुलीचे दागिने! जुगार खेळतांना दंभाराम हारला व हे दागिने दंभारामाकडून मी घेतले होते. गोपाळनें खरे दागिने काढून घेऊन नकली दागिने पेटींत ठेवल्याची अफवा मी ऐकली व या भल्या माणसाची लोक निंदा करीत असल्याचें ऐकलें तेव्हां मला राहवलें नाहीं. मी येऊन जाऊन पैजेंत जिंकलेले दागिने हे. ही माझ्या मेहनतीची कमाई नव्हे. म्हणून परत देतांना माझ्या मनाला कांहीं वाईट वाटत नाहीं."

लग्न समारंभ थाटामाटानें पार पडला. पण दंभारामाला मात्र तोंड दाखवायला जागा उरली नाहीं.





# जुळीं भावंडें

एका गांवीं एक कोळी रहात असे. मासे धरण्यांत तो फार पटाईत होता. त्या धंद्यांत त्याला लाभपण पुष्कळ होत असे. परंतु मूलबाळ नाहीं म्हणून त्याला फार वाईट वाटत असे.

एकदां कोळी मासे धरण्यासाठीं गेला असतां त्याच्या घरीं एक म्हातारी आली. म्हणाली—"अग कोळिणी! किती पैसे मिळविले तरी खरें सुख त्यांत आहे का? मूलबाळ ज्याला नाहीं त्याचें जिणें व्यर्थ आहे बघ!"

"आमचें भाग्यच फुटकें त्याला आतां कोण काय करणार? असेंच रडत सर्व आयुष्य कंठायचें नशिबीं लिहिलेलें आहे." कोळीण म्हणाली.

"हें काय वेड्यासारखें बोलतेस? मी सांगतें तसें कर! पुत्रसुख तुझ्या नशिबीं आहे. तूं आपल्या नवऱ्याला एक सोनेरी मासा धरून आणायला सांग! त्या माशाचे सहा तुकडे करून एक तुकडा तूं खा, एक नवऱ्याला खायला सांग, एक आपल्या कुत्रीला व एक घोडीला खायला घाल आणि उरलेले दोन घराच्या दोन्ही बाजूला पुरून ठेव. राहील ना लक्षांत?" असें सांगून म्हातारी निघून गेली.

कोळिणीनें अगदीं तसेंच केलें. नवरा मासे धरायला निघाला तेव्हां त्याला सांगून एक सोनेरी मासा आणवला आणि त्याचे सहा तुकडे करून एक स्वतः खाल्ला, एक नवऱ्याला खायला सांगितला, एक कुत्रीला आणि एक घोडीला खायला घातला आणि उरलेले दोन घराच्या दोन्ही बाजूला पुरून ठेवले.




कांहीं काळ लोटल्यावर घराच्या दोन्ही बाजूला दोन झाडें उगविलीं. कुत्रीला दोन पिलें व घोडीला दोन शिंगरें झालीं आणि कोळिणीला एक जुळें झालें. दोघे मुलगेच होते. त्यांना मित्र व मकर अशीं नांवें ठेवण्यांत आलीं.

दोघे मुलगे रंगारूपानें अगदीं सारखे होते. फक्त निरनिराळ्या रंगाच्या कपड्यां-मुळेंच फरक कळत होता.

हळू हळू झाडें, कुत्र्याचीं पिलें व शिंगरें वाढूं लागलीं. जुळी भावंडें पण लहानाचीं मोठीं झालीं. तरुण वय त्यांना जगांत मोकळेपणीं हिंडावें व फिरावें असें वाटूं लागलें. परंतु एकाच वेळीं आईवडिलांनीं दोघांना बरोबर जाऊं दिलें नाहीं. तेव्हां मित्र धाकट्या भावाला म्हणाला- "माझ्या झाडावर जरा लक्ष ठेव. तें हिरवागार असेपर्यंत माझ्याविषयीं कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं. परंतु तें वाळूं लागलें कीं मी कोणत्यातरी संकटांत सांपडलों आहें असें समज आणि लगेच माझ्या शोधार्थ नीघ!" तो घोड्यावर बसून व कुत्रें बरोबर घेऊन निघाला.

मित्र बरेच दिवस प्रवास करीत राहा-ल्यावर एका मोठ्या शहरांत येऊन पोंचला. तें नगर राजधानीचें नगर होतें. तो एका म्हातारीच्या घरीं उतरला. त्यानें म्हातारीला त्या गांवची हकीगत विचारली.

"काय सांगूं बाळ या गांवची हकीगत! आमच्या राजाच्या मुलीचें नांव जगन्मोहिनी असें आहे. तिच्याशीं लग्न करण्याच्या हेतूनें कित्येक तरुण राजकुमार आले. पण राजानें त्या सर्वांना ठार करविलें." म्हातारी म्हणाली.

मित्रनें त्या म्हातारीच्या घरच्या खिडकीं-तून सहज राजवाड्याकडे पाहिलें आणि म्हणाला-"आपल्याला त्याच्याशीं काय करायचें आहे? मी गाणें म्हणतों, ऐकतां का आजी?" असें विचारून तंबुरा घेऊन तो गाणें म्हणूं लागला.

राजकुमारी जगन्मोहिनी, आपल्या महा-लाच्या खिडकीजवळ उभी राहून डोळे मिटून गाणें ऐकूं लागली. गाण्याच्या सुरांत ती देहभान विसरून गेली. गाणें संपतांच तिनें आपल्या नोकराला बोलावून विचारलें- "त्या म्हातारीच्या घरांत कोण गाणें म्हणतो आहे, माहीत आहे का तुला? जाऊन बोलावून आण त्याला."

राजकुमारीचा निरोप ऐकून मित्र राज-वाड्यांत गेला. त्याला पाहून जगन्मोहिनी मुग्ध झाली आणि आपल्या वडिलांना जाऊन म्हणाली "मी इतके दिवस ज्याच्याशीं लग्न करण्याचें मनाशीं ठरविलें होतें तो आला आहे."

"कोण आहे तो? पाठवून दे त्याला माझ्याकडे!" राजा म्हणाला.

मित्र राजाकडे गेला. राजा म्हणाला-"राजकन्या तुझ्याशीं लग्न करायचें म्हणते आहे. पण तूं तिच्या जोगा आहेस कीं नाहीं हें कसें ओळखायचें? मी सांगतो तें



केलं पाहिजेस. केलें नाहींस तर तुला फांशी देईन."

"मला तुमच्या मुलीशीं मुळीं लग्नच करायचें नाहीं." मित्र म्हणाला.

"बकबक बंद कर! राजकुमारीचा असा अपमान? ती लग्न करणार म्हणते आणि तूं नकार देतोस? कोण आहे रे तिकडे? पकडा याला आणि द्या फांशी!" राजा म्हणाला.

"नको नको! आपली आज्ञा असेल तसें करतों!" मित्र म्हणाला.

"तेव्हां राजाचा पारा थोडा उतरल्या-सारखा दिसला. मित्रला राजा एका मैदानांत



बोलावून घेऊन गेला. तेथें एक वाळकें ओणकें होतें तें दाखवून म्हणाला— "तलवारीचा एक वार करून याचे दोन तुकडे झाले पाहिजेत. केलेस तर राज-कन्येशीं तुझें लग्न होईल, आणि नाहीं तर फांशी देण्यांत येईल."

मित्र म्हातारीकडे गेला आणि गुपचूप एका बाजूला जाऊन बसला. तें पाहून म्हातारीनें त्याला विचारलें—"कायरे मुला, असा काय बसला आहेस?"

तेव्हां तो म्हणाला—"आज मला बरें नाहीं, आजी!"

त्याचें गाणें ऐकायला मिळेल म्हणून जगन्मोहिनी बराच वेळ आपल्या महालाच्या खिडकीजवळ वाट पहात बसून होती. परंतु तो गाणें म्हणत नाहीं हें पाहून ती स्वतः म्हातारीच्या घरीं गेली. "आज गाणें का नाहीं म्हटलेंस?" तिनें मित्रला विचारलें.

"तुझ्यामुळें मला उद्यां फांशीची शिक्षा मिळणार आहे. मग गाणें कसें सुचणार?" मित्र म्हणाला. नंतर राजा जें कांहीं म्हणाला होता तें सर्व त्यानें सांगितलें. राजकुमारीनें त्याला आपल्या डोक्याचा एक केस काढून दिला व म्हणाली—"तूं हा केस आपल्या तलवारीला गुंडाळून त्या ओणक्यावर घाव केलास तर एका घावांत त्या ओणक्याचे दोन तुकडे होतील."

मित्रला तें ऐकून आनंद वाटला व त्या आनंदांत त्यानें एक सुंदर गाणें म्हणून दाखविलें. राजकुमारी डोळे मिटून गाणें ऐकत होती.

दुसऱ्या दिवशीं मित्र मैदानांत गेला. राजकुमारीनें सांगितल्याप्रमाणें त्यानें तिच्या डोक्याचा केस तलवारीला गुंडाळून त्या ओणक्यावर वार केल्यावरोबर त्याचे दोन तुकडे झाले.

राजा तें पाहून म्हणाला—"शाबास! आतां आणखी एक काम कर! तूं घोड्यावर बसून दोन्ही हातांत दोन पाण्यानें भरलेलीं भांडीं धरून घोड्यावर फीर. एक थेंबभर देखील पाणी खालीं सांडलें तर तुला फांशी होईल.

मित्रनें जगन्मोहिनीकडे जाऊन तें सांगितलें व म्हणाला—"हीं अशक्य कामें सांगून राजानें मला ठार करण्याचें ठरविलेलें दिसत आहे."

तिनें आपल्या कानांतल्या कुड्या काढून दिल्या व म्हणाली—"मी नाहीं का तुला वांचवायला येथें? तुझ्यावर मी आपला जीव ओवाळून टाकीन. कांहीं भिण्याचें कारण नाहीं. या कुड्या प्रत्येक भांड्यांत टाकून ठेव. पाणी गोठून जाईल व एक थेंबभर देखील खालीं सांडणार नाहीं."

मित्रनें त्याप्रमाणें केलें व एक थेंबभर देखील पाणी सांडलें नाहीं.

"शाबास! हें कठीण काम देखील तूं करून दाखविलेंस आतां एक सोपेंसें काम सांगतो. उद्यां तुला एका पहिलवानाशीं कुस्ती खेळावी लागेल व त्याला जिंकावें लागेल. तूं त्याला पाडलेंस तर तुझें लग्न



राजकुमारीशीं करून देईन. नाहीं तर फांशीची शिक्षा!" राजा म्हणाला.

त्या दिवशीं रात्रीं मित्र आनंदांत तंबुऱ्यावर गाणें म्हणूं लागला. जगन्मोहिनी त्याच्याकडे आली व चकित होऊन विचारूं लागली—"आज खूष दिसतो आहेस?"

"उद्यां कोणाबरोबर तरी मला कुस्ती खेळावी लागेल. त्याला मी खात्रीनें पाडीन. मला खात्री आहे!" मित्र म्हणाला.

पण जगन्मोहिनी म्हणाली—"सर्वांत जास्त धोका या कुस्तींतच आहे. उद्यांची कुस्ती आणखी कोणाशीं नसून माझ्याशींच



आहे. उद्यां कुस्ती सुरू होण्यापूर्वी एक पेय मला प्यायला देतील. तें प्याल्यावर माझें अंग दगडासारखें टणक होईल व आकृती राक्षसासारखी भयंकर होईल. तूं पाहूनच घाबरून जाशील. हें मंत्रवलेलें पाणी मी तुला देतें. मी जवळ आलें म्हणजे तूं तें माझ्या अंगावर टाक. मी बेशुद्ध होऊन जाईन व माझ्या अंगांत शक्ति उरणार नाहीं. त्यावेळीं मला धरून जमिनीवर पाड."

मित्र त्याप्रमाणें दुसऱ्यादिवशीं तें मंत्रवलेलें पाणी घेऊन आखाड्यांत गेला. समोर दहाफूट उंच कोणीतरी राक्षस उभा दिसला. त्यानें तें पाणी त्याच्या अंगावर फेंकलें. तेव्हां घेरी आल्यासारखा तो खालीं पडणार एवढ्यांत मित्रनें त्याला धरून खालीं पाडलें.

"शाबास! मी आपल्या मुलीचें लग्न तुझ्याशीं करून द्यायला तयार आहें. उद्यांच चांगला मुहूर्त आहे." राजा म्हणाला.

पण मित्र जगन्मोहिनीशीं लग्नाला तयार नव्हता. म्हातारीला कांहीं कळविल्या-शिवाय तो पहाटे उठून घोड्यावर बसून व कुत्र्याला बरोबर घेऊन निघून गेला.

उजाडण्याच्या सुमारास तो दुसऱ्या राज्यांत जाऊन पोंचला. त्या राज्याची राजधानी समुद्रकांठीं होती. तो एका धर्मशाळेंत उतरला.

सकाळीं तो धर्मशाळेंतून बाहेर आला तेव्हां त्याला समुद्रकांठीं गर्दी दिसली. ते सर्व समुद्रालगतच्या एका डोंगरावर चढत होते. ते कोठें चालले आहेत व काय करीत आहेत हें पाहण्यासाठीं तो त्यांच्या पाठोपाठ घोड्यावर बसून निघाला.

त्याला त्या गर्दीत मधोमध एक राजकन्या दिसली. तिच्या हाताला एक सोन्याची सांखळी बांधलेली होती. ती सांखळी धरून लोक तिला नेत होते. डोंगरावरच एका जागीं तिला एकटीला बांधून ठेवून सर्व लोक निघून गेले.

मित्रनें राजकन्येचा उतरलेला चेहरा पाहिला. घोड्यावरून उतरून तो जवळ गेला. ती अप्रतीम सुंदर होती. "काय झालें? तुला एकटीला सोडून ते कां गेले? आणि तूं रडत कां आहेस?" त्यानें तिला विचारलें.

"समुद्रसर्पाला दरवर्षीं एका मुलीचा बळी द्यावा लागतो. या खेपेस माझी पाळी आहे. पण तूं येथें राहूं नकोस. पळून जा. नाहीं तर माझ्याबरोबर तुला देखील मरावें लागेल." राजकुमारी म्हणाली.

"मी नाहीं हलणार येथून तुला एकटीला येथें सोडून." मित्र म्हणाला. त्याला तिची दया आली होती. इतक्यांत एक मोठी लाट आली. ती बरोबर एक मोठा सांप घेत असलेला त्याला दिसला. त्यानें आपल्या कुत्र्याला त्याच्यावर सोडलें. कुत्र्यानें सांपाला तोंडांत धरलें. मित्र तलवार घेऊन सांपावर तुटून पडला. सांपानें आपला बचाव करण्याचा पुष्कळ यत्न केला. पण शेवटीं



कुत्र्यानें व मित्रनें दोघांनीं मिळून त्या सांपाला ठार केलें.

नंतर मित्रनें राजकन्येला बंधन मुक्त केलें व तिला आपल्या घोड्यावर बसवून घेऊन राजाकडे गेला. मित्रनें राजकन्येला कसें सोडवलें हें ऐकून राजानें खूष होऊन तिच्याशीं मित्रचें लग्न करून दिलें. मित्र घर जांवई होऊन तेथेंच राहूं लागला.

एकदां शिकारीला जावेंसें वाटलें त्याला. तेव्हां राजा म्हणाला—"शिकारीला जायचें असेल तर नोकरा चाकरांना बरोबर घेऊन जा. एकट्यानें जाऊं नकोस."



“मला नोकरांचाकरांची गरज नाहीं. मी एकटाच जाणार आहें.” तो म्हणाला. राजकन्येशीं लग्न झाल्यानंतर प्रत्येक कामाला नोकर हजर असलेला पाहून त्याला मुळींच आवडलें नाहीं. एकटें रहायला मिळेल या हेतूनेंच त्यानें शिकारीची गोष्ट काढली होती.

तो घोड्यावर बसून व आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन शिकारीला निघाला. कांहीं वेळानें त्याला तहान लागली. त्याला रानांत एका जागीं एक झोंपडी दिसली. त्या झोंपडीत एक म्हातारी होती. ती एक जादुगारीण आहे हें त्याला माहीत नव्हतें. त्यानें तिच्याकडे प्यायला पाणी मागितलें.

“तुझें कुत्रें पाहून मला भीति वाटते. मी एकदां आपला चाबूक उगारून पाहातें.” जादुगारीण म्हणाली.

ती एक हिरव्यारंगाचा चाबूक घेऊन आली व तिनें त्या चाबकानें कुत्र्याला मारलें. कुत्रा जागच्या जागीं दगड होऊन गेला. नंतर तिनें तो चाबूक घोड्याला व मित्रला मारला. ते पण दगड होऊन गेले. जादुगारीण हंसत झोंपडींत निघून गेली.

मित्र दगड होऊन गेल्याबरोबर त्याच्या घरांतल्या अंगणांतलें एक झाड वाळूं लागलें. तें पाहून मकरला भावावर संकट आल्याचें कळलें. तो आपला कुत्रा घेऊन घोड्यावर बसून निघाला.

पुष्कळ दिवस प्रवास केल्यावर तो समुद्रकाठच्या त्या धर्मशाळेंत येऊन पोंचला. धर्मशाळेचा मालक म्हणाला—“राजकन्येशीं आपला विवाह झाला त्या वेळीं मी हजर राहूं शकलों नाहीं. या बद्दल माफ करा. मी आपलें अभिनंदन करतों.”

त्यावरून मकरला कळलें कीं आपल्यालाच चुकीनें मित्र समजून तो बोलत आहे.



नंतर भावाचें लग्न झालें आहे हें देखील त्याला कळलें. तो एवढेंच म्हणाला—“अभिनंदन बोलवून दाखवायचें नसतें.” असें सांगून तो राजवाड्यांत गेला.

त्याला पाहतांच राजा पुढें येऊन म्हणाला—“कोठें गेला होतास बाबा इतके दिवस? तुझ्यावर संकट ओढवलें कीं काय या काळजींत होतों आम्ही!” मकरला मित्र समजून तो तें बोलत होता, हें उघड होतें.

राजकन्येनें तीच चूक केली. ती म्हणाली—“आम्हांला किती काळजी वाटत होती तुमची!” परंतु मकर तिच्याकडे अनोळखी माणसासारखा पहात राहिला व कांहीं वेळानें त्यानें आपलें तोंड फिरविलें. तें पाहून मित्रची बायको रडत निघून गेली.

त्या दिवशीं रात्रीं मकर राजवाड्यांत न राहतां धर्मशाळेंतच राहायला निघून गेला. भाऊ शिकारीला गेला होता एवढेंच त्याला कळलें होतें. म्हणून सकाळीं उजाडल्याबरोबर उठून तो घोड्यावर बसून व कुत्र्याला बरोबर घेऊन निघाला. तो त्या जादुगारणीच्या झोंपडीजवळ येऊन पोंचला. झोंपडी बाहेर त्याला त्याचा भाऊ, घोडा व



कुत्रा दगडाच्या मूर्ती होऊन पडलेले दिसले. तो सरळ झोंपडींत शिरला व म्हातारीचा गळा आंवळून म्हणाला—“माझ्या भावाला जिवंत करतेस कीं नाहीं?”

“तुझ्या कुत्र्याला पाहून भीति वाटते मला. प्रथम मी त्याच्यावर चाबूक उगारून पाहातें नंतर मी तुझ्या भावाला जिवंत करीन.” ती म्हणाली.

मकरनें कुत्र्याला छू केल्याबरोबर कुत्र्यानें जाऊन म्हातारीला धरलें. तेव्हां म्हातारी म्हणाली—“तूं कुत्र्याला बोलव. मी तुझ्या भावाला जिवंत करतें.”



"काय करायचें तें मला सांग! नाहीं तर माझा कुत्रा तुला जिवंत फाडून खाईल!" मकर म्हणाला.

"माझ्याकडे दोन चाबूक आहेत, एक हिरवा आणि एक तांबडा. हिरव्या चाबकानें मारलें तर मार बसल्याबरोबर जिवंत प्राणी दगड होऊन जातो. तांबड्या चाबकानें मारलें कीं दगड होऊन गेलेला प्राणी जिवंत होतो." म्हातारी म्हणाली.

मकरनें तांबडा चाबूक उचलून भाऊ, घोडा व कुत्रा यांना मारलें. तिघे जिवंत झाले. मकरनें 'म्हातारीला खाऊन टाक.' म्हणून कुत्र्याला सांगितल्याबरोबर कुत्र्यानें म्हातारीला ठार करून खाऊन टाकलें.

दोघे भाऊ घोड्यावर बसून राजवाड्यांत आले. मकरला स्मित करीत असलेला पाहून मित्रनें विचारलें—"कां रे हंसतो आहेस?"

"कांहीं नाहीं, तुझा सासरा व बायको मी तूंच म्हणून माझ्याशीं वागले व बोलले." मकर म्हणाला.

तें ऐकून मित्रला राग आला. त्यानें तलवारीनें तत्काळ आपल्या भावाला ठार केलें. तो मकरचें प्रेत वाटेंतच टाकून राजवाड्यांत निघून गेला. त्याची बायको भीत भीत त्याच्या जवळ आली. ती जवळ आली तेव्हां तिचे डोळे रडून रडून लाल झालेले त्याला दिसले. "काय झालें रडायला तुला?" तिनें विचारलें.

"रडूं नाहीं तर काय हंसूं? तुम्ही डोळे वटारून माझ्याकडे पहात राहलांत व एक शब्ददेखील बोललां नाहीत. रागारागानें निघून गेलांत. तेव्हांपासून रडते आहें." राजकुमारी म्हणाली.

मित्रला कळलें कीं मकरच्या व्यवहारांत गैर वर्तन असें कांहीं नव्हतें. अशा भावाला आपण अविचारानें ठार केलें या बद्दल त्याला

फार वाईट वाटले. तो बायकोला घेऊन मकरचें प्रेत पडले होतें तेथें गेला. मकरचा घोडा व कुत्रा रखवाली करीत तेथें उभे होते. मित्रनें तांबडा चाबूक मारल्याबरोबर मकर झोपेंतून जागा झाल्यासारखा उठून उभा राहिला. म्हणाला "मला एका एकीं हें काय झालें? मी घोड्यावरून खालीं पडलो होतो का?"

"नाहीं. मीच तुला ठार केलें होतें. मला तुझ्यावर संशय आला व त्या रागांत मी तो मूर्खपणा केला. मला माफ कर!" मित्र म्हणाला.

तिघे मिळून राजवाड्यांत आले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मित्र मकरला म्हणाला— "तूं देखील लग्न करून घे!"

"मी करायला तयार आहें, पण माझ्याशीं लग्न करायला कोण तयार होणार?" मकरनें विचारलें.

"तुझ्याशीं लग्न करायला एक स्त्री तयार आहे." असें सांगून त्यानें त्याला जगन्मोहिनीची गोष्ट सांगितली आणि त्याला तिच्या देशाचें नांव सांगून निरोप दिला.

मकरला पाहून जगन्मोहिनीनें विचारलें— "सर्व परीक्षा बाबांनी घेतल्या व त्यांतून तुम्ही सुटलांत. आतां लग्न होणार म्हणून त्या आनंदांत मी रात्रीं झोपलें. सकाळीं पाहातें तर तुम्ही नाहींसे झालेले."

"मी मित्र नसून त्याचा भाऊ मकर आहें." मकर म्हणाला.

"मी तुझ्या रूपावर व गाण्यावर भाळलें होतें. तुझ्या नांवावर नाहीं." जगन्मोहिनी म्हणाली.

त्या दोघांचा लग्न समारंभ थाटामाटानें झाला. दोघे भाऊ आपापल्या सासुरवाडी सुखानें राहूं लागले.





# भुतांची मैत्री

आनंदकडे डोंगरानजीक थोडी जमीन होती. ती छान सुपीक होती. छान पीक येई त्याच्या शेतांत. परंतु त्याच्या शेतांत भुतांची भीति होती. कोणी तेथें पाहाऱ्याला रहायला तयार नव्हता.

रात्रीं "आणखी एक, आणखी एक" असें तालसुरांत गाणें ऐकूं येई. मधून मधून पुसट कोणी तरी चालत असल्याचा भास होई. म्हणून त्या बाजूला काळोख पडल्यावर कोणी फिरकत नसे. अर्थातच शेत ओसाड पडलें.

आनंदनें शेत विकून टाकायचें ठरविलें. तेथें भुतें राहतात हें गांवकऱ्यांना माहीत असल्यामुळें कोणी तें शेत विकत घ्यायला पुढें येईना. बाहेर गांवचा मनुष्यच कदाचित विकत घेईल असा विचार करून त्यानें गांवकऱ्यांना सांगितलें कीं कोणी शेत घ्यायला आला तर त्याला हें गुपित कोणी सांगूं नये.

पुष्कळ दिवसांनीं शेत विकत घ्यायला एक जण आला. त्याचें नांव चंद्रहास असें होतें. दूरच्या गांवचा तो एक श्रीमंत गृहस्थ होता. त्यानें भावाकडून आपला वांटा मागून घेतला होता. त्याच्या वांट्यांत त्याला एक लाख रुपये मिळाले होते. शेत विकत घेऊन एक टुमदार घर बांधून तेथें राहण्याचा त्याचा विचार होता. शेतकीची माहिती असलेला मनुष्य त्या शेतांतून सोनें काढूं शकला असता एवढी सुपीक होती ती जमीन. म्हणून चंद्रहासनें त्याला विचारलें—"इतकी चांगली जमीन असून तुम्ही इतके दिवस ती पडीत कां सोडून दिलीत?"

आनंद म्हणाला—"गांवापासून इतकी दूर राखण कोण करणार? तेथेंच घर बांधून राहाणाराला शक्य आहे.

"चंद्रहासनें पन्नास हजाराला ती जमीन विकत घेतली. तेथें एक घर बांधून सुमुहूर्ता-वर गृहप्रवेश केला. नंतर त्यानें शेत नांग-रून पेरणी केली. पीक तयार झाल्यावर त्यानें राखण करण्यासाठीं कोणाला तरी नेमावें म्हणून विचार केला तेव्हां त्याला खरें गुपित कळलें.

"दिवसभर वाटेल तें काम करून घ्या. रात्रीं नाहीं राहणार कोणी शेतावर!" प्रत्येक जण म्हणे. राखण करणें सुद्धां आवश्यक होतें. रानटी डुकरें व इतर जनावरें येऊन नासधूस करतील ही भीति होती. तो फसला होता. तें शेत विकत घेऊन व घर बांधून त्यानें त्यांत आपले सर्व पैसे अडकविले होते. कोणाशीं भांडण करण्यांत कांहीं हंशील नव्हतें. म्हणून त्यानें भुतांशींच मैत्री करून शेतावर आपला ताबा करून घेण्याचें ठरविलें.



चंद्रहास स्वतः एक माचें बांधून त्यावर बसून राखण करूं लागला. मध्यरात्रीच्या सुमारास "आणखी एक, आणखी एक" चा आवाज ऐकूं आला व कांहीं आकृतींची हाल चाल चालू असल्याचा भास झाला. शंभरावर भुतें शेतांत शिरल्याचें त्यानें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलें. त्यांचें ताला-सुरावर नृत्य चालू होतें. नंतर "पुरे आतां जाऊं या!" चा आवाज ऐकूं आला आणि सर्व भुतें एकेक करून डोंगरावर चढून निघून गेलीं.

चंद्रहासनें अनेक दिवस तें दृश्य पाहिलें. सुरवातीला तो भुतांना पाहून भ्याला, पण हळू हळू भुतांचें भय त्याच्या मनांतून पार नाहींसें झालें.